ग्रंथसंपादक व प्रसारक मंडळीची ग्रंथमाला.

ग्रंथ ३० वा.

# अबलोन्नतिलेखमाला

## समग्र.

लेखक

रा. बा. चिंतामण विनायक वैद्य

एम्. ए., एल्एल्. बी.

माजी चीफ जस्टिस ग्वाल्हेर संस्थान.

प्रकाशक

दामोदर सांवळाराम आणि मंडळी,

बडोदें व मुंबई.

सन १९०६ ई.

इंदुप्रकाश छापखान्यांत छापिली.

किंमत १॥ रु.

## अर्पण पत्रिका.

सकलगुणसंपन्न,

श्रीमन्मातोश्री सौ. चिमणाबाई
महाराणी साहेब गायकवाड,

सी. आय.,

यांस,

त्यांचे ठायीं असलेलें प्रजावात्सल्य, विद्याभिरुचि,

स्त्रीशिक्षणाविषयीं उत्सुकता,

इत्यादि गुणांच्या

स्मरणार्थ

त्यांच्या परवानगीनें

हें पुस्तक मोठ्या प्रेमानें व नम्रतेनें

अर्पण केलें असे.

# प्रस्तावना.

अबलोन्नतिलेखमालेच्या फुटकळ लेखांचें एके ठिकाणीं ग्रथन केलें असतां वाचकांस बराच फायदा होईल असें वाटल्यावरून सदर लेखांची एकत्र केलेली ही दुसरी आवृत्ति काढिली आहे. माझी प्रथम पत्नी सौ० सगुणाबाई सन १८८८ सालीं अल्प वयांत वारल्यामुळें माझ्या उद्विग्न झालेल्या अंतःकरणांत हिंदु स्त्रियांची प्रशंसनीय सुशीलता कायम राहून त्यांची वैवाहिक उन्नति कशी होईल याविषया-संबंधानें विचार उत्पन्न झाले व त्यावेळेस जे निरनिराळ्या समाजांच्या इतिहासांचें परिशीलन व मनन मीं केलें त्याचा निष्कर्ष-समाजापुढें "अबलोन्नतिलेखमाला" या रूपानें ठेविला गेला. पहिले चार लेख (१ सामाजिक सुधारणेचा इतिहास व मार्ग, २ विवाहाची उत्क्रांति, ३ बालविवाहाचा इतिहास व गुणदोष ४ बालविवाह शास्त्रसंमत नाहीं,) सन १८८९ व सन १८९० सालीं केसरी पत्राबरोबर पुरवणी रूपानें फुकट वाटले गेले. पुढचा पांचवा व साहवा लेख विधवा संबंधानें असून त्यांत अक्षतयोनीविधवाविवाह करण्याजोगा आहे असें मत मी प्रतिपादन केलें आहे. कदाचित् यामुळें ह्मणा, किंवा अन्यकारणामुळें ह्मणा, तो लेख केसरीकारांजवळ चार पांच वर्षे पडून राहिला. तेव्हां तो लेख सन १८९५ त नेटिव ओपिनियन पत्राबरोबर वाटला गेला. यानंतरचा सातवा व "प्रस्तुत कोणती सुधारणा शक्य आहे" याविषयावरचा लेख ही नेटिव ओपियन पत्राबरोबर प्रसिद्ध झाला. याच विषयाला जोडून स्त्रीशिक्षणावर लेख लिहिण्याचे मीं योजिलें होतें. तो लेख फार उशीरा ह्मणजे सन १९०४ च्या डिसेंबर अखेर

मुंबईत 'सोशल कॉनफरन्स' झाली त्यावेळेस इंदुप्रकाशपत्राबरोबर पुरवणी रूपानें फुकट प्रसिद्ध झाला. हल्लीं रा. रा. दामोदर सांवळाराम आणि मंडळी यांच्या साहाय्यानें सर्व लेखाचा एकत्र ग्रंथ प्रसिद्ध होत आहे. याप्रमाणें या लेखाच्या पहिल्या व दुसऱ्या आवृत्तीची हकीकत आहे.

सामाजिक सुधारणे संबंधानें सन १८९०: पासून स. १९०५ पावेतो च्या १५।१६ वर्षांत लोकांत काय प्रगती झाली याचा विचार केला तर बालविवाहाची अनेक कारणांनीं खरोखर सुधारणा झाली आहे, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. पूर्वी १० वर्षाच्या आंत बहुधा मुलींचीं लग्नें होत असून १० वर्षांवरच्या अविवाहित मुली थोड्या दिसत असत; हल्लीं १० वर्षांच्या आंतल्या विवाहित मुली थोड्या असून बहुधा बारावर्षाच्या सुमारास मुलींचीं लग्नें होतात. या स्थितीचा बारकाईनें विचार केला असतां मला वाटतें कीं, हल्लींची स्थिती कांहीं बाबतींत पूर्वीपेक्षां शोचनीय आहे. मुलींनां थोडें बहुत समजूं लागल्यावर त्यांच्या लग्नाची चर्चा होणें, मुली पाहणें, व नाकारणें, हें अपरिहार्य असल्यामुळें दोन तीन वर्षें लग्नाची काळजी मुलींनां त्यांच्या वाढीच्या वेळीं लागते. त्यामुळें त्यांच्या शरीरप्रकृतीवर अनिष्ट परिणाम होतो असें बारीक रीतीनें पाहिलें तर दृष्टीस पडेल. हा विषय यापेक्षां जास्ती या प्रस्तावनेंत वाढवितां येत नाहीं; इतकेंच सांगणें पुरें आहे कीं, जोंपर्यंत ऋतुप्राप्तीनंतर लग्न करण्याचा प्रघात सुरू होणार नाहीं, तोंपर्यंत या संबंधांत खरी सुधारणा झाली असें ह्मणतां येणार नाहीं. विधवाविवाहासंबंधानें पाहतां अद्याप विशेष पाउल पुढें पडलें

नाहीं. अक्षतयोनिविधवाविवाहाचाच अभिमान जर सुधारक पहिल्यापासून धरते तर चांगलें झालें असतें. माझा पांचवा लेख लोकांसमोर वेळेवर आला असता, तर कदाचित् ही दिशा लागली असती, असें स्वमतप्रशंसेच्या भरांत कधीं कधीं मला वाटतें. कांहीं असो, एकंदर विधवाविवाह व अक्षतयोनिविधवाविवाह यांची भेसळ पहिल्यापासून ह्मणजे पुण्याच्या वादापासून झाल्यामुळें अद्याप लोकविरोधांत कांहीं कमीपणा आला आहे असें दिसत नाहीं. राहिलें स्त्रीशिक्षण, त्यांत बरेंच पाऊल पुढें पडलें आहे, तथापि तें गर्व करण्यासारखें नाहीं असें ह्मटलें पाहिजे.

आपल्या कुटुंबांत प्रौढविवाहाचें प्रत्यक्ष आचरण करून व आपल्या संस्थानांत बालविवाहप्रतिबंधक कायदा अमलांत आणून श्रीमंत सयाजीराव गायकवाड यांनीं बालविवाहाचे सुधारणेस मोठा हातभार लाविला आहे यांत संशय नाहीं. तसेंच श्रीमंत सौ० चिमणाबाई महाराणीसाहेब ह्याहीं पतीशीं तादात्म्य होऊन जाणाऱ्या हिंदुस्त्रियांच्या सद्वृत्तीस अनुरूप हिंदुस्त्रियांच्या उन्नतीकरितां मनोभावें झटतात हे सुप्रसिद्ध आहे. या लेखांची एकत्र ग्रथित केलेली माला त्यांस अर्पण करण्याविषयीं त्यांणीं उदार अंतःकरणानें परवानगी दिल्याबद्दल त्यांचें आभार मानून, ही त्यांणीं स्वीकारिलेली अबलोन्नतिलेखमाला आपला इच्छित हेतु साध्य करण्यास कांहीं तरी अंशानें कारणीभूत होवो अशी जगन्नियंत्यापाशीं प्रार्थना आहे.

**मुंबई, मे १९०६.** **चिं० वि० वैद्य.**

# अनुक्रमणिका.

# अबलोन्नतिलेखमाला.

## लेख पहिला.

### हिंदुस्थानांतील सामाजिक सुधारणेसंबंधाच्या खट-पटींचा वृत्तांत व सामाजिक सुधारणा सिद्धीस नेण्याचे योग्य उपाय.

सामाजिक सुधारणारूपी खडकावर आजपर्यंत कित्येक धाडशी सुधारकांचीं गलबतें आपटून चकाचूर झालीं आहेत, ह्मणून अशा महत्वाच्या विषयावर मजसारख्या अप्रसिद्ध आणि अल्पमति मनुष्यानें पुढें होऊन चर्चा करूं लागणें हें थोडेंसें धाडसच समजावयाचें. ह्या सुधारकांपैकीं अगदीं अलीकडील व प्रमुख गृहस्थ मलबारी ह्यांनीं बालविवाह आणि असंमतवैधव्य ह्या विषयांवर कंठशोष करून आपली शिकस्त केली. तथापि आपल्या पूर्वपद्धतींत तिळभरही फेरफार झाला नाहीं, हें सर्वांस विदितच आहे, आणि हे सर्व यत्न वृथा होण्याचें अपयश कांहीं अंशीं आपल्याकडेही येतें हें कबूल केलें पाहिजे. तरी ज्या माहात्म्यांनीं आपला वेळ आणि उत्साह हीं ह्या यशहीन कामांत खर्चीं घातलीं आहेत, त्यांस योग्य सन्मान देऊन व त्यांचे आभार मानून मी असें प्रतिपादन करणार आहें कीं, आजपर्यंत सामाजिक सुधारणा करण्याविषयीं ज्या ज्या कल्पना निघाल्या व त्या सिद्धीस नेण्याकरितां जे जे प्रयत्न झाले त्यांत बऱ्याच चुका झाल्या आहेत. कालांतरानें आणि शिक्षणप्रसारानें ह्याच सुधारणा पुढें कोणत्या तरी वेळीं आपोआप किंवा

अल्पश्रमानें होतील, परंतु तसें होण्यास आजपर्यंतचा काळ तितका अनुकूळ नव्हता; याकरितां सामाजिक सुधारणे-संबंधानें आजपर्यंत काय काय उद्योग करण्यांत आले आहेत व त्यांचा काय परिणाम झाला, सुधारकांचा प्रयत्न निष्फळ होण्यास काय कारणें झालीं, हें सागणें येथें अप्रस्तुत होईल असें नाहीं. इंग्रजी शिक्षणाचा फैलाव झाल्यापासूनच हल्लीं ज्यास आपण सामाजिक सुधारणा म्हणतों तो विषय उपस्थित झाला व तत्संबंधीं चर्चा होऊं लागली, हें कोणीही कबूल करील. इंग्रजी अंमल हिंदुस्थानांत झाला तेव्हां जी आमची सामाजिक स्थिति होती, ती ते येण्यापूर्वी कित्येक शतकांपासून दृढ झालेली होती. हिंदुस्थानचा इतिहास अगदीं गडप होऊन त्याची माहिती नाहींशी झाली आहे, तरी खिस्ती शक चालू होण्यापूर्वींच आर्य लोकांचें आर्यत्व व त्यांचा उत्कर्ष ह्या दोहोंचाही ऱ्हास होऊं लागला होता, हें खात्रीनें सांगतां येईल. स्त्रियांस अशिक्षित ठेवीत असत; व त्या पुरुषापेक्षां कमी योग्यतेच्या आणि निसर्गतः कुमा-र्गाकडे प्रवृत्त होणाऱ्या, असा त्यांजवर आक्षेप असे; स्त्री-स्वातंत्र्याचा लोकांस अतिशय तिटकारा असे व तें त्यांस ईश्वरानेंच दिलें नाहीं असा समज असे; कन्या ह्मणजे कुलकलंक आणि कुलविध्वंसक अशा समजुतीनें बालपणींच कोठें कोठें त्यांचा घात करीत; लग्नसंबंध ह्मणजे काय ह्याचें स्वरूप थोडेंसुद्धां त्यांचे लक्षांत येऊं लागण्यापूर्वी लग्नबंधनांत त्यांस जखडून टाकीत; विधवांस आपल्या मृतपतीबरोबर सहगमन करावें लागे, नाहीं तर पूर्वजन्मीं केलेलें घोर पातक ह्या जन्मीं फेडण्याकरितां आमरण संन्यास-

व्रत धारण करून रहावें लागत असे. अशी ही हिंदु स्त्रियांची खेदकारक स्थिति इंग्रजी राज्याचा आरंभ होण्याचे वेळीं हिंदुस्थानांत होती; आणि ती निदान दोन हजार वर्षांपूर्वीपासून चालत आली असली पाहिजे; कारण तीं इतकी हाडास खिळली आहे कीं, तींत सुधारणा करण्याचे सुधारकांचे भगीरथ प्रयत्नही व्यर्थ जातात. बौद्धधर्म ह्मणजे मुख्यत्वें जातिभेद आणि ब्रह्मकर्मादि आचार ह्यांविरुद्ध मात्र बंड समजलें पाहिजे, ह्यामुळें त्यांत स्त्रियांच्या स्थितीविषयीं कोठें फारसा विचार ( हिंदुधर्मानिराळा ) केलेला नाहीं. जैन धर्मांत लग्नपद्धति वगैरे हिंदुधर्मांतीलच कायम ठेविल्या आहेत. नाहीं ह्मणण्यास त्यांचे जातींत स्त्रियांस गोसाविणी होऊन राहण्याची मोकळीक आहे, परंतु ती चाल ह्मणजे आमच्यांतील विधवांच्या संन्यासव्रताच्याच तोडीची आहे. पुढें मुसलमानांनीं स्वाऱ्या करून हा देश जिंकला. त्यांची स्त्रियांस वागविण्याची रीति काय विचारावी? याहूनही पशुतुल्य! ह्यामुळें त्यांच्यापासून फायदा तर कांहींच नाहीं, परंतु हिंदु स्त्रियांची स्थिति विशेष शोचनीय झाली व त्यांच्या तत्कालीन दुःखमालिकेंत एकांतवासांत राहण्याच्या पीडेची आणखी भर पडली. पुढें पेशव्यांच्या कारकीर्दीत पुनः ब्राह्मणांचें वर्चस्व झालें. तें किती घटकांचें होतें हें आपणांस माहीत आहेच, व त्यांत स्त्रियांच्या स्थितीची सुधारणा बिलकुल झाली नाहीं. काय झालें तें हेंच कीं, स्नान, संध्या, देवतार्चन, यज्ञ, लग्नसमारंभ वगैरे कर्मांचा मात्र बडेजाव वाढून तीं पुष्कळ खर्चानें होऊं लागलीं. याप्रमाणें ब्राम्हण व त्यांचे अनुयायी ह्यांचें पारतंत्र्यविमोचन

होऊन त्यांचे हातीं राजसत्ता आल्यासारखें झालें, एवढ्या गोष्टींपलीकडे कांहींच झालें नाहीं. कित्येकांचें ह्मणणें असेल कीं, मराठी राज्य स्थापन झाल्याकारणानें राजकीय हित व सुधारणा होऊन अर्थातच सामाजिक सुधारणाही झाली आहे, परंतु ह्या ह्मणण्यांत मला तर कांहींच तथ्य दिसत नाहीं. पाश्चात्य शिक्षणाच्या सामर्थ्यानें आणि त्याचा प्रसार होऊं लागल्यापासून मात्र हिंदू लोकांच्या समजुतींत सुधारणा होऊन स्त्रियांस सामाजिक विषयांत पुरुषासारखेच हक्क असावे, असें वाटूं लागलें आहे.

हिंदुस्थानांत ज्या अनेक जाति व धर्म आहेत त्यांत व लोकांच्या चालीरीतींत हात घालावयाचा नाहीं, असा इंग्रज-सरकारचा मोठा शहाणपणाचा निश्चय आहे. लॉर्ड विल्यम बेंटिंक ह्यानें सती, बालहत्या वगैरे धर्माच्या निमित्तानें होणारे फौजदारी गुन्हे अगदीं नाहींतसे केले, तरी एकंदरींत ही मोठी आनंदाची गोष्ट आहे कीं सामाजिक कामांत हात घालण्याचा वरील निश्चय इंग्रजसरकारनें आजपर्यंत कायम ठेविला आहे. सामाजिक सुधारणा जुलमानें करावयाची नाहीं हा निश्चय जरी सरकारास राजनीतीला अनुसरून करावा लागला आहे, तरी आपल्या प्रजेचें कल्याण करणें हें परोपकारी राष्ट्रास उचित असल्यामुळें तें करण्याकरितां हिंदुस्थानांतील अनेक लोकांस उच्च प्रतीच्या आणि प्राथमिक शिक्षणाचें अमृत पाजून त्यांची सुधारणा त्यांजकडूनच करवावी असा आमच्या सरकारचा उदार हेतु आहे. शिक्षणाचा अद्भुत प्रताप अथवा दुसऱ्या अर्थी मानवी मनांत नव्या नव्या विचारपद्धति येणें, नवीन संस्थांची माहिती

होणें, सृष्टीचे नवीन देखावे पहाणें, ह्यांच्या योगानें शास्त्र, समाज आणि राज्यव्यवस्था ह्यांत मोठमोठे फेरफार झाले आहेत. असें हें शिक्षण प्राप्त होऊन लोक जी आपखुशीनेंच सुधारणा करतील ती जुलमानें केलेल्या बाह्यात्कारी सुधारणेपेक्षां फार हितावह होईल. वर सांगितल्याप्रमाणें नवीन विचार, नवीन प्रदेशांचे शोध, व त्यांतील अद्भुत चमत्कारांची माहिती ह्यांच्या योगानें कशा उलाढाली झाल्या आहेत, त्यांचीं उदाहरणें इतिहासांत शतशः सांपडतील. रोमच्या धर्ममतांत सृष्टिरचना आणि सृष्टीचा आकार ह्यांसंबंधीं कांहीं वेडगळ समजुती असत, त्या अमेरिकाखंडाचा शोध लागल्यापासून सहजगत्याच उघडकीस येऊन नाहींशा झाल्या; ग्रीक आणि लॅटिन ह्या भाषांचें व त्यांतील ग्रंथांचें पुनरुज्जीवन झाल्यामुळें रोमन क्याथोलिक धर्म बहुतेक डबघाईस आला; मानवी जातीचें महत्व, व त्यांचे सर्वांचे समान हक्क, राजसत्ता काय कारणानें निर्माण होते आणि ती राजाला कां प्राप्त झाली आहे, कर बसविण्याचीं मूळ कारणें काय, संपत्ति म्हणजे काय, तिची मूळ उत्पत्ति कशी, ह्या विषयांवर ह्यूम, लॉक, व्हाल्टियर, रूसो, ॲडामस्मिथ वगैरे मंडळीनें ज्या चर्चा चालविल्या होत्या त्यांचेच योगानें फ्रान्स देशाची राज्यक्रांति जगांत गाजली—ज्या राज्यक्रांतीचे योगानें एका फ्रान्सांतीलच नव्हे तर साऱ्या यूरोप खंडांतील समाज आणि राज्यव्यवस्था यांतील जुन्या आणि जुलमी चाली पार नाहींतशा झाल्या. तसेंच शास्त्रांविषयीं घ्या. पृथ्वींतील मनुष्यांच्या मूळ जाती अमेरिकन, आफ्रिकन, एशियाटिक आणि पालीनीशियन ह्यांचें अधिक ज्ञान झा-

त्यानें व त्यांच्या धर्माच्या समजुती, सामाजिक चाली व स्वभाव यांचीही विशेष माहिती झाल्यानें जगाची उत्पत्ति कशी झाली व त्यांत कशी सुधारणा होत गेली, ह्यासंबंधीं आपले विचार फार वाढले आहेत, आणि कित्येक विषयांत तर आपल्या नेहमींच्या समजुती आणि कल्पना अगदीं बदलल्या आहेत.* आपल्या हिंदूलोकांच्या मनाची स्थिति अशी होती कीं, वेद म्हणजे काय ते सर्व प्रकारच्या ज्ञानांनीं परिपूर्ण भरलेलें भांडार आहेत, असें ते समजत, व वेदांच्या आधारानेंच लिहिलेलीं जीं षड्दर्शनें आहेत त्यांत सांगितलेल्या अनेक युक्तिवादांच्या विचारांत ते आपला वेळ घालवीत असत; ह्यामुळें वेदाव्यतिरिक्त कोणत्याही नव्या विषयाचा स्वतंत्र रीतीनें विचार करणें त्यांच्या कधीं स्वप्नींही आलें नाहीं. अशा स्थितींत पाश्चात्य शिक्षण इकडे आलें. त्यांतील विचार करण्याची पद्धति ह्मणजे केवळ जुन्या गोष्टींवर भरंवसा न ठेवितां जी गोष्ट प्रमाणानें सिद्ध करितां येते ती खरी मानावयाची--तसेंच त्यांचा सुधारलेला धर्म व नवीन शोधांनीं परिपूर्ण भरलेलीं शास्त्रें हीं पाहून विजेनें जसे डोळे दिपावे तद्वत् त्यांचीं मनें आश्चर्यानें थक्क झालीं. गहन विषय त्यांचे पुढें येऊं लागले; शेंकडों विचारणीय पदार्थ आणि सृष्ट चमत्कार त्यांस कळूं लागले आणि धार्मिक व सामाजिक सुधारणा-ज्यांविषयीं पूर्वीं त्यांच्या

---

*उदाहरणार्थ-आपल्यांत असें समजलें जातें कीं पुत्र व माता ह्यांचा संबंध होणें मनुष्यस्वभावाविरुद्ध आहे; परंतु अशा जाति सृष्टीवर आढळल्या आहेत कीं त्यांच्यांत हा व्यवहार चालू आहे इतकेंच नाहीं, तर त्यांस तो निंद्यही वाटत नाहीं!

मनांत कधीं कल्पनाही आली नसेल त्या केल्या असतां हो-ण्यासारख्या आहेत असें वाटूं लागलें. नवीन शोधांतील असे चमत्कार पाहून आपल्या लोकांचीं मनें सानंदाश्चर्यानें थक्क होऊन नव्या विचारांत गढून गेलीं. पहिल्या हर्षलहरींत तर प्रत्येक पाश्चात्य तऱ्हा प्रिय वाटूं लागली; त्यांचे पोषाख उत्तम वाटूं लागले. त्यांच्या हौशी आवडूं लागल्या; त्यांच्या सामाजिक चालींचें अनुकरण आपले लोक मोठ्या प्रेमानें करूं लागले; आणि त्या चालींबरोबर त्यांच्यांतील कांहीं दोषही आमच्यांत शिरले. इतकेंच नाहीं, तर त्यांचा अंगी-कार करण्यांतही आह्मांस एक प्रकारचें भूषण वाटूं लागलें. निराकार ईश्वर आणि निसर्गप्रधान धर्म लोकांस प्रिय वाटूं लागले, व जिकडे तिकडे लोक धर्मसुधारणेच्या मागें लागले. विचारशून्य लोकांनीं तर बाप्तिस्मा घेतला; धाडशी आणि हिंमतवान् लोकांनीं आपणा स्वतःकरितां नवीनच धर्मपंथ काढिले; व विचारशील आणि दूरदर्शी लोकांनीं आपल्या वडिलोपार्जित धर्माचीच सुधारणा करण्याचें मनांत आणिलें. स्त्रियांच्या दुर्दशेची लोकांस मोठी कींव आली, व त्यांचें व्यवहारांतील दुःख व लग्नसंबंधीं पराधीनता विपरीत वाटूं लागून हीं दुःखें नाहींशीं करण्याकडे लोकांचें चित्त वेधलें. एकीकडे कांहीं अरण्यपंडित मंडळी फार दिवस अंधार-कोठडींत कोंडलेल्या आपल्या बायकामुलींस घेऊन बाहेरची मोकळी हवा खाण्यास उघडपणें जाऊं लागली. दुसरीकडे कांहीं मंडळी स्त्रीशिक्षण देण्याचे खटपटीस लागली, व कांहीं त्यांच्या लग्नाच्या चालीरीतींत फेरफार करण्याकडे गुंतली. सरशेवटीं परंतु तितक्याच हिंमतीनें हिंदुस्थानांतील

लोक समान राजकीय हक्क मिळविण्याचे खटपटींत, देश-स्थिति सुधारण्याचे खटपटींत, कायदेकौन्सिलांत मेंबर निवडण्याचा अधिकार मिळविण्याचे खटपटींत, लोकनियुक्त राज्यव्यवस्था करण्याचे खटपटींत, सारांश ज्या संस्थांपासून होणारा फायदा सुधारलेल्या परराष्ट्राच्यां . अमलाखालीं योग्य कालांतरानंतरच मात्र भासूं लागतो अशा उद्योगांत गुंतले. ह्याप्रमाणें इंग्रजी शिक्षणाचा प्रसार झाल्यापासून धर्माची समाजाची व राष्ट्राची सुधारणा करण्याचे आमच्या लोकांचे यत्न चालू झाले. आतां आपला प्रस्तुत विषय जो सामाजिक सुधारणा ती करण्याकरितां आजपर्यंत आपल्या लोकांनीं काय काय यत्न केले त्यांच्या हकीकतीकडे वळूं.

सामाजिक सुधारणा ह्या शब्दाची व्याप्ति फार मोठी आहे, व त्यांत अशा पुष्कळ गोष्टींचा समावेश होतो कीं, ज्या समाजविषयक असून त्यांत कांहीं फेरफार करणें अथवा त्या अगदीं बदलणें अवश्य आहे. एकींतून दुसरींत जातां येत नाहीं असे समाजाचे जातिभेद, मृत्युलेख नसल्यास वारस ठरविण्याची रीति, राष्ट्रांतील संपत्तीची असमान वांटणी, स्त्रियांचें पारतंत्र्य, हे व आणखी असेच कित्येक विषय, ज्यांत मनुष्यांचा सामाजिक व धार्मिक नात्यानें एकमेकांशीं संबंध येतो, ते सार्वत्रिक सामाजिक सुधारकांचे फैलांत येण्यासारखे आहेत. ह्या विषयांपैकीं मी ज्यावर कांहीं सांगणार आहें, तो विषय 'अनेक प्रकारचें स्त्रियांचें दौर्बल्य' हा आहे; व जेव्हां जेव्हां मी 'सामाजिक सुधारणा' या शब्दांचा उपयोग करणार आहें, तेव्हां तेव्हां तो वरील विषयास मात्र उद्देशून करणार असें समजावें. स्त्रियांची स्थिति

सुधारण्याचे जे जे उपाय आजपर्यंत सुधारकांनीं केले आहेत, त्यांतले मुख्य तीन आहेत, ते येणेंप्रमाणें:-स्त्रीशिक्षण, विधवापुनर्विवाह, आणि बालविवाहनिषेध. वाचकांच्या परवानगीमें यांपैकीं स्त्रीशिक्षण हा विषय, त्याचा आजपर्यंत वृत्तांत, त्यांतील असलेले दोष, व मला त्यासंबंधी ज्या सूचना करणें आहेत त्या, ह्या पुस्तकाच्या शेवटच्या भागांत करीन; कारण महत्वानें जरी त्याचा नंबर पहिला आहे, तरी सध्यां तो इतका वादग्रस्त नाहीं. ह्याकरितां बालविवाह आणि असंमत वैधव्य यांवर माझें काय ह्मणणें आहे तें प्रथम वाचकांपुढें ठेवितों. ह्या विषयांवर देखील मागें पुष्कळ चर्चा झाली आहे, तरी अद्यापि त्यांचा कांहीं निकाल झाला नसल्यामुळें जिज्ञासु वाचकांचें मन इकडे वेधल्यावांचून राहणार नाहीं.

आपणांस माहीत आहेच कीं हिंदुस्थानांतील दुसऱ्या कोणत्याही प्रांतांपेक्षां बंगाल्यांत इंग्लिशांचें राज्य आणि इंग्लिश शिक्षण हीं फार दिवस ( सुमारें एक शतकाहून जास्त वर्षें ) सुरू आहेत. त्यामुळें सामाजिक सुधारणेचा प्रश्न प्रथम त्या देशांत निघाला, हें फारसें आश्चर्य करण्यासारखें नाहीं, परंतु इतकें खरें कीं सुधारणेचा फैलाव होण्यास अधिक अनुकूळ असें बंगाल्यावांचून दुसरें स्थळ हिंदुस्थानांत सांपडतेंना. बंगाली लोक बाकी सर्व हिंदू लोकांपेक्षां उल्हासी, हिंमतीचे, आणि कुशाग्रबुद्धीचे असून स्वधर्मांत जसे निष्ठावान् आहेत, तसेच त्यांनीं दुसरा धर्म, दुसरा पंथ किंवा दुसरी रीति स्वीकारिली असतां त्यांतही एकनिष्ठची पराकाष्ठा करितात. बंगाल्यांत धर्मभ्रष्ट झालेले, आपल्या जाती-

ढून अन्य तऱ्हेचा पोषाख करणारे व समाजापासून भिन्न तऱ्हांनीं वागणारे असे बाव्हे फार आहेत, परंतु आपला जुना धर्म सोडून न देतां त्यांतच कांहीं चाली नव्या घालून व कांहीं जुन्या नाहींशा करून आपला वडिलोपार्जित धर्म सुधारावा अशा बाण्याची नवीन शिक्षणांतील जी मंडळी होती, त्यांनीं सामाजिक सुधारणेच्या कामांपैकीं एकच काम हातीं घेतलेलें दिसतें; तें विधवापुनर्विवाह हें होय. ह्या विषयावर पंडित ईश्वरचंद्र विद्यासागर ह्यांनीं पुष्कळ शोध केले, व जुन्या मताच्या लोकांशीं वाद करून त्यांची अशी खात्री करण्याचा यत्न केला कीं, विधवापुनर्विवाहास वेदाचा प्रतिबंध नाहीं इतकेंच नाहीं, परंतु तो करावा अशाविषयीं वेदांत स्पष्ट आधार आहे. त्यांनीं असेंही दाखविलें कीं ह्या मताचे विरुद्ध जीं स्मृत्यादि ग्रंथांतून वचनें आहेत तीं वेदांपेक्षां फार अर्वाचीन असल्यामुळें एकीकडे ठेविलीं पाहिजेत. हे विद्वान् गृहस्थ अद्यापि हयात आहेत व त्यांचा ह्या गोष्टीविषयीं उद्योगही चालू आहे. त्यांच्या ह्या शास्त्रीय वादांत कितपत तथ्य आहे हें आपणास येथें पाहण्याची जरूरी नाहीं. सुधारणा करूं इच्छिणारी कांहीं मंडळी बंगाल्यांत होतीच, त्यांस वरील मतें पसंत पडलीं; परंतु बहुतेक जनसमूहास ह्या विषयाची चाललेली चर्चा मुळींच न कळल्यामुळें ते आपल्या ठिकाणीं स्वस्थ राहून सुधारकांचा तिरस्कार करूं लागले. ह्या लोकांशीं सुधारक पक्षानें वाद करून थोडाबहुत जय बंगाल्यांत मिळविला.

विधवापुनर्विवाह कायदेशीर आहे असा सर्व हिंदुस्थानांत कायदा होण्याविषयीं सुधारक मंडळीनें खटपट चालविली,

ही त्यांची चूक झाली; कारण बंगाल्याशिवाय इतर प्रांतांत त्यावेळीं अलीकडील शिक्षण व सुधारलेलीं मतें लोकांस रुचत नसल्यामुळें अर्थातच ते सुधारणेस प्रतिकूळ असत. सुधारकांस कायदे करणारी मंडळी अनुकूळ असल्यामुळें त्यांच्या इच्छेप्रमाणें विधवापुनर्विवाहाचा कायदा ठरविण्याचा यत्न कांहीं अंशीं सिद्धीस गेला; परंतु बाकीच्या लोकांच्या हरकतीमुळें सुधारकांस पाहिजे होत्या तशा सर्वच गोष्टी त्यांत ठरल्या नाहींत. ही जी उणीव राहिली, तिचा परिणाम जुन्या मताच्या लोकांना फायदेशीर होऊन सुधारणेचें काम कित्येक वर्षे मागें पडलें, व ह्याच कायद्याचे योगानें लोकांचा गैरसमज होऊन, सरकार सर्व हिंदुस्थानचे धर्म बुडविण्याचा प्रयत्न करीत आहे, अशी भीति त्यांचे मनांत भरवून देण्यास कित्येकांस फूस सांपडली, ही गोष्ट अद्याप सरकारच्या लक्षांत आली नाहीं; व कोणी इतिहासकारानेंही ह्या परिणामाचा कोठें उल्लेख केलेला आढळत नाहीं.

विधवापुनर्विवाहाचा कायदा, सन १८५६ चा आक्ट १२ वा, हा तारीख २५ जुलै सन १८५७ पासून अमलांत आला. ह्यांत असें स्पष्ट लिहिलें आहे कीं, विधवापुनर्विवाहासंबंधीं वेदांत जीं वचनें आहेत त्यांचा खरा अर्थ काय आहे, हें ठरविण्याची सरकारास जरूरी नाहीं, व कायद्याचे उद्देशांत असें कबूल केलें आहे कीं, आजपर्यंत जो कायदा हिंदुस्थानांत अमलांत येत होता त्याप्रमाणें, कांहीं अपवाद खेरीज करून, हिंदू विधवांस पुनर्विवाह करितां येत नाहीं; केल्यास त्यापासून झालेली संतति दासीपुत्र असें समजून त्यांस वारस होण्याचा हक्क पोंहचत नाहीं,

आणि ह्या गोष्टीस धर्मपुस्तकांचा आणि अनादिसिद्ध प्रचाराचा आधार आहे, असेंही ह्या आक्टांत कबूल केलें आहे; परंतु त्यांत इतकेंच ठरविलें आहे कीं, धर्मपुस्तकांचा खरा अर्थ केला असतां तो विधवापुनर्विवाहास प्रतिकूळ नाहीं; अशा विवाहापासून झालेल्या संततीचे. वारसदारीचे हक्क जातात असेंही त्यांत कोठें लिहिलेलें नाहीं व. आजपर्यंत चालत आलेली वहिवाट चुकीची असून ती आह्मांस कबूल नाहीं. असें ज्या हिंदूलोकांचें म्हणणें असेल त्यांच्या फायद्याकरितां ह्या नवीन आक्टाचे ठराव अमलांत आणिले जात आहेत; ( ह्मणजे तशा लोकांस पुनर्विवाह करण्याची मोकळीक दिली आहे. ) त्यांत सरकारानें आपलाही अभिप्राय दर्शविला आहे कीं वरील विधवाविवाहास येणाऱ्या कायद्याच्या अडचणी दूर केल्या असतां सुनीति आणि लोककल्याण हीं पुष्कळ वाढतील.

हा कायदा पसार झाल्यास बहुत वर्षे लोटलीं आहेत, तरी तो लक्षपूर्वक वाचिला असतां त्यास जुन्या मनाच्या लोकांनीं त्यावेळेस किती भयंकर अडथळे आणिले होते याचें अनुमान आजही करितां येतें. विधवेच्या विवाहास नेहमीं मोठ्या कठीण अशा दोन अडचणी येतात. त्या अशा कीं त्यांस पहिल्या नवऱ्यापासून संतति झाली असल्यास तिची काय व्यवस्था करावयाची? व तशीच तिच्या पहिल्या नवऱ्याच्या मिळकतीची काय व्यवस्था करावयाची? मला असें वाटतें कीं इतर देशांत व समाजांत ह्या अडचणी विधवांस अनुकूळ अशा तऱ्हेनें दूर केलेल्या आढळतील; परंतु वरील कायद्यांत ( विधवापुनर्विवाहाचे आक्टांत ) हिंदू धर्माच्या

मूलतत्वांस अनुसरून आणि विधवांस फार प्रतिकूळ अशा रीतीनें वरील प्रश्नांचा निकाल केलेला आहे. पुनर्विवाह करणाऱ्या विधवेस ह्या आक्टाप्रमाणें आपल्या पहिल्या नवऱ्याच्या अथवा त्याच्या वारसाच्या मिळकतीवरील सर्व हक्क सोडावे लागतात. . तिच्या स्थितीचा अशा अशुभ शब्दांनीं उल्लेख केला आहे कीं, 'ती जणुं मेली असें समजून तिच्या पहिल्या नवऱ्याच्या संपत्तीचा वारस ठरविण्याची व्यवस्था केली जाईल'. तसेंच तिला पहिल्या संबंधापासून जीं मुलें झालीं असतील, त्यांच्या पालनपोषणाचा हक्क तिजकडून निघून नवऱ्याचा जो अतिसंन्निध नातलग हयात असेल त्याजकडे जातो. ह्याप्रमाणें मनुष्यमात्रास अतिप्रिय अशा ह्या जगांतील ज्या दोन वस्तु, संतति आणि संपत्ति, त्यांस बिचाऱ्या पुनर्विवाह करणाऱ्या विधवा मुकतात, आणि शारीरिक इच्छा सुमार्गानें तृप्त करून घेणें असल्यास मातृप्रेम आणि ऐहिक सुखोपभोग ह्यांवर लाथ मारिली पाहिजे, अशा पेंचांत त्या सांपडतात. सुधारकांनीं पुष्कळ हाकाटी केली कीं, हा ठराव नीतिविरुद्ध असून ह्यानें दुराचरणास मात्र उत्तेजन होईल; कारण जी विधवा पुनर्विवाह करून नीतीनें आणि नेमस्तपणानें आपली कामशांति करिते, तिचा नवऱ्याच्या संपत्तीवरील हक्क नाहींसा व्हावा, आणि जी (वैधव्यांतच राहून) धडधडीत व्यभिचारानें नवऱ्याच्या नांवास कलंक लाविते तिला त्याच्या संपत्तीचा यथेच्छ उपभोग मिळावा, हा किती अन्याय आहे!! सुधारकांच्या ह्या आरोपाचा आणि हाकाटीचा कांहीं उपयोग झाला नाहीं. ह्याप्रमाणें पुनर्विवाहास येणाऱ्या ज्या दोन मोठ्या अडचणी आहेत,

त्यांची वर सांगितल्याप्रमाणें सन १८५६ च्या १२ व्या आक्टांत केलेली व्यवस्था चांगली आहे, किंवा वाईट आहे, म्हणजे एका नवऱ्याची संपत्ति घेऊन दुसऱ्या नवऱ्याच्या समागमाचा दुहेरी फायदा विधवांस मिळावा किंवा नाहीं, आणि तसेंच त्यांचीं पूर्वसंबंधाचीं मुलें पूर्वीच्या नवऱ्याच्या आत्महितेच्छु नातलगांच्या स्वाधीन करणें चांगलें, किंवा त्यांच्या सावत्र बापाच्या पितृप्रेमावर त्यांस सोंपवून देणें चांगलें*, ह्याविषयींची वाटाघाट आह्मी येथें करीत नाहीं. येथें इतकेंच सांगणें पुरे आहे कीं, सन १८५६ च्या १२ व्या आक्टानें विधवेचा विवाह कायदेशीर मानिला आहे, परंतु जगांतील अत्यंत प्रिय ज्या वर सांगितलेल्या दोन गोष्टी, त्यांस मात्र ती ह्या कायद्यानें अजीबात मुकते!

तसेंच सुधारकांपैकीं जे कित्येक जण आपला हेतु सिद्धीस नेण्याकरितां अमर्याद कामें करितात, म्हणजे जे लोक कांहीं मिशनऱ्यांचा कित्ता गिरवून, ज्यांस आपलें हिताहित अगदीं कळत नाहीं, अशा पोरबुद्धीच्या बालविधवांस फूस देऊन त्यांचा पुनर्विवाह करवितात, व तेणेंकरून अर्थातच तिच्या सोयऱ्याधायऱ्यांस दुःख देतात, अशा लोकांवर ह्या कायद्याचा कटाक्ष असून त्यांकरितां फार कडक शिक्षा

---

* वरील दोन्ही प्रकारच्या व्यवस्थेंत त्या बापड्या मुलाची अपेक्षा होण्याचा संभव असतो; कारण पहिल्या प्रकारांत ती मुलें नाहींशीं झालीं असतां त्यांची संपत्ति त्याच्या पालकांस ( ते जवळचे नातलग असल्यामुळें ) मिळावयाची असते. ह्यामुळें ते त्या मुलांस कितपत जपत असतील, ह्याची कल्पना वाचकांस होईलच; व दुसऱ्या प्रकारांत सावत्र बापाचें प्रेम!!

ठेविली आहे. कायद्यांत न आलेल्या अज्ञान बालविधवेचा विवाह तिच्या बापाच्या, अथवा त्याच्या पश्चात् जे कायदेशीर पालक आहेत त्यांच्या अनुमतावांचून झाला असल्यास तो रद्द करितां येण्यासारखा आहे; आणि तो घडवून आणणारांस अथवा त्यास उत्तेजन देणारांस एक वर्षाहून जास्त नाहीं इतकी कैदेची शिक्षा, अथवा दंड, अथवा दोन्ही शिक्षा देण्याचा ठराव आहे. हा ठराव पुष्कळ न्याय्य आहे, ह्यांत संशय नाहीं; परंतु तो करण्याचें कारण दोहोंतून एक असलें पाहिजे. जुन्या मताच्या लोकांस जी मोठी धास्ती वाटत होती कीं विधवांस पुनर्विवाहाची मोकळीक असल्यामुळें अज्ञान स्त्रियांस पुष्कळ लोक फसवून घराबाहेर काढतील, ही धास्ती पुष्कळ अंशीं कमी व्हावी; अथवा असले मध्यस्थ खटपटे लोक पुष्कळ असल्यामुळें त्यांचा बंदोबस्त करणें सरकारास जरूर वाटलें असावें.

पुनर्विवाह सशास्त्र आहे असें कायद्यानें ठरवितां आलें, परंतु लोकांकडून होणारा पुनर्विवाहितांचा छल कायद्यानें बंद झाला नाहीं, व तो करितां येणारही नाहीं, यामुळें एकादी विधवा पुनर्विवाह करण्यास तयार झाली असतां कायद्याप्रमाणें वर सांगितलेला दुर्दैवाचा वांटा तर तिच्या पदरीं येईच; परंतु शिवाय, लोकांस पुनर्विवाह हें मोठें विपरीत व अधर्माचें कृत्य वाटत असल्यामुळें, ते तिचा तिरस्कार करीत व तिजवर बहिष्कार घालीत, ह्यामुळें तिच्या विपत्तीस पारावार नाहींसा होत असे. सणावारीं किंवा दुसऱ्या एखाद्या समारंभांत तिला इतर बायका आपल्यांत येऊं देत नाहींत; आणि ह्यापलीकडे असह्य गोष्ट तर बाग्र-

कांस दुसरी नाहींच! तसेंच तिच्या मुलींना नवरे मिळूं नयेत; हिंदू स्त्रियांना हजारों नेमधर्म, आणि मंगळागौरी, वटसावित्री, हरतालिका वगैरे कित्येक व्रतें करावयाचीं असतात, तीं चालविण्यास भिक्षुकांनीं तिच्याकडे जाऊं नये; अशीं अनेक संकटें तिला यावीं. ह्या कारणांमुळें कायद्याची परवानगी असूनही पुनर्विवाह करण्याचा धीर विधवांस होत नाहीं. सारांश, लोकांचें अनुमत असल्यावांचून कोणतीही गोष्ट जुलमानें अमलांत आणण्याविषयीं कायदा पसार करणें किती निरर्थक आहे, ह्याचें वरील आक्ट हें एक चांगलें उदाहरण आहे. ह्याप्रमाणें ह्या कायद्यास पुष्कळ लोक नाखुष तर होतेच, परंतु कित्येक दुष्ट व धाडशी लोकांनीं त्याबद्दल लोकांत मोठा गैरसमज उत्पन्न केला. सन १८५७ सालच्या बंडास जीं कारणें झालीं, त्यांत काडतुसांस गाईची व डुकराची चर्बी लावितात, ह्या खोट्या बातमीमुळें हिंदू व मुसलमान ह्या दोहों जातींच्या लोकांस आपला धर्म बुडण्याचें भय किती वाटत होतें, हें इतिहासकारांनीं चांगल्या प्रकारें वर्णिलें आहे. ह्या धामधुमीच्या काळांत उत्तर हिंदुस्थानांत राहिलेल्या एका चांगल्या गृहस्थानें इंग्रजसरकार आपले धर्म बुडविण्याचा यत्न करीत आहे, हा आरोप कसा शाबीत करून दाखवीत, हें आम्हांस इत्थंभूत सांगितलें आहे. बंडाच्या पूर्वी नुकतेंच सन १८५० चा २१ वा आणि १८५६ चा १२ वा हे आक्ट अंमलांत आले होते.* त्यां-

* वरील आक्ट अनुक्रमें हिंदूंच्या धर्मांतराचा आणि विधवापुनर्विवाहाचा हे आहेत.

वरून इंग्रजसरकारची आपले धर्म बुडविण्याची इच्छा खचितच पूर्ण आहे, अशी चर्चा गांवोगांव चालत असे. याला असे प्रमाण दाखवीत कीं, विधवांचे पुनर्विवाह जबरदस्तीनें लावावयाचे आणि हिंदूंस बाटवावयाचे कायदे इंग्रजसरकारनें काढिले आहेत, व हिंदूशास्त्राप्रमाणें जरी अशा पुनर्विवाहित व बाट्या लोकांचा आपल्या आपल्या कुळांतील संपत्तीवर हक्क राहत नाहीं, तरी तें शास्त्र एकीकडे ठेऊन बाटण्यापूर्वी किंवा पुनर्विवाह करण्यापूर्वी असलेले सर्व हक्क त्यांस मिळणार, असें लोक बोलत असत. कर्मधर्मसंयोगानें कांहीं हिंदू राजेरजवाडे त्याच वेळेस कलकत्त्यास गेल्यामुळें दुसरी एक अशीच बातमी कोणी उठविली कीं, त्यानीं आपापले संस्थानांत विधवापुनर्विवाहास आणि हिंदूंचे धर्मांतरास असेंच उत्तेजन द्यावें व मदत करावी, अशी आपली इच्छा इंग्रजसरकारानें त्यांस प्रकट केली व ती अंमलांत आणण्याबद्दल त्यांवर सक्तीही केली.

विधवापुनर्विवाहाचा कायदा ठरला, इतक्याच गोष्टीनें बंगाल्यांतील सुधारकांची इच्छा परिपूर्ण होऊन त्यांचें अवसान खचल्यासारखें दिसतें; कारण तेथें पुनः कोणीही विधवेचा अथवा बालस्त्रीचा पक्ष घेऊन सुधारणा करण्याचा यत्न केला नाहीं; परंतु मागाहून लवकरच ज्या मंडळीचा बंगाल्यांतील ह्या खटपटीनें पूर्ण पाडाव झाला नव्हता अशा जुन्या मताच्या शास्त्रीय मंडळीवर मुंबईकरांनीं शस्त्र धरिलें.

सन १८६६ पासून ७० पर्यंतचीं चार वर्षे पुनर्विवाहाच्या इतिहासांत मोठ्या महत्वाचीं असून त्यांत झालेली हकीकतही चित्तवेधक आहे. विष्णुशास्त्री पंडित पुनर्वि-

वाहोरपेजकांपैकीं एक सुप्रसिद्ध पुढारी होते. त्यांनीं सन १८६६ स ईश्वरचंद्र विद्यासागर ह्यांचा पुनर्विवाहावर ग्रंथ आहे, त्याचें मराठींत भाषांतर करून इंदुप्रकाश' वर्तमानपत्रांतून तें प्रसिद्ध करण्याची सुरवात केली. त्यांतील मजकूर अर्थातच पुनर्विवाहाच्या तर्फेचा असे. बंगाल्यांत पुनर्विवाहाची थाटाघाट सुरू असल्याचें देखील आपल्याकडील लोकांस खपत नव्हतें, असा मागें एके ठिकाणीं उल्लेख केलाच आहे. मग त्या प्रकारचा मजकूर मुंबईतच प्रसिद्ध होऊं लागल्यावर काय विचारावें! विष्णुशास्त्र्यांच्या लेखावर अनेक पत्रांतून कोटिक्रम व आक्षेप येऊं लागले. दहाजणांस एकट्यानें पुरें पडण्याचें काम मोठें कठीण आहे, तरी विष्णुशास्त्र्यांनीं अविश्रांत श्रमानें आणि मोठ्या समयसूचकतेनें सर्वांच्या आक्षेपांचें निराकरण करण्याचें कार्य यथाशक्ति चालविलें होतें. अशी पत्रोपत्रीं झटपट होतां होतां हा वादाग्नि अधिक पेटून व्याख्यानद्वारा वाग्युद्धास आरंभ झाला. अर्थातच व्याख्यानांतही सुधारक पक्षाचे पुढारी विष्णुशास्त्रीच असत, व त्यांस प्रतिपक्षी त्यांच्याच तोडीचे मिळाले होते; त्यांचें नांव विठोबा अण्णा दप्तरदार. व्याख्यानें ऐकण्यास जी मंडळी जमत असे, त्यांत बहुतकरून व्याख्यानकाराच्याच पक्षाचे, अथवा ज्याचे विचार ज्यांस आवडत असेच लोक असत, ह्यामुळें जो निकाल व्हावयाचा तो नेहमीं एकतर्फी होत असे; आणि उभय पक्षांतील लोकांसमक्ष दोन्ही मतांच्या व्याख्यात्यांचा सामना कधीं न झाल्यामुळें जयापजय कोणास येईल, ह्याचा अदमास लागेना, व कोणाचें ह्मणणें विशेष ग्राह्य आहे, तीही तुलना कोणास

करितां येईना. अशा अरण्यरुदनवत् वाकूपांडित्यानें कांहीं निष्पन्न होतं नाहीं असें पाहून सुधारक पक्षाच्या मंडळींनें एक सभा स्थापन केली व तींत विधवाविवाह घडवून आणण्यास काय काय उपाय करावे, ह्याची वाटाघाट चालविली. विरुद्ध पक्षही त्यांच्या मागें हात धुवून लागला होताच; त्यानें वरच्या सभेचे यत्न निष्फळ करूं इच्छिणारी विरुद्ध सभा काढिली. ह्या दुसऱ्या सभेचे सूत्रधार गणेश बापूजी मालवणकर हे होते. ह्या सद्गृहस्थास आपल्या अत्यौत्सुक्यामुळें या विवादाच्या शेवटच्या हातघाईंत भूलोकींच्या यमयातना मात्र भोगाव्या लागल्या. ती हकीकत पुढें लवकरच येईल.

सुधारणेच्या पक्षांत सामान्य मंडळी होती असें नाहीं. रा. ब. महादेव गोविंद रानडे, रा. बा. गो. ह. देशमुख, रा. सा. बा. मं. वागळे इत्यादि बडीं प्रस्थें होतीं; परंतु लिहिण्यास खेद इतकाच वाटतो कीं, आपली मनीषा तृप्त व्हावी आणि पुनर्विवाहाचा काय परिणाम होईल तो पाहण्यास सांपडावा ह्मणून, त्यांनीं तो प्रयोग एका बापड्या अप्रसिद्ध जोडप्यावर करून पाहिला. एखादें औषध किंवा वनस्पति नवीन असली, ह्मणजे तिचा प्रयोग एकदम मनुष्यावर केल्यास कदाचित् घात होईल, ह्मणून डाक्टर लोक त्यांचा प्रयोग प्रथम जनावरावर करून पाहतात, आणि खरोखर त्यापासून मनुष्यजातीचें फार हितही झालें आहे. तरी कित्येक लोक त्या डाक्तरांस असा दोष देतात कीं हें त्यांचें कृत्य निर्दयतेचें व अन्यायाचें आहे!! परंतु हा शास्त्रीय प्रयोगाचा न्याय सामाजिक सुधारणेस लागू

पडत नाहीं. सामाजिक सुधारणेचा प्रयोग असल्या क्षुल्लक मनुष्यांवर करून पाहणें ह्मणजे खरोखर अन्याय्यांचेंच नव्हे, तर निष्फळही आहे. उपदेशाप्रमाणें क्रिया असल्यावांचून कोणाचें ह्मणणें कोणी खरें मानीत नाहीं. ह्या नियमाप्रमाणें सामाजिक सुधारणेचा दुरून दुरून तोंडचा उपदेश केल्यानें तिला मदत तर व्हावयाची नाहींच, परंतु तिचें पाऊल आंत मात्र येतें. सुधारकांच्या पुढाऱ्यांपैकीं कित्येकांस आपल्या उपदेशानुरूप स्वतः आचरण करून लोकांस उदाहरण घालून देण्याची संधी नव्हती असेंही नाहीं, परंतु इतकी जबाबदारी पत्करतो कोण? सारांश, ह्या सभेनें इतक्याच कामाकरितां वर सांगितल्याप्रमाणें एक अप्रसिद्ध जोडपें शोधून काढिलें, आणि हा अपयशाचा वांटा त्यांचे पदरांत लोटिला. वेणूबाई नांवाची एक तरुण विधवा परांजप्याच्या एका घरण्यांतली होती, आणि पांडुरंग विनायक करमरकर ह्मणून एक मराठी शाळामास्तर होता; ह्या दोघांचा हा जगविख्यात लग्नसमारंभ होऊन हें जोडपें कृतकृत्य होणार होतें. निमंत्रणपत्रिका खालील सात गृहस्थांच्या सहीच्या पाठविल्या होत्या. (१) पंडित, (२) देशमुख; (३) रा. ब. रानडे; (४) भिडे; (५) बी. पी. रानडे; (६) तळेकर; आणि (७) गाडगीळ. मुंबईंत मोरोबा कान्होबा ह्यांच्या वाड्यांत तारीख १९ जून सन १८६९ ह्या दिवशीं हा लग्नसमारंभ मोठ्या थाटानें झाला. व हायकोर्टचे जज्ज, बारिस्टर्स व मोठमोठे शेट सावकार लोकही हा समारंभ—समारंभ कसचा! सुधारकांच्या भीरुत्वाचा हा उत्तम देखावा—पाहण्यास आले होते.

नास्तिक मतांचा कोणी नुसता उच्चार केला पुरे कीं झालीच त्यास शिक्षा, अशा तऱ्हेचे रोमन क्याथोलिक वगैरे कांहीं धर्म ज्याप्रमाणें कडक आहेत, तितका कडक आपला धर्म नाहीं. आपल्या धर्माचें तत्व असें आहे कीं 'कलौ पतति कर्मणा' कलियुगांत जो पापकर्म आचरील तोच दोषास पात्र आहे; नुसत्या तोंडच्या नास्तिकवादानें कोणी दोषी ठरत नाहीं. ह्याप्रमाणें वरील लग्न लावीपर्यंत सुधारक मंडळीची नुस्ती तोंडची बडबड असल्यामुळें तिकडे कोणी विशेष लक्ष पोंचाविलें नव्हतें; परंतु बोलण्याप्रमाणें त्यांनीं प्रत्यक्ष क्रिया करितांच ठाकूरद्वारांत एक जंगी सभा भरून 'बहिष्कार' ! बहिष्कार !, असें सर्वतोमुखीं होऊन बहिष्काराचा ठराव पसार झाला, व नवीन वधूवरांचें जोडपें आणि वरील सात असामी यांस जातीबाहेर टाकलें. दुसरे दिवशीं भास्करशास्त्री ताम्हनकर, सखारामशास्त्री काणे, मि० महादेव चिमणाजी आपटे आणि मि० अण्णा मोरेश्वर कुंटे ह्या चार असामींनीं जाहीर केलें कीं आह्मांस ठाकूरद्वारांतील सभेचे वरील ठराव मान्य नाहींत. तेव्हां लागलेंच ह्याही चार गृहस्थांस बहिष्कृत मंडळींत सामील केलें. ज्ञातीपासून बहिष्कृत राहण्याचें दुःख फार कठीण आहे. तें जो बहिष्कृत आहे त्यासच बाधावयाचें असें नाहीं, परंतु त्याचे इष्टमित्र, बायकामुलें, सर्वांसच त्याचें प्रायःश्चित भोगावें लागतें. ह्या कारणामुळें वरील अपंक्त टाकिलेल्या जाड्या प्रस्थांचे कांहीं मित्र मिळून त्यांनीं जातीशीं मध्यस्थीचें बोलणें लाविलें कीं, विधवापुनर्विवाह सशास्त्र आहे किंवा अशास्त्र आहे ह्याचा अद्याप निकाल झाला नाहीं, ह्मणून तो होईपर्यंत पुनर्विवाहास नुस्ती

मदत केली एवढ्या आरोपावरून वरील गृहस्थांस बहिष्कृत ठेवणें योग्य नाहीं. हें ह्मणणें अशापैकींच होतें कीं ह्या विषयासंबंधानें वादविवाद करण्याकरितां सभा भरवा. विरुद्धपक्षानें हें ह्मणणें मान्य केलें; कारण वादांत जय मिळण्याची त्यांस खात्री होतीच; परंतु शिवाय बहिष्कृत मंडळीस पश्चात्ताप होऊन त्यांनीं पुनर्विवाहाचा पक्ष सोडिला आणि आपल्या पक्षास मिळाले तर बरेंच झालें, असा त्यांचा हेतु होता, व अशीं बडीं प्रस्थें आपल्या पक्षास अनुकूल व्हावीं एतदर्थ हा त्यांचा प्रयत्न जुन्या मताच्या लोकांस पसंत पडला.

वर सांगितल्याप्रमाणें वादविवाद करण्याकरितां तारीख २० मार्च सन १८७० ह्या दिवसापासून पुण्यांत दीक्षितांच्या वाड्याच्या टोलेजंग दिवाणखान्यांत सभा भरूं लागली. पुनर्विवाह हा विषय साधारण नसून, त्याच्या योगानें कित्येक आचारविचार बदलून धर्मसंबंधीं मोठी उलाढाल व्हावयाची, म्हणून अशा महत्वाच्या विषयाचा एक निर्णय ठरविण्याकरितां श्रीमत् जगद्गुरु शंकराचार्यांची स्वारी सभेला आली होती. तसेंच ठिकठिकाणचे महाविद्वान् लोक सभेंत असल्यामुळें ती इतकी भव्य आणि भारदस्त दिसत असे कीं, अशी सभा पूर्वी कित्येक शतकांत लोकांस पाहावयास सांपडली नसेल, व पुढेंही पाहावयास सांपडणार नाहीं. त्या वेळीं आलेले शास्त्री वादविवादांत परम निपुण, धर्मशास्त्र म्हणजे ज्यांस करतलामलकवत् व गहन विचार करण्यांत एकाहून एक अधिक सामर्थ्यवान् असे होते. असे विद्वान् शास्त्री प्रस्तुत बहुतेक मावळले आहेत व पुनः असे होतील अशी आशाही नाहीं. मुसलमानांच्या कारकीर्दीच्या

उत्तरार्धांत शास्त्रविद्येस ऱ्हास लागून ती दीन दशेंत आली होती; आणि स्वराज्याचा आश्रय तिला न मिळता, तर तिची काय अवस्था झाली असती ह्याची कल्पनाही करवत नाहीं; परंतु मराठेशाही झाल्यापासून तिचें पुनरुज्जीवन होऊं लागून ती पुनः उत्कृष्ट दशेस येऊं लागली. ह्या महावाग्युद्धांतील शास्त्री पेशवाईच्या अखेर तयार झालेले असून त्यांस अलीकडील इंग्रजी शिक्षणाचें वारेंही लागलें नव्हतें. असो. असे पांच शास्त्री सुधारक पक्षाच्या तर्फेनें व दुसरे पांच विरुद्ध पक्षाच्या तर्फेनें पंच नेमून गोपाळाचार्य कराडकर हे सरपंच नेमिले होते. सुधारक पक्षाच्या तर्फेचे वक्ते, मागील इंदुप्रकाशांतील लेख प्रसिद्ध करणारे बाणेदार गृहस्थ विष्णुशास्त्री हे होते; व रावबहादूर रानडे हे त्यांचे साह्य करीत होते. इकडे विरुद्ध पक्षांतील तें काम नारायणाचार्य गजेंद्रगडकर यांनीं उचलिलें, आणि त्यांस मदत विठोबा अण्णा दप्तरदार ह्यांची होती. ह्याप्रमाणें उभयपक्ष परस्परांशीं तुलित असे होऊन वादास आरंभ झाला, धार्मिक वादविवादांत शब्दार्थ हवेतसे फिरवून पळण्याचे मार्ग पुष्कळ सांपडतात, ह्याकरितां उभयपक्षांनीं लेखी प्रश्न करून उत्तरें देण्याचें कामही लेखी चालविलें.

नऊ दिवसपर्यंत ही भवति न भवति चालली होती. उभयपक्षांनीं अनेक शोध करून आपआपल्या तर्फेनें पुष्कळ प्रमाणें दाखविलीं व सर्व प्रकार अगदीं शांततेनें आणि सभ्यपणानें चालला होता. तरी ह्या विवादाचा शेवट लवकर होत नाहीं, असें पाहून सर्व लोकांस आणि स्वतः सभासदांस देखील अगदीं कंटाळा आला, आणि आतां

मतें घ्यावीं असा सर्वांचा अभिप्राय पडला. सर्वांचीच अशी इच्छा पाहून शंकराचार्यांनीं पंचांस आपापलीं मतें लिहून देण्यास सांगितलें. आतां काय निकाल होतो इकडे सर्वांचे डोळे लागून राहिले. सर्व मतें एकत्र करितां असें आढळलें कीं सुधारक पक्षाच्या तर्फेचा एक पंच व्यंकटशास्त्री माटे विरुद्ध पक्षास मिळाला, आणि त्यानें आपलें मत विरुद्ध पक्षास अनुकूळ असें दिलें असल्यांमुळें ४ स ६ असें मताधिक्य विधवाविवाहाविरुद्ध झालें. तेव्हां सरपंच आणि श्रीमत् शंकराचार्य यांस निर्णय करण्यास अडचण राहिली नाहीं, आणि लोकांस आवडताच असा ठराव लागलाच प्रसिद्ध झाला कीं 'धर्माच्या सर्व मान्य आधारांवरून विधवाविवाह अशास्त्र आहे.'

जगाच्या वहिवाटीप्रमाणें पराजित झालेल्या पक्षानें (सुधारकांनीं) बयादी सांगण्याची व लोकांचा गैरसमज करण्याची सुरवात केली. त्यांनीं असें प्रसिद्ध केलें 'कीं सुधारकपक्षाचा एक पंच विरुद्ध पक्षास मिळाला, ह्याचें कारण विरुद्ध पक्षांतील लोकांनीं त्यास 'विधवापुनर्विवाहासारख्या अधर्माचरणास मत दिल्यास तुम्हांवर ईश्वरी क्षोभ होईल', असें भय घातलें; तेव्हां तो बिचारा शास्त्री वृद्ध आणि धर्मभोळा असल्यामुळें भिऊन, पूर्वी धर्मराजा जसा योग्य कारणाकरितां खोटें बोलला, तसें ह्यानेंही करण्याचें पत्करिलें; आणि शंकराचार्यांच्या पायांची शपथ घेऊन कबूल केलें कीं, आपल्या पक्षाविरुद्ध मत देईन. मागाहून असेंही प्रसिद्ध झालें कीं वरील फितूरी शास्त्र्यास "तुम्हीच पूर्वी जे पुनर्विवाहास असणारे आधार आम्हांस

दाखविले, व ते निर्विवाद आहेत असें म्हणत होतां, त्यांचें निरसन तुम्हीं कसें केले ? " असा प्रश्न करितांच निरुत्तर होऊन त्यानें वरील फितुरीचा प्रकार कबूल केला. ह्याप्रमाणें सुधारकांचे लेख व त्यावर विरुद्ध पक्षाचे उलट लेख वर्तमानपत्रांतून येऊं लागले. जुन्या मताच्या पक्षापैकीं मालवणकर ह्मणून एक गृहस्थ अति स्वपक्षाभिमानी होते. त्यांनीं 'सुधारकपक्षानें माझ्या फितुरीबद्दल लिहिलेला सर्व मजकूर खोटा आहे' अशी व्यंकटशास्त्र्याच्या सहीची एक कैफीयत प्रसिद्ध केली. अगोदरच पराजय झाला होता व त्यांत मागाहून ही फजिती, अशा दुहेरी उद्वेगाच्या आवेशांत सुधारकांनीं फौजदारी कोर्टाची वाट धरिली. कांहीं लोकांवर बेअब्रु केल्याबद्दल खटले चालून फौजदारी अंमलदारांनीं त्यांस शिक्षाही दिल्या. ह्या बेअब्रूच्या एका खटल्यांत खोटी साक्ष दिल्याचा आरोप मालवणकर यांजवर येऊन त्यांस तीन महिने सक्त मजुरीची शिक्षा झाली; व ह्याप्रमाणें जुन्या मताच्या अत्याग्रहाचें प्रायश्चित्त त्यांस इहलोकींच्या यमपुरींत ( कारागृहांत ) भोगावें लागलें. हा विपरीत परिणाम पाहून सर्व लोकांस व खुद्द सुधारक मंडळीसही फार वाईट वाटलें; व त्यांनीं दुसऱ्या कित्येक लोकांवर केलेले फौजदारी खटले एकदम काढून घेतले. शंकराचार्यांनीं भीतीनें आपल्या मुलखाची वाट धरिली. कारण, सरकारी अंमलदार सुधारकांच्या पक्षास अनुकूळ असल्याची शंका आल्यामुळें, ते कदाचित् आपलाही कांहीं उपमर्द करतील, अथवा आपल्यावर कांहीं अरिष्ट आणतील असें भय त्यांस वाटलें. अस्तु; एकंदरींत, जुन्या मताच्या पक्षाच्या लोकांवरील आरोप कितीही खरे

असले, तथापि सुधारक लोकांची सारी अक्कल स्वपक्षाभिमानानें गुंग होऊन आपल्या देशबांधवांशीं वादविवाद करण्यांत आपलें मुख्य कर्तव्य काय आहे, हें ते विसरले, व ह्यामुळेंच ते सर्व लोकांच्या क्रोधास स्वतः पात्र होऊन त्यांनीं आरंभिलेलें कार्यही लोकांस अप्रिय झालें, असें ह्या घटकेस आपणास म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं.

ह्याप्रमाणें उभय पक्षांतील लोकांचें परस्पर हाडवैर पडून जुन्या मताचे लोकांचा जय झाला. आधींच सुधारकांची संख्या थोडी, त्यांत त्यांचा असा पाडाव झाल्या कारणानें त्यांच्या पक्षास कोणी मिळेना; आणि हिंदुस्थानच्या पश्चिम व दुसऱ्याही कित्येक भागांतील लोक सुधारकांचा तिरस्कार करूं लागल्यामुळें, सुधारणा हा शब्द देखील कित्येक वर्षेंपर्यंत ऐकूं येईनासा झाला. मधून मधून वर्तमानपत्रद्वारा उभयपक्षांची झटापट होत असे, परंतु त्यांत म्हणण्यासारखें वर्चस्व कोणाचेंच दिसत नसे. पुनर्विवाह देखील कधीं कधीं होत, परंतु फारच क्वचित; आणि ते तरी अशा लोकांत कीं जे हिंदू समाजांत आहेत किंवा नाहींत याची देखील भ्रांति! संस्कृतांत एक म्हण आहे कीं—'तृणं जगत् निस्पृहस्य, निस्पृहो जगतस्तृणम्;' अशी ह्या पुनर्विवाह करणाऱ्या लोकांची स्थिति असल्यामुळें लोक त्यांस बाटे मंडळापैकीं समजून त्यांच्या कृत्यांचा विचार करीत नसत. इकडे पुण्याच्या वादविवादांत जे सुधारकांचे पुढारी होते, त्यांपैकीं प्रत्येकावर दुर्दैवानें असे प्रसंग आले कीं, सुधारणेविषयीं त्यांचें खरोखर औत्सुक्य किती आहे ह्याची परीक्षा व्हावी, व त्यांनीं त्या वेळीं जर आपल्या उप-

देशाप्रमाणें वर्तन केलें असतें, तर हे प्रसंग नव्हेत सुदिन आहेत, असें त्यांस करून दाखवितां आलें असतें; परंतु तसें केल्यानें लागलींच आपणावर काय काय संकटें येतील, तीं त्यांस दिसूं लागलीं. जगांतील कित्येक सुखांस आपण अंतरूं, लोक आपला फार छळ करितील, इत्यादि विचार, आणि त्यांच्या धर्मभोळ्या आया व स्त्रिया ह्यांची सुधारणेचा पक्ष न स्वीकारण्याविषयीं विनवणी हीं सर्व आपल्या मत-स्वातंत्र्याकरितां एकीकडे ठेवण्याचें धाडस त्यांस होईना, ह्यामुळें विचाऱ्या सुधारणेचा पाया दोन्हीं बाजूंनीं खचत चालला—एक तिला आलेलें अपयश, आणि दुसरें स्वयं-ऱ्हास, म्हणजे जे थोडेसे लोक सुधारणेच्या पंथांत होते ते तो मार्ग हळूहळू सोडूं लागले.

वर सांगितल्याप्रमाणें सुधारणारूप अग्नि अपयशाच्या रक्षेनें ग्रस्त होऊन विझत चालला होता; आणि तो पुनः प्रज्वलित होईल अशी आशाही दिसत नव्हती; परंतु सन १८८४ त पुनः एक वावटळ सुटलें, त्याच्या सोसाट्यानें त्यावरील सांचलेली राख अगदीं झडून जाऊन जो थोडासा मंदाग्नि राहिला होता, तो पुष्कळ भडकला. एक परजातीय परंतु मोठ्या हिंमतीचा आणि दयाळू अंतः-करणाचा गृहस्थ पुढें सरसावला. त्यानें बालविवाह आणि असंमतवैधव्य या विषयावर आपले प्रख्यात लेख प्रसिद्ध करून सर्व एतद्देशीय आणि परकीय विचार-शील लोकांचें मन आपणाकडे वेधिलें. बालविवाह ह्या विष-यावर विचारवान् व सुधारक लोकांनीं तोंपर्यंत योग्य विचार कधींच केला नव्हता; तथापि असा महत्वाचा परंतु माग-

सलेला विषय हातीं घेऊन त्यावर लोक योग्य विचार करतील इतक्या महत्वास त्यास आणिलें ही गोष्ट मिस्तर मलबारी यांस फारच भूषणार्ह होय. बालविवाहासंबंधानें लोकांचे विचार हळूहळू बदलूं लागले होते. ह्या विषयावर व्याख्यानें होऊं लागलीं होतीं; युनिव्हर्सिटीचे निबंध कधीं कधीं ह्याच विषयावर येत; एकंदरींत, ह्या चालीचे परिणाम कांहीं तरी वाईट आहेत, ह्यांत संशय नांहीं, हा विचार लोकांच्या मनांत जागृत होऊं लागला होता; परंतु हिंदू समाजांत जीं दुःखें आहेत त्या सर्वांचें, निदान कांहीं मोठ्या अंशाचें तरी मूळ कारण बालविवाह करणें हेंच आहे, इतके हिंदूलोकांचे विचार अद्याप दूरवर गेले नव्हते. मि॰ मलबारी ह्यांनीं ही वाईट चाल मोडण्याकरितां फारच स्तुत्य उद्योग व श्रम केले आहेत. ह्या चालीच्या वाईट परिणामांची इतकी हाकाटी करून सर्व विचारशील लोकांचें चित्त तिजकडे वेधण्याची खटपट मि॰ मलबारी ह्यांनींच केली. हे गृहस्थ परजातीय असून त्यांचा उद्योग हिंदुधर्मविरुद्ध असल्यामुळें जुन्या मताचे लोक रागानें फार खवळून गेले होते, तरी केवळ बालवधूच्या कळवळ्यानेंच त्यांच्याशीं टक्कर मारण्याचें काम मि॰ मलबारी ह्यांनींच केलें. ह्या यशहीन कामाकरितां सर्व हिंदुस्थानभर फिरण्याचे श्रम त्यांनीं उदार बुद्धीनें केले; आणि एक पैदेखील घेतल्यावांचून हिंदू बालस्त्रियांच्या दुःखविमोचनाची रदबदली, ज्यांत सदय अंतःकरणाचे लोक फारच थोडे अशा हिंदुजनसमाजापाशीं त्यांनींच केली. मि॰ मलबारी ह्यांनीं मोठमोठ्या अधिकारावर असलेल्या परोपकारी लोकांचें मन आपल्या तर्फेला वळविलें

आणि हिंदूंच्या पुढारी लोकांची विनवणी केली कीं, जर हिंदू लोक स्वतः होऊन अर्धी मदत करितील, तर हें काम सिद्धीस नेण्यास (बालविवाहनिषेधक कायदा करण्यास) बाकी अर्धी मजल चालून येण्यास—सरकार खुषी आहे; परंतु ह्या सर्व खटपटींचा कांहींएक उपयोग झाला नाहीं. हिंदू समाजास सुधारणेपासून होणारें खरें हित कळूं लागलें नसल्यामुळें ते तिला मदत करीनात; ह्या चालीचे दुष्परिणाम भोगणाऱ्या स्वतः ज्या हिंदू स्त्रिया त्यांजवर ह्या चालीमुळें जरी नानाप्रसंग कोसळतात—ज्या कित्येक बालविधवा होऊन, अखेर मृत्युमुखीं पडतात, कित्येक विकारवशतेनें अनुचित कर्म करून लोकापवादास पात्र होतात, कित्येक जन्मरोगी होतात—तरी अज्ञानामुळें त्या देखील सुधारकांच्या मतास अगदीं विरुद्ध असत; सुधारणा करण्याच्या कामांत मि० मलबारी यांस मदत करणाऱ्या लोकांचा कळवळाही तिलपतच होता; स्वतः मलबारी यांचेही सुधारणा घडवून आणण्याचे बेत आणि भाषणें हीं कांहींअंशीं अविचारांचीं असत; ते परजातीचे असल्यामुळें हिंदुधर्मांत हात घालण्याचा अधिकार त्यांस वास्तविक पाहतां नव्हताच; आणि शिवाय कांहीं सुशिक्षित मंडळी—जे दोरी सोडिली असतां धनुष्याच्या कांबीच्या दुसऱ्या टोंकाप्रमाणें उलट पक्षाकडे ओढ घेत होते—व दुसरे अशिक्षित हेकेखोर लोक, मि० मलबारी ह्यांचें प्रयत्न निष्फळ करण्यास झटत होतेच; इतक्या अनेक अडचणीमुळें मि० मलबारी ह्या थोर गृहस्थानें आरंभिलेलें हें थोर कार्य अगदीं निष्फळ झालें. तेव्हांपासून ह्या सुधारणेच्छु पारशी गृहस्थांची हिंमत

खचून त्यांनीं आपले अंग ह्या भांडणांतून काढिलेसें दिसतें;* व जरी हा उद्योग अद्याप त्यांनीं समूळ सोडिला नाहीं, तरी हें काम एखाद्या हिंदू सुधारकाकडे सोपवावें, कारण हिंदूंची सुधारणा करणारा उपदेशक हिंदूच असल्यास ती लोकांत विशेष प्रिय होईल, अशा विचारांत ते होते.

असे गृहस्थ त्यांस लवकर सांपडले, ते आपले दिवाणबहादूर रघुनाथराव. हे मोठे धीट, हिंदूधर्मपरायण, आणि स्वधर्माभिमानी असे आहेत. तरुण मनुष्यांत देखील क्वचितच असेल इतकी हिंमत ह्यांच्या अंगीं आहे; व पूर्वी युरोपांत लूथर म्हणून जगविख्यात सुधारक होऊन गेला, त्यानें जसें एकनिश्चयानें आणि धाडसानें यूरोपखंडांत सुधारणा करण्याचें काम शेवटास नेलें, त्याच्या किंवा आपल्या देशांतील केशव चंद्र यांच्या तोडीची ह्यांची उत्साहबुद्धि आहे. तसेंच ह्यांनीं वेदांत आणि शास्त्रांत फार गहन शोध केले आहेत. ह्यांची वाद करण्याची पद्धति मोठी बारकाईची व हट्टाची आहे. एकंदरींत हे जुन्या शास्त्र्यांशीं व पंडितांशीं वाद करून त्यांस बालविवाह व असंमतवैधव्य यांस वेदांचा किंवा प्राचीन सूत्रांचा आधार नाहीं असें सिद्ध करून दाखविण्यास फार योग्य आहेत. राज्यकारभारांत निमग्न असोत, किंवा नोकरी सोडून देऊन घरींच असोत, त्यांनीं आपला फुरसतीचा मूल्यवान् वेळ ह्या कामांत खर्ची घातला आहे;

---

* नुक्तेच हे गृहस्थ हवा पालटण्याकरितां विलायतेस गेले होते, तेव्हां ती संधी साधून यांणीं या विषयावर इंग्लंडांत केलेली चळवळ वाचकांस ठाऊक असेलच.

त्यांनीं स्वतः केलेले सर्व शोध प्रसिद्ध केले आहेत; हिंदु जनसमूहांस व्याख्यानें दिलीं आहेत; व जुन्या मताच्या आणि विरुद्ध पक्षाच्या लोकांशीं अनेक वादविवाद केलें आहेत; सारांश; जुन्या मताच्या लोकांशीं भांडून सुधारणा करण्याच्या कामांत त्यांनीं अतिशय झटून श्रम केले आहेत; परंतु त्यांचाही परिणाम लोकांच्या मनांवर अथवा त्यांच्या चालींवर घडला नाहीं. याचें मूळ कारण असें आहे कीं, सुधारणेचें काम विरुद्ध मताच्या पडितांशीं नुस्ता वाद केल्यानें कधींही तडीस जाणार नाहीं; लोकांस त्या वादाच्या गुणदोषांबद्दल निर्णय करितां न आल्यामुळें कोणाचें मत जास्त हितावह आहे, हें त्यांस समजत नाहीं; व सुधारकांच्या म्हणण्याचा खरेपणा जरी त्यांच्या हृदयांत भासूं लागला, तरी त्यांचें मन शास्त्र्यांच्या व पंडितांच्या ह्मणण्याकडे लवकर वळतें, कारण ते प्रचाराचा मेळ शास्त्राशीं घालून देतात. असो. आनंदाची गोष्ट इतकीच आहे कीं, एवढ्याच अपयशानें न डगमगतां दिवाणबहादूर ह्यांनीं आपला प्रयत्न मोठ्या जोरानें व हिंमतीनें सुरू ठेविला आहे, व त्यांचें नांव हिंदुस्थानच्या भावी प्रजेंत प्रसिद्ध राहील अशी खात्री आहे.

मद्रास इलाख्यांतील लोकांनीं सामाजिक सुधारणेचें काम बऱ्याच प्रशंसनीय तऱ्हेनें चालविलें व पुढें चालवीतही आहेत, परंतु वायव्येकडील भागांत व पंजाबांत सुधारणेच्या इतिहासांत गणण्यासारखी कांहींच खटपट झालेली नाहीं. उघडच आहे. आह्मी पूर्वीं सांगितल्याप्रमाणें सुधारणेचें बीज इंग्रजी शिक्षणांत असून, त्या देशांत युनिव्ह-

सिटी आतांच नुक्ती स्थापन झाली आहे, हें मनांत आणिलें असतां इकडल्याप्रमाणें तिकडे सुधारणेचे निःसीम भक्त निर्माण झाले नाहींत, ह्याचें आपणांस आश्चर्य वाटणार नाहीं. तरी त्यांस देखील आतां जुन्या चालींविषयीं संशय येऊन अविश्वास वाटूं लागला आहे, आणि त्यांविषयीं त्यांची चौकशी सुरू होऊन त्यांचा उद्योग फलद्रूप होऊं पाहत आहे थोड्याच वर्षांत हे दोन्ही भाग पुढें सरसावून हिंदुस्थानांतील सुधारलेल्या प्रांतांमध्यें आपणांस योग्य स्थान मिळवितील असा संभव आहे.

हल्लींचा आपला काळ सभांचा आणि संघांचा आला आहे, असें दिसतें; कारण संघांच्या एकत्र शक्तीपुढें व्यक्तिमात्राचा पराक्रम अगदीं लोपून गेला आहे. पूर्वीच्या काळांत जगविख्यात सेनाधीश व विजयी पुरुष होऊन गेले; मोठमोठे भविष्यवादी आणि धर्मप्रसारक होऊन गेले; अचाट बुद्धीचे शास्त्रज्ञ व तत्त्ववेत्ते होऊन गेले; आणि आतां त्यांच्या ऐवजीं 'ईस्ट आफ्रिकन कंपनी,' 'मुक्तिफौज,' 'क्लोरोफार्म कमिशन' अशा मंडळ्यांची गर्जना होत आहे. इतकेंच नाहीं; हल्लीं लोक इतके शहाणे व बहुश्रुत झाले आहेत कीं, पूर्वीप्रमाणें एकाच विलक्षण बुद्धिमान् मनुष्याचा पगडा सर्वजणांवर कधींही बसणार नाहीं, व साधारण मनुष्यापेक्षां फारच अद्भुत शक्तीचीं माणसें हल्लींच्या काळांत होणेंही अशक्य आहे, असें रा० सा० शंकरराव पंडितां-सारख्या विद्वान् गृहस्थांचें मत आहे. ते असें म्हणतात, कीं बहुतेक मनुष्यांची बुद्धि उपजत सारखीच असते, परंतु मागाहून जसें ज्यास शिक्षण मिळेल, त्या मानानें

त्याच्यांत फरक होतो. पूर्वीच्या काळांत बहुतेक लोक अज्ञा-नांधकारांत निमग्न असत; कारण त्यांस शिक्षणांचीं साध-नेंच तशीं नसतं, व ज्या एकाद्यास शिक्षणाचा फायदा मिळे, तो त्याच्या योगानें बाकीच्या अज्ञजनांस फारच लोकोत्तर वाटत असे; परंतु लहानपणापासून समान शि-क्षण मिळत गेल्यास त्यांची बुद्धि समान होईल; इतकेंच नाहीं, तर त्यांचा द्रव्यसंचयही सारखाच होऊन शेवटीं सर्व जगांतील लोकांची स्थिति अगदीं एकसारखी होईल. आतां, त्याप्रमाणें हल्लीं जरी सर्वांची संपत्ति एकसारखी झालेली दिसत नाहीं, तरी शिक्षणप्रसारानें सर्वांची बुद्धि एकसारखीच होत आली आहे; आणि कालांतरानें संप-त्तीचीही व्यवस्था अशीच होईल. ह्या नियमाप्रमाणें पाहतां असें दिसतें कीं, पूर्वीप्रमाणें अलौकिक बुद्धीचीं माणसें ह्या काळांत निपजणें अशक्य आहे; आणि त्यांचें काम आतां सभांकडूनच आणि संघांकडूनच करविलें पाहिजे. शिवाजीनें एकट्यानें जसा पूर्वी मुलूख जिंकून स्वराज्य स्थापन केलें; मुसलमानांस त्यांच्या जुलुमाबद्दल शासन केलें आणि जिंक-लेल्या लोकांस स्वतंत्र केलें, तसें करण्याचें—जरी सर्व प्रकारें राजकीय स्वातंत्र्य मिळविण्याचें नाहीं, तरी त्याच्याच बरोबरीचें, दुसरे महत्वाचे राजकीय हक्क मिळविण्याचें-साम-र्थ्य आज फक्त एक राष्ट्रीयसभेलाच आहे; आलेक्झांडर ( शिकंदर ) बादशहानें एकट्याच्या पराक्रमानें जसें सर्व जग जिंकिलें, आगस्टस ह्यानें जसें सार्वभौम रोमन राष्ट्र स्था-पिलें, नेपोलियन ह्यानें जसें इतिहासांतील प्रत्येक वीरास युद्धकौशल्यांत मागें टाकिलें, आणि मोडकळीस आलेल्या

आपल्या लोकसत्तात्मक राज्याचें मोठें सार्वभौम राष्ट्र बनवून त्यास शत्रूंच्या रक्तानें स्नान घातलें, त्याच्या उलट प्रकार हल्लीं नजरेस येत आहे. ब्रेझिलच्या 'राज्यक्रांतीवरून उघड दिसतें कीं, सर्व राष्ट्र एकमतानें चाललें असतां तें कोणतीही गोष्ट करूं शकेल आणि त्याच्या एक संपापुढें एका व्यक्तीचें कांहीं चालणार नाहीं. इतकेंच नाहीं, ' कूटस्थ कीटायते ' ह्या वाक्याप्रमाणें त्याची एकट्याची कोठें दाद देखील लागणार नाहीं. शास्त्र विषयाकडे पाहिलें तरी असेंच आढळतें. मागें न्यूटन, केप्लर, ग्यालिलियो, कोपर्निकस वगैरे पुरुषांनीं आपापल्या अचाट बुद्धीनें आणि अव्याहत श्रमानें सृष्टीचे नियम शोधून काढिले. त्यांच्या ऐवजीं हल्लीं कांहीं शास्त्रज्ञ लोकांच्या मंडळ्या एकांतांत असून सृष्टिक्रमाचे सिद्धांत सोडवितात. वरील सर्व गोष्टींवरून असें अनुमान होतें कीं, सामाजिक सुधारणा करण्याचें काम कोणत्याही एकाच व्यक्तीच्या शक्तिबाहेरील आहे, आणि तें सिद्धीस नेण्यास सामाजिक सभाच पाहिजे. हें अनुमान कांहीं अंशीं सत्यही आहे; कारण लोकापवादास्तव किंवा दुसऱ्या पुष्कळ वाईट परिणामांच्या भीतीनें, वेगळी तऱ्हा स्वीकारण्यास किंवा दुसरें एकादें लोकरीतीविरुद्ध कृत्य करण्यास एकट्या मनुष्याचा जेथें धीर होत नाहीं, तेंच कृत्य कांहीं मंडळी एकविचारानें करण्यास प्रवृत्त झाली असतां भावी छळाचें दुःख सर्वांवर वांटलें जाऊन कोणासच जड जाणार नाहीं. ह्या युक्तीनें सामाजिक सुधारणा करण्याची एक नवीन पद्धति अलीकडे निघाली आहे, ती अशी कीं, एक सभा करून तींतील सर्व लोक,

आम्ही सामाजिक वर्तनाचे अमुक अमुक नियम पाळूं आणि त्यांत हयगय केली असतां सभेस अमुक ठरीव दंड भरूं, असा शपथपूर्वक आपापला करार करून देतात. ह्याच तोडीची दुसरीही एक सुधारणा, म्हणजे 'सामाजिक सभा' ह्या नांवाची राष्ट्रीय सभेच्या खालच्या पायरीची एक सभा स्थापन झाली आहे. तिला जाणारे सभासद हल्लीं ज्या कित्येक सामाजिक सुधारणा करूं इच्छिणाऱ्या सभा आहेत त्यांतून निवडून पाठविले जातात आणि आपणा स्वतःसच मुखत्यार निवडून, मुखत्यार म्हणून दुसरेही कित्येक सुधारक जातात; परंतु हिंदु समाजांत मतवैचित्र्य अतिशय असल्यामुळें आणि बहुतेकांचा कल विशेषेंकरून जुन्या मतास चिकटण्याचा असल्यामुळें ह्या सभेच्या कामाची पद्धत विशेष व्यवस्थेची नाहीं; आणि सभेला जाणाऱ्या लोकांस कांहीं फायदा होण्याच्या ऐवजीं मौज पाहण्याची मात्र ही एक जागा झाली आहे. आतां, एकोणिसाव्या शतकांतील शिक्षणाच्या धर्तीनें मनुष्यांची एकी वाढून त्यांच्या एकत्र मतास मोठा जोर येत चालला आहे आणि व्यक्तिमात्राचा प्रताप त्यापुढें लोपून गेला आहे, हें खरें आहे; आणि ह्याचीं उदाहरणें जाईंट स्टॉक कंपनी, पार्लमेंट सभा, व्यापारी कंपन्या, मजूरांचे संप, वगैरे अनेक आहेत. तत्रापि ही एकीची संवय आपणा हिंदू लोकांस अद्यापि लागली नाहीं; आणि जेथें जेथें ती लागली आहे, तेथें सुद्धां समाजावर वजन ठेवणारे आणि सामाजिक कृत्यांचीं सूत्रें यथास्थित चालविणारे पुरुष असतात असें नाहीं.

येथपर्यंत सामाजिक सुधारणेच्या ठळक ठळक गोष्टींचा इतिहास झाला. आतां आजपर्यंत सामाजिक सुधारणेचें काम हातीं घेऊन तें सिद्धीस नेण्याकरितां इतके प्रयत्न केले, तरी ते निष्फळ झाले ह्याचीं कारणें काय, त्यांनीं काय चुका केल्यामुळें हें कार्य बिघडलें, आणि त्यांच्या उद्योगाविरुद्ध नेहमीं येणाऱ्या हरकती कोणत्या? ह्या गोष्टींचा विचार करण्यास ठीक पडेल. हा विचार करण्यापूर्वी एवढें एक सांगणें अवश्य आहे कीं, हिंदुस्थानांत सामाजिक सुधारणा करावयाची, म्हणजे तिला धार्मिक सुधारणेचेंच बहुतेक स्वरूप येतें; कारण आपला हिंदू धर्म आणि त्यासारखेंच पृथ्वीवरील दुसरेही पुष्कळ धर्म ह्यांत, मनुष्य उपजल्यापासून तों मरेपर्यंत त्याच्या आयुष्यांत घडणाऱ्या सर्व गोष्टी गोंवून टाकिलेल्या असतात. कांहीही कृत्य करावयाचें असो, तें अमुक पुराणोक्त फल प्राप्त होण्याकरितां करावें किंवा अमुक ठिकाणीं त्याचा निषेध मानिला असल्यामुळें करूं नये, असा धर्माचा आधार त्यास असावयाचाच. मग कन्येचें वय विवाहकाळीं किती असावें, विधवाविवाह करावा किंवा नाहीं, हे तर फार महत्वाचे प्रश्न आहेत; तेव्हां अशा प्रश्नांचे निर्णय ( ह्मणजे मुलींचीं लग्नें अमुक वयांत करावीं, किंवा पुनर्विवाह करावा किंवा नाहीं ) लोकांनीं आपल्या सोईस पडतील त्याप्रमाणें करावें असें त्यांच्या खुषीवर अथवा लोकसांप्रदायावर न ठेवितां ते धर्मानेंच ठरवून ठेविले आहेत, ह्यांत विशेष आश्चर्य वाटण्यासारखें नाहीं. वैदिक काळांत बालविवाह, पुनर्विवाह, स्वयंवर, सती,

विधवा संन्यास, वगैरे सर्व प्रकारच्या चाली प्रसृत होत्या, आणि पुष्कळ निरनिराळीं मतेंही होतीं. त्या सर्वांस वेदांचा आधार सांपडेल; निदान अमुक रीति वाईट आहे म्हणून तिचें आचरण करूं नये, असा निषेध केलेला त्यांत कोठेंही नाहीं. परंतु पुढें कालगतीनें जशी जशी लोकांची स्थिति पालटूं लागली, तसतशा कित्येक चाली नाहींशा होऊं लागल्या; कित्येक लोकांस आवडतनाशा झाल्या; आणि हलींचीं जुनीं मतें हळू हळू स्थापन होऊं लागलीं. तींच पुढें जोरावत जाऊन सुमारें २००० वर्षांपूर्वीं बहुतेक सर्व सूत्रकार, स्मृतिकार आणि शास्त्रकार ह्यांनीं वरील प्रश्नांचे निकाल करून हिंदुधर्माचें खरें आचरण अमुक आहे असें ठरविलें; व जे हिंदूलोक ह्याप्रमाणें आचरण करणार नाहींत, त्यांस नरकप्राप्ति होईल, इतकेंच नाहीं, तर अशा मनुष्यांस बहिष्कृत करावें; त्यांशीं संपर्क करूं नये; त्यांस मिळकतीचे हक्क मिळूं नयेत अशा अनेक अटी स्मृतिकारांनीं घातल्या. हिंदुस्थानांतील सर्व ब्राह्मण, आणि श्रुतिस्मृतीप्रमाणें आपणासही अधिकार आहे असें समजून ब्राह्मणांप्रमाणें आचरण ठेऊं पाहणाऱ्या कित्येक श्रेष्ठ जाती यांच्यांत, मुलींचीं लग्नें पाहिजे तेव्हां करणें अथवा पुनर्विवाह करणें हें त्यांच्या खुषीवर असावें, असें आतां राहिलें नाहीं; परंतु असे करणें धर्माप्रमाणें आहे किंवा अधर्म आहे, पुण्यकर्म आहे किंवा पापकर्म आहे, लोकमान्य आहे किंवा उपहासास्पद आहे, ह्या गोष्टींची मात्र वाटाघाट उत्पन्न होते, अशा थरास हे विषय आले आहेत. आणि ब्राह्मणांची जात हिंदुस्थानांत श्रेष्ठ असून

इतर जातींत धर्मोपदेश करणारी असल्यामुळें सर्वांचीं मतेंही ब्राम्हणांसारखींच झालीं आहेत; ह्याप्रमाणें सामाजिक सुधारणेच्या विषयांस धार्मिक सुधारणेचें रूप आलें आहे; परंतु धर्मांत फेरफार करणें लोकांस विशेष जड वाटतें, म्हणून ते सामाजिक सुधारकांच्या मतास अत्यंत विरुद्ध असतात. यावरून हिंदूलोकांचें मन सुधारणेकडे वळविणें ह्मणजे त्यांचे धर्मसंबंधीं असलेले दोष नाहींसे करणें आहे. जुन्या धर्मांतील मतांच्या वाईटपणाविषयीं खात्री झाल्यानें लोकांनीं आपल्या खुषीनेंच तो सोडून देऊन नवीन धर्म स्वीकारिल्याचीं उदाहरणें इतिहासांत दोन तीन आहेत; खिस्तीधर्म, बौद्ध धर्म, प्राटेस्टंट धर्म आणि मुसलमानी धर्म, ह्यांचा इतिहास पाहिला असतां जुन्या धर्माच्या लोकांनीं कसे अडथळे आणिले होते, आणि ते कसे सहज दूर झाले, हें कळून येईल; व आपल्या देशांतील सुधारणेस प्रतिकूळ असलेलीं लोकांचीं धर्ममतें नाहींशीं करण्यास काय केलें पाहिजे हें ठरविण्यास वरील इतिहास हें चांगलें साधन होईल, याकरितां त्याचा आतां तपशीलवार विचार करूं.

( १ ) सामाजिक असोत किंवा धार्मिक असोत, जुन्या मतांना मुख्य आधार बायका असतात. सामाजिक सुधारकांची कृति त्यांच्या उपदेशाप्रमाणें नसते, म्हणून लोक जेव्हां त्यांस ह्या असंबद्धतेविषयीं असा प्रश्न करितात कीं, ' अहो, तुमच्या बोलण्याप्रमाणें प्रथम तुम्हीच आपलें वर्तन कां ठेवीत नाहीं ?', तेव्हां ह्या प्रश्नास सुधारक लोक बहुतकरून एकच जबाब देतात कीं, "काय करावें ? आमच्या बायका, किंवा बहिणी किंवा पूज्य मातोश्री ( अथवा

दुसरी जी कोणी काकीमामी असेल ) ह्यांच्यापुढें आमची अक्कल अगदीं चालत नाहीं." हें त्यांचें ह्मणणें 'न कर्त्याचा वार शनिवार' ह्या ह्मणीप्रमाणें कांहीं तरी बयाद सांगण्यापैकीं आहे, किंवा स्त्रीवशतेमुळें त्यांस लांछनास्पद आहे असें समजूं नये; कारण स्त्रियांचा प्रभावच खरोखर तसा आहे. कोणत्याही समाजांत ज्या चालीरीति असतात त्या मागल्याप्रमाणेंच पुढें चालविण्याविषयीं बायकांचा मोठा दुराग्रह असतो; मग त्या खरोखर चांगल्या असोत अथवा वाईट असोत, त्याचा विचार त्या करीत नाहींत. उदाहरणार्थ--इंग्रज लोकांच्या बायका, ऐटदार परंतु ज्यानें वाऱ्याचा लेशही येणार नाहीं, असे पंखे हालवून उष्मा शांत करण्याचा यत्न करीत असतात किंवा जिच्या सावलीनें तोंड झांकण्याची देखील पंचाईत, इतकी मोठी छत्री घेऊन उन्हांत फिरत असतात. तशाच आमच्या हिंदुलोकांच्या भोळ्या बायका धूम तुळशीला प्रदक्षिणा घालतात. ह्या सर्वांत पाहिलें असतां अज्ञान सारखेंच, परंतु एकदां घेतलेली रीति न सोडण्याविषयीं जो त्यांचा हेका तो यावरून स्पष्ट दिसून येतो. बरें, स्त्रियांचा हा स्वभाव ( सामाजिक किंवा धार्मिक गोष्टींत जें एकदां मत झालें, तें मोठ्या दुराग्रहानें कायम ठेवणें, ) आपण निंद्य मानितां कामा नये. तो मोठा फायदेशीर असल्यामुळें त्यास मान देणें यांतच आपला शहाणपणा आणि थोरपणा आहे; आणि त्याच्या विरुद्ध जाणें अप्रशस्त असून त्याचे परिणाम भयंकर होतील. सारांश, स्त्रियांचे मनोविकार त्यांच्या विचारशक्तीहून फारच बलवत्तर आहेत; ह्यामुळें एखादी नवीन सुधारणा

करावयाची असली, आणि तिचा उपयोग मोठा असून तिच्यांत सदयता इत्यादि पुष्कळ गुण असले, तरी पूर्वापार चालत आलेली रीति मोडण्याचें स्त्रियांस फार भय वाटत असल्यामुळें त्या तिचा स्वीकार करीत नाहींत. सारांश, स्त्रियांच्या सुखाकरितां किंवा त्यांच्या दुःखविमोचनाकरितां ज्या सुधारणा करण्याचें योजावें, त्यांस स्वतः स्त्रियाच मोठ्या शत्रू बनून राहतात; हा पहिलाच सिद्धांत दिसण्यांत अगदीं उलट दिसतो तरी तो अक्षरशः खरा आहे, आणि असाच सर्वत्र अनुभव आहे.

स्त्रियांचे मनोविकार त्यांच्या विचारशक्तीपेक्षां फारच बलवत्तर असतात, ही गोष्ट थोडी वाईट तर खरीच. तत्रापि ह्याच मनोविकारांच्या योगानें त्यांच्यांतील एक गुण फार उपयुक्त आणि पूज्य झाला आहे. तो कोणता ह्मणाल तर कितीही श्रम, दुःख, किंवा त्रास पडला, तरी तो धैर्यानें सहन करण्याची शक्ति बायकांस विशेष असते हा होय. बालपणांत आणि तरुणपणांत मनुष्याचें यथायोग्य लालन-पालन होतें, ह्याला कारणीभूत स्त्रियांचा हाच गुण होय. पहा, नानातऱ्हेचे श्रम व अडचणी सोडून, व लहानपणच्या अनेक रोगांतून बचावून स्त्रिया आपल्या मुलांस लहानांचीं मोठीं करितात; तरुण झाल्यावर जरी तीं आपल्या आईला शिव्या देऊं लागलीं तरी त्यांस दुखणेंबाणें आलें असतां त्याच त्यांची शुश्रूषा करण्यांत तत्पर असतात; मुलें किती कुरूप असोत, घाणेरडीं असोत, किंवा मोठीं झाल्यावर बदफैली छिनाल निघोत त्यांच्या योगानें आयांच्या मायेंत किमपिही फरक पडत नाहीं; त्या श्रम, अप-

मान सर्व कांहीं सोसून आपल्या आवडत्या मुलांचें भलें करण्यासच झटत असतात, हा किती उपयोगी गुण स्त्रियांच्या आंगीं आहे? आणि हा गुण त्यांच्यांत नसता तर जगाची काय वाट झाली असती? आईच्याच नात्यानें स्त्रियांच्या ठायीं हा गुण असतो असें नाहीं. पत्नीच्या नात्यानें देखील स्त्रिया अशाच वागतात. सुखाच्या दिवसांत त्या आपल्या प्रिय पतीस आज्ञाधारक मित्राप्रमाणें रमवितात; व्यवहारांत त्यांना विश्वासू मंत्र्याप्रमाणें सल्ला देतात. चाकराप्रमाणें त्यांची सेवा करितात, आणि त्यांस दुखणें आलें असतां ममताळूपणानें दाईप्रमाणें त्यांच्या शुश्रूषेंत तत्पर असतात.

आमच्या हिंदू स्त्रियांच्या ठायीं जी सहनशक्ति आहे, तिजबद्दल खरोखर त्या सन्मानास फार योग्य आहेत, आणि गतभर्तृका झाल्यावर स्त्रियांस जे नियम ठरवून दिले आहेत, त्याप्रमाणें आचरण करण्यांत त्यांचा हा गुण फारच व्यक्त होतो. पुरुषांस विधुर झाल्यानंतर विधवेप्रमाणेंच आचरण करण्याचे नियम जर ठेविले असते, तर स्वामिनिष्ठेनें निष्कलंक आचरण ठेवणाऱ्या विधवेप्रमाणें पुरुष वागतो काय? कधींही वागले नसते; हें मीच म्हणतों असें नाहीं, दुसऱ्याही कित्येकांचें* असेंच मत आहे. शिवाय हिंदू

*दंपत्योर्व्युत्क्रमे दोषः समः शास्त्रे प्रतिष्ठितः,
नरा न तमवेक्षंते तेनात्र वरमंगनाः ॥
न शतेनापि वर्षाणामपैति मदनाशयः,
तत्राशक्त्या निवर्तन्ते नरा धैर्येण योषितः ॥
वराहमिहिर. बृ. सं अ० ७४. श्लो० १२-१५.

स्त्रियांस हें सहिष्णुत्व जास्त येण्यास दुसरींही कित्येक कारणें झालीं आहेत. शास्त्रानें आणि लोकमतानें त्यांस पुरुषांपेक्षां पुष्कळ गोष्टींचा प्रतिबंध आहे; पुराणांतील कित्येक कथांत त्यांच्या पातिव्रत्याच्या ज्या गोष्टी लिहिलेल्या आहेत, त्या ऐकिल्यामुळें तसें वागण्यांत स्त्रियांस मोठा अभिमान वाटत असतो; तसेंच कित्येक कवींनीं आपल्या अजरामर कृतींत सावित्री, तारा, सीता ह्यांची आपल्या पतींवर प्राणापलीकडे असलेली निष्ठा, फारच स्तुतिपर गाइलेली आहे, त्यामुळें हिंदू स्त्रियांचीं मनें तल्लीन होऊन तीं चरित्रें त्यांच्या नेत्रांपुढें अक्षय्य दिसत असतात, व स्वसुखास तुच्छ मानण्याचें त्यांस उत्तेजन येत असतें.

हिंदू स्त्रियांची दैवानुरूप प्राप्त झालेली दशा भोगण्यास कुरकुर नसते इतकेंच नाहीं, तर त्या जीं जीं दुःखें सहन करितात त्यांवरून त्यांची प्रीति आणि जुन्या चाली दुराग्रहानें पुढें चालविण्याची इच्छा, हीं किती बलिष्ठ असतात हें उघड दिसून येतें. पुनर्विवाह विधवांस खरोखर पुष्कळ अंशीं सुखकर होईल; परंतु त्यांची आपल्या पहिल्या पतीविषयींची प्रीति पहा किती विलक्षण असते, कीं आपण ज्याला ईश्वराप्रमाणें पूज्य मानिला, ज्यावर आजपर्यंत पतीच्या नात्यानें प्रीति केली, यजमान ह्मणून ज्याची सेवा केली, त्याला विसरून, दुसरा पति करण्यापेक्षां आजन्म दुःख सहन करण्यास त्या सिद्ध असतात. तसेंच लोकरीति आणि धर्माज्ञा बरोबर अमलांत आणण्याकरितां कन्येच्या विरहदुःखाचा विचार एकीकडे ठेऊन तिचें लग्न अल्पवयांत करण्याविषयीं आपणच पतींची विनवणी करून, मागाहून

तिच्या तीव्र वियोगामुळें आपणच दुःखाश्रु ढाळितात. ह्याप्रमाणें स्वसुखास तुच्छ मानण्याचा हिंदू स्त्रियांचा जो स्वभाव आहे, तो शास्त्रांनीं आणि जुन्या चालींनीं दृढ झाल्यामुळें, त्यांना स्वतःला ज्या घातक त्याच चाली त्यांस प्रिय वाटतात; आणि पुरुष कितीही विद्वान् असला तरी तो स्त्रियांच्या मोहांत पडतो, आणि त्यांच्या इच्छेविरुद्ध त्याच्यानें जावबत नाहीं. ह्याप्रमाणें सामाजिक सुधारकांस स्त्रियांचा मोठा अडथळा येऊन त्यांचे प्रयत्न फुकट जातात, आणि धैर्य नाहींसें होतें. हा अडथळा नाहींसा करण्यास दुसरा कांहीं उपाय नाहीं; कालांतरानें आणि स्त्रीशिक्षणाच्या फैलाव्यानें जेव्हां स्त्रियांच्या स्वभावांत आणि मनांत बदल होईल तेव्हां त्यांचीं मनें सुधारणेस अनुकूल होतील. मात्र स्त्रीशिक्षणास उत्तेजन देऊन त्यांचीं मनें सुधारणेकडे लवकर वळविण्याचा प्रयत्न केल्यास होण्यासारखा आहे; आणि सुधारणेंत हेंच कृत्यें अत्यंत महत्वाचें आहे, असें पुढील विवेचनावरून दिसून येईल.

( २ ) वर लिहिल्याप्रमाणें स्त्रिया ह्या सुधारणेच्या जशा अनिवार्य शत्रु होऊन राहिल्या आहेत, तशींच त्यांचीं मनें एकदा फिरलीं ह्मणजे सामाजिक आणि धार्मिक सुधारणेस मोठ्या औत्सुक्यानें त्या मदतही करितात; आणि ह्याचेंही कारण मागें सांगितल्याप्रमाणें त्यांची विचारशक्ति फार थोडी असून मनोविकार अतिशय बलवान् असतात हेंच होय; म्हणजे जुन्या चाली न सोडण्याविषयीं जशा त्या दुराग्रह धरितात, तशाच नवीन पंथांत शिरल्या असतां तोही त्या एकनिष्ठेनें आणि भाविकपणानें स्वीकारितात. जुना धर्म

न सोडण्याविषयींच्या स्त्रियांच्या इच्छेविरुद्ध जसें पुरुषांस जाववत नाहीं, असें मागे सांगितलें, त्याच कारणानें त्या नवीन पंथांत शिरल्या असतां पुरुषांचें डळमळीत मन नवीन पंथांत स्थिर करण्यास त्या फार उपयोगीं पडतात. तत्वत: विचार केला असतां आपणांस कळून येतें कीं, विचारशक्तीच्या योगानें मनुष्याचें मन नेहमीं डळमळीत होतें; ह्यामुळें एकादा विचारी मनुष्य नवीन धर्माचा विचार करूं लागला असतां जशा कांहीं गोष्टी त्यांत चांगल्या आहेत असें त्यास वाटतें, त्याचप्रमाणें चालू असलेल्या जुन्या धर्मांत देखील कांहीं गोष्टी त्यास चांगल्या आढळतात, आणि जुन्या धर्मांतील कांहीं दोष जसे त्याला दिसतात, तसेच नवीन धर्मांतही काय काय दोष उत्पन्न होतील हें त्यास विचारशक्तीनें समजतें. एकंदरींत त्याचें मन कोणीकडेही स्थिर न होतां मध्येंच गटंगळत असतें. ज्यांना विचारशक्ति असून मनाचा उत्साहही फार असतो, अशा अमोल ईश्वरी देणगीचे मनुष्य जगतांत फार थोडे असतात; आणि तेच मात्र कोणता तरी एक पंथ नवीन प्रचलित करण्यास, किंवा त्याचा जय करण्यास समर्थ असतात; परंतु त्यांशिवाय बाकीच्या बहुतेक लोकांचा भरंवसा जुन्या धर्मावरही पूर्ण नसतो, आणि नव्यावर त्यांची श्रद्धा बसत नाहीं, असे ते मध्येंच गोंधळत असतात. ह्याविषयीं गिबन ह्या प्रसिद्ध इतिहासकारानें एके ठिकाणीं असेंच लिहिलें आहे—“ आपली विचारशक्ति आपणास कोणताही पंथ धरूं न देतां तिऱ्हाइताप्रमाणें आपणास मधल्याच अवस्थेंत ठेविते; परंतु मनोविकार हे

विचार शक्तीच्या अगदीं उलट आहेत; ते चांगल्या किंवा वाईट, नव्या किंवा जुन्या कोणत्या तरी एका पंथांत आपणास दृढ करून सोडितात. " स्त्रियांचा स्वभाव पुरुषांच्या स्वभावापेक्षां अगदीं निराळा आहे. त्या स्वतः कधीं कांहींच फेरफार करीत नाहींत, परंतु कोणी कांहीं नवी तऱ्हा काढिली, तर ती चांगली आहे किंवा वाईट आहे, खरी आहे किंवा खोटी आहे, ह्याचा विचार एकीकडे ठेवून प्रथम ती कायावाचामनोभावानें स्वीकारण्यास स्त्रियांतूनच कोणी तरी पुढें सरसावतात. आपल्या हिंदूधर्माच्या चार्त्रीतच पाहिलें तरी हा स्त्रियांचा स्वभाव तेव्हांच दिसून येतो, आणि आपण त्याबद्दल त्यांचा उपहासही करितों. कोणी खरा किंवा लुच्चा कसाही बोवा येवो, त्याच्या बोलण्यावर स्त्रियांचा विश्वास आधीं बसून तावडतोब त्या त्याच्या भजनीं लागतात. त्याचप्रमाणें कोणी मंत्री, पंचाक्षरी, फलज्योतिषी, ह्यांच्याही नादीं लागतात, यावरून त्यांच्यांत विचारशक्तीपेक्षां मनोविकारांचेंच प्राबल्य जास्त असतें असें दिसून येतें. कित्येक प्रसंगीं त्यांचें आचरण तर हंसूं येण्यासारखें आणि उपहासपद असतें, परंतु हा स्त्रियांचा गुण फार महत्वाचा आहे. ख्रिस्तीधर्माच्या प्रसाराची हकीकत ऐकिली असतां नवीन धर्म स्थापन होण्यास स्त्रियांनीं तो प्रथम स्वीकारण्याची किती अवश्यकता असते, आणि त्यापासून कसा उपयोग होतो हें आपणांस कळून येतें. ख्रिस्ती धर्माच्या पहिल्या दोन तीन शतकांत जितके लोक ख्रिस्ती झाले, त्यांत बायकांचीच संख्या फार मोठी होती; आणि नुस्ती संख्याच होती असें नाहीं, त्या धर्मावर नि-

ह्याही त्यांचीच अतिशय असे. ह्या गोष्टीवरून कित्येक लोक खिस्ती धर्माचा असा उपहासही करितात कीं, पहिल्यानें खिस्ती झालेले लोक ह्मणजे हलकट, दुराचारी इत्यादि कुचकामाचे लोक, शेतकरी, मजूर, बायका, पोरें, यांनीं भरले होते. खिस्ताचे बारा प्रेषित* बायकांचा कधीं कंटाळा करीत नसत; कारण बायकांचीं मतें बदललीं ह्मणजे मोठें कामच झालें, हें तत्व त्यांस पूर्ण माहीत होतें, आणि त्या प्रेषितांची वर्तणूक फारच नीतीची असल्यामुळें, बायकांस उपदेश करून व त्यांस धर्मांतर करण्यास लावून त्यांच्या-कडून आपला कार्यभाग साधण्यास त्यांस हरकत येत नसे. ह्या प्रेषितांच्या मागून शुभवर्तमानाचा प्रसार करणारे जे धर्मोपदेशक झाले, त्यांनींही प्रेषितांच्याच कित्याप्रमाणें, ज्याचें मन स्वतःच्या दुराचारामुळें आणि पातकामुळें अगदीं खात होतें, अशा लोकांस आणि विशेषेंकरून बायकांस खिस्ती धर्माचा आश्रय देण्याचा क्रम चालविला. कारण अशा लोकांचा त्यांच्या दुष्कर्मामुळें पूर्वधर्मातील लोक तिरस्कार करूं लागून त्यांस जातीबाहेर टाकितात, आणि त्या उदा-सीनतेनें आणि पश्चात्तापानें त्यांचीं मनें इतकीं शुद्ध होतात कीं, पुनः त्यांस धर्माचा आधार मिळाल्याबरोबर बहुतकरून तें धर्मनिष्ठ आणि नीतिमान् निघतात. फार लांब नको, हल्लींचे पाद्री, मुक्तिफौजवाले, हे देखील उपदेश करण्याचें काम स्त्रियांकडून करवितात, आणि ही त्यांची युक्ति फार

---

* खिस्ती धर्माचा प्रसार करण्याची आज्ञा येशूनें आपल्या बारा मुख्यशिष्यांस दिली होती, त्यांस अपॉसल्स् ( प्रेषित ) ह्मणतात.

यथायोग्य आहे, असें ह्मणण्यास हरकत नाहीं; कारण नुसत्या मुद्देशीर बोलण्यापेक्षां तेंच बोलणें जर स्त्रियांच्या चित्तवेधक कोमलवाणींतून अथवा गायनद्वारा आलें, तर ऐकणाऱ्या लोकांस मोह पडतो व त्यापासून फायदा होतो. याप्रमाणें स्त्रियांच्याच मुख्य मदतीनें रोम शहरांत आणि दुसऱ्या प्रांतांत ख्रिस्ती मतें अगदीं घरोघर फैलावलीं, आणि पुरुषमंडळी जरी तिकडे लक्ष देत नसत, तरी रोमन लोकांच्या बायकामुली ह्या नवीन मताला फारच लुब्ध होऊन गेल्या. हळू हळू हा धर्म (ख्रिस्ती) डायओक्लिशिअन बादशाहाच्या देखील वाड्यांत घुसला. कोणत्याही नव्या धर्माविषयीं पुरुषांच्या मनांत आणि बायकांच्या मनांत किती फरक असतो, हें गिबन ह्यानें ह्या राजघराण्याविषयीं जें लिहिलें आहे, त्यावरून स्पष्ट दिसून येईल. "नवीन धर्म मोठा चांगला होता, तरी डायओक्लिशिअन बादशहा दूरदर्शी असल्यामुळें तो तिकडे दुर्लक्ष करीत असे. बरें; त्याची आपल्या जुन्या धर्मावर फार निष्ठा असे असेंही नव्हतें; तरी पूर्वीपासून चालत आलेल्या रीतीप्रमाणें आपल्या राष्ट्राच्या देवतांसच तो भजत असे; परंतु त्याची राणी प्रिस्का आणि मुलगी व्हेलेन्‌शिया ह्या फावल्या वेळांत ख्रिस्ती धर्माचीं तत्वें मोठ्या आदरानें आणि पूज्यबुद्धीनें ऐकत असत. ह्याचप्रमाणें ख्रिस्ती धर्मावर नेहमीं बायकांचेच उपकार फार झाले आहेत. आणि जेव्हां जेव्हां तो फैलावला तेव्हां तेव्हां प्रथम त्याजवर बायकांची भक्ति बसल्यामुळेंच तो फैलावला"

पुढें ख्रिस्ती बादशहांच्या आश्रयानें लॅटिन आणि ग्रीक ह्या लोकांनीं आपापलीं धर्ममतें रोम आणि कान्स्टांटिनोपल

येथें पूर्णपणें स्थापन केली. तेव्हांपासून रोमन आणि ग्रीक दोन्ही जातींचे मिशनरी लोक आपल्या शेजारच्या जर्मन, रशियन वगैरे लोकांस उपदेश करण्यास फिरत असत. त्यांच्या प्रयत्नानें फ्रॉंकराजे आणि त्यांच्या मागून त्यांच्या रयतेनेंही हा धर्म कसा स्वीकारला, इत्यादि गोष्टींची विश्वसनीय हकीकत इतिहासांत थोडथोडी आढळते. ह्या हकीकतीमध्यें देखील प्रथम स्त्रियांनीं हा धर्म स्वीकारिला, आणि त्यांच्या मोहपाशानें त्यांचे नवरे, नातलग वगैरे सर्वांनीं त्याचें अनुकरण केलें, हीच गोष्ट नजरेस येते. फ्रांक लोकांचा राजा क्लोव्हिस हा प्रथम खिस्ती झाला, ह्याचें कारण त्याची बायको बरगंडीच्या राजाजी मुलगी क्लाटिल्डा ही खिस्ती असल्यामुळें तिनें त्याचें मन त्या धर्माकडे वळविलें. गाथ, व्हँडाल, जर्मन वगैरे लोकांनीं स्वाऱ्या करून रोमन राष्ट्रांचा सर्व पश्चिम भाग जिंकिला, त्याच वेळेस साक्सन लोकांनीं ब्रिटिश देश जिंकिला. रोमन राष्ट्रांत राहणाऱ्या रानटी लोकांपैकीं ह्या साक्सन लोकांनीं मात्र आपला मूर्तिपूजेचा धर्म सोडिला नव्हता; आणि तेच ब्रिटन देश जिंकून तेथें राहिले. ह्यामुळें पुढें दोनशें वर्षेंपर्यंत इंग्लंडांत नरयज्ञाचा धडाका सुरू असे. तेथील लोकांचें ( ह्मणजे साक्सन लोकांचें ) धर्मांतर होऊन त्यांस हल्लींचीं उत्तम स्थिति प्राप्त होण्यास स्त्रियाच कारण झाल्या आहेत. केंट येथील एथेलबर्ट नांवाच्या राजानें मूर्तिपूजा झुगारून देऊन प्रथम बातिस्मा घेतला; ह्याचें कारण त्यानें फ्रांक राजाची कन्या बर्गा हिला वरिलें होतें व ती खिस्ती धर्मी असल्यामुळें त्याचें मन तिनेंच तिकडे वळविलें हें होय.

एथलबर्गा ह्मणून फार सभ्य चालीची आणि सदाचरणी अशी एक ख्रिस्ती बायको होती, तिच्या मोहानें नार्थंब्रियाचा राजा एवढा धाडदांड, पण तोही निमूटपणें ख्रिस्ती झाला. मर्सिया ह्मणून इंग्लंडाचा जो भाग होता, त्यांतील लोक बरेच दिवस मूर्तिपूजकच राहिले; शेवटीं बायकांनींच त्यांस ख्रिस्ती धर्मांत आणून सोडिलें. तेथील पेंडा नांवाच्या राजानें आस्विन ह्याची सुंदर कन्या आल्च फ्लेडा हिशीं लग्न केलें; ती ख्रिस्ती धर्माची असल्यामुळें पेंडा हाही ख्रिस्ती झाला.

ग्रीक धर्मोपदेशकांच्या उद्योगानें रशियन लोकांचें धर्मांतर झालें. तेथेंही प्रथम बायकांनींच तो धर्म उचलिला, आणि मागील उदाहरणांप्रमाणें धर्मप्रसार करण्यांत त्यांचाच उपयोग फार झाला. इयोगर ह्याची विधवा स्त्री ओल्गा हिनें प्रथम मोठ्या थाटानें कान्स्टांटिनोपल येथें बाप्तिस्मा घेतला. तेंव्हांपासून तिचें हेलेना राणी असें पूज्य नांव पडलें. तिच्या खासगीकडे जेवढे नोकर होते, त्या सर्वांनीं तिचें अनुकरण केले; त्यांत तिचा एक चुलता होता, दोन दुभाषे (ती रशियाची राणी असल्यामुळें तिच्या कामकाजांत ह्यांची गरज असे) आणि थोर घराण्यांतील १६ व हलक्या कुळांतल्या १८ इतक्या तरुण स्त्रिया होत्या. ही राणी खिवा आणि नाव्हगोराड येथें आल्यावर देखील नवीन धर्माप्रमाणें चालण्याचा आणि तेथें त्याचा प्रसार करण्याचा तिचा निश्चय झाला; परंतु तिचे सर्व प्रयत्न व्यर्थ गेले; आणि तिचे लोक व तिच्या स्वतःच्या कुटुंबांतील मनुष्यें देखील हट्टानें आपल्या वडिलोपार्जित देवांचीच पूजा करीत. तिचा स्वतःचा स्वाटास्लास नांवाचा मुलगा होता, त्याला

आपण ख्रिस्ती झालों असतां इष्टमित्र आपली चेष्टा करतील, किंबहुना आपला तिरस्कारही करूं लागतील असें भय वाटत असे; आणि तिचा नातू वालाडॉमीर ह्यानें तर जुन्या देवांचीं देवळें नवीन बांधण्याचा धडाका चालविला होता! परंतु स्त्रियांच्या आकर्षणाचा जोर कसा विलक्षण आहे पहा; त्या नातवाला ( वालाडॉमीर ) आपणास रोमन बायको असावी अशी इच्छा झाली, परंतु रोमन पडले ख्रिस्ती ह्मणून तोही लागलाच ख्रिस्ती झाला. बाप्तिस्मा घेतांच त्यानें आपल्या राष्ट्रांत चोंहींकडे कायदा करून टाकिला कीं, बाप्तिस्मा घेण्याचें नाकारील तो ईश्वराचा आणि राजाचा शत्रू समजून त्यास शासन केलें जाईल. याप्रमाणें ख्रिस्ती धर्माचा प्रथम प्रसार होण्यास, व तसेंच बारबेरियन ( रानटी ) लोकांचेंही धर्मांतर होण्यास, बायकाच कारण झाल्या. हें वरील उदाहरणांवरून दिसून येईल. आधीं त्या स्वतः धर्मांतर करीत आणि मागाहून पुरुषांसही धर्मांतर करण्यास लावीत.

पुढें ख्रिस्ती धर्माची सुधारणा होते वेळीं अशाच पुष्कळ गोष्टी घडून आल्या आहेत, आणि त्यांत स्त्रियांचे हे विरुद्ध स्वभाव—ह्मणजे जुनें मत न सोडण्याविषयीं दुराग्रह, व नवीन मतस्वीकार केल्यास त्यांतही निश्चय—दिसून येतात. आठव्या शतकांत जेथें जेथें ह्मणून ख्रिस्ती धर्म होता त्या त्या सर्व ठिकाणीं, त्यांच्यांतील मूर्तिपूजेविषयीं मोठे वादविवाद उत्पन्न होऊन पुष्कळ बखेडे झाले. रोमन क्याथोलिक धर्मांत मूर्तिपूजेसारखाच कांहीं प्रकार आहे, ह्मणजे क्रास, मेरीचा ( येशूची आई ) पुतळा इत्यादिकांस ते भजतात,

व जरी ख्रिस्ती धर्मांत मूर्तिपूजा वर्ज आहे तरी ते असें मानीत कीं हातांनीं घडलेल्या मूर्तीस मात्र भजूं नये, परंतु मनुष्यांनीं घडलेल्या नाहींत अशांस भजलें तरी हरकत नाहीं. हा त्यांनीं काय फरक काढिला असेल तो असो, आपणास त्याचें हसूं आल्यावांचून राहणार नाहीं, परंतु इतिहासकानें ह्याविषयीं जें वर्णन केलें आहे, तेंच यथायोग्य दिसतें. तो ह्मणतो—"लोकांचा धर्मभोळेपणा फार दिवस वाढत गेल्यामुळें ख्रिस्ती धर्माचा पहिला साधेपणा जाऊन त्यांत मूर्तिपूजेचा संस्कार शिरूं लागला, ह्मणजे जरी ते प्रत्यक्ष मूर्ति घडून त्यांस भजत नसत, तरी त्यांच्या भाविकपणामुळें क्रास, मेरीची तसबीर, साधू मेल्यानंतर त्यांच्या मागें राहिलेल्या त्यांच्या पादुका, हाडें वगैरे वस्तु हीं त्यांस पूज्य वाटूं लागलीं. जेथें पवित्र क्षेत्रें व वस्तु होत्या तेथें कांहीं तरी अपूर्व चमत्कार दृष्टीस पडत असत. ह्या सर्व गोष्टींवर लोकांचा इतका विश्वास बसला होता, आणि त्यांस धर्माधिकाऱ्यांच्या आज्ञेंत वागण्याची इतकी संवय झाली होती कीं, वरील गोष्टींच्या सत्यत्वाविषयीं शंका घेण्याची किंवा त्यांचा तपास करण्याची कोणास बुद्धि होत नसे." ह्या वेळीं लियो बादशहा रोमच्या गादीवर होता. त्याचीं धर्ममतें आर्मिनिया प्रांतांतील चालू असलेल्या ख्रिस्ती धर्माचीं होतीं, ह्यामुळें आणि ख्रिस्ती धर्मांत शिरलेला हा मूर्तिपूजेचा प्रकार पाहून मुसलमान लोक ख्रिस्ती लोकांची निंदा करीत, ह्यामुळें, मूर्ति नाहींशा करण्याचा त्यानें पूर्ण निश्चय केला. तो आणि त्याच्यामागून दुसरे पांच बादशहा ह्यांनीं ह्या मूर्ति नाहींशा करण्याचा क्रम एकसारखा चाल-

विला होता, परंतु लोकांचीं मनें प्रतिकूळ असल्यामुळें त्यांचा हेतु निष्फळ झाला. ह्या वेळीं मंक ( बैरागी ) म्हणून एका वेडगळ मताच्या पंथाचे लोक होते, त्यांचें ह्या मूर्तिपूजेमुळें पुष्कळ महत्व वाढून ते संपत्तिमान् झाले होते. तेव्हां अर्थात्च त्यांनीं मूर्तिपूजेचा कैवार घेतला, आणि ती न बुडूं देण्याविषयीं शिकस्त प्रयत्न केले; परंतु मुख्य धर्माधिकारी होते, ते कार्यसाधू व स्वार्थपरायण असल्यामुळें बादशहाच्या मर्जीप्रमाणें आपलें मत देत असत. सरते शेवटीं बादशहानें बिशप ( धर्माधिकारी ) लोकांची सभा भरविली; आणि त्यांत बादशहाच्या मर्जीप्रमाणेंच, ह्मणजे मूर्तिपूजा ख्रिस्तीधर्माविरुद्ध आहे म्हणून ती वर्ज करावी असा निर्णय ठरला. ह्याप्रमाणें बादशहा आणि धर्माधिकारी हे दोन्ही जरी मूर्तिपूजेविरुद्ध झाले, तरी बायकांपुढें त्यांचें कांहीं चाललें नाहीं; कारण निराकार परमेश्वराची कल्पना करण्यापेक्षां स्त्रियांचा भाव मूर्तीचे ठायीं फार लवकर बसतो. प्रत्यक्ष बादशहाच्या घराण्यांतील स्त्रिया देखील मूर्तिपूजा टाकीनात. कान्स्टांटिनोपल येथें येशूचा एक पुतळा होता, त्याचे—आपल्याकडील महास्थानांच्या ठिकाणीं जसे कांहीं चमत्कार होतात ह्मणून आपण ऐकतों त्याप्रमाणेंच —कांहीं साक्षात्कार लोकांत प्रसिद्ध असत. वरील धर्माधिकाऱ्यांच्या सभेनें मूर्तिपूजेचा निषेध ठरविल्यावर बादशहानें तो पुतळा फोडून टाकण्याचा हुकूम केला. हा हुकूम अमलांत आणण्याकरितां लागलाच एक कामगार तेथें गेला, आणि शिडी लावून पुतळा फोडण्याकरितां तो त्या चौथऱ्यावर चढूं लागला. हें अधर्माचें कृत्य पाहण्यास गर्दी अतोनात जमली

होती; विशेषेंकरून त्यांत बायकाच फार होत्या; व त्यांस असें वाटत होतें कीं कांहीं तरी ईश्वरी चमत्कार घडून येऊन हा पवित्र पुतळा फोडण्याचें शासन आपोआपच होईल; परंतु आतां तो ती मूर्ति फोडणार तरी कांहीं चमत्कार होत नाहीं, असें पाहून त्या जमलेल्या स्त्रियांनींच ती शिडी ओढली; आणि तिजवर चढलेल्या कामगारास खालीं पाडून सोट्यांनीं ठार केलें !

ख्रिस्ती धर्मांत मूळ निराकार ईश्वराचीच सेवा सांगितली आहे; परंतु मूर्तिपूजा त्यांत शिरण्यास एक स्त्रीच कारण झाली; आणि तिच्या पुढल्या पिढ्यांत ती ( मूर्तिपूजा ) झपाट्यानें वाढत गेली. पुढें वर सांगितल्याप्रमाणें लियो बादशहानें मूर्तिपूजा बंद केली, कान्स्टंटाईन काप्रोनिमस् ह्याची सून ऐरीन हिचा मुलगा अज्ञान असल्यामुळें राज्य-सूत्र तिच्या हातांत आलें. त्याबरोबर लागलीच तिनें नाईस येथें तिसरी धर्माध्यक्षांची सभा भरविली. मागें सांगितलेंच आहे कीं हे धर्माधिकारी अत्मलाभाकरितां निव्वळ तोंडपुजे-पणा करीत असत; ह्यामुळें त्यांनीं आपणच मागें ठरविलेले नियम रद्द करून नवीन ठराव केला कीं, भाविक ख्रिस्ती लोकांनीं मूर्ति आणि साधूंच्या शेष राहिलेल्या वस्तूंची ( त्यांचे कपडे, टोप्या, पादुका, काठ्या, इ० ) आदरपूर्वक पूजा करावी. ह्याप्रमाणें मूर्तिपूजा पुनः स्थापित झाली; परंतु ही स्त्री मेल्यानंतर लागलाच तिला प्रतिकूळ काळ आला. मूर्तिभंजकांपैकीं शेवटचा बादशाह थिओफायलस् हा जरी विद्वान् होता, तरी मंक आणि मूर्तिपूजा ही नाहींशी करण्याचा त्यानें निश्चय केला. प्रत्येक देवळांत भिंतींवरून काढिलेलीं

चित्रें त्यानें खरडून काढविलीं; कोणा साधूंचीं बसैरे प्रासादिक भांडीं ठेविलेलीं असत तीं विकून• किंबा त्यांचा आटवून रस करून नाहींशीं केलीं; मठांतून जे मंक भरले होते त्यांस हुसकावून लाविलें; त्यांतील कित्येक बापडे तर क्षुधेनें आणि थंडीनें मेले, आणि कित्येकांनीं पुनः संसारांत शिरून संसारिक वेष आणि संसारिक सुख बरोबरच स्वीकारिलीं.

मूर्तिपूजाविरोधाची जितकी हकीकत आहे, त्यांत बायकोच्या हातीं राज्यसत्ता आल्याबरोबर तिनें मूर्तिपूजा स्थापन करावी व पुनः दुसऱ्यानें ती मोडून टाकावी; तरी आणखी एखाद्या बायकोनेंच तिला पुनः आश्रय द्यावा, असाच प्रकार सर्वत्र आढळतो. वरील शेवटला मूर्तिभंजक बादशहा थिओफायलस् ह्याची खुद्द बायको थिओडोरा ही नेहमीं गुप्तपणें मूर्तिपूजा करीत असे. दोनदां हें तिचें कृत्य उघडकीस आलें, आणि आपली स्वतःचीच बायको मूर्तिपूजक आहे असें बादशहास समजलें. एकदां तिच्या मुलांनींच बादशहास सांगितलें कीं, आईजवळ एका पेटींत सुरेख खेळणीं आहेत, तीं ती बाहेर काढून त्यांचें वंदन करिते आणि आह्मांसही तसेंच करावयास सांगते. तसेंच दुसऱ्या एका दिवशीं ती त्या मूर्ति उशीखालून काढून त्यांची पूजा करीत बसली असतां एक खुषमस्कऱ्या घरांत होता त्यानें तिला पकडिलें. राणीला ह्याबद्दल फार बोलून घ्यावें लागलें; परंतु त्या खुषमस्कऱ्यासही त्याच्या फाजील चौकशीबद्दल फटके मिळाले. तेव्हांपासून थिओडोरा सावधपणानें वागूं लागली, व आपल्या देवतांस कोठें तरी लपवून ठेवीत असे, परंतु हा बादशहा मेल्याबरोबर पुनः मंक

कान्स्टांटिनोपल येथें जमले; कारण राणी त्यांच्या पक्षाची असल्यामुळें तिनें मूर्तिपूजा पुन: सुरू केली. एकीकडे नवऱ्याची प्रीति आणि दुसरीकडे धर्मनिष्ठा असें दोहींकडे स्त्रियांचें चित्त गुंतलें ह्मणजे त्यांची कशी स्थिति होते हें थिओडोरा हिच्या हकीकतीवरून चांगलें दिसतें. बादशहा जरी मूर्तिपूजेविरुद्ध होता तरी लोकांची श्रद्धा मूर्तीवरून कमी झाली नव्हती, असें मागें सांगितलेंच आहे, त्यामुळें थिओफायलस मेल्यानंतर तेव्हांचे पाद्री ह्मणूं लागले कीं तो मूर्तिभंजक असल्यामुळें स्वर्गीं न जातां अधोगतीस जाईल. तेव्हां आपला प्रियपति अधोगतीस न जावा ह्मणून थिओफायलस ह्यास मरणकाळीं आपल्या मूर्तिभंजकपणाचा पश्चात्ताप वाटून त्यानें आपणास ( थिओडोरा हीस ) मूर्ति आणावयास सांगितलें आणि त्याचें आदरपूर्वक चुंबन केलें, अशी तिनें गप्प उठविली. इतकें केलें तेव्हां त्या पाद्र्यांनीं त्याच्याबद्दल देवाजवळ क्षमा मागून आतां तो सुखरूप स्वर्गास पोहोंचेल असा थिओडोरा हिला लेखी परवाना दिला.

ह्या पुढील ख्रिस्ती धर्माची भाकड हकीकत, आणि त्यांतील अज्ञानी मंक आणि गोसावणी ह्यांचीं कृत्यें सांगण्यांत विशेष अर्थ नसल्यामुळें तीं वाचण्याचे श्रम वाचकांस देत नाहीं. तसेंच प्राटेस्टंट धर्म आणि त्याच्या अनेक उत्पन्न झालेल्या शाखा ह्यांचीही हकीकत आम्ही येथें सांगत नाहीं. टयूटानिक देशांतून धर्माची स्वतंत्रता स्थापन झाली ती अनेक सभावाद आणि लढाया होऊन शेवटीं कायम झाली, आणि धर्मविवादांत आणि लढायांत बायकांचा विशेष संबंध पडला नाहीं हें साहजिकच आहे; परंतु जेव्हां

जेव्हां त्यांस संधि सांपडली, तेव्हां तेव्हां कांहींनीं सुधारणे-च्या विरुद्ध पक्षास राहून मूळ धर्म कायम ठेवण्याची, आणि कांहींनीं सुधारणेच्या पक्षास मिळून मूळधर्माचा द्वेष करण्याची होती तितकी पराकाष्ठा केली. फार लांब नको, इंग्लंडच्या इतिहासांतील ब्लडी मेरी, आणि एलिझाबेथ, ह्यांचीं चरित्रें हीं इतिहासांतील अक्षय उदाहरणें आहेत, व त्यांवरून स्त्रियांनीं जुना किंवा नवा एक धर्म उचलला म्हणजे मग कांहीं झालें तरी तो त्या कधीं सोडावयाच्या नाहींत, हें उघड दिसून येईल.

ह्याप्रमाणें स्त्रियांचा स्वभाव दुहेरी आहे. सामाजिक धर्माचें रक्षण करण्यास मुख्य आधारस्तंभ त्याच असतात, व नवीन धर्माचा प्रसार करण्याच्या कामांतही उत्साह व मदत त्यांचीच असते. जेव्हां त्या विरुद्ध असतात तेव्हां त्यांचें मन अनुकूल करून घेणें ह्मणजे बहुतेक असाध्यच असतें. बरें, त्यांच्या मनांत नवीन गोष्ट स्वीकारण्याची आली, ह्मणजे ती त्या मोठ्या उत्साहानें आपण आधीं स्वीकारितात; व त्यांच्या मागून पुरुषांसही नवीन मत आवडूं लागतें. महंमद पैगंबराला देखील पहिली निःस्सीम भक्तीण मिळाली, ती त्याची बायको खाडिजा होय. तिच्या नवऱ्याच्या मनांत नवीन धर्माचा जो अंकुर स्फुरण पावूं लागला, त्याजवर तिचा विश्वास प्रथम बसला. दुसऱ्या धर्मांचाही इतिहास पाहिला तरी स्त्रियांनींच तो धर्म प्रथम आणि निष्ठेनें स्वीकारिला आहे, असें आढळून येतें. बौद्ध धर्माचा इतिहास घ्या, त्यांत तरी हेंच भरलें आहे. "बुद्धाचे

अनुयायी हे मध्यम स्थितींतील लोक असत आणि आरंभीं आरंभीं तर स्त्रियाच होत्या." असें हंटर साहेब ह्मणतात.

एकंदरींत सामाजिक सुधारणा करण्याच्या कामांत आजपर्यंत मोठी चूक झाली आहे असें ह्मटलें पाहिजे. स्त्रियांच्या हिताकरितां, इतकेंच नव्हे, राष्ट्रसुधारणेकरितां, स्त्रियांचीं मनें प्रथम वळवून त्यांस अनुकूळ करून घेतल्या असत्या, तर त्यांची हरकत सहज दूर झाली असती. स्त्रीशिक्षणानें त्यांचें मन हळू हळू इकडे वळतेंच आहे हें खरें; परंतु त्याच स्त्रीशिक्षणास झटून मदत देऊन स्त्रियांचीं मनें सुशिक्षित करण्याकडे पूर्ण लक्ष दिलें असतें, तर फार फायदा झाला असता. तसेंच हें कृत्य अवघड आहे हेंही खरें, तथापि उंदिरांनीं मांजराच्या गळ्यांत घांट बांधण्याइतकें तरी तें खचितच अवघड नाहीं, आणि आजपर्यंत त्याचा चांगला विचार केला असता, तर स्त्रियांच्या मतांत आजला पुष्कळ सुधारणा झाली असती.

(२) सामाजिक सुधारकांची ह्यापेक्षांही मोठी दुसरी चूक झाली आहे. सुधारणेचें काम नेहमीं मध्यम स्थितींतील आणि हलक्या स्थितींतील लोकांच्या मनास द्रव आणल्यावांचून कधींही शेवटास जात नाहीं, असें असून हिंदुस्थानांतील सुधारकांनीं अद्यापि त्यांची आठवण देखील काढिली नाहीं. चांगलीं इंग्रजींत लिहिलेलीं पुष्कळ लहान लहान पुस्तकें आणि टिप्पणें सुधारणेच्छु लोक प्रसिद्ध करितात; परंतु त्यांचा उपयोग पाहूं गेलें असतां फक्त जे थोडेसे लोक इंग्रजी शिकलेले असतात त्यांस, आणि आमच्या देशांत असलेल्या आंग्लभौम हुद्देदारांस मात्र होऊन, ते त्यांवर

शिफारशीचे मात्र मोठे लांब लांब अभिप्राय देतात. फार झालें व व्याख्यानें दिलीं तर तीं सुद्धां इंग्रजींतच; आणि त्यांचें श्रोतेमंडळ ह्मणजे बालविवाह आणि पुनर्विवाह ह्यांविषयीं ज्यांचीं मतें ठाम होऊन राहिलीं आहेत, किंवा जे परजातीचे असल्यामुळें बालविवाह आणि विधवाविवाह वाईट किंवा चांगला ठरल्यापासून ज्यांचें नफानुकसान कांहींच नाहीं, अशा लोकांचें असावयाचें. तसेंच, मतें घ्यावयाचीं झालीं तर तीं देखील आमच्यांतील जे थोडेसे लोक पुढारी ह्मणविणारे आहेत त्यांचीं, व पारशी आणि इंग्रज गृहस्थांचींच घेतात; परंतु बहुतेक देश व्यापणारे जे गांवढळ आणि मध्यम स्थितीचे लोक त्यांस कोणीही विचारीत नाहीं. 'ते अडाणी लोक, त्यांचें काय मत घ्यावयाचें आहे?' अशी त्यांची अवहेलना होते. तेव्हां अर्थात्‌च ह्या विषयाची चाललेली वाटाघाट त्यांस माहीत नसते, किंवा तिकडे ते दुर्लक्ष करितात; मग त्यांच्या मनास द्रव यावा कसा!! ते सुधारकांस बाट्ये समजून त्यांचा द्वेष करितात, आणि त्यांच्या खटपटींत शेकडों अडथळे मुद्दाम आणितात. एतद्देशीय भाषांत प्रतिपादन करून ह्या दोन वाईट चालीचे अत्यंत शोचनीय परिणाम लोकांस स्पष्ट करून दाखविण्याचा यत्न कोणीही केला नाहीं; व कित्येक बिचाऱ्या लहान मुली लग्न झालें नाहीं तोंच विधवा होतात, किंवा स्त्रीत्व त्यांच्या ठायीं पूर्ण आलें नाहीं, तोंच त्यांस कित्येक मुलें होऊन त्या निस्तेज आणि क्षीण होतात, हें किती भयंकर आणि निर्दयपणाचें आहे, हें साधारण स्थितींतील लोकांस समजावून देण्याचा

उद्योग कोणीही केला नाहीं; व जुन्या चाली इतक्या अभेद्य झाल्या आहेत ह्याचें कारण त्यांस सामान्य जनसमूहाचा आधार आहे हेंच आहे; आणि नवीन चाली तरी त्यांनींच स्वीकारिल्या तर सुरू होतील, असें असून त्यांच्या मनांतील धर्मवेड प्रथम घालवावें व त्यांच्या हृदयास ह्या दुष्ट चालीविषयीं दयेचा पाझर आणावा, असें कोणाच्याही मनांत येत नाहीं; निदान त्यांचें आर्जव करून त्यांची मदत घेणेंही कोणास रुचलें नाहीं. ह्याचा परिणाम असा झाला आहे की, प्रत्येक सामाजिक सुधारक आरंभीं एकदा मोठा खटाटोप करून ह्या चाली मोडण्याचा प्रयत्न करितो; परंतु वर सांगितल्याप्रमाणें मध्यम स्थितींतील लोकांपैकीं कांहींकांस ह्या विषयाची चर्चा माहीत नसल्यामुळें आणि कित्येकांची अवहेलना झाल्यामुळें ते त्याचा तिरस्कार करितात; आणि अशा कोट्यावधि सामान्य लोकांच्या दुर्लक्षामुळें व तिरस्कारामुळें त्याचा एकट्याचा कंठशोष अरण्य रुदिताप्रमाणें निष्फळ होऊन त्याच्या प्रयत्नांचा मागमूसही राहत नाहीं.

साराश, सामाजिक किंवा धार्मिक सुधारणेचा प्रयत्न शेवटास न जाण्याचें कारण सुधारक लोक समाजांतील मध्यम स्थितींतील लोकांकडे दुर्लक्ष करितात हें आहे. आतां कोणाकोणास असा भ्रम आहे कीं हिंदुस्थानांतील सर्व इंग्रजी शिकलेल्या लोकांनीं आपण स्वतःस थोडासा त्रास सोसून एक वेगळाच समाज बनविल्यास आणि तो परंपरेनें कायम ठेवून त्यांत सुधारणेच्या मताप्रमाणें वागण्याचा क्रम चालविल्यास कालगत्या हा समाज मोठा होईल, आणि लोकांस सुधारणेचें महत्व सहज दिसून येऊन

ते देखील त्यांचाच कित्ता उचलितील. दुसऱ्या कित्येकांचें असें मत आहे कीं, सुधारकांचे थोडे थोडे प्रयत्न चाललेच आहेत, त्यांस कायद्याची मदत मिळाल्यास सुधारणेचें काम लवकर सिद्धीस जाईल,—मग तो कायदा लोकांनीं सुधारणेच्या मताप्रमाणें चाललेंच पाहिजे; असा जुलमाचा असो, किंवा त्यांच्या खुषीस येईल तर ह्या गोष्टी करण्याची त्यांस मोकळीक मिळावी इतकाच असो. सारांश सुधारणा शेवटास जाण्यास जुलुमाचा किंवा खुषीचा कायदा केला पाहिजे, किंवा लोकांच्या अनुकुलतेनेंच ती सिद्धीस जाईल, हा विषय वादग्रस्त असल्यामुळें त्याचा विचार आपणास केला पाहिजे.

( अ ) विद्वान् लोक म्हणून एक वेगळाच वर्ग आहे, आणि त्यांनीं वर लिहिल्याप्रमाणें वेगळाच समाज केल्यास तो साहजिक वाढत जाऊन त्यांचें उदाहरण लोकांस अक्षयी पहाण्यास सांपडेल, हाच जो लोकांचा गैरसमज आहे तो प्रथम दूर केला पाहिजे. सामाजिक सुधारणा आणि धार्मिक सुधारणा ह्यांच्यांत एक मोठा फरक आहे, आणि ह्या फरकामुळेंच सामाजिक सुधारणा धार्मिक सुधारणेपेक्षां कांहीं अंशीं कठीण झाली आहे. ख्रिस्ती धर्म, मुसलमानी धर्म, प्रार्थनासमाज, ह्यांसारखा एखादा निराळा धर्मपंथ निघाला, आणि त्यांत दृढनिश्चयाचे कांहीं नियमित लोक एकदां जमले म्हणजे त्यांचा धर्म साहजिक रीत्या वाढत जातो. कारण त्यांच्यांत बापाचा धर्म मुलाला, आणि मुलाचा नातवाला, अशी परंपरा चालते. शिवाय ते आपल्या मूळच्या समाजापासून भिन्न झाल्यामुळें दुसऱ्या

कोणाचा आधार न राहून त्यांस एकमेकांच्या विचारानें व एकीनें राहणें भाग पडतें, व अशी एकी झाल्यामुळें कोणतीही गोष्ट अमलांत आणण्यास किंवा बंद करण्यास त्यांस उशीर लागत नाहीं; परंतु सामाजिक सुधारणेचें तसें नाहीं. एकाच घरांतील मनुष्यांत देखील सामाजिक सुधारणेचीं मतें भिन्न भिन्न असणें शक्य आहे. ह्यामुळें आईबापांचीं सामाजिक मतें मुलांस पसंत पडतील किंवा तदनुसार वर्तन त्यांच्या हातून होईलच, असें ह्मणतां येत नाहीं; ह्मणून सामाजिक सुधारणा होण्यास सर्व राष्ट्राचाच कल फिरला पाहिजे. प्रार्थनासमाजवाल्यांनीं एक चांगली लग्नपद्धति काढून ती आपल्या धर्माप्रमाणें सशास्त्र मानिली तर त्या लोकांत ती लवकर अमलांत येईल; परंतु सामाजिक सुधारकांनीं आपला हिंदूपणा न सोडितां आणि निराळा पंथ न काढितां नुसता सामाजिक पंथ काढून ती सुधारणा आपल्या लोकांत करूं ह्मटलें असतां चालणार नाहीं. ती करण्यास लोकांचेंच मन वळविलें पाहिजे. ह्याप्रमाणें सामाजिक सुधारक देखील जर समाजापासून वेगळे राहून सुधारणेचा यत्न चालवूं ह्मणतील तर त्यांजकडूनही तो सिद्धीस जाणें कठीण, मग नुसत्या विद्वान् लोकांच्या समाजानें काय होणार आहे? कारण इंग्रजी शिकलेल्या सर्व लोकांस सारखी लागू असणारी दुसरी कोणतीच गोष्ट नाहीं. एक पाश्चात्य शिक्षणापासून प्राप्त झालेले विचार मात्र सर्वांचे सारखे. ते तरी ज्याच्या त्याच्या समजुतीप्रमाणें जो तो वेगळ्या वेगळ्या तऱ्हेनें करणार. त्यांची उत्साहशक्ति जितकी प्रखर असावयास पाहिजे तितकी नसते. बरें, सारेच

६

विद्वान् पडले, ह्यामुळें कोणत्याही एकाद्या सामान्य विषयावर सर्वांचें मत एक होण्याची मारामार. त्यांची संख्या नेहमीं कमजास्त होत असते, व एकामागून एक वंशपरंपरा सर्वच विद्वान् होतील असेंही नाहीं; ते स्वतः विद्वान् घराण्यांतील असतात असा नियम नाहीं; व त्यांचीं मुलेंही विद्वान् होतील यासही कांहीं प्रमाण नाहीं. त्यांतील प्रत्येकाची आपल्या वृद्ध आईबापांविषयीं पूज्य बुद्धि निरनिराळ्या प्रमाणानें असते. तसेंच पूर्वापार चालत आलेल्या आचारांवर प्रत्येकाची श्रद्धा निरनिराळ्या तऱ्हेची असणार. देशपरत्वें, जातिपरत्वें, आचारपरत्वें, त्यांच्या धर्मसमजुती आणि, विचार अगदीं भिन्न असतात. सारांश, कोणत्याही कार्याला बळकटी येऊन तें सिद्धीस नेण्यास जीं तत्वें मनुष्यांस असावीं लागतात, तीं हिंदुस्थानांतील इंग्रजी विद्वानांत नाहींत. तीं तत्वें ह्मणजे ऐकमत्य आणि उत्साह. अनादिसिद्ध काळापासून यहुदी लोकांत ह्या दोन्ही गुणांचें वास्तव्य आहे, व तसेंच प्रथम ख्रिस्ती झालेल्या लोकातही हे गुण असत. ख्रिस्ती लोकांनीं धर्माभिमान हा गुण यहुदी लोकांपासून घेऊन धर्माधिकारी नेमून धर्मसंबंधीं सर्व वर्चस्व त्यांस दिल्यामुळें त्यांच्या धर्माची व्यवस्था चांगली राहिली आणि तो धर्म उत्तरोत्तर पसरत गेला. मुसलमान लोकांच्याही अंगीं हे गुण परिपूर्ण असून अद्यापि दृष्टीस पडतात, परंतु विद्वान् लोकात ह्या गुणाची स्फूर्ति फारच थोडी असल्यामुळें विद्वान् लोकांचा एक निराळा समाज बनेल ही कल्पनाच नको.

( ब ) तरी मुख्यत्वेंकरून सामाजिक अथवा धार्मिक

सुधारणेचा प्रयत्न सफल होण्याचें मुख्य साधन त्यास लो-कांचें अनुमत पाहिजे हेंच आहे. मिलमनचें ह्याविषयीं एक उत्कृष्ट वचन आहे—"(सामाजिक) किंवा धार्मिक सुधारणेचें कोणतेंही कृत्य जुलमानें करूं ह्मटलें असतां कधींही शेवटास जात नाहीं, आणि आजपर्यंत जे फेरफार झाले आहेत ते असे झाले आहेत कीं, एकाद्या सामाजिक अथवा धार्मिक चालीनें लोकांस मोठी गैरसोय उत्पन्न व्हावी, तिचा मध्यम व कनिष्ट स्थितींतील लोकांनीं विचार करावा, व तीविषयीं सर्वांच्या मनांत मोठा उद्वेग उत्पन्न होऊन त्यांनीं सपाट्यासरशी ती जुनी चाल रद्द करावी व नवीन प्रचारांत आणावी." हा सिद्धांत मिलमन् ह्यानें, मूर्तिपूजानिषेधाचा ह्मणजे ख्रिस्ती धर्मांत शिरलेली मूर्तिपूजा नाहींशी करण्याचा कान्स्टांटिनोपल ये-थील कांहीं बादशहांनीं भगीरथ प्रयत्न चालविला होता, परंतु लोकांचें मत तसें नसल्यामुळें ते मूर्तिपूजा सोडीनात, इत्यादि हकीकतीचा, जो इतिहास लिहिला आहे त्याच्या आरंभीं घातला आहे; आणि लोकांचें मत अनुकूल अस-ल्यावांचून सुधारणा अमलांत आणण्याविषयीं कायदा केला किंवा दुसरेही कांहीं यत्न केले तरी त्यांचा कांहीं उपयोग होत नाहीं, हें त्या इतिहासावरूनही स्पष्ट दिसून येतें. मध्यम स्थितींतील लोक धिम्मे असून त्यांचें ज्ञान व्यावहारिक असतें, व तसेंच त्यांचे मनोविकारही तीव्र असतात; ह्या कारणानें त्यांजला आपणाकडे वळविणें असल्यास त्यांजवर जुलूम करून किंवा त्यांचा तिरस्कार करून कांहीं उपयोग नाहीं; त्यांस सन्मानच दिला पाहिजे. आतां कोणताही फेरफार ते एकदम करितातच असें नाहीं, तरी सारासार

विचाराच्या गोष्टी ऐकण्यास ते राजी असतात. त्यांचें अंतः- करणही दयार्द्र असतें, आणि स्त्रियांच्या ठायीं जे गुण असतात ह्मणून मागें सांगितलें, त्यांतलेच 'बहुतेक गुण ह्यांच्याही अंगीं आहेत; मात्र स्त्रियांपेक्षां हे जास्त विचार- शील असतात व ह्यांची उत्साहशक्ति स्त्रियाहून थोडी कमी असते. त्यांच्या स्वभावेंत त्यांस उपदेश केला पाहिजे; त्यांच्या चुका असल्यास तिकडे अंमळ दुर्लक्ष केलें पाहिजे; आणि आपले विचार त्यांच्या चित्तांत पूर्ण ठसवून त्यांस कळवळा आणिला पाहिजे; इतकें झाल्यावर त्यांच्या स्वतः- च्याच बालविधवा होणाऱ्या मुली, आणि शारीरिक ऱ्हासा- मुळें गांजलेल्या बायका ह्यांच्या विपत्तिविमोचनास ते झटून पडतील, हें खचित आहे. सारांश, ह्या विषयाची चर्चा मध्यम स्थितींतील लोकांत होण्याचीच फार आवश्यकता आहे.

जगांतील सर्व धर्मांच्या शेंकडों इतिहासांत हेंच मूलतत्व भरलें आहे. ख्रिस्ती धर्माचा प्रसार प्रथम रोमन राष्ट्रांतील मध्यमप्रतीच्या लोकांत झाला आणि विशेषेंकरून दुष्ट, दुर्व्यसनी वगैरे कुचकामाचे लोक, शेतकरी, मजूर, गुलाम हेच त्याचा स्वीकार प्रथम करीत, हें गिबन ह्या इतिहास- कारानें प्रांजलपणें कबूल केलें आहे; व त्यावर बरेंच व्याख्यानही केलें आहे. ग्रीस देशांतील तत्वज्ञानी, रोममधील सरदार, किंवा दुसरे श्रेष्ठ लोक, ह्या धर्मांत पाहिल्यानें क्वचितच शिरत. गरीब लोकांत ख्रिस्ती धर्माचा प्रवेश फार लवकर झाला, परंतु विद्वान् लोकांची खात्री करून त्यांचा त्यांत रिघाव होणें बरेंच कठिण पडलें; आणि राजेरजवाड्यांत

आणि सरदार लोकांत तर ह्याचा प्रवेश होण्यास फारच उशीर लागला. ह्याचें कारण असें आहे कीं, विद्वान् लोकांची समजूत पाडून त्यांचा भरवसा बसविणें फार अवघड आहे. बरें, श्रीमान् लोकांस कोणताही धर्म असला तरी कोणत्याही गोष्टीची काळजी नसते, ह्यामुळें तेही ह्याविषयीं विशेष विचार करीत नाहींत. राहिलेले मध्यम व कनिष्ठ स्थितींतील लोक; हे खरोखर सरळ स्वभावाचे आणि प्रेमळ असल्यामुळें सुधारणेस अनुकूल होण्याची पंचाईत पडत नाहीं. गिबन ह्मणतोः—" समाजांत श्रीमंत, प्रतिष्ठित आणि विद्वान् लोक हे लोकसंख्येच्या मानानें कमी असून बाकीचा समाज अप्रसिद्ध, अज्ञानी आणि भिकार लोकांनीं भरलेला असावयाचा, अशीच प्रत्येक समाजाची स्थिति असते, आणि ख्रिस्ती धर्माचा उपदेश सर्वांस सारखाच होत गेला; तेव्हां अर्थातच हलक्या लोकांच्या संख्येचें प्रमाण अधिक असल्यामुळें ख्रिस्ती झालेल्या लोकांतही हलके लोक फार असत, व श्रेष्ठ लोकांची संख्याच थोडी असल्यामुळें ते थोडे असत. पहिल्यानें ख्रिस्ती धर्म अडाणी आणि अप्रसिद्ध लोकांनीं मात्र स्वीकारिला असा ख्रिस्ती धर्मावर जो आक्षेप आहे, तो दूर करण्याकरितां कांहीं विद्वान् व श्रीमान् लोक ख्रिस्ती झाले होते, त्यांजकडे कित्येक ख्रिस्तीधर्माभिमानी बोट दाखवितात; परंतु ते ( विद्वान् व श्रीमान् ) इतके थोडे असून इतके मागाहून झालेले होते कीं, त्याच्या योगानें सदहू आक्षेप पूर्णपणें नाहींसा करितां येत नाहीं. हा आक्षेम दूर करण्याकरितां अलीकडे रचिलेल्या नानातऱ्हेच्या कोव्या

करून निंदेस पात्र होण्यापेक्षां वर सांगितल्याप्रमाणें ह्या प्रश्नाचा निर्णय करणें जास्त समंजस आहे." गिबन् ह्यानें वरील आक्षेपाचा उलगडा करितांना असें ह्मटलें आहे ( व यावरून त्याचा थोडासा नास्तिकपणाही दिसून येतो)— "ईश्वराची आज्ञा आहे कीं जे अभिमान सोडून देऊन दीन होतील त्यांसच ईश्वराच्या राज्यांत आश्रय मिळेल; मग दारिद्र्यानें पीडल्यामुळें किंवा लोकांनीं बहिष्कार केल्यामुळें जे लोक अगदीं दीन झाले होते ते ईश्वराच्या आज्ञेप्रमाणें पुढील सुखाकरितां खिस्ती धर्माचा उपदेश लक्षपूर्वक श्रवण करीत, हें यथार्थच झालें." त्यानें दिलेलें पुढील दुसरें कारणही खरें आणि सयुक्तिक दिसतें. "श्रीमंत लोकांस ऐहिक सुख यथेच्छ असल्यामुळें ते बेपर्वा असतात, व जे शहाणे असतात, ते निःपक्षपातानें नव्या धर्माचा विचार न करितां त्याविषयीं शंका घेण्यांत आणि वादविवाद करण्यांत मात्र आपल्या बुद्धीचा आणि ज्ञानाचा अपव्यय करितात," असो. मुख्य सांगणें असें आहे कीं, वरील चटकदार लिहिण्याच्या झोंकांत गिबन ह्या एका महत्वाच्या वर्गांतील लोकांस अगदीं विसरला आहे, असें दिसतें. ते लोक ह्मणजे जे अगदीं दरिद्री नसतात व मोठे धनाढ्यही नसतात जे अज्ञानावस्थेंत नसून जगविख्यातही नसतात; तसेंच जे अक्षरशत्रु ठोंबे नसून मोठे विद्वन्मणिही नसतात; असे मध्यम स्थितींतील लोक होत. हे दयार्द्र अंतःकरणाचे व निश्चयाचे असतात; व ज्ञानगर्वानें किंवा श्रीमंतीनें ताठलेले नसून अज्ञानांधकारांत गढलेले किंवा दारिद्र्यानें पीडलेले असेही नसल्यामुळें त्यांची प्रवृत्ति दुराचाराकडे मुळींच

नसते. त्यांची धर्मावर विशेष श्रद्धा असल्यामुळें खिस्ती धर्मोपदेशकांनीं शुभवर्तमानाचा सदुपदेश साध्या रीतीनें करून ह्या लोकांचीं मनें तिकडे वळविलीं, व ह्मणूनच मध्यम स्थितींतील लोकांपैकीं पुष्कळ लोक प्रथम खिस्ती झाले. सारांश, मध्यम स्थितींतील लोकांस सामाजिक सुधारणेचा उपदेश करणें, व त्यांचीं मनें तिकडे ओढून घेणें, हें अत्यंत इष्ट आणि सुसाध्य आहे.

यूरोपांत १६ व्या शतकांत जी मोठी धर्मसुधारणा ( अथवा रेफर्मेशन ) झाली, तिचीं तरी कारणें काय आहेत ? सर्व सामान्य जनसमूहास बायबल ( धर्मपुस्तक ) त्यांच्या स्वतःच्या भाषेंत वाचण्यास सांपडून त्यांत लिहिलेलीं धर्मतत्वें त्यांस कळूं लागलीं. छापण्याच्या कलेमुळें तीं पुस्तकें इतकीं पुष्कळ झालीं कीं गरीबगुरीबांस देखील तीं घेण्याचें सामर्थ्य आलें; पूर्वी तीं पुस्तकें लाटिन भाषेंत असल्यामुळें लाटिन शिकलेल्या मंकांवरच जी भिस्त होती ती नाहींशी झाली; व ज्ञान आणि धर्मशास्त्र हीं जीं मंकांच्या मठांत किंवा धर्माध्यक्षांच्या घरांत कोंडून राहिलीं होतीं, तीं मोकळीं होऊन घरोघर पसरलीं. इराझमस ( बायबलाचें भाषांतर कर्ता ) लवकरच निर्माण व्हावयाचा होता; आणि तो झाल्याबरोबर साधें, सरळ आणि लोकप्रिय, असें बायबलाचें भाषांतर झालें. धर्मसुधारणा होण्यास मध्यम स्थितींतील लोकांच्या हृदयांत ज्ञानाचा प्रकाश होण्याची किती अवश्यकता आहे, व तसें झाल्यानें काय अचाट कृत्यें घडून येतात, हें दिसून येण्यास प्राटेस्टंट धर्माचें उदाहरण फार समर्पक आहे. मिलमन् ह्यानें छापण्याच्या कलेचें आणि

कागद करण्याच्या कारखान्याचें महत्व, आणि त्यांपासून सामान्य स्थितींतील लोकांवर झालेला परिणाम, हीं फार उत्कृष्ट तऱ्हेनें वर्णन केलीं आहेत. तो ह्मणतोः—" जीं पुस्तकें लिहिण्यास प्रथम किती कालगति, किती खर्च, आणि किती श्रम पडत असत, तीं इतकीं भराभर उत्पन्न होऊं लागलीं, आणि इतकीं स्वस्त झालीं कीं, हा जादूचा खेळ आहे, असें कित्येक लोक समजत; आणि ज्यांना पूर्वींचीं हस्तलिखित पुस्तकें पाहण्यास देखील मिळत नसत त्यांना तीं आतां सहज घेतां येऊं लागलीं. लोकांस वाचनास पुस्तकें नेहमीं व सहज मिळूं लागल्यापासून त्यांची वाचनाची इच्छा व शक्तीही वाढत गेली. धर्मशास्त्र ह्मणजे जें अगदीं गूढ होऊन राहिलें होतें, व धर्माधिकाऱ्यांची आणि मंकांचीच मालमत्ता होऊन गेलें होतें, तें सार्वजनिक झालें. अगदीं थोड्या काळांतच तें सर्वांचा प्रिय विषय होऊन त्याचें अध्ययन झपाट्यानें चाललें. उपदेशकांची देखील गरज कमी झाली असें नाहीं; कारण लोकांची जिज्ञासा पुष्कळ वाढली. पूर्वी उपदेशकांचीं व्याख्यानें, देवळांत जितके लोक जमत, व जितक्यांस त्याचा (उपदेशकाचा) एकट्याचा आवाज ऐकूं जाई, तितक्यांसच मात्र ऐकावयास सांपडत; तसें आतां न राहून तीं छापून सर्व देशांत आणि खंडांत प्रसिद्ध होऊं लागलीं. उत्कृष्ट उपदेशक होते ते तोंडीं व्याख्यानें देण्याऐवजीं आपल्या व्याख्यानांचीं लहान लहान पुस्तकें छापूं लागले; व ह्यामुळें ज्या व्याख्यानांनीं व्याख्यानाच्या ठिकाणीं जमलेल्या श्रोत्यांस मात्र फायदा होत असे, तो हीं पुस्तकें निघूं

लागल्यापासून सर्व राष्ट्राला किंबहुना सर्व मनुष्यजातीला होऊं लागला. कित्येक लोक व्याख्यानकारांची आणि उपदेशकांची मदत न घेतां फक्त बायबलाच्याच साहाय्यानें ज्ञानप्राप्ति करून घेऊं लागले. तसेंच पूर्वी पातकांचें क्षालन होण्याकरितां तीं धर्मोपदेशकांपाशीं कबूल करावीं लागत, त्याऐवजीं आतां कित्येक लोक बायबल पुढें ठेवून त्यापाशींच आपली पातकनिवृत्ति करीत. पूर्वी स्वर्गप्राप्ति होण्याकरितां धर्मोपदेशकांस देवाकडे मध्यस्थी करावी लागे; ती करण्याचा हक्क स्वतःसच आहे, असें आतां सर्वांस वाटूं लागलें." वरील मिलमनच्या हकीकतीपासून आपण उपदेश घेऊं नये काय? त्यांचें उदाहरण पाहून तसा मार्ग आपण स्वीकारूं नये काय? व ह्या दुष्परिणामी वाईट चालींचा तिरस्कार उत्पन्न करणारीं पुस्तकें सर्व हिंदुस्थानभर कां प्रसिद्ध करूं नयेत? मध्यम स्थितींतील लोकांच्या आणि जगांतील बारीकसारीक कोंपऱ्यांतील देखील मनुष्यांच्या विचारांत ह्या गोष्टी शिरल्या पाहिजेत; व निरपराध बालविधवेस जन्मभर दुःखसमुद्रांत लोटण्याच्या अमानुषपणाचा, आणि बालवधूस आणि तिच्या संततीस निर्बल व निस्तेज करणाऱ्या दुष्ट चालीचा सर्व राष्ट्रास विषाद वाटविला पाहिजे.

(क) धर्माध्यक्ष नेमून त्यांच्या हातांत सर्व धार्मिक व्यवस्थेचीं सूत्रें देण्याची पद्धति ज्या ज्या धर्मांत सुरू होते त्या त्या सर्वांत पुढें एकसारखेच दुष्परिणाम होतात. धर्माध्यक्ष आणि त्याच्या हाताखालचे दुसरे लोक ह्यांचें प्रस्थ माजून ते करतील तो कायदा होऊं लागतो; मूर्तिपूजा फैलावते; धर्मशास्त्र फक्त त्यांच्याच हातांत राहिल्यानें लोकांस

खरा आचार समजण्यास दुसरा मार्ग राहत नाहीं; व शिक्षण फक्त त्याच वर्गांत कायम राहून इतर लोकांचें अज्ञान वाढत जातें. हेंच दुर्दैव आमच्या हिंदुस्थानच्या वांट्यास आलें होतें व हल्लींही दिसत आहे. धर्माधिकाऱ्यांनीं आपल्या ज्ञानाचा व अधिकाराचा दुरुपयोग केल्यामुळें नानातऱ्हेचे अवगुण आपल्या धर्मांत व समाजांत उत्पन्न झाले आहेत, असें जिज्ञासु वाचकांस आढळून येईल. रोमन क्याथोलिक धर्मांत देखील बिशप लोकांच्या प्राबल्यामुळें असेच दोष उत्पन्न झाले होते, परंतु त्यांच्यांत धर्मोपदेशकांची म्हणून एक जात निराळी नाहीं, आणि आमच्यांत ती आहे, ही एक विशेष शोचनीय गोष्ट होय; कारण धर्मोपदेशकांची निराळीच जात झाल्यामुळें वंशपरंपरा त्याच जातीचा फायदा होऊन बाकीचे बहुतेक लोक अशिक्षित आणि ज्ञानशून्य होत गेले; परंतु यूरोपांत प्राटेस्टंट आणि सुधारक उत्पन्न होऊन धर्माध्यक्षांचें प्रस्थ व अधिकार हीं नाहींशीं झालीं; त्यांच्यावांचून पूर्वी एक पानही हालत नव्हतें; तीच आतां त्यांची बहुतेक गरजही लागत नाहीं; मुक्ति देण्याचें काम फक्त त्यांच्याच हातांत होतें, तें आतां प्रत्येकाच्या हातांत आलें आहे. पवित्रशास्त्र प्रत्येकाच्या हातांत येऊन प्रत्येक त्याचें अवलोकन करीत असल्यामुळें धर्माध्यक्ष लोक स्वहितास्तव पूर्वी पाहिजे तसे धर्माचे आधार सांगत असत, तें त्यांचें वर्म बाहेर पडून आतां त्यांचें कांहीं चालेनासें झालें आहे. ह्या ऐतिहासिक उदाहरणांचा कित्ता आपण गिरविला पाहिजे. दयाळू इंग्रजसरकारच्या अमलाखालीं हिंदुस्थानांत सुधारणा होऊं लागलीच आहे; मात्र यूरो-

पांतील सुधारकांचा अग्रगण्य जो ल्यूथर, त्याच्याप्रमाणें लोकांच्या मर्मांत ह्या गोष्टी ठसवून त्यांचें साहाय्य घ्यावें, शास्त्रांचे आणि वेदांचे खरे अर्थ त्यांस समजावून देऊन त्यांसच त्यांचा निर्णय करण्यास सांगावा, व सुधारणेस अनुकूळ असा त्यांचा ठराव मिळवावा, हेंच हिंदुस्थानांतील सुधारकांचें मुख्य काम राहिलें आहे. ह्यावरून जुन्या मताच्या विद्वान् शास्त्र्यांस कांहीं विचारूं नये व त्यांशीं वाद करूं नये, असें आम्ही प्रतिपादन करतों असें कोणी समजूं नये. परंतु स्वतः शास्त्रीच ह्या प्रश्नाचा जो निकाल करितात, तसा न करूं देतां लोकसमाजापुढें शास्त्री आणि सुधारक ह्या दोघांनीं आपापल्या पक्षाचे काय आधार असतील ते दाखवावे; कारण हा विषय लोकसमाजाच्या स्वतःच्याच नफानुकसानीचा असल्यामुळें त्यांस बहुमतानें पसंत पडेल तो मार्ग स्वीकारण्यास तेच मुखत्यार आहेत. सारांश, केवळ शास्त्री लोकांसच न्यायासनावर बसवून त्यांनीं हा निकाल ठरविणें हें अगदीं अप्रशस्त आहे, ह्याच सांगण्याचा मुख्य भाग आहे; कारण ते काय फैसला सांगणार तो आधींच धडधडीत दिसतो आहे; तो इतका इतिहासप्रसिद्ध आहे कीं त्याविषयीं शंका घेण्याचें कारण नाहीं. प्रेग येथील जेरोप्रमाणें ते सुधारकांस जाळतील; जॉन वुइक्लिफ ह्याचा जसा लोक हेवा करीत असत, तसा ते सुधारकांचा करतील; ग्यालिलियो ह्यास जसा वेडा ठरवून कैद केलें होतें, तसे ते सुधारकांस करूं पहातील, किंवा मागें वर्णन केलेल्या सन १८७० च्या पुण्याच्या वादविवादांतील सुधारकांप्रमाणें ते त्यांची दुर्यो करून आप-

लेंच मत कायम करितील. धर्मांत किंवा शास्त्रीय विषयांत कोणताही फेरफार करावयाचा ह्मटला ह्मणजे भिक्षुक-वर्गाच्या मंडळांचा प्रतिबंध त्यास यावयाचा, अशी वहिवाट पूर्वीपासून परंपरेनें चालत आली आहे; परंतु लोकांनीं त्यांच्या प्रतिबंधास न जुमानितां सुधारणा अमलांत आणिली कीं, मागाहून हेच शास्त्री व भिक्षुक आपला दुरभिमान सोडून नवीन झालेल्या फेरफारास अनुकूल असाही शास्त्राधार काढून दाखवितात, व झाली ती गोष्ट शास्त्रसंमतच आहे असें समाधान मानितात. मिलमन् ह्यानें पोप व धर्मोपदेशक ह्यांच्या सुधारणेच्या ( प्राटेस्टंट धर्म होण्याच्या ) आधींच्या व मागूनच्या अशा दोन्ही स्थितींचें वर्णन केलें आहे, त्यावरून वरील ह्मणण्याचें सत्यत्व पूर्ण दिसून येईल. "धर्माधिकारी लोक पूर्वी अधिकारारूढ होते, ते आतां फक्त वजनदार आणि शिष्ट लोकांत मोडतात. प्राटेस्टंट लोकांचे धर्माधिकारी हे तर एकंदर लोकांत मिसळून त्यांच्यापैकींच एक गणले जातात; म्हणजे त्यांनीं सामान्य रयतेचें कमीपण पत्करिलें आहे व कुटुंबवत्सल होऊन गृहस्थाश्रमाचीं कृत्यें करून ते सद्धर्मनीतीनें वागत आहेत. तसेंच जेथें रोमन क्याथोलिक धर्म कायम राहील, तेथील धर्मोपदेशक जरी एकंदर लोकांत न मिसळतां पूर्वीच्याच पद्धतीनें आपला वेगळा समाज करून रहात आहेत, तरी त्यांस देखील सार्वजनिक मताला नमून वागावें लागतें; व पूर्वीप्रमाणें जरी कांहीं अंमलही त्यांजकडे राहिले आहेत, तरी त्यांजवरही लोकमताचा अंमल चालत आहे." सारांश लाटिन आणि ग्रीक शिक्षण व छापण्याची कला ह्यांनी

जसें युरोपियनांचें कल्याण केलें आणि समाजाच्या मतास जोर आणिला आहे, तसेंच आपल्या हिंदुस्थानचें हित होण्यास वरील दोन्हीही साधनें हल्लीं अनुकूल आहेत, ह्मणजे संस्कृताचा अभ्यास आणि छापण्याची कला हीं दोन्हीही येथें सुरू आहेत, व त्यामुळें पूर्वी जशी धर्मपुस्तकचा आधार पाहण्यास एकाद्या वेदशास्त्र अवगत असलेल्या पंडिताची किंवा शास्त्र्याची पायधरणी करावी लागत असे, किंवा कोणाच्या येथें एखादेंच धर्मपुस्तक मोठ्या प्रयत्नानें लिहून ठेविलेलें असेल त्याच्या येथें जावें लागत असे, तसें करण्याची आतां आपणास गरज राहिली नाहीं. आतां राजारामशास्त्री आणि भाऊपुराणीक हे ह्मणतील ती पूर्व दिशा आणि सांगतील तो आचार असे जुलमाचे दिवस जाऊन त्यांचें प्रस्थ कमी झालें आहे. यापुढील कर्तव्य इतकेंच उरलें आहे कीं, विचारपूर्वक धर्मशास्त्रांचे खरे अर्थ करून त्यांचें भाषांतर केलें पाहिजे; त्यांच्या हजारों प्रती छापून त्या चोहींकडे पसरिल्या पाहिजेत, व त्यांच्या आधारानें लोकांनीं आपलीं मतें कायम केलीं पाहिजेत आणि ह्या गोष्टी क्रमाक्रमानें होऊंही लागल्या आहेत. त्याप्रमाणें एकदा लोकांचा एक निश्चय ठरला म्हणजे शास्त्री आणि पंडित ह्यांचींही मतें आपोआप बदलतील आणि सुधारणेच्या मताला अनुकूल असा शास्त्रार्थ ते आपणच काढून दाखवूं लागतील.

येथपर्यंत थोडक्यांत इतकें प्रतिपादन झालें कीं हिंदुस्थानांतील विद्वान् लोक आपला समाज निराळा बनवून एकादी सुधारणा करूं म्हणतील तर त्यांच्यानें कोणतीही महत्वाची व चिरकालिक सुधारणा होणें नाहीं. ती होण्यास

हिंदू समाजांतील मध्यम व कनिष्ठ स्थितींतील लोकांचीं मनें अवश्यमेव अनुकूल करून घेतलीं पाहिजेत. सुधारणा कराव्या किंवा नाहींत, हा निर्णय शास्त्री व पंडित लोकांस करण्यास सांगितला असतां काय ठरींव परिणाम होतील हेंही सांगितलें. आतां सुधारणेस सरकारची अनुकूलता असल्यानें, व सरकारानें त्यांत हात घातल्यास काय होईल? त्याची सुधारणेस मदत होईल किंवा नाहीं? तसेंच सरकार कोठपर्यंत तींत हात घालूं शकेल, ह्याविषयीं लिहूं.

( ड ) ह्या विषयावर विचार करूं लागलें असता अरिस्टॉटलच्या एका प्रसिद्ध सिद्धातांची आठवण होते. हा सिद्धांत असा आहे—'खरा सद्गुण ह्मणजे दोन अतिशयांचा मध्य होय.' अनादिकाळापासून ज्यांत मनुष्यांचे व तत्वज्ञान्यांचे विचार गर्क होऊन गेले, तरी अद्यापिही ज्यांचा निकाल लागत नाहीं असे कित्येक प्रश्न आहेत. उदाहरणार्थ, प्रत्येक मनुष्यास प्राप्त होणारी स्थिति हें त्याच्या कृतीचें फळ आहे, किंवा तसें होण्याचें कांहीं पूर्वसंचित असतें? कालस्य कारणम् राजा, कालो वा राजकारणम्। ह्मणजे राज्यास जी स्थिति येते ती राजा आणितो, किंवा काळाप्रमाणें राजा होतो? ह्या प्रश्नांचा उलगडा अरिस्टाटलच्या वरील नियमाप्रमाणें करितां येईल; ह्मणजे ह्याचें खरें स्वरूप दोहोंच्या मध्यें आहे. कांहीं कृत्यें करण्याचें मनुष्याच्या स्वाधीन असतें. आणि कांहीं त्याच्या दैवानुसार घडून येतात. राजे आणि कायदे जसे असतील तशी लोकस्थिति होते; आणि लोकांचा कल असेल तसेच कायदे राजे ठरवितात.

कायदा ह्या शब्दाचा वास्तविक अर्थ ह्मटला तर ज्यास राज्याधिकार प्राप्त झाला आहे, किंवा दिला गेला आहे, किंवा एका इसमाची किंवा अनेक इसमांची सर्व समाजास आपल्या मताप्रमाणें वागण्यास सांगणारी नियमरूपानें प्रगट केलेली इच्छा, असा करितां येईल. आकर्षणाच्या नियमाप्रमाणें सर्व समाजाच्या मताविरुद्ध जर एकट्यानेंच आपली इच्छा चालवूं ह्मटलें, तर पृथ्वीपासून वर फेंकिलेला दगड जितका पृथ्वीस आपल्याकडे ओढूं शकेल, तितपतच त्याला यश मिळेल! इतकेंच नाहीं, तो दगड जसा उलट पृथ्वीवर आपटून कणशः फुटून जाईल, त्याप्रमाणेंच अशा राजाचा किंवा कायदे करणाराचा समाजाकडून छळ होऊन त्याचा नाश होईल; परंतु ह्या राजकीय इच्छेला जर लोकमत अनुकूळ असेल, तर ती इच्छा बहुसमाजमताच्या जोरानें कमी पक्षाच्या लोकांस जिंकून त्यांस तिजप्रमाणें वर्तावयास लावील. ही गोष्ट नाकबूल करणें म्हणजे एखादा धोंडा किंवा चंद्राप्रमाणें मोठा परंतु पृथ्वीहून फार लहान असा गोळा, पृथ्वी आपणाकडे ओढूं शकणार नाहीं असें ह्मणण्यासारखें आहे, हें गणिताच्या दृष्टांतानें स्पष्ट दिसेल. परंतु हा दृष्टांत आपण एकीकडे ठेविला तरी साधारणरीत्याही हा नियम स्पष्ट आहे. सारांश, जे लोक असें ह्मणतात कीं केवळ राजाची इच्छा किंवा कायदा [ मग तो इतर सर्व लोकांच्या मताविरुद्ध असला तरी ] कायदा ह्मणून त्या समाजावर आपला अंमल बसवील; व त्यांस त्याप्रमाणें वागवील; त्या लोकांची ही समजूत चुकीची आहे, आणि कायदा व राजमत बहुत लोकांच्या मताप्रमाणें असलें तरी

त्यापासून कमी पक्षास बाधा होणार नाहीं, असें जे प्रतिपादन करितात, त्यांचेंही ह्मणणें चुकीचेंच आहे. हे सिद्धांत केवळ विचारदृष्ट्याच बरोबर दिसतात असें नाहीं. त्यांच्या सिद्धतेस इतिहासांत शेंकडों उदाहरणें सांपडतील. विधवा-पुनर्विवाहाचा कायदा, सन १८५६ चा आक्ट १२ वा, ह्याविषयीं मागें उल्लेख केलाच आहे. हा कायदा करण्यांत इंग्रजसरकारचे फार चांगले हेतु होते; परंतु तो करण्यास ती वेळ कितपत अनुकूल होती, लोकमत त्या कायद्याविरुद्ध होतें कीं काय, व सरकारास पुनर्विवाहाच्या कामांत किती गोष्टी हात घालण्यासारख्या होत्या, यांचा चांगला विचार न झाल्यामुळें मागें सांगितलेले वाईट परिणाम घडून आले, आणि त्या कायद्यापासून अद्यापि कांहीं फायदा झालेला दिसत नाहीं. सर्व प्राचीन राष्ट्रांत रोमन राष्ट्रांची मात्र कायदे ठरविण्याची पद्धति निर्दोष असे. त्या लोकांना कायद्याची आणि व्यवस्थेची फार आवड असे, अशी त्यांची कीर्ति आहे, व रोमन कायदे उत्तरोत्तर कसे सुधारत गेले, हें त्यांच्या इतिहासावरून स्पष्ट दिसून येतें. एकादा मनुष्य मोठ्या प्रयत्नानें रद्द केलेले व प्रचारांतून नाहींसे झालेले सर्व कायदे व हुकूम जर वाचील, आणि ते रद्द होण्याची अथवा प्रचारांतून जाणण्याचीं कारणें शोधील तर लोकांनीं त्या कायद्यांस हरकत आणिल्यामुळें किंवा त्यांस ते पसंत नसल्यामुळें बहुतकरून ते रद्द झाले आहेत असें त्यास आढळून येईल. ह्याचें एक लहानसें उदाहरण घेऊं. रोमन राष्ट्रांत, नवराबायकोनें एकमेकांस सोडचिठ्ठी द्यावयाची ती अमुक कारणांपैकीं ( कांहीं तशींच महत्वाचीं

कारणें ठरविलेलीं होतीं ) एकादें झाल्यावांचून द्यावयाची नाहीं, असा जैस्टिनियन ह्यानें ख्रिस्ती धर्मोपदेशाचे अनुरोधानें कायदा केला, व निष्कारण स्वैरतेनें सोडचिठ्ठी देणारास कडक शिक्षा ठेविली. परंतु जस्टिनियनच्या वेळेस रोमन लोकांची नीति फार बिघडली होती, हें इतिहासांत प्रसिद्ध . आहेच, ह्यामुळें जस्टिनियनच्या मागें त्याच्या स्थानापन्न बादशहापाशीं ह्या कायद्याच्या अति कडकपणाबद्दल लोक तक्रारी आणूं लागले; व त्यांत ठरविलेल्या शिक्षा रद्द करण्याची त्यांनीं इतकी मध्यस्ती केली कीं, अखेरीस मागल्या कायद्यांतील ठराव रद्द करून, स्त्रीपुरुषांची उभयतांची इच्छा असल्यास त्यांनीं पाहिजे तेव्हां घटस्फोट करावा, असा कायदा करणें भाग पडलें. इतिहासकार त्याविषयीं असें ह्मणतो:—" धर्माधिकाऱ्यांच्या उपदेशाप्रमाणें नीति सुधारण्याकरितां जो इतका कडक कायदा केला होता, तो देखील कान्टांटिनोपलच्या ( किंबहुना सर्व रोमन लोकांच्या ) नीतिसंबंधी शोचनीय स्थितीमुळें रद्द झाला. " मूर्तिपूजा नाहींशी करण्याचा प्रयत्न पांच रोमन बादशहांनीं एकसारखा चालविला होता, व लोक त्यांस प्रतिकूळ असल्यामुळें तो सिद्धीस गेला नाहीं; इत्यादि हकीकत मागें सांगितलीच आहे, हें ह्या सिद्धांताचें तिसरें उदाहरण आहे. सारांश, मिलमननें मूर्तिपूजानिषेधाच्या इतिहासाच्या आरंभीं लिहिलेला पूर्वोक्त सिद्धांत अक्षरशः खरा आहे, कीं " धार्मिक किंवा ( समाजिक ) सुधारणा सरकारानें जुलमानें सुरू केल्यास त्या कधींही सिद्धीस जात नाहींत. "

सामाजिक किंवा धार्मिक फेरफार करणें तो सरकाराचें

आपण होऊन सुरू करूं नये हें बरोबर आहे; परंतु समाजाकडूनच त्याची सुरवात झाल्यावर शेवटीं तो कायम करण्याकरितां सरकारानें मदत देण्यास हरकत नाहीं, इतकेंच नाहीं, तर ह्या मदतीची आवश्यकताही आहे असें अनुभवावरून दिसून येतें. लोकाच्या मनांत नवीन सुधारणा स्वीकारण्याचें पूर्णपणें भरलें, आणि मग तिचा कायदा ठरला, ह्मणजे ती सुधारणा त्वरेनें अमलांत येऊन अल्प काळांतच सर्व राष्ट्रभर पसरते. ह्याचें कारण फार लांब नाहीं. प्रत्येक समाजांत, ज्यांत सोय अधिक असेल ती गोष्ट करणारे, लोकांची तऱ्हा पाहून तीच आपणही स्वीकारणारे, केवळ द्रव्यलोभाकरितां पाहिजे तें कृत्य करण्यास तयार असणारे, व कित्येक अगदीं मूर्ख ह्मणजे ज्यांना जुनी व्यवस्था चांगली किंवा नवी चांगली, हें समजत नाहीं, परंतु 'महाजनो येन गतः स पंथः' ह्या न्यायानें वर्तणारे, असे लोक फार असतात. नवीन चालीस सरकारची अनुकूलता असली किंवा तिचा कायदा ठरला, ह्मणजे वर सांगितेल्या निरनिराळ्या स्वभावांचे लोक आपणच होऊन तिचा स्वीकार करितात, व लोकप्रवाह जिकडे वाहील तिकडे हेही खुषीनें वाहत जातात.

कायदा अमलांत येण्यास लोकांची संमति जशी अवश्य आहे, त्याप्रमाणेंच सुधारणा सुरू झाल्यावर ती पूर्ण अमलांत येण्यासही कायदाच पाहिजे; कारण कायद्यावांचून तिचा अमल पूर्णपणें बसत नाहीं, अशाविषयीं पुष्कळ उदाहरणें इतिहासांत सांपडतात. रोमन बादशाहा कान्स्टंटाईन हा ख्रिस्ती झाल्यामुळेंच त्या धर्माच्या प्रसाराला अति

उत्तेजन आलें, हें खिस्ती इतिहासकारांनीं प्रांजलपणें कबूल केलें आहे; आणि ह्याबद्दल कान्स्टंटाईन बादशाहाची ते भाविकपणानें स्तुतीही करितात. हा बादशाहा खिस्ती होऊन त्या धर्माचा प्रसार करणार, असा ईश्वरी संकेत असून त्याचीं चिन्हें पूर्वीच दिसूं लागलीं होतीं; ह्मणजे तो खिस्ती होण्यापूर्वी आकाशांत चकचकीत क्रास दिसत असे, व कान्स्टंटाईन ह्यासही शुभ स्वप्नें पडत असत, असें सांगतात. ह्याच कारणांनीं ह्या पहिल्या खिस्ती बादशाहावर सर्वांची पूज्य बुद्धि आहे असें दिसतें व त्याला बारा अपास्टल्स (प्रेषित) ह्यांच्या बरोबरीचा मानतात. गिबन ह्मणतो:—"ह्या बादशाहाला बारा अपॉस्टलांच्या योग्यतेचा मानतात, हें जर त्याचें आचरण प्रेषितांइतकें पवित्र होतें असें समजून मानीत असतील, तर ही त्याची प्रशंसा केवळ तोंडपुजेपणाची होय; परंतु त्यांच्याप्रमाणेंच ह्यानें किती लोकांस खिस्ती करण्याचें यश मिळविलें ह्यांचा विचार केला तर मात्र हा त्यांच्या योग्यतेचा ठरेल. पूर्वी रोमन राष्ट्रांत खिस्ती लोकांचा छळ होत असल्यामुळें तो धर्म स्वीकारण्यास कोणी धजत नसत; परंतु तो स्वतःच खिस्ती झाल्यावर त्यानें धर्माच्या मोकळिकीचा कायदा प्रथम केला, व खिस्ती लोकांवर होत असलेले जुलूम बंद केले. पूर्वी खिस्ती धर्माचा उपदेश तो आपल्या राष्ट्रांत करूं देत नसे; आणि यानंतर त्यानें ती मोकळीक दिली, इतकेंच नव्हे, तर मनुष्याचें मन ज्या ज्या उपायांनीं वळतें ते ते उपाय करून लोकांस पवित्रशास्त्राची दीक्षा देण्यास कान्स्टंटाईन हा धर्मोपदेशकांस मोठें उत्तेजन आणि मदत देत असे. हा

क्रम चालल्यामुळें त्याच्या राज्यांत जुन्या आणि नव्या धर्माचे लोक समसमान झाले, परंतु हें समानत्व एक क्षणभरच टिकलें असेल. बादशहाची प्रीति ख्रिस्ती लोकांवर असल्यामुळें, आपण ख्रिस्ती झालों असतां इहलोकीं सुख होईल ( कारण ख्रिस्ती लोकांस कान्स्टंटाईन ह्याचा आश्रय मिळूं लागला ) व परलोकींही होईल असें मनुष्यांस वाटूं लागलें. ह्याप्रमाणें द्रव्य आणि सन्मान मिळण्याची आशा बादशहाचें स्वतःचें उदाहरण, ख्रिस्ती होण्याविषयीं लोकांस त्याचे उपदेश आणि त्याचें मोहक भाषण ह्यांच्या योगानें त्याजकडे येणाऱ्या हजारों द्रव्यलोभी आणि आत्महितेच्छु लोकांचीं मनें ख्रिस्तीधर्माकडे वळलीं. ज्या ठिकाणचे लोक आपणच होऊन आपलीं पूर्वीचीं देवळें मोडून टाकून ख्रिस्तीधर्मावर भक्ति दाखवितात, त्यांस नानाप्रकारचे सार्वजनिक हक्क व देणग्या बादशाहाकडून मिळत असत. सामान्य लोक तर अल्प द्रव्यलाभाकरितां भराभर ख्रिस्ती होत; ह्याविषयीं एक अशी गोष्ट ऐकिवांत आहे कीं, जो ख्रिस्ती होईल त्यास एक पांढरा पोषाख आणि सोन्याचीं वीस नाणीं देण्याचा एक ठराव बादशहानें केला, व त्या आशेनें बारा हजार लोक व शिवाय त्यांचीं बायकामुलें इतकीं मनुष्यें एका रोम शहरांत ख्रिस्ती झालीं. ह्यावरून कान्स्टंटाईन ह्यानें आपल्या लोकांस परलोकसुख थोडक्या खर्चानें प्राप्त करून दिलें, असें ह्मटलें पाहिजे." कान्स्टंटाईन बादशहा ख्रिस्ती झाल्यानंतर पुढें साठ वर्षांनीं मूर्तिपूजेचा उच्छेद कसा झाला, ही हकीकत ह्याच इतिहासकारानें आपल्या अजरामर ग्रंथांत फार सुरस वर्णिली आहे,

"कान्स्टंटाईन बादशहाचा जो निश्चय व प्रयत्न होता तोच थिओडोशिअस बादशाहानें विशेष आग्रहानें चालविल्यामुळें लोकांनीं आपले जुने देव देवळांतून ओढीत आणून रस्त्यांत फेंकून दिले. सेनेट सभा रोम येथें तमाम भरली असतां तिजपुढें थिआडोशिअस बादशहानें, रोमन राष्ट्राचा देव कोण असावा? जुपिटर किंवा ख्रिस्त? हा महत्वाचा प्रश्न काढिला. हा प्रश्न झाल्यावर सेनेटर लोकांना जरी बाह्यात्कारी पूर्ण मतस्वातंत्र्य होतें—म्हणजे कोणत्याही पक्षाचें आपलें असेल तें खरें मत देण्याची सर्वांस मोकळीक होती—तरी बादशहाच्या विरुद्ध मत देण्याचें धाडस त्यांस होईना; कारण कित्येकांस राजप्रीती संपादन करावयाची होती व कित्येकांस तो जातीनेंच तेथें हजर असल्यामुळें त्याचें भय वाटत होतें, कीं न जाणो, आपण बादशहाच्या विरुद्ध गेलों असतां, सिमाचस ह्यास जसें जुलमानें नुक्तेंच हद्दपार केलें होतें. तसें एखादें अरिष्ट आपणांवरही येईल. ह्या सर्व कारणांमुळें ख्रिस्ती धर्माच्या तर्फेनें बहुमत पडलें आणि जुपिटराच्या मूर्तींचा विध्वंस करावा असें ठरलें. सेनेट सभा बादशहाच्या ह्मणण्यास इतकी लवकर कबूल झाली, ह्याचें कारण त्यांच्या मनांत कांहीं प्रेरणा झाली असावी, किंवा भित्रेपणा, धनाशा अशा लांछनास्पद कारणांमुळें ते वळले असतील; परंतु जुना धर्म दिवसेंदिवस नाहींसा व्हावयास लागून त्याची आशा कमी होत चालली, आणि ख्रिस्ती धर्मावर लोकांची भक्ति वाढत गेली, हें निःसंशय आहे. त्यावेळच्या पद्धतीप्रमाणें ते राजाच्या हुकमास नम्र झाले आणि त्यांच्या स्त्रीपुत्रांची विनंति ( मागें सांगि-

तशेंच आहे कीं रोमन लोकांच्या बायका प्रथम खिस्ती झाल्या ) त्यांस अमान्य करवेना." हे शब्द अक्षरशः पाठ करण्याच्या योग्यतेचे आहेत. सामाजिक किंवा धार्मिक सुधारणा होण्यास काय काय साधनें लागतात, तीं ह्यांत एकत्र गोंवून स्पष्ट वर्णिलीं आहेत; .ह्मणजे प्रथम स्त्रियांचें, व नंतर सामान्य जनांचें मन वळावें लागतें; त्यानंतर कांहीं दिवस ती सुधारणा लोकांच्या खुषीवर राहून शेवटीं तिला कायद्याचें बळ मिळालें पाहिजे. हाच इतिहासकार आणखी असें ह्मणतो कीं:—" शेवटीं थिओडोशिअस बादशाहानें एक आज्ञापत्र काढिलें, त्याच्या योगानें मूर्ति-पूजेचा पूर्ण उच्छेद होऊन जुन्या मताच्या अभिमान्यांस आपला धर्म पुनः चालू होण्याची आशा तिळभरही राहिली नाहीं. तें आज्ञापत्र येणेंप्रमाणें:—" आमची इच्छा आणि आमची आज्ञा अशी आहे कीं, आमच्या रयतेपैकीं कोणीही मनुष्यानें—मग तो आमचा नोकर असो, त्याची योग्यता व स्थिति श्रीमंतीची असो किंवा गरिबीची असो—कोण-त्याही शहरांत, अथवा दुसऱ्या कोठेंही निर्जिव मूर्तीची पूजा करूं नये, व त्यांकरितां निर्दोषी प्राण्यांचे बळी देऊं नयेत, आणि जर कोणी तसा पशुयज्ञ करील तर तो राजाचा मोठा अपराधी समजला जाऊन त्या पातकाच्या क्षालनार्थ त्यास देहान्त शिक्षा होईल. शिवाय जुन्या धर्मा-तील दुसरेही निंद्य विधि जो करील त्याचें तेथील घरदार व सर्व मालमत्ता सरकारांत जप्त केली जाईल." हे हुकूम बाद-शाहानें फार कडक रीतीनें अमलांत आणिले, व शेवटीं, फार दिवसपर्यंत नुस्त्या चालीरीतींच्या आधारावर चालत

आलेला जुना धर्म झपाट्यानें मोडत गेला. कांहीं लोक अति अज्ञानी असल्यामुळें पूर्वीच्या देवतांस, तारक मारक त्याच आहेत असें समजून त्यांवर जसा भरंवसा ठेवीत, व त्यांचा कोप न होण्याविषयीं जपत असत, तीच त्यांची भक्ति नव्या धर्माच्या लोकांनीं नवीन झालेल्या राष्ट्रदेवतांकडे वळविली. बादशाहाची आज्ञा प्रसिद्ध झाल्यानंतर जी पुढली पिढी झाली त्यांस जन्मादारभ्य खिस्ती धर्माचेंच शिक्षण लागल्यामुळें त्यांची निष्ठा खिस्ती धर्मावर पूर्ण बसत चालली; व थिआडोशिअस ह्याच्या मरणानंतर अठ्ठावीस वर्षांनीं मूर्तिपूजेचा मागमूस देखील कोणा तत्कालीन इतिहासकाराच्या नजरेस येण्यासारखा राहिला नाहीं."

खिस्ती धर्माचा प्रसार झाल्यामुळें सर्व रोमन राष्ट्राचें धर्मांतर होऊन मूर्तिपूजा कशी नाहींशी झाली, त्याचा इतिहास ह्याप्रमाणें आहे. ह्या एवढ्या महत्वाच्या गोष्टीचा पाया म्हटला म्हणजे सेंट पॉल आणि सेंट पीटर ह्या दोन प्रेषितांचा लोकांस उपदेश; नवीन धर्माच्या अभिमानानें ज्या कित्येकांनीं आपले प्राण खर्ची घातले, त्यांचें उदाहरण, व स्त्रियांचें आणि सामान्य लोकांचें प्रथम धर्मांतर, हीं होत; परंतु तीं शेवटास न्यावयास बादशहाचे उपाय व कायदे हेच फार उपयोगीं पडले. प्रत्येक चाल बंद होतांना शेवटीं तिला एकदा उलट खावी लागते; म्हणजे सुधारणेच्या अगदीं विरुद्ध जाणारे व सुधारकांइतकेच सामर्थ्यवान् असे कित्येक पुरुष निर्माण होऊन जुन्या धर्माचें पुनः संरक्षण करितात. तरी देखील, जुलमाचा कायदा कधींही सिद्धीस जात नाहीं, हाच नियम शेवटीं कायम ठरतो. ह्या सिद्धांता-

प्रमाणें रोमन राज्यांत थिओडोशिअसचे पूर्वी पुनः उलट प्रकार चालू झाला होता. जुलियन ह्मणून एक बादशाहा गादीवर येऊन त्यानें आपलें सर्व कर्तृत्व मूर्तिपूजेचा उत्कर्ष करण्यांत खर्चिलें. तो स्वतः विद्वान् होता तरी त्यानें पूर्वीचीं धर्मबंडें लोकांच्या मनांत पुनः भरविण्याचा उद्योग चालविला; राष्ट्राच्या जुन्या देवता होईल तितकें करून स्थापन करविल्या; व पशुयज्ञ तर तो स्वतः प्रतिदिवशीं सकाळीं व सायंकाळीं मोठ्या थाटानें आणि नियमानें करीत असे. हा धर्मोपदेशक बादशाहा लोकास असें सांगे कीं, "जुलियन बादशाहानें आपल्या रयतेपैकीं प्रत्येकास जरी कुबेराइतकें श्रीमंत केलें, किंवा प्रत्येक शहर बाबिलन शहराइतकें भव्य केलें, तरी पूर्वीच्या धर्माविरुद्ध झालेलें बंड ( खिस्ती धर्म ) मोडून त्यानें आपल्या लोकांस पूर्वीच्या पवित्र धर्मांत आणि ल्यावांचून, त्यास रयतेचा हितकर्ता असें ह्मणतां येणार नाहीं." वायुगतिदर्शक यंत्र जसें वाऱ्याची झुळक असेल त्या दिशेकडे फिरतें त्याप्रमाणेंच रोमन-राष्ट्रांतील कांहीं लोक ह्या बादशाहाची मर्जी संपादन करण्याकरितां पुनः मूर्तिपूजक झाले ह्यावरून खिस्ती धर्माचा स्वीकार त्यांनीं केवळ ऐहिक सुखप्राप्तीकरितां केला होता हें उघड दिसतें. बरें, जुलियनच्या मागूनचे बादशाहा खिस्ती धर्मी होऊन खिस्ती लोकांस पुनः अनुकूळ काळ आला, तेव्हां हेच लोक पुनः खिस्ती बनले. सारांश त्यांस जिकडे ऐहिक सुख जास्त मिळे तिकडे ते वळत. असो. खिस्ती धर्माचा प्रसार फारच झाला असल्यामुळें व प्रेषितांचे उपदेश लोकांच्या मनांत पूर्ण बिंबले असल्यामुळें, जुलियन बादशाहाच्या अधिका-

राचा आणि प्रयत्नांचा कांहीं जोर चालला नाहीं; व मूर्ति-पूजा पंथाची झुकलेली इमारत पुनः दुरुस्त झाली. त्याच्या मरणानंतर लागलाच ख्रिस्ती धर्माला जोर येत चालला, मूर्तिपूजेची इमारत ढासळून गेली, व ख्रिस्ती बादशाहांच्या मदतीमुळें नूतन धर्म बलवत्तर होऊन सर्व सुधारलेल्या जगांतील लोक ख्रिस्ती झाले.

कोणत्याही धर्माची हकीकत पाहिली तरी तिचा उत्कर्ष होण्यास व अखेर जय होण्यास हींच कारणें होत जातात, असें आढळून येईल. कायद्याच्या आधारावांचून किंवा राजाच्या अनुकूलतेवांचून अमुक धर्म फैलावला असें उदाहरण इतिहासांत क्वचितच सांपडेल. सत्पुरुषांच्या उपदेशानें आणि धर्माभिमानासाठीं पाहिजे तें दुःख सहन करणाऱ्या पुरुषांच्या उदाहरणानें दृढनिश्चयी जे सामान्य लोक त्यांच्या हृदयांत सुधारणेचें बीज उत्पन्न होतें. प्रथमतः राजे आणि लोकसमुदाय ह्या नवीन सुधारकांचा तिरस्कार करितात; परंतु कालगतीनें त्यांची संख्या आणि शक्ति वाढत जाऊन त्यांचा प्रवेश हळू हळू राजवाड्यांतही होतो. लागलीच ती सुधारणा जारीनें अमलांत येऊन राष्ट्रभर पसरते. पुनः ती उलट खाऊं लागते, व नवीन सुधारणेस विरुद्ध राजा पुनः उत्पन्न होऊन तो लोकांस नवीन धर्मापासून परावृत्त करूं पाहतो; परंतु ह्याविरुद्ध खटपटीनें नवीन मतास उलटा दुप्पट जोर येऊन त्याच्या लाटेखालीं राजा व प्रजा सर्वांचा चुराडा होतो, व जुना धर्म केवळ स्मृतिशेष होऊन जातो; ह्या नियमाप्रमाणेंच ख्रिस्ती-धर्म प्रथम मध्यम लोकांत पसरला; लोकांनीं त्याचा छळ

केला; नंतर तोच राजांनीं स्वीकारिला व सर्व राष्ट्राचा धर्म झाला. पुनः त्यास प्रतिपक्षी उत्पन्न झाला; परंतु तो अधिक बळावून शेवटीं सर्व सुधारलेल्या जगाचा धर्म आपण एकटाच होऊन बसला. मुसलमानी धर्म देखील अशाच रीतीनें फैलावला. महंमदाला प्रथम कांहीं शिष्य मिळाल्यानंतर त्याचा छळ होऊन त्यास मक्केंतून हांकून लाविलें, परंतु मदिना येथें त्यास आश्रय मिळून तेथून त्याचा धर्म एकसारखा फैलावत चालला, आणि पुनः तोच धर्म मक्केंत आल्यावर तेथील लोकांनीं तो सहज उचलिला. ह्यापुढें आरब लोकांनीं जे पराक्रम केले, ते केवळ धर्माकरितां केले; व त्यांस एकसारखा जयही येत गेल्यामुळें मुसलमानी धर्म सिरिया, इराण, इजिप्त, आफ्रिका, स्पेन, हिंदुस्थान इत्यादि देशांत पसरला. धर्माचा प्रसार करण्याच्या कामांत कायद्याची किंवा राजाची सत्ता असणें किती आवश्यक आहे, हें महंमद ह्यास पूर्णपणें कळत होतें; असें ह्मणण्यास हरकत नाहीं; व तशी सत्ता आपणांस करितां यावी व धर्मप्रसार लवकर व्हावा, ह्या हेतूनें त्यानें आपल्या धर्मांत असें ठरवून ठेविलें आहे कीं, तो आणि त्याच्या धर्मगादीचे अधिपति खलीफा हे केवळ धर्मगुरूच नाहींत, तर राज्यनियामकही आहेत; व शिवाय दुसऱ्या धर्मांतील लोकांस जिंकून त्यांस बलात्कारानें मुसलमान करावें असेंही त्याचें मत आहे. ह्याप्रमाणें महंमद हा आपल्या धर्मानुरूप मुसलमानांचा धर्मसंरक्षक आणि राजा तर होताच; परंतु नवीन धर्म स्थापन होऊन तो सर्व दुनियेंत पसरावा

हा त्याचा हेतु सिद्धीस जाण्यास जबरीनें धर्मप्रसार कर-ण्याचें त्याचें मत अत्यंत उपयुक्त होतें; व आरब लोकांस धर्मवेडामुळें आलेलें स्फुरण व त्यांचा रानटीपणाचा आवेश ह्यांच्या योगानें महंमदीचे ते हेतु सिद्धीसही गेले.

सामाजिक व धार्मिक सुधारणा होण्यास कायद्याची किंवा राजाची सत्ती जरूर असली पाहिजे, हें प्राटे-स्टंट धर्म वाढत जाऊन शेवटीं त्याचा जय कसा झाला इत्यादि हकीकतीवरूनही प्रत्यंतरास येतें. रोमन क्याथो-लिक धर्म बिघडून लोकांवर धर्मसंबंधीं अनेक जुलूम होऊं लागल्यामुळें, त्या धर्माचें विशदीकरण करण्याचा व त्यांतील वेडगळ मतें काढून टाकण्याचा प्रथम प्रयत्न सेंट पाल ह्याच्या शुद्ध व सरळ धर्मपद्धतीच्या आधारानें कांहीं लोकांनीं सुरू केला; त्यावरून त्यांचें नांव पाला-इटस् असें पडलें; व हाच पंथ पुढें होणाऱ्या प्राटेस्टंट धर्माचें आदिबीज समजला पाहिजे; परंतु ह्या पंथाचीं मतें क्याथोलिक धर्माच्या विरुद्ध असल्यामुळें लोकांनीं त्याचा छळ आरंभून हा पंथवृक्ष वाढूं लागला नाहीं, तोंच त्याचा समूळ उच्छेद केला. पुढें जान वुइक्लिफ ह्यानें तेंच मत आणि तोच क्रम हीं पुढें चालू केलीं, व त्याची तशीच दशा झाली. जॉन हस व प्रेग येथील जेरोम ह्यांनीं जर्मनी व आस्त्रिया देशांतील शेतकरी वगैरे लोकांस वुइक्लिफ ह्याचीं मतें शिकविण्याचा आरंभ केला. हीं मतें पोपांच्या विरुद्ध होतीं म्हणून अर्थातच त्यांनीं ह्या शत्रूंचा बीमोड करण्याची खटपट आरंभिली. आपलीं मतें शुद्ध व बायबलानुसार आहेत, हें वादविवादानें सिद्ध करून दाखविण्याकरितां त्यां-

नीं जेरोम ह्यास बोलावणें पाठविलें; व त्याचा जय किंवा अपजय झाला तरी त्याच्या केंसासही धक्का न लावितां त्यास सुखरूप परत जाऊं देण्याचें आश्वासन दिलें. असा करारमदार झाल्यावर जेरोम सभेस गेला, परंतु सभेंत त्याच्या पक्षाचा दुसरा कोणीही नसल्यामुळें सर्वांनीं त्याची दुर्दशा केली; व पोपाच्या लोकांनीं विश्वासघात करून वचनाप्रमाणें त्यास परत जाऊं न देतां, तेथेंच मोठा अग्नि पेटवून त्यांत त्यास दुष्टपणानें जिवंत जाळिलें! ह्याप्रमाणें ह्या मताच्या लोकांची दुर्दशा झाली; परंतु इतके दिवस ह्या मताची चर्चा चाललेली असल्यामुळें, व ह्या बळी पडलेल्या पुरुषांचा दृढनिश्चय पाहून सुधारणेचीं मतें लोकांच्या मनांत बरींच ठसलीं, आणि राजेरजवाड्यांचेही चित्त तिकडे वेधूं लागलें. पोपाचा जुलूम दिवसेंदिवस वाढतच चालला होता. रोम येथें सेंटपीटर ह्याचें देऊळ बांधण्यास पैसा उत्पन्न करण्याकरितां त्यानें इंडलजनस् नांवाचें पापविमोचन करणारे परवाने काढून त्यांची दरवारीनें किंमत ठेविली; आणि ज्या ज्या लोकांस आपल्या पातकांबद्दल क्षमा मागणें असेल, त्यांनीं आपलीं पातकें धर्माध्यक्षापाशीं कबूल करून तीं कमजास्त असतील त्या मानानें इंडलजनस् विकत घ्यावा, म्हणजे त्यांचीं सर्व पातकें दूर होऊन त्यास स्वर्गांत जाण्यास अडचण येणार नाहीं, असा मजकूर त्या परवान्यांत प्रसिद्ध केला. ह्या युक्तीनें पोपाला लक्षावधि रुपये उत्पन्न होऊं लागले, व दुष्कर्माचें प्रायश्चित्त असें स्वस्त झाल्यामुळें, लोक दुष्ट कृत्यें करण्यासही भीत नाहींसे झाले. अशा स्थितींत ल्यूथर

नांवाचा पुरुष पुढें आला; व त्यानें लोकांस उपदेश करून त्यांचें स्वस्तःचें अज्ञान आणि पोपानें चालविलेला गोंधळ त्यांस् उघड करून दाखविण्याचा उद्योग झपा-ट्यानें चालविला. त्यानें हा उपदेश करण्याचें सोडून द्यावें म्हणून पोपानें त्यास नानातऱ्हेचें भय घातलें व शेवटीं बहिष्कृतही टाकिलें; परंतु ल्यूथर ह्यानें आपला प्रयत्न उलटा जास्त जोरानें चालविला. त्यानें पोपांचीं व धर्मा-ध्यक्षांचीं दुसरीं अनेक अनीतीचीं आणि दुराचाराचीं कृत्यें उघडकीस आणिलीं. मागील प्राटेस्टंट सुधारकांचा उपदेश ठसलेले कित्येक शेतकरी व लहान लहान सरदारलोकही ल्यूथर याच्या पक्षास मिळाले, परंतु त्यांचा कांहीं एक उपयोग झाला नसता; कारण आजपर्यंत त्यांनीं कित्येक वेळां अशीं धर्मबंडें केलीं होतीं, परंतु राजेलोक त्यांस प्रति-कूळ असल्यामुळें त्यांचा सर्व प्रयत्न व्यर्थ जाऊन त्यांस कडक शिक्षा मात्र भोगाव्या लागत. जेरोमप्रमाणेंच ल्यूथर ह्यासही जाळून टाकून नास्तिक मताचा प्रसार बंद करावा, असें पोपानें योजिलें व वर्म येथें सभा भरवून तेथें ल्यूथर ह्यास वादविवाद करण्याकरितां बोलाविलें. सभेचा अध्यक्ष जर्मनीचा बादशाहा पांचवा चार्लस हाही पोपाच्याच तर्फेचा होता; कारण त्याच्या मदतीनें इटाली, फ्रान्स, स्पेन अशीं मोठमोठीं राज्यें मिळविण्याची चार्लस ह्याची खटपट सुरू होती. अशा धडधडीत शत्रूंच्या सभेंत ल्यूथर गेला, त्याला आपला पक्ष सोडण्याविषयीं त्याच्या मित्रांनीं फार आग्रह केला, परंतु त्याचा दृढनिश्चय ढळला नाहीं. शेवटीं त्या दिवशीं त्याचीही जेरोमप्रमाणेंच अवस्था

होऊन तो अग्निकुंडांत पडावयाचा होता, परंतु साक्स-नीचा राजा फ्रेडरिक ह्यानें त्याजकरितां आपली भीड खर्चिल्यामुळें, ल्यूथर ह्या अरिष्टांतून सुखरूपपणें बचावला. येथून सुटका झाल्यानंतर त्यानें लोकांचा आश्रय धरिला, आणि पोपांचीं सर्व दुष्कृत्यें उघडकीस आणण्याकरितां व लोकांचीं मनें सुधारणेकडे वळविण्याकरितां अविश्रांत मेहनत चालविली. ह्याप्रमाणें चाललें असतां सुधारणेस अनुकूळ गोष्टी एकाएकीं घडून आल्या. पोप आणि जर्मनीचा बादशहा ह्यांचें वैमनस्य पडल्यामुळें जुन्या धर्माला असलेला राजाश्रय नाहींसा झाला. चार्लस ह्यानें नवीन मताचा छळ करण्याचें सोडून दिलें, आणि मागाहून लवकरच स्पायर येथें सभा भरवून, जर्मनींतील सर्व संस्थानिकांनीं आपल्या भक्तीप्रमाणें कोणताही धर्म स्वीकारिला, तरी त्यांस बादशहाची मनाई नाहीं, असा ठराव तींत प्रसिद्ध केला. ल्यूथरच्या मताला अनुकूळ असलेले राजे लागलेच प्राटेस्टंट झाले, व अर्धा जर्मनी देश एकदम पोपाच्या जुलुमापासून मुक्त झाला! एवढयानेंच पोपावरील सर्व अरिष्ट टळलें असें नाहीं. प्राचीन काळापासूनच जर्मन लोकांची बहिवाट चालत आली होती; त्या बहिवाटीप्रमाणें ह्या वेळेसही त्यांनीं रोम शहरावर गदा आणिली, व पूर्वी पवित्र मानलेल्या पोपाच्या स्वतःच्या शहरांत शिरून त्यांनीं त्याची दाढी हलविली. जर्मन शिपायांनीं सर्व रोम शहर जिंकून लुटून फस्त केलें, व त्यांतील लोकांचीं दुष्कृत्यें उघडकीस आणून त्यांची विटंबना केली. उपदेशक असो किंवा धर्माध्यक्ष असो; त्याची

कांहीं एक मर्यादा न बाळगितां ते त्यांचा अपमान करून त्यांस लुटीत, व तसेंच देवळें, मठ वगैरे सर्व त्यांनीं उध्वस्त करून टाकिले. प्रेषितांचा राजा सेंटपीटर ह्याचें मंदिर देखील जर्मन लोकांनीं लुटण्याचें वगळिलें नाहीं. धर्माधिकारी लोकांचे दुराचार सर्वांस दाखवून त्यांची फजिती करण्याकरितां, कार्डिनल ह्मणजे वरिष्ठ धर्माधिकाऱ्यांप्रमाणें झगे आंगांत घालून, व हातांत दारूच्या बाटल्या किंवा रांडांस आपल्यामागें घोडयावर घेऊन जर्मन शिपाई साऱ्या शहरभर फिरले. एका ख्रिस्ती भटाची देखील रस्त्यांत येण्याची प्राज्ञा नव्हती; कारण ते दृष्टीस पडल्याबरोबर "अरे पोप! पोप! ठोका, पाहतां काय!" असें जर्मन शिपाई ओरडत. त्यांस बाहेर पडणें झाल्यास जर्मन शिपायाचा वेष करून हिंडावें लागे. असो; अशी जुन्या धर्माची विटंबना होऊन प्रोटेस्टंट धर्माचा जय झाला. त्याचा अंकुर प्रथम पालाइटस, वुइक्लिफचे अनुयायी, व हसचे शिष्य, ह्यांच्यांत उत्पन्न होऊन त्यांचा अतोनात छळ झाला, परंतु शेवटीं राजाश्रय मिळाल्यामुळेंच प्रबल होऊन जय पावला. अल्प काळांतच हा धर्म इंग्लंड, स्विट्झरलंड, डेनमार्क, स्वीडन वगैरे देशांत पसरला; परंतु तेथेंही अशीच लोकांच्या मनांत प्रेरणा होऊन राजांनींही त्याचा कैवार घेतल्यामुळें तो जय पावला. मागील सिद्धांताप्रमाणें ह्याही धर्म कायम होण्यापूर्वी मोठी गडबड उडून अशीं भयंकर युद्धें झालीं कीं, धर्माच्या बाबतींत अशीं कधींच झालीं नव्हतीं. अगावर पुष्कळ धर्म अनेक तऱ्हांनीं पसरले, परंतु केवळ राजांच्या आश्रि

त्यांच्या तरवारींच्या जोरावर कायम झालेला प्रोटेस्टंट धर्मावांचून दुसरा धर्म नाहीं, असें स्वीडन, नार्वेचा राजा गुस्ताव्हस अडॉलफस ह्यानें समरांगणीं केलेल्या शौर्यावरून, व इंग्लंडची राणी एलिझाबेथ हिनें स्पानिश लोकांच्या अजिंक्य आरमाराबरोबर जी टक्कर मारिली तिजवरून दिसून येईल.

अशी एक ह्मण आहे कीं, इतिहासांत ज्या गोष्टी एकदां घडतात तशाच पुनः पुनः घडत जातात. ह्या सिद्धांताचें सत्यत्व बौद्ध आणि ख्रिस्ती धर्मांच्या इतिहासांत जें पूर्ण साम्य आहे, त्यावरून स्पष्ट दिसून येईल. ख्रिस्ताच्या पूर्वी ६०० वर्षें त्याच्याच तुलनेचा एक धर्मस्थापक होऊन गेला. त्याचें नांव गौतम बुद्ध. ख्रिस्ताचीं व ह्याचीं मतें एकच होतीं; व बुद्धही लोकांस हाच उपदेश करी कीं, पशुयज्ञ करणें हें मुक्ति मिळण्याचें साधन नाहीं, व सर्व जगांतील लोकांवर प्रीति ठेवावी व त्यांवर उपकार करीत जावें. हें दोन्ही धर्मांचें मुख्य मत आहे. ह्या दोन्ही धर्मांचा प्रसार व जयही सारख्याच रीतीनें झालेला दिसतो. ब्राह्मण लोकांनीं योग, सांख्य, वेदान्त आणि मीमांसा ह्यांत जें तत्वज्ञान लिहून ठेविलें होतें, तें त्यांच्या ईश्वराची उपासना करून त्यास प्रसन्न करून घेण्याच्या ज्या यज्ञयागादि रीति चालू होत्या त्यांच्याशीं अगदीं विरुद्ध असल्यामुळें हिंदुस्थानांतील लोकांस त्या चालू रीतींबद्दल अभरंवसा उत्पन्न झाला होता. इकडे ख्रिस्ताच्या वेळीं ग्रीक लोकांच्या देशांतून यज्ञ सुरू असत, परंतु प्लेटो ह्मणून जो विख्यात तत्वज्ञानी होऊन गेला त्याच्या विचारांवरून यज्ञयागादिक चालींविषयीं ग्रीक राष्ट्रांतील लोकांच्या मनांत असेच संशय

येऊं लागले होते. आत्मा अविनाशी आहे, व त्यास एकांतून दुसऱ्यांत, अशा चौऱ्यायशीं लक्ष योनी फिरावयास लागतात, हीं मतें बुद्धानें सांख्य शास्त्रांतून उचलिलीं; आणि त्यांच्या आधारानें तो असा उपदेश करी कीं, 'ह्या चौऱ्यायशींच्या फेऱ्यांत सुखाचा लेशही नसून जीं पर्वतप्राय दुःखें आहेत तीं टाळण्यास यज्ञयागादिक पापकर्में केल्यानें कांहीं साधन होणार नाहीं; कारण पशूंचा देह चौऱ्यायशींच्या फेऱ्यांत असल्यामुळें जरी भिन्न दिसतो, तरी त्यांचा व मनुष्यांचा आत्मा एकच आहे, व त्यांची हत्या करणें नरकाचें साधन होय; ह्याकरितां इहलोकीं व परलोकीं सुखप्राप्ति होण्यास वरील उपाय ( ह्मणजे जगांतील लोकांवर उपकार करावे, सर्वांवर प्रीति करावी व यज्ञयाग सोडून द्यावे ) मात्र साधन आहेत.' ख्रिस्तानेंही हुबेहुब हीच तऱ्हा स्वीकारिली होती. प्लेटोच्या तत्वज्ञानाचा खोल विचार केला असतां, आत्मा अनश्वर आहे, आणि ईश्वराचे तीन भेद झालेले आहेत, हींच मूळतत्वें त्यांत सांपडण्यासारखीं आहेत. या मतांच्याच आधारावर येशू-ख्रिस्तानें आपला धर्म रचिला, व तोही 'सर्वांस त्यांच्या अपराधांची क्षमा करावी, आपल्या शेजाऱ्यांवर प्रीति करावी' हेच उपदेश लोकांस करी. दोघांसही प्रथम निःसीम भक्त मिळाले, त्या स्त्रियाच होत्या. दोघांनींही प्रथम अगदीं गरीब, भणंग, भिकारी वगैरे लोकांस उपदेश करून त्यांस आपल्या पंथांत आणिलें. दोन्ही धर्मांतील लोकांचा प्रथम फार छळ झाला, तरी ते बळावत जाऊन राजांनींही ते स्वीकारिले. दोघांचीही पूर्ण वृद्धि होण्यास तीन तीनशें

वर्षे लागलीं; व त्या काळांत त्यांच्या संबंधानें कित्येक खटपटी व वाद होऊन शेवटीं दोघांसही .दोन मोठमोठ्या बादशहांनीं आश्रय दिले. बौद्धधर्म अशोकराजानें स्वीकारिला, व खिस्तीधर्म कान्स्टंटाईन बादशाहानें स्वीकारिला. फार तर काय, परंतु ह्या दोन्ही बादशहांचीं चारित्रें देखील एकमेकांशीं समान आहेत. कान्स्टंटाईन हा पश्चिम यूरोपचा गव्हर्नर होता. तो रोमची गादी खालीं झल्याबरोबर सैन्यानिशीं कान्टांटिनोपल येथें येऊन, बाकीच्या हक्कदारांचा पराभव करून आपण रोमनराष्ट्राचा चक्रवर्ती झाला. तसाच अशोक हाही हिंदुस्थानच्या पश्चिम भागांत ( पंजाबांत ) सुभेदार होता. त्यानेंही असाच पराक्रम करून मगध येथील गादी संपादन केली; व सर्व हिंदुस्थानचा चक्रवर्ती झाला. दोघांनींही ( अशोक व कान्स्टंटाईन ) आपापल्या आवडत्या धर्मांचा प्रसार करण्याकारितां स्वतः जातीनें अनेक खटपटी केल्या, व कायदेही केले. कान्स्टंटाईन बादशहाची हकीकत मागें वर्णन केलीच आहे कीं, त्यानें प्रथम खिस्तीलोकांचा छळ होत असे, तो बंद करून सर्वांस स्वातंत्र्य दिल्यामुळें पुष्कळ लोक खिस्ती होऊं लागले, व मागाहून तेच कायदे जास्त कडक होऊन खिस्तीधर्म स्वीकारणें कायद्यानें भाग पडलें. एकंदरींत त्यानें खिस्तीधर्माच्या उत्तेजनार्थ इतके प्रयत्न केले कीं, त्यास तेरावा अपास्टल असेंही ह्मणतात. बौद्धधर्माचीही अशीच स्थिति होऊन त्याचा जय झाला, व अशोक राजानेंही अशीच एकामागून एक गोष्ट अमलांत आणिली, ह्मणजे प्रथम केवळ उपदेश, मागाहून कायदा, व शेवटीं जुलूम.

त्यानें बांधिलेले २१०० वर्षांपूर्वीचे स्तंभ, आणि त्यांवर खोदून ठेविलेलीं आज्ञापत्रें अजून दृश्यमान आहेत; व त्यांवरून, आपल्यां रयतेनें बौद्ध धर्म स्वीकारण्याकरितां त्यानें काय काय यत्न केले, व त्यांचीं मुख्य चार तत्वें प्रत्येक धर्मांतील मनुष्यास कशीं आचरण्यास लाविलें, इत्यादि गोष्टींची कल्पना करितां येते. तीं चार तत्वें ह्मणजे, आईबापांस मान द्यावा, ब्राह्मण आणि श्रमण ( बौद्ध धर्मांतील भिक्षुक ) यांस भिक्षा द्यावी, इष्टमित्रांवर व शेजाऱ्यांपाजाऱ्यांवर प्रीति करावी, व ज्यांस थोडें तरी ज्ञान आहे, अशा जीवाची हिंसा करूं नये, हीं होत. हीं चारी तत्वें त्यानें सर्वांस सक्तीनें आचरण्यास लाविलें. प्रथम, बौद्धधर्माचे नियम पाळण्याविषयीं तो लोकांस फक्त उपदेश करीत असे, तोच मागाहून त्याबद्दलचे हुकूम करून ते अमलांत आणूं लागला; प्रथम, बौद्ध धर्म स्वीकारिण्याचें लोकांस तो उत्तेजन देत असे, तोच मागाहून तसें करण्याविषयीं भय घालूं लागला; तसेंच तो परधर्मी लोकांविषयीं प्रथम विशेष चौकशी करीत नसे, तो मागाहून त्यांचा बारकाईनें तपास करून छळ करूं लागला. अशी एकेक पायरी चढवीत चढवीत त्यानें शेवटीं कायदा करून टाकिला. थिआडोशिअस बादशहानें व अशोक राजानें शेवटीं जीं आज्ञापत्रें प्रसिद्ध केलीं, तीं देखील सारखींच आहेत. दोहोंतही निरनिराळ्या तऱ्हेनें होणाऱ्या पशुयज्ञाची बंदी केली आहे; व तो करणारांस थिआडोशिअस बादशहानें कायदेशीर कडक शिक्षा ठेविली होती, तिच्या ऐवजीं हिंदुस्थानचा बादशहानें फक्त आज्ञा

केली आहे. ( हिंदुस्थानांत तितकी आज्ञा म्हणजे थिआ-डोशिअस बादशहाच्या कडक शिक्षेच्या भयाइतकीच समजली पाहिजे. ) अशा सक्तीनें शेवटीं दोन्ही धर्मांचा जय झाला. तीं आज्ञापत्रें येणेंप्रमाणें—

| थिआडोशिअस. | अशोक. |
| --- | --- |
| (इ. स ३८५) आमची इच्छा आणि आमची आज्ञा अशी आहे कीं, आमच्या रयतेपैकीं कोणीही मनुष्यानें कोणत्याही शहरांत अथवा इतर ठिकाणीं निर्जीव मूर्तीची पूजा निरपराध पशूंचे बळी देऊन करूं नये. जो करील तो राजद्रोही समजला जाऊन, ज्या ठिकाणीं हें अधर्माचें कृत्य होईल तेथील त्याचें घर, सर्व मासमत्ता सरकारांत जप्त केली जाईल. | (इ. स. पूर्वी २०० वर्षे.) राजा प्रियदर्शी ह्याची आज्ञा आहे कीं--पशूंचा यज्ञ कोणीं करूं नये. जिवंत प्राण्यांस कोणी मारूं नये. ह्या पवित्र आचरणामुळें देवांना प्रिय जो अशोक राजाचा धर्म तो सर्व भूमंडळावर पसरेल. वरील नियम पर्वताप्रमाणें अचळ होऊन लोकांनीं आपापल्या धर्माप्रमाणें पाळावे. प्रत्येक सद्गुणी मनुष्यानें ह्याप्रमाणें वागावें, व ह्याविरुद्ध जाण्याचा प्रयत्न कोणीही करूं नये. |

सुधारणेस कायद्याची मदत पाहिजे आहे किंवा नाहीं हा आज मित्तीस मोठा वादग्रस्त विषय आहे; आणि हिंदुस्थानांतील इंग्रजी शिकलेल्या विद्वानांचीं मतें ह्याविषयीं

फार भिन्न भिन्न आहेत; परंतु ह्याच प्रश्नाच्या निकालावर सामाजिक सुधारणा यशस्वी होणें पुष्कळ अंशीं अवलंबून असल्यामुळें तो पूर्णपणें व लवकर होणें अवश्य आहे. येथपर्यंत जें बरेंच प्रतिपादन झालें, त्यावरून सुधारणेस कायद्याची सक्ति असणें तर जरूर आहे, हें दिसून येईल; परंतु ती केव्हां ? जेव्हां अनेक सत्पुरुषांच्या उपदेशानें लोकांच्या मनांत सुधारणेविषयीं अनुकूल विचार येऊं लागून ती स्वीकारण्यास ते तयार असतात, अशाच वेळेस कायद्याची अवश्यकता असून त्या वेळीं कायदा करण्यांत आला असतां तो सुधारणेस फार उपयोगी पडतो. त्यापूर्वी म्हणजे जोंपर्यंत सुधारणेचा उपयोग आणि महत्व हीं लोकांस समजलीं नाहींत, तोंपर्यंत त्यांची खुषी नसतां जुलुमानें त्यांस ती स्वीकारण्यास सांगणें गैरवाजवी आहे, व तो उद्योग सिद्धीस जाणेंही अशक्य आहे; परंतु एकाद्या सुधारणेस लोकांच्या बहुमताची अनुकूलता असून पुष्कळ लोक त्याप्रमाणें आचरणही करीत आहेत, अशा स्थितींत ती सुधारणा असतां तिजविषयीं अनुकूळ कायदा न ठरविणें, म्हणजे सुधारणेचें एक जबर साधन नाहींसें करून, तिला विचारशून्य, अडाणी लोक, हटवादी शास्त्री, व कार्यसाधू भिक्षुक ह्यांच्या मर्जीवर ठेवण्यासारखें आहे, इतकेंच नाहीं, तर ती बुडविणेंच आहे असें म्हटलें तरी चालेल; कारण विचारशून्यांची अवस्था मेंढरांप्रमाणें असते; शास्त्री आपल्या ज्ञानाचा निष्कारण दुरुपयोग करितात; व भिक्षुकांचा फायदा बुडतो ह्मणून तेही प्रतिकूळ असतात. अशांस वांकवि-

ण्यास कायदाच पाहिजे. ह्या विषयावर कित्येक ऐतिहासिक उदाहरणें दिलींच आहेत; तरी आपल्याच देशांतील एक उदाहरण घेतल्यास हा विषय मनावर पूर्णपणें ठसेल. ज्यानें उगीच थोडीबहुत वेद किंवा शास्त्र हीं पाहिलीं असतील तो, आपले पूर्वज—ज्यांना आपण पवित्र ऋषि ह्मणतों, व जे आपल्या हिंदूधर्माचे मूळ उत्पादक होत—नित्य गाई व दुसऱ्या चतुष्पाद पशूंचे यज्ञ करीत, ह्या गोष्टीमुळें खचितच फार चकित झाला असेल. त्यांचें मांस भक्षण करण्यासही त्यांस मनाई नसे. कोणी सद्गृहस्थ किंवा जांवई पाहुणा आला असतां मधुपर्काच्या वेळेस अथवा श्राद्धाच्या वेळेस, बैलाच्या मांसाची गरज पडे. तसेंच ईश्वराची आराधना करून कोणतीही फलप्राप्ति करून घेणें असतां घोडे, गाई, बैल, मेंढरें ह्यांचे निरनिराळे मेध करीत असत; परंतु आतां पहा, काय चमत्कार दृष्टीस पडतो कीं, त्याच हिंदू लोकांनीं आज शेंकडों वर्षें मांसभक्षण अगदीं वर्ज्य केलें आहे! आणि त्याच गाईची किंवा बैलाची हत्या ह्मणजे घोर पातक मानिलें जातें! गाईच्या चरबीचें नांव काढिलें, किंवा तिला कसाबास विकण्याची गोष्ट काढिली कीं, हिंदूच्या आंगाचा तिळपापड होतो, व ते दंगे आणि बंडेंही करण्यास प्रवृत्त होतात. इतका जमीनअस्मानाचा फरक त्यांच्या विचारांत कशानें पडला? पशुहत्या कलियुगांत वर्ज्य आहे; गवालंभ कलियुगीं वर्जांत घालून ठेविला आहे; व गोहत्येच्या पातकाचें तर क्षालन होत नाहीं अशीं शास्त्र्यांचीही मतें फिरण्यास धर्मांत काय फेरफार झाला असावा? अग्निहोत्र्यांचीही अशींच मतें कशानें

फिरली कीं, ते पशुयज्ञ करणें अगदीं अश्रेयस्कर व निंद्य समजतात ! बौद्धधर्मांत प्राणिहत्यानिषेध केला आहे, आणि तो धर्म आपल्या देशांत होता, ह्यामुळें हा फेरफार झाला असावा, असें ह्मणवत नाहीं; कारण बौद्धधर्म सर्व हिंदुस्थानभर कधींच पसरला नाहीं. व हिंदु लोकांवर त्याचा इतका सक्त अंमल कधींही नव्हता. तर ह्या गोष्टीचें फक्त एकच कारण दाखविण्यासारखें आहे, व इतिहासकारांनींही तेंच दाखविलें आहे तें हें कीं, 'पशुयज्ञ कोणीही करूं नयेत.' असें जें महत्वाचें आज्ञापत्र अशोक राजानें सर्वत्र प्रसिद्ध केलें होतें, त्याचाच हा परिणाम आहे. इतिहासकार वर्णन करितो: -"अशोक राजाची ही आज्ञा लोकांच्या मनावर ठसून तिचा जो पूर्ण परिणाम घडला, तो केवळ तिच्या अतिकडकपणामुळें घडला; व असा परिणाम घडविणारा कडक हुकूम राज्यव्यवस्था निर्माण झाल्यापासून कोणीही अमलांत आणिला नसेल. ब्राह्मण लोक जरी मांसभक्षण फारसें करीत नसत, तरी पशूंचा यज्ञ करण्याची चाल त्यांच्यांत अनादि काळापासून चालत आली होती. तसेंच क्षत्रिय हेही फार प्राचीन काळापासून मृगया करण्यांत आणि युद्धकलेंत फार कुशल असत, व आपली उपजीविका बहुतकरून मांसाहारावरच करीत. ह्याप्रमाणें ह्या दोन्ही वर्गांतील लोक जी नित्य पशुहिंसा करीत असत, ती बंद व्हावी व सर्वांच्या ठायीं भूतदया उत्पन्न व्हावी, हाच अशोकाच्या आज्ञेचा मुख्य हेतु होता; परंतु पहिल्या खेपेस तो सिद्धीस गेला नाहीं; व ब्राह्मण आणि क्षत्रिय ह्या दोघांच्याही मनावर तो ठसेना; कारण वेदांच्या आज्ञेप्रमाणें

पशूंचा यज्ञ करून त्यांस कापणें, हें क्रूरपणाचें कृत्य आहे, असें ब्राह्मणांच्या स्वप्नींही आलें नाहीं; तसेंच हरिणांचा व रानडुकरांचा घात केल्यामुळें त्यांस दुःसह वेदना होतात, ह्मणून आपला शूरत्वाचा खेळ व पूर्वापार भक्ष्य वर्ज करावें, असें अर्थातच क्षत्रियांच्याही मनांत येईना.

"ह्याप्रमाणें अशोकानें हा हुकूम प्रथम जाहीर केला तेव्हां त्याचा फारसा उपयोग झाला नाहीं. कित्येकांस हा हुकूम आवडला नाहीं, व कित्येकांनीं तर आपली उघड नाखुषी दर्शविली. तरी बादशहानें आपला सुनिश्चय सिद्धीस नेण्याचा पूर्ण आग्रह धरिला. त्यानें पुनः बादशाही थाटानें तीच आज्ञा आपल्या राज्यांत जाहीर केली; व आपला अधिकार आणि सामर्थ्य पूर्णपणें कळून येऊन लोकांच्या मनांत पूज्यबुद्धि उत्पन्न व्हावी, व विरोध करण्याचें त्यांच्या मनांत देखील येऊं नये, अशी सक्त तजवीज बादशहानें केली. द्वाही फिरविण्याकरितां अनेक हत्ती व रथ हीं अलंकारांनीं शृंगारित करून त्यांच्यापुढें नळे, चंद्रजोती वगैरे दारूकाम उडवीत मोठ्या थाटानें राष्ट्रांतील प्रत्येक मुख्य मुख्य ठिकाणीं नेलीं. त्यांच्या भोंवती असंख्य लोक जमत, व तसे जमले ह्मणजे नगारे तुताऱ्या वगैरे वाद्यें वाजवून, राजानें जो मनुष्य द्वाही फिरविण्याकरितां पाठविला असे, तो सर्वांस ओरडून सांगे कीं, "ऐका हो सर्व लोकांनो! राजा प्रियदर्शी ह्याची अशी आज्ञा आहे कीं, पशूंचा कोणी यज्ञ करूं नये; जिवंत प्राण्यांस कोणीं जिवें मारूं नये; हीं प्रत्येक मनुष्याचीं मुख्य कर्तव्यकर्में आहेत व तीं पर्वताप्रमाणें अचल ( अक्षय ) रहावीं; प्रत्येक सद्गुणी मनुष्यानें

ह्याप्रमाणें वर्तन करावें; ह्याच्याविरुद्ध कोणीही आडळ नये; आणि कोणाचे कांहींही धर्माचार असले, तरी ते ह्या नियमांस अनुसरून केले पाहिजेत."

"आजपर्यंतच्या उपलब्ध असलेल्या इतिहासांत 'न्याय आणि भूतदया हीं सर्वांनीं पाळिलीं पाहिजेत, व त्यांत धर्माची सबब ऐकिली जाणार नाहीं.' असा कायदा अशोक राजानेंच प्रथमतः आपल्या अधिकाराच्या जोरावर केला. पशूंचा यज्ञ करणें हें अमानुषपणाचें कृत्य आहे, असें त्यानें ठरविल्यामुळें ब्राह्मणांचीं पूर्वीचीं यज्ञादि कर्में नाहींशीं होत चाललीं. आतांचे ब्राम्हण गोमांस भक्षण करणें ह्मणजे जसें महत्पाप समजतात, किंवा मुसलमान लोक डुकराचें मांस भक्षण करणें नीच मानितात, तसें मानण्याविषयीं अशोकानें पूर्वींच्या ब्राह्मणांस सांगितलें नव्हतें; ह्मणजे गोमांस खाणें किंवा पशुयज्ञ करणें, हीं देवास अप्रिय आहेत, किंवा तो अधर्म आहे ह्मणून तें वर्ज करा, असें त्यानें सांगितलें नाहीं; परंतु हें कृत्य हिंसकपणाचें आणि भूतदयेविरुद्ध आहे इतक्याकारितांच तें बंद करविलें. ह्या मताच्या विरुद्ध पक्षास कांहीं लोक मिळून कित्येक वर्षें हा वाद चालला होता, परंतु शेवटीं भूतदयेचा जय होऊन ब्राह्मण व क्षत्रियांचीं मतें हार पावलीं. अलीकडे पशुयज्ञ हिंदुस्थानांतून नाहींसाच झाला आहे, असें म्हटलें तरी चालेल. राजे लोकांनीं व चक्रवर्तींनीं करण्याचे जे राजसूय अश्वमेध यज्ञ, ते तर प्रस्तुत ऐकूंही येत नाहींत; आतां कांहीं कांहीं क्षत्रियांस शिकारीचा फार शोक आहे, तरी एकंदरींत हिंदू लोकांचा कल प्राणिवधाविरुद्ध आहे."

वरील इतिहासकार म्हणतो कीं, भूतदयेनें ब्राह्मण व क्षत्रिय लोकांची प्राणिवध करण्याची मतें व त्यांच्या तदनुसार चाली, हीं लयास घालविलीं परंतु ह्या म्हणण्यांत विशेष तथ्य दिसत नाहीं; कारण भूतदयेचा प्रभाव जर पूर्वापार चाली रद्द पाडण्याइतका मोठा असता, तर बालविधवा व बालवधू ह्यांजवर जीं संकटें ओढवत आहेत, त्यांच्या योगानें लोकांस दया येऊन ह्या वाईट चाली कधींच लयास गेल्या असत्या. एकाद्या मुलीचा पति अल्पवयांत मेला म्हणजे तिच्या आईबापांचे जीव तिला पाहून तिळतिळ तुटतात. त्यांचे आप्तस्नेही, किंवा परकी लोकही ह्या अनाथ रंडक्या मुलीस पाहून हळहळल्यावांचून राहत नाहींत; इतकी जरी भूतदया खवळून जाते, तरी ह्या दुष्ट चालीविरुद्ध जाऊन ती मोडण्याचें धाडस त्यांस होत नाहीं, असें व्यवहारांत आपण नेहमीं पाहतों; मग भूतदयेचा मनुष्यांच्या चालीरीतींवर जय झाला, हें वरील इतिहासकाराचें म्हणणें कितपत संभवतें ? ह्यावरून अशोक राजाच्या आज्ञेस भूतदयेचें सहाय झाल्यामुळें पशुयज्ञाच्या चाली लयास गेल्या अशी गोष्ट संभवत नाहीं. तिला दुसऱ्याच एका गोष्टीची अनुकूलता असल्यामुळें हा फेरफार घडून आला आहे. ब्राह्मण आणि क्षत्रिय ह्यांच्या कृत्यास ज्या कारणानें प्रतिबंध झाला आहे तें कारण वेगळेंच असून बौद्ध धर्म उत्पन्न होण्याच्या पूर्वींच उद्भवलें होतें; व त्या योगानें लोकांचें मन पशुयज्ञाविषयीं आधींच उलट झालें होतें. वेदान्त आणि सांख्य, ह्यांतील तत्वज्ञानामुळें लोकांस ईश्वराचें ऐक्य त्याच्या प्राप्तीचीं साधनें, त्याचें स्वरूप इत्यादिकांचें ज्ञान

होऊं लागलें होतें. दिवसेंदिवस तें ज्ञान वाढत जाऊन, कर्ममार्ग आणि ज्ञानमार्ग ( म्हणजे यज्ञयागादि कर्ममार्गानें ईश्वराची उपासना करून त्यास प्राप्त करून घेणें, किंवा वेदान्तांत सांगितल्याप्रमाणें त्यांचें ज्ञान प्राप्त करून घेऊन त्यास ओळखणें ) ह्यांपैकीं ग्राह्य कोणता ह्याविषयीं अनेक वादविवाद होत; व शेवटीं ज्ञानमार्गाच्या तर्फेचा निर्णय होई. ह्याप्रमाणें ज्ञानमार्गाचा प्रचार वाढत चालला होता; गृह्यसूत्रांचा काळ निघून गेला; व यज्ञयागाचीं बारीक बारीक कृत्यें इतकीं असंख्य वाढलीं कीं लोकांस त्यांचा कंटाळा येऊं लागला होता. सारांश बौद्धधर्माचीं मतें जय पावलीं याचें मूळ कारण सांख्य आणि वेदान्त ह्यांतील तत्त्वज्ञानाच्या योगानें सर्व राष्ट्राचीं मनें फिरून जाऊन सुधारणा ग्रहण करण्यास अति उत्सुक झालीं होतीं, हें आहे. तत्रापि कांहीं कांहीं भाविक मूर्ख लोक व संशयी दुराग्रही लोक ज्यांनीं गतानुगतिक न्यायानें जुन्या चालीप्रमाणें यज्ञ करणे सोडून दिलें नव्हतें, अशा लोकांस नम्र करण्यास अशोक राजाचा जुलमाचा कायदा फार उपयोगीं पडून, अद्यापिही ज्याला कर्मभूमि म्हणतात, अशा आपल्या भरतखंडांतील पशुयज्ञ नाहींसे करण्यास कारणीभूत झाला. तेव्हांपासून अहिंसा हें हिंदुधर्माचें तत्व बनलें आहे. शास्त्रांनीं आणि स्मृतींनीं मागील रक्तपाताच्या यज्ञाऐवजीं सुधारणेस अनुसरून पायस, पिष्ट इत्यादि नवीन नियम घालून दिले, व हिंसा वर्ज मानिली आहे ह्यामुळें गोरक्षण हें आपणांस पवित्र व सर्वप्रिय झालें आहे, व खुद्द आपले पूर्वज जरी त्याच्या अगदीं विरुद्ध क्रिया ( गोयज्ञ, मधुपर्क

वगैरे ) करीत असत, तरी आपण तें अगदीं विसरून जाऊन त्याच्या उलट मानितों.

सर्व राष्ट्राचीं मतें बदलून जाऊन त्यांत कसा विलक्षण फेरफार होतो, ह्यांचें वरील हकीकत हें सुंदर उदाहरण आहे. लोकांची जुन्या चालींविषयीं अप्रीति, नवीन चालींबद्दल अनुकूलता, आणि जुन्या चालींचा उच्छेद करण्याचा राजाचा निश्चय, ह्या तिन्ही कारणामुळें वरील सुधारणा घडून आली, व ह्यांपैकीं कोणतेंही एक साधन जर कमी पडलें असतें, तर ती घडून येणें दूरापास्त झालें असतें. बालविवाहाची चाल अशाच प्रकारची अगदीं त्याज्य असून व त्याविषयीं लोकमत असेंच प्रतिकूळ होऊनही ती काढून टाकण्याचा उद्योग कां सफल होऊं नये ? हिंदु लोक आजपावेतों मुलीचें लग्न ऋतुप्राप्तीनंतर करणें म्हणजे जसें अमानुषपणाचें आणि घातक कृत्य समजतात, तसें आतां त्याच्या उलट कां मानणार नाहींत कीं ऋतुप्राप्तीनंतरचें लग्न घातक नसून ऋतुप्राप्तीपूर्वी लग्न करणें ह्मणजे मात्र घातक आहे ? त्याच प्रमाणें शेंकडों वर्षांमागें अशोक राजानें घालून दिलेला कित्ता उचलून सार्वभौम इंग्रज सरकारानें, ‘ कोणत्याही धर्माचे लोक असोत, त्यांनीं आपला धर्म न्याय आणि भूतदया ह्या मुख्य दोन कर्तव्यकर्मांस अनुसरून आचरिला पाहिजे ’ असा लोकप्रिय सुधारणेचा हुकूम कां करूं नये ? असा हुकूम केला असतां, सरकारानें आपणावर ईश्वरानें सोंपून दिलेलें एक मोठें कर्तव्य बजाविलें असें होईल; परंतु ह्या शेवटल्या प्रश्नास नेहमीं असें उत्तर मिळतें कीं,

"सामाजिक कामांत आह्मीं हात घालणार नाहीं, असें राजकारणमुत्सद्यांनीं वचन दिलें असल्यामुळें आह्मांस त्यांत हात घालतां येत नाहीं. तशांतून इंग्रज लोकांचें उदाहरण पाहून हळूहळू एतद्देशीय लोकांच्या मनांवर त्याचा ठसा उमटत चाललाच आहे; त्यांच्या उदाहरणानें कांहींएक खटपट केल्यावांचून इच्छित सुधारणा सुरू होतील." तेव्हां प्रथम मनुष्यापुढें सुशिक्षित लोकांचें उदाहरण असल्यानें, व त्यांची तऱ्हा व त्यांच्या चाली पाहून त्यांच्या मनाची काय स्थिति होते, ह्या गोष्टीचा विचार केला पाहिजे;

जेव्हां एकादा लोकसमाज आपल्या आसपासच्या लोकांपेक्षां जास्त सुधारलेला असतो, तेव्हां त्याच्या सुधारलेल्या धर्माचा आणि रीतींचा, त्याच्या सहवासास असलेल्या कमी सुधारलेल्या अथवा अधिक रानटी लोकांवर कांहीं तरी परिणाम घडतोच; आणि त्याचें उदाहरण पाहून तीच रीति किंवा तो धर्म आपणही स्वीकारावा, असें त्यांस वाटूं लागतें. ह्याप्रमाणें जेव्हां रोमनराष्ट्रानें ख्रिस्ती धर्म स्वीकारला, आरबांनीं मुसलमानीं धर्म स्वीकारला, व हिंदुस्थानचे चक्रवर्ती बौद्ध धर्मी झाले, तेव्हां ह्या सुधारलेल्या धर्मास वैभवाचा आधार सांपडून, त्यांतील धर्मसमारंभाचा थाटमाट व शोभा ह्यांच्या योगानें ते आसपासच्या रानटी लोकांत फार लवकर पसरले. फ्रेंच लोक, जर्मन लोक, इंग्लंडांतील साक्सन, रशिअन व तुर्क लोक, ह्यांच्या धर्मांतराची हकीकत पाहिली असतां, ख्रिस्ती धर्म रोमन राष्ट्रांत पसरण्यास किंवा प्राटेस्टंट धर्म स्थापन होण्यास जसे महाप्रयास व कालांतर लागलें, तसें ह्या वरील लोकांच्या धर्मांतरास न लागतां तें

फार स्वल्प उपायांनीं झालें. नवीन धर्माचीं तत्वें त्यांच्या मनांत शिरावीं म्हणून त्यांस बोध करण्याची फार मेहनत पडली नाहीं, व अनेक छळवाद सोसून धर्मासाठीं बळी पडण्याची गरजही कोणास लागली नाहीं. बहुतकरून राजांनींच आपलें धर्मांतर प्रथम केलें; व त्यांच्या मागून सबंध जातींनीं आणि समाजांनीं त्यांचा कित्ता एकदम उचलिला. रोमन राष्ट्र मोडकळीस येऊन युरोपांतील अनेक जातींच्या रानटी लोकांनीं जरी तें जिंकिलें, व तसेंच आशियांतील रानटी लोकांनीं बगदाद येथील खलीफांची गादी हिसकावून घेतली, तरी तेथील अनुक्रमें ख्रिस्ती व मुसलमानी ह्या सुधारलेल्या धर्मांचा त्या रानटी लोकांच्या मनावर पगडा बसून ते धर्म त्यांनीं आपखुषीनेंच स्वीकारले.

अशा प्रकारच्या ( वरील फ्रेंच, जर्मन वगैरे ) लोकांचीं कांहीं उदाहरणें येथें घेतलीं असतां तीं वाचकांस बहुत करून अप्रस्तुत वाटणार नाहींत, " क्लोव्हिस म्हणून फ्रांक लोकांचा राजा होता, त्याला क्यॅथोलिक धर्म त्या वेळच्या धर्मांत फार सुधारलेला असल्यामुळें आवडून तो स्वीकारण्याचा त्यानें निश्चय केला; परंतु आपल्या रयतेस हा धर्म पसंत न पडल्यास ते आपणास जुमानितील किंवा नाहीं, ही त्यास मोठी अडचण आली, व मजप्रमाणेंच तुह्मीही ख्रिस्ती व्हाल काय? असें त्यानें आपल्या लोकांस विचारिलें. तेव्हां सर्वांनीं त्यास राजनिष्ठपणानें एकच उत्तर दिलें कीं ' आमचे विजयी महाराज जिकडे जातील, तिकडे आह्मींही जाण्यास तयार आहोंत, मग ते समरांगणीं जावोत किंवा बातिस्मल फाँटवर ( ह्मणजे बातिस्मा घेण्याची जागा)

जावोत.' असें अनुमत मिळाल्यावर ह्या नव्या कान्स्टंटाईन* (क्रोव्हिस) बादशहानें बाप्तिस्मा घेतला, व त्याच्याबरोबर त्याचे तीन हजार शूर राजनिष्ठ लोक ख्रिस्ती झाले. लागलेंच उपदेशकाच्या आज्ञेप्रमाणें राजाच्या अशिक्षित धाडदांड लोकांनीं—ज्यांची ते आजपर्यंत पूजा करीत आले होते अशा आपल्या लांकडांच्या देवांस बाहेर काढून जाळून टाकिलें; व ख्रिस्ती लोकांचा छळ करून त्यांचे क्रास जे आजपर्यंत जाळीत असत त्यांचीच आतां पूजा करूं लागले. इंग्लंडांतही असेंच झालें. केंट येथील राजानें ख्रिस्तीधर्म स्वीकारल्याबरोबर त्याचा कित्ता त्याच्या सरदारांनीं व पुष्कळ प्रजांनीं एकदम उचलला; त्यासाठीं कोणावर जबरदस्ती किंवा जुलूम करावा लागला नाहीं. मात्र जितके लोक राजाचा धर्म स्वीकारीत तितक्यांवर त्याची कृपा विशेष असे. तेथील लोकांचें उदाहरण पाहून नार्थंब्रियातील लोकांचीं मनें ख्रिस्ती धर्माकडे अतिशय वळलीं. तेथील सर्व लोक, धर्माधिकारी, आणि राजा, ह्यांची ह्यासंबंधानें एकच काय ती सभा भरली; व तींत केंटच्या धर्मोपदेशकानें जुन्या व नव्या धर्माविषयीं उपदेश केला, व ह्या एकाच सभेच्या निकालानें सर्व नार्थंब्रिया ख्रिस्ती झाला. सारांश, आज एक ख्रिस्ती झाला, उद्यां दुसरा झाला, असा सावकाश रीतीनें

* कान्स्टंटाईन बादशहानें जसा पूर्वी ख्रिस्ती धर्म हा आपल्या राष्ट्राचा धर्म करून ख्रिस्ती धर्मावर उपकार केले, तसाच ह्यानेंही ख्रिस्ती धर्माचा पुष्कळ प्रसार केला, व फ्रांक लोकांचा धर्म ख्रिस्ती धर्म केला ह्मणून ह्यास नवा कान्स्टंटाईन अशी संज्ञा इतिहासकारानें दिली आहे.

धर्मप्रसार न होतां, प्रांतचे प्रांत व जातींच्या जाती एकदम खिस्ती होत गेल्या. रशियामध्येंही राजकीय अधिकाराच्या जोरावर हा धर्म फैलावला. "तेथील राजा वालाडोमीर, आपल्या पेराऊन नामक ( मेघगर्जनेच्या ) जुन्या देवाचा जरी निःसीम भक्त असे, तरी खिस्ती झाल्याबरोबर त्यानें त्या देवाला खिवा येथील रस्त्यामधून ओढीत नेऊन त्याचा विध्वंस करण्याचा हुकूम केला. त्याप्रमाणें त्याचे रानटी बारा शिपाई जाऊन ती मूर्ति रस्त्यांतून ओढीत घेऊन आले, व सोंट्यांनीं तिचे तुकडे तुकडे करून ते त्यांनीं बारिस्थिनीस नदींत फेंकून दिले. नंतर जे लोक बातिस्मा घेण्याचें नाकारतील ते राजाचे आणि ईश्वराचे शत्रू समजले जातील अशी त्यानें आपल्या राज्यांत चोहींकडे द्वाही फिरविली. राजाज्ञा होतांच, ज्या अर्थीं राजा आणि त्याचे सरदार ह्यांनीं खिस्ती धर्म स्वीकारिला आहे, त्या अर्थीं त्या धर्माचीं मतें खरीं व कल्याणकारकच असतील, अशी खातरी होऊन हजारों रशियन लोक खिस्ती होण्यास तयार झाले; व कित्येक दिवसपर्यंत बातिस्मा घेणारांच्या गर्दीमुळें नदीवर रीघही होत नसे. दुसऱ्याच पिढींत रशियांतील मूर्तिपूजेचा मागमूसही नाहींसा झाला. ह्यापेक्षांही तुर्क लोकांचें उदाहरण फार चमत्कारिक असून, सुधारलेल्या धर्माचा व चालींचा रानटी लोकांवर विलक्षण परिणाम घडतो, हें त्यावरून ढळढळीत दिसून येतें. तुर्क लोक मूळचे फार रानटी व राक्षसी असत, त्यांनीं वेगवेगळ्या टोळ्यानीं रशिया, जर्मनी, इराण इत्यादि निरनिराळ्या ठिकाणीं राज्यें जिंकिलीं, व प्रत्येक टोळीनें तेथला तेथला निरनिराळा सुधारलेला धर्म

उचलला. हंगेरियन लोक हे मूळचे ह्या रानटी तुर्क लोकां-
पैकींच आहेत. ते सर्व फ्रान्स आणि जर्मन देशभर पसरले;
व तो मुलूख ओसाड करून टाकून, व शेवटीं क्याथो-
लिक धर्माचें अनुकरण करून, व्हाग्टीस ह्मणजे ज्याला हल्लीं
हंगेरी ह्मणतात तेथें स्थाईक झाले. कान्स्टांटिनोपल येथील मि-
शनरी लोक पुष्कळ दिवस रशियांतील लोकांस ख्रिस्ती धर्माचा
उपदेश करीत फिरत असत; ह्यामुळें जे तुर्क लोक रशि-
यांत गेले ते ग्रीक ख्रिश्चन झाले. कांहीं तुर्क इराणावर तुटून
पडून बगदाद, सिरिया, तुर्कस्थान वगैरे ठिकाणचे अधिपति
झाले; तिकडे मुसलमानी धर्म त्यांच्या धर्मापेक्षां फार सुधा-
रलेला असल्यामुळें त्या तुर्क टोळीनें तोच धर्म स्वीकारिला
व मोठ धार्मीक मुसलमान बनून पांच प्रार्थना नियमानें
करूं लागले, आणि राजकीय संबंधानें जरी त्यांनीं खालि-
फांस पादाक्रांत करून टाकिलें होतें, तरी धार्मिक संबंधानें
ते त्यांच्या अगदीं दासानुदासाप्रमाणें वागत.

प्रस्तुतकाळीं आपणामध्यें तरी पुनर्विवाह व बालविवाह-
निषेध ह्यांविषयीं जी हाकाटी होऊन लोकांचें मन तिकडे
वेधलें आहे, याचें आदिकारण आपण शोधूं लागलों तर
युरोपियन लोकांचा आपणांस फार दिवस सहवास आहे व
त्यांच्या सुधारणेच्या शिखरास पोंचलेल्या सामाजिक चाली
आपल्या पाहण्यांत नेहमीं येतात, ह्यामुळें आपल्या
चाली सुधारण्याची अ.ह्मांस इच्छा झाली आहे, असें
दिसून येईल. सुधारणा ही राष्ट्रांतील सर्व लोकांच्या
खुषीवर अवलंबून आहे, व राष्ट्रांतील सर्व लोकांचें मन सु-
धारणेकडे वळण्यास कोणाचें तरी उदाहरण त्यांच्या पुढें

असलें पाहिजे; किंवा ह्या वाईट चालींच्या परिणामाचा विचार सुरू होऊन त्यांची चर्चा सर्वांस समजली पाहिजे; एरव्हीं आपोआप कोणतीही सुधारणा घडून यावयाची नाहीं; परंतु जेथें हीं दोन्हीं साधनें नाहींत, तेथील लोकांचीं मनें अर्थातच सुधारणेस प्रतिकूळ असतात, व कदाचित् त्यांतलाच एकादा मनुष्य सुधारक निघाला आणि लोकांचीं मनें आपल्याकडे वळवूं लागला, तर तें कधींही सिद्धीस जात नाहीं. मागें परशुरामपंत भाऊ पटवर्धन ह्यांच्या मुलीचा नवरा तिच्या अगदीं अल्पवयांत वारल्यामुळें त्यांजवर दुःखाचा कडा कोसळला; त्या वेळेस त्यांनीं पुनर्विवाहाचा प्रश्न काढिला होता असें सांगतात, परंतु त्याचा परिणाम काय झाला असावा, ह्याची कल्पना वाचकांस सहजच होईल. एक तर ती ऐन पेशवाईची वेळ; जुन्या शास्त्रांचा तेव्हां उत्कर्ष असून तीं भर अंमलांत होतीं; मग पुनर्विवाहास अनुकूल न्याय होणार कसा ?

हल्लीं राजकीय संस्थानांतून चांगली सुधारणा होत चालली आहे, व त्यांस काळही बरा अनकूल आलेला दिसतो. युरोपियन लोकांचा अंमल आणि त्यांच्या चांगल्या चालींचें उदाहरण ह्या दोन्ही कारणांमुळें आपल्या मुलखांत लग्नाच्या बाबतींत सुधारणा करावी, अशी इच्छा कित्येक राजे लोकांच्या मनांत उत्पन्न झाली आहे, व लोकांचींही मनें ह्या हितावह सुधारणा ग्रहण करण्याविषयीं उत्सुक असून त्यांस राजे लोकांची अनुकूलता असल्यामुळें त्या प्रचारांतही येऊं लागल्या आहेत. लग्नाच्या कामांत बेताबातानें खर्च करण्याची चाल वरील संस्थानांत चांगली अमलांत आली

आहे, आणि मुलींचें वय लग्नाचे वेळीं मोठें असण्याची वहिवाट लवकरच सुरू करून हिंदुस्थानांतील बाकीच्या लोकांस ते कित्ता घालून देतील अशी आशा दिसत आहे.

परंतु दुर्दैवानें एतद्देशीय संस्थानांपेक्षां ब्रिटिश इंडियांतील लोकांची स्थिति विशेष शोचनीय आहे. संस्थानांतील राजे एतद्देशीय असल्यामुळें त्यांचा उपदेश हिंदु लोकांस विशेष ठसतो; व लोकांप्रमाणेंच ते स्वतःही ह्या चालींचे दुष्ट परिणाम भोगीत असल्यामुळें, त्या नाहींशा करण्याचा प्रयत्न ते विशेष झटून करीत आहेत. परंतु ब्रिटिश इंडियांत तसें नाहीं. तेथील युरोपियन अधिकाऱ्यांनीं कितीही सचोटीनें व खऱ्या अंतःकरणानें एकादी सुधारणा अमलांत आणण्याचें योजिलें, तरी ते परकी असल्यामुळें त्यांच्या कृत्यांचे कांहीं वेगळेच अर्थ करून तीं आपल्या नुकसानीकरितां केलीं असावीं असा संशय घेतला जातो. एतद्देशीय राजांच्या संबंधानें अर्थातच असा संशय घेण्यास लोकांस जागा राहत नाहीं. एकंदरींत ह्या सुधारणा सर्व हिंदुस्थानभर होण्यास फार दिवसगत लागेल, व शेवटीं इंग्रज सरकार जरी उदार आहे, तरी त्यांचा आश्रय प्रथम मिळून त्या सुरू होणें कठीणच; परंतु हिंदु लोकांपैकींच पुष्कळांच्या मनांत जेव्हां ह्या हिताच्या कल्पना पूर्णपणें भरतील तेव्हां त्यांच्या अनुमोदनानें मात्र त्या सुरू होतील. सामाजिक कामांत हात न घालण्याचा इंग्रजसरकारचा इरादा आहे, तो शहाणपणाचा आणि राजकारणी आहे; लोकांच्या मनांवर शिक्षणाचा परिणाम होऊन सुधारणानु-

कूल ते स्वतः कायदा मागण्यास येईपर्यंत इंग्रज लोक फार झालें तर तोंडीं उपदेश करूं शकतील, परंतु त्यापलीकडे कांहीं करणार नाहींत. ह्याचें दुसरेंही एक कारण आहे. स्वराज्यांत, राजाचें लक्ष आपल्या प्रजेकडे खरोखर ओढत असल्यामुळें साम, दाम, दंड, भेदादि सर्व उपाय योजून लोकांचें मन चांगल्या गोष्टीकडे वळविण्याकरितां व इच्छित सुधारणा घडवून आणण्याकरितां जसा तो झटत असतो, तशी स्थिती इंग्रजसरकारची नाहीं. त्यांना हिंदू लोकांचा जरी कळवळा आला तरी त्यांची विशेष काळजी ते बाळगीत नाहींत; ह्यामुळें उगीच कांहीं तरी थट्टेनें किंवा द्वेषभावानें साहेब लोक हीं कृत्यें करितात, असा अभरंवसा हिंदू लोकांच्या मनांत उत्पन्न होऊन ते सुधारणेविषयीं खरा विचार करीत नाहींत. लालूच दाखवून वळविण्यापेक्षां दहशतीच्या योगानें मनुष्य पाहिजे तें कृत्य करण्यास लवकर तयार होतो. ह्या नियमाप्रमाणें, नुस्त्या उपदेशानें लोक जितकी लवकर सुधारणा स्वीकारतील, त्यापेक्षां तिच्याविरुद्ध जाणारांस कडक शिक्षा देण्याचा सरकारी कायदा असल्यास त्या शिक्षेच्या भयानें ते ती अधिक लवकर स्वीकारतील, हें खरें आहे; परंतु तसा जुलमाचा कायदा इंग्रजसरकारास करितां येत नाहीं; कारण ते परकी असल्यामुळें त्यांनीं लहानसहान शिक्षा ठेविली तरी आपणांस ती कडक व दुःसह वाटून आपण त्यांचा द्वेष करूं लागणें साहजिक आहे. असे वाईट परिणाम होऊं नयेत ह्मणूनच इंग्रजसरकार सामाजिक सुधारणेंत हात घालण्याचें नाकारतें, व तेंच करणें सुयुक्तिक आहे. एकंदरीनें पाहतां

ब्रिटिश हिंदुस्थानांत सुधारणा होण्यास कायद्याचीच आवश्यकता आहे, परंतु लोकांचें बहुमत त्यास अनुकूल आहे किंवा नाहीं, ह्याचा पूर्ण अजमास करून, त्यांची खुषी असेल त्याप्रमाणें, व जुलूम न वाटेल अशा रीतीनें तो अमलांत आणला पाहिजे. उदाहरणार्थ, पार्शी लोकांच्या अर्जावरून त्यांच्या लग्नसंबंधाचा कायदा जसा इंग्रजसरकारानें केला आहे. व तो अमलांत येऊन लोकांच्या चालीरीतींत जबरदस्तीनें हात घातल्याचा दोषही इंग्रजसरकारावर जाण्यास जागा उरली नाहीं, तसा हिंदुस्थानांत हिंदू लोकांकरितांही कायदा होण्यास हरकत दिसत नाहीं.

हल्लींच्या काळांतील प्रसिद्ध तत्त्ववेत्ता स्पेन्सर ह्यानें 'मनुष्यसमाज विरुद्ध सरकार' ह्या नांवाचें एक पुस्तक लिहिलें आहे. समाजानें आपलीं कामें सरकारांतून ढवळाढवळ न होतां करावीं, व त्यांस कायद्याचा प्रतिबंध किंवा मदत नसावी; तसेंच सरकार ह्मणजे राज्यसत्ता, हिचा उद्देश व उपयोग काय, व सरकारास कायदे करण्याचा हक्क कोणत्या विषयांत आहे, ह्याविषयीं ह्या निबंधांत उत्कृष्ट विवेचन केलें आहे. त्याचें मत असें आहे कीं, राष्ट्र किंवा राजकीय समाजबंधन ह्याचा उद्देश, परराष्ट्रापासून त्या समाजाचें रक्षण व्हावें, किंवा परराष्ट्राचा पाडाव त्या राष्ट्रास करितां यावा किंवा तें दाबांत ठेवितां यावें, इतकाच आहे; व ह्या बाबतींत जरूर असे कायदे किंवा निर्बंध करण्याचा अधिकार सरकारास आहे. ज्या लोकांनीं वरील निबंध लक्षपूर्वक वाचिला असेल, ते ह्या प्रतिपादनावर नानातऱ्हेचे आक्षेप घेतील. सामाजिक सुधारणेकरितां कायदा करावा, हें मत

स्पेन्सरच्या सिद्धांताविरुद्ध नाहीं काय ? विरुद्ध असेल तर हा विरोध समाधानपूर्वक दूर करितां येईल काय ? असा कायदा करणें ह्मणजे, ज्या अनेक भयंकर चुका आजपर्यंत कायदेकारांनीं केल्या, व ज्यापासून जगाचें नुकसान झालें आहे; व जीं दुःखें दूर करण्याकरितां कायदा करावा त्या दुःखाच्या शतगुणित दुःखें त्या कायद्यानें नवीन उत्पन्न होतात; अशा चुकांपैकींच एक चूक होणार नाहीं काय ? राजसत्ताही ज्या कारणांकरितां सृष्टींत निर्माण झाली आहे, त्या उपयोगांचे अनुरोधानें कायदे करावे; ही जी मर्यादा आहे, त्या मर्यादेपलीकडे असा सामाजिक कायदा करणें होणार नाहीं काय ? हे व दुसरे अनेक आक्षेप स्पेन्सरच्या वरील निबंधाच्या आधारें उत्पन्न होऊन, स्पेन्सरच्या जबरदस्त नांवानेंच असा हा सामाजिक कायदा करण्याचा प्रश्न अगदीं दडपून टाकतील; परंतु किंचित् सूक्ष्म दृष्टीनें विचार केला, तर वरील आक्षेप निरसन होण्याजोगे आहेत असें समजून येईल. स्पेन्सरनें आपल्या ग्रंथांत कायदे करणाऱ्यांच्या चुकांचीं जीं उदाहरणें दिलीं आहेत, तीं बहुतेक व्यावहारिक किंवा अर्थशास्त्रासंबंधीं आहेत. जितक्या घडामोडी, व्यावहारिक किंवा सांपत्तिक, जगतांत होतात, तितक्या सर्व अनिवार्य अशा सृष्टिनियमांचे परिणाम होत, हें त्या शास्त्रांचें अध्ययन करणाऱ्या सर्वांस माहीत आहे, परंतु सामाजिक स्थितीची गोष्ट अशी नाही. समाजाचीं जीं चमत्कारिक स्थित्यंतरें होतात, त्यांचें बीज लोकांच्या संवयी, त्यांची शिक्षणपद्धति, त्यांचे मनोविकार, व त्या समाजाचें वाढणें किंवा कमी होणें वगैरे गोष्टींचा इतिहास, इत्यादि

गोष्टींत आहे. . उघडच आहे कीं, जरी समाजाचे सर्व लोक एके ठिकाणीं जमून त्यांनीं आपली आर्थिक स्थिति बदलण्याचा निश्चय केला, तरी जोंपर्यंत मनुष्यास आपलें मनुष्यत्व बदलतां येत नाहीं, तोपर्यंत ही गोष्ट सिद्धीस जाणें असाध्य आहे, परंतु सामाजिक स्थिति बदलणें हें इतकें असाध्य नाहीं; कारण संवयी व चालीरीति बदलतांना आपण शेंकडों पाहिल्या आहेत. मनोविकार बदलतां येतात; शिक्षणपद्धति बदलतां येते; सारांश, सामाजिक स्थिति बदलतां येईल. मनुष्याची नेहमीं सुखाकडे प्रवृत्ति आहे; व आजपर्यंतचा इतिहास पाहतां ती काठें बदलली आहे असें दृष्टीस पडत नाहीं. अमुक जातीचे बहुतेक लोक परोपकाररत व स्वसुखपराङ्मुख होते, असें इतिहासांत कोठेंही आढळत नाहीं; परंतु लोकांनीं आपल्या चालीरीति बदलल्याची शेंकडों उदाहरणे आहेत, व म्हणूनच सामाजिक स्थितिपेक्षां आर्थिक चमत्कार,—जे मनुष्याच्या स्वसुखप्रवृत्तिमूलक आहेत,—बदलणें फार दुःसाध्य आहे. उदाहरणार्थ, स्वत्व हे जगांत ठेवावयाचें नाहीं, जितकी संपत्ति एकाद्या देशांत आहे, तितकी सर्वांनीं सारखी उपभोगावी, असा एक कायदा केला, तर मी इतरांपेक्षां श्रीमंत व्हावें व माझ्या जास्त संपत्तीचा उपभोग मीं एकट्यानेंच घ्यावा, हें जोंपर्यंत मनुष्यस्वभावांतून काढतां येत नाहीं, तोपर्यंत हा कायदा निरर्थक होणार आहे. कित्येक मूर्ख राजांनीं व कायदेकारांनीं पदार्थांच्या किंमती कायद्यानें ठरविल्या, व गरीब लोकांस हवाशीर घरें थोडक्या खर्चांत राहण्यास मिळावीं म्हणून भाड्याचे दर

कायम केले, वगैरे प्रयत्नांस हीच गोष्ट लागू आहे; म्हणूनच ते सर्व प्रयत्न शेवटीं निष्फळ झाले. आतां सामाजिक स्थितीसंबंधें पाहिलें तर आपली सामाजिक वर्तणूक लोकमतानुरोधानें होते व लोकमत जरी परंपरेनें पिढीजाद चालत येत असतें, तत्रापि तें कांहीं जबरदस्त कारणामुळें व युक्तीनें बदलून जातें; आणि अशा बदललेल्या लोकमताधिक्याला जर कायद्याचा जोर मिळाला, तर त्यामुळें फार लौकर आणि कायमचा परिणाम सर्व समाजावर होतो, तसेंच कायद्याच्या अमलामुळें दुसरे जे अनेक नवीन अवगुण उत्पन्न होण्याचा संभव असतो, ते बहुतेक नाहींसे करितां येतील. प्रत्येक समाजस्थितींत कांहीं गुण व कांहीं दुर्गुण आहेत, हें कोणीही समंजस मनुष्य कबूल करील, व जेव्हां जेव्हां समाजस्थिति बदलते, तेव्हां तेव्हां समाजांतील जुने दोष नाहींसे होतात; परंतु त्यांच्या बदली दुसरे कांहीं दोष—मग त्यांची पहिल्यानें कल्पना झाली असो किंवा नसो—उत्पन्न झाल्यावांचून राहत नाहींत; तत्रापि नवीन दोष किंवा असुखें उत्पन्न होतात म्हणूनच जर एखादी सुधारणा वाईट व त्याज्य असें ठरेल, तर मग कोणतीच सुधारणा सुधारणा म्हणून समजली जाणार नाहीं व इंग्रजलोकांची इतकी सुधारलेली स्थिति, रानटी इंडियन लोकांच्या स्थितीपेक्षां चांगली सुधारलेली आहे असें म्हणतां येणार नाहीं; कितीही उच्च स्थितीस पोंचलेली राज्यपद्धति झोटिंगबादशाहीपेक्षां बरी समजली जाणार नाहीं, कारण दोष व असुखें प्रत्येकांत आहेतच; परंतु असा अर्थ स्पेन्सरच्या म्हणण्याचा नाहीं,

व हा अनुवाद सत्यही नाहीं. सृष्टींत निर्दोषता कधींही सांपडणार नाहीं. जगांतील दोष होतां होईल तितके कमी करावयाचे इतकेंच सुधारणेचें खरें बीज आहे. त्याचप्रमाणें सामाजिक सुधारणेची गोष्ट आहे. ज्या चालीरीति अमलांत आणाव्या असें सुधारक म्हणतात, त्यांचा पूर्ण विचार झाला पाहिजे, प्रौढ वयांत लग्नें केल्यापासून काय अनर्थ उत्पन्न होतील ? व जे अनर्थ उत्पन्न होतील ते, जीं दुःखें निवारण होतील त्यांपेक्षां जास्ती आहेत किंवा कमी ? प्रौढ लग्नें अमलांत आणण्याकरितां कायदा केला, तर तो सुखकारक होईल किंवा दुःखकारक होईल ? सामाजिक कायद्यांच्या दुष्परिणामांचा मनुष्यबुद्धीनें आज अजमास करितां येतो किंवा नाहीं ? असेल तर ते नाहींसे होण्यास काय उपाय योजावे ! वगैरे गोष्टींचा विचार समाजानें पूर्ण विचार करून जी सामाजिकसुधारणा अमलांत आणावयाची, तिच्या चांगुलपणाविषयीं बहुतेक ऐक्य झाल्याशिवाय आपणच होऊन आपणांस कायद्यानें बांधून घ्यावें, असें माझें बिलकुल म्हणणें नाहीं. मात्र ज्या चाली चांगल्या आहेत असें लोकसमाजास वाटेल, त्या ताबडतोब व सहज अमलांत आणण्यास कायद्यासारखें दुसरें कोणतेंही साधन नाहीं, हें निःसंशय आहे. येथें असा प्रश्न उद्भवेल कीं, जर सामाजिक सुधारणा कायद्यानें करण्यापूर्वी तिजविषयीं बहुतेक सर्वांचें मत अनुकूल झालें पाहिजे असें आहे, तर मग कायदा करण्याची गरज कोठें राहिली ? एकादें भांडें अपसुक फुटणार असेल, तर त्याला फोडण्यास कायद्याचा लोखंडी घण कशास पाहिजे ? सर्व

लोकांचें मत अनुकूल झाल्यास सर्वांनीं कोणतीही चाल आपण होऊनच अनुसरावी, व अनुसरणारांस लोकविद्वेषाचें भय बिलकुल उरलें नाहीं; कारण सर्वच त्या मताचें असणार. अशा वेडगळ शंकांचें समाधान येथपर्यंत वारंवार झालेंच आहे. पुनः चर्वितचर्वण करणें व्यर्थ वाटेल. तत्रापि आणखी एकदा उल्लेख करणें इष्ट आहे कीं मनोवृत्ति व मत ह्यांप्रमाणें कृति घडणें फार कठीण आहे. व कांहीं लोकांस विचारच करितां येत नाहीं; त्यांस मत कोठून असणार ? कांहीं आळशी असतात ते हें चांगलें किंवा तें चांगलें, ह्याचा विचार करीत नाहींत. कांहीं हटवादी असतात; म्हणजे दुसऱ्याचा पक्ष चांगला असें अंतर्यामीं वाटत असूनही, ते आपलें बुद्धिबल स्वमतसमर्थनाकडे खर्च करितात. अशा लोकाचें काय करावें ? इतिहासावरून असा सिद्धांत निघतो कीं, उपदेशक, प्रेषित उपदेशकांचें आचरण, व प्रेषितांचा छळवाद, ह्याच्या योगानें प्रथम समाजांतील कांहीं लोकांच्या आचरणांत फरक पडतो, व सर्वत्रांचें मनोमय आनुकूल्य घडतें. असें झाल्यावर राजसत्ता आणि कायदा हीं पुढें सरसावून नवीन मताचा पूर्ण अंमल वसवितात. जे विचारशून्य असतात त्यांस मताधिक्याकडे वळवितात; जे आलस्यपूर्ण असतात त्यांस नवीन मतांत स्थिर करितात; व जे हटवादी असतात, त्यांस जबरदस्तीनें नवीन मार्गाला लावितात. ह्याप्रमाणें अशोक व कनिष्क ह्या चक्रवर्तीनीं बुद्धाचा धर्म कायम केला; कान्स्टंटाईन आणि थिओडोशियस, ह्यांनीं ख्रिस्ती धर्मास पूर्ण विजयशिखरास चढाविलें;

महंमद आणि अबू—बकर ह्यांनीं मुसलमानी धर्माचा डंका चोंहींकडे वाजविला; फ्रेडरिक आणि एलिझाबेथ ह्यांनीं प्राटेस्टंट धर्माची इमारत पूर्ण उभारिली; तर मग आज ज्या चाली सर्वांना हितकर अशा वाटूं लागल्या आहेत, व त्यांप्रमाणें कित्येकांनीं आरचणही केलें आहे, त्यांचा पूर्ण व लवकर अंमल होण्याकरितां हिंदुस्थानांत कायद्याची मदत घेण्यास कोणती हरकत आहे ?

सरकारानें कोणकोणत्या विषयांत हात घालावा याजविषयीं अद्याप पूर्ण निश्चय झाला नाहीं. व्यवहारदृष्ट्या पाहिलें तर एकंदर सर्व विषयांत व गोष्टींत सरकारचा हात आहेच, अशी राजसत्तेची वहिवाट दृष्टीस पडते. स्थूलदृष्ट्या शिक्षण, व्यापार, आरोग्य, नीति वगैरे बाबतींत तर हे विषय आह्मांस जरूर लक्ष देऊन ध्यानांत वागविले पाहिजेत, असें समजूनच सरकार नेहमीं तजवीज करितें; व सूक्ष्म विचारांतीं ह्या गोष्टी खरोखरच समाजाच्या, इतर समाजांशीं अस्तित्ववाद खेळण्याच्या शक्तीला अनुकूल किंवा प्रतिकूल होतात. ह्याच न्यायानें सामाजिक स्थितीकडे सरकार आणि कायदेकार मंडळीनें लक्ष दिलें पाहिजे; परंतु विधवासंन्यास आणि बालविवाह ह्यांसारख्या वाईट चाली तर यांहूनही बलवत्तर कारणांकरितां सरकाराच्या नजरेस पात्र आहेत; आणि स्पेन्सरच्या सिद्धांताबाहेर त्या अणुमात्र पडत नाहींत. जर ह्या भयंकर चालींपासून प्रजा दिवसानुदिवस अशक्त, बलहीन, व निस्तेज होत चालली आहे; जर हिंदुस्थानच्या हल्लींच्या उत्क्रमणस्थितींत ह्या चालींचे दुष्ट परिणाम अतिच होत जाऊन दरदिवस वाढत जात आहेत; जर पुष्कळ

अपराध व अनर्थ अतर्क्य रीतीनें आपल्या डोळ्यांदेखत घडत आहेत, सारांश, लोकांच्या अस्तित्वास धक्का पोंचण्याची वेळ येऊन ठेपली आहे, तर अशा बाबतींतही सरकारानें हात घालूं नये, तर सरकारनें लक्ष तरी कोणत्या बाबतींत द्यावयाचें*! !

येथपर्यंत सामाजिक सुधारणेचा यत्न निष्फळ कां होतो ह्याच्या मुख्य मुख्य कारणांचा विचार झाला. सुधारणेस पहिला विरोध स्त्रियांचा असून त्यांचीं मनें वळविण्याविषयीं अद्याप कोणीही प्रयत्न केला नाहीं; तसेंच कोणत्याही धर्माचा प्रसार होण्याचे मुख्य साधन म्हटलें ह्मणजे मध्यम व कनिष्ठ स्थितींतील लोकांची अनुकूलता, तीही संपादन करण्याचा कोणी सुधारकानें आजपर्यंत उद्योग न करितां त्याजकडे दुर्लक्ष केलें आहे. सुधारणेच्या कामाला लोकांची मदत व त्यांचें संमत हीं जशीं अवश्य आहेत, तसा सरकारी कायदाही असण्याची जरूरी आहे; परंतु ह्यांपैकीं पहिलें काम लोकांची संमति मिळविणें, व दुसरें कायदा मिळविणें हीं असून तीं दोन्ही मिळालीं असतां

---

*पुनः एकवार उल्लेख केला पाहिजे कीं, जो कायदा होणें तो लोकांच्या इच्छेप्रमाणें बहुमतानें झाला पाहिजे. नाहीं तर मुंबईस कायदा करावा अशा मताच्या लोकांनीं धामधूम करून लोकमत अगदीं एकीकडे ठेवण्याचा यत्न केला होता व माधवबागेंतील प्रसिद्ध टोलेजंग सभेंत जो ठराव झाला त्याप्रमाणें सरकारास वागणें इष्ट वाटून सुधारणायत्नास फजीतीचें मात्र स्वरूप आलें असें होणें इष्ट नाहीं. पहिल्यानेंच लोकमतानकूल्य पाहिलें पाहिजे तें कसें याजविषयीं पुढें विवेचन येईल.

सुधारणा लवकर अमलांत येऊन चिरस्थायी होईल, व त्याप्रमाणें जेव्हां बहुतेक सर्व हिंदू लोकांची अमुक सुधारणा अमलात आणण्यास पूर्ण संमति आहे अशी सरकारची खात्री होईल, त्या वेळेस इंग्रजसरकारानें सुधारणेचा कायदा करावा असें वर दाखविलें; तत्रापि आजपर्यंतच्या बहुतेक सामाजिक सुधारकांची समजूत ह्याच्या अगदीं उलट असून त्यांनीं कायद्याच्या जोरानें लोकांकडून सुधारणा जबरदस्तीनें अमलांत आणविण्याचा प्रयत्न आजपर्यंत केला व पुढेंही करावा असें ते ह्मणतात. त्यांचा युक्तिवाद असा आहे कीं, रोग्याची खुषी किंवा नाखुषी न पाहतां जसें औषध त्याच्या घशांत ओतलें पाहिजे, तशी हिंदु लोकांची स्थिति बिघडविणारा रोग बरा करण्याकरितां त्यांच्या मूर्खपणाच्या अडथळ्यास न जुमानितां कायद्याची गोळी त्यांच्या घशाखालीं उतरविली पाहिजे, हीही एक सुधारकांची चूक झाली आहे, असें दाखविलें. विद्वानांचा समाज बनविल्यानें, किंवा एक सभा काढून त्यांत सर्वांनीं शपथपूर्वक सामाजिक नियम पाळण्याचें कबूल केल्यानें कांहीं एक निष्पन्न होणार नाहीं; कारण अशा एकीची मजबुती पाहिजे तितकी आमच्यांत नाहीं, व अशा सभा काढते वेळीं लोकांत जो उत्साह असतो तो पुढें शेवटपर्यंत नांदत नाहीं, इत्यादि गोष्टींचाही विचार केला. तसेंच शास्त्रयांशीं वाद करण्यांत कांहीं अर्थ नाहीं असें दाखवून अशा वादविवादाचा मागें झालेला परिणामही सांगितला आहे. शास्त्रीलोक नेहमी जुन्या मतास चिकटून राहिले असल्यामुळें निःपक्षपाताचा न्याय करण्यास ते योग्य नाहींत, सबब तो अधिकार लोकांनीं

आपल्याकडे घेऊन सुधारणा स्वीकारणीय आहे किंवा नाहीं ह्या प्रश्नाचा निकाल स्वतःच करावा,हें योग्य आहे; व ह्याप्रमाणें व्यवस्था होऊन एकदां लोकांच्या मनांत सुधारणा ग्रहण करण्याचें बिंबलें ह्मणजे हेच शास्त्री आणि त्यांचीं शास्त्रें आपल्या पाठीस लागून सुधारणेस अनुकूल होतील, वगैरे गोष्टींचाही उल्लेख झाला आहे. आतां सामाजिक सुधारणेचा उपदेश करण्यांत व ती घडवून आणण्यांत दुसरी कांहीं सुधारकांची स्वतःचीं लहानसहान व्यंगें आहेत, व त्यांच्या योगानेंही सुधारणा शेवटास जाण्यास बराच अडथळा झाला आहे. तीं कोणतीं त्यांविषयीं विचार करूं.

असमत वैधव्य आणि लहानपणीं मुलांचीं लग्नें करण्याची चाल, ह्यांविषयीं जितकें पूर्ण विवेचन लोकांपुढें यावयास पाहिजे आहे तितकें अद्याप आलें नाहीं; व त्या चाली बंद करण्याच्या आवश्यकतेचीं सबळ कारणेंही कोणी फारशीं दाखविलीं नाहींत. मि० मलबारी यांनीं आपल्या पुस्तकांत ह्या विषयांसंबंधाचे उल्लेख केले आहेत खरे, परंतु ते तुटक तुटक आहेत; त्यांच्या ह्या विषयांवरील मोठाल्या पुस्तकांत देखील बहुतकरून युरोपियन आणि एतद्देशीय विचारी लोकांचे अभिप्रायच भरलेले आहेत, व ते जरी चांगल्या मनोवेधक भाषेंत गुंफिलेले आहेत, तरी ह्या विषयाचें जसें पूर्ण आणि पद्धतवार विवेचन व्हावयास पाहिजे आहे, तसें त्या अभिप्रायांत झालें आहे, असें ह्मणतां येत नाहीं. मि० गिडुमल यांचें ह्याच विषयावर एक मोठें पुस्तक आहे, परंतु त्यांतही मि० मलबारी यांच्या प्रयत्नांपेक्षां विशेष म्हणण्यासारखें कांहीं नाहीं. सारांश, ह्या दोन्ही विषयांच्या

चांगल्यावाईट परिणामांचा चांगला ऊहापोह होऊन त्यांपासून खरोखर हित आहे. किंवा अहित आहे, व असल्यास किती हें निश्चयात्मक कोणीही ठरविलें नाहीं. असंमत वैधव्य आणि बालविवाह ह्यांचा कांहीं तरी वाईट परिणाम आहे, असे लोकांचे उद्गार कधीं कधीं येकूं येतात व आपणही अस्पष्ट रीतीनें तसेंच मानितों; परंतु ते वाईट परिणाम काय आहेत व त्यांच्या योगानें कसे अनर्थ घडून येत आहेत ह्याचें प्रतिबिंब लोकांच्या मनांत चांगलें ठसलें नसल्यामुळें सुधारणा ग्रहण करण्याविषयीं लोकांचीं मनें चांगलीं उत्सुक झालीं नाहींत व ती घडवून आणण्याची खटपटही ते होऊन करीत नाहींत. ह्या दोन चालींपासून उत्पन्न होणारीं अशीं दुःखें तरी कोणतीं? व तीं खरोखर ह्या वाईट चालींचेच परिणाम आहेत कीं काय? तसेंच त्यांपासून कांहीं फायदेही आहेत कीं काय? असल्यास त्याच चालींपासून उत्पन्न होणाऱ्या दुःखाचें उन्मूलन करण्याकरितां ते फायदे सोडून देण्यास लोक तयार होतील किंवा नाहीं? कोणत्या उपायांनीं हे दुष्ट परिणाम बंद होऊन लोकांस अक्षय्य सुख होईल? बरें, सुखाच्या आशेनें केलेल्या उपायांपासून कोणतीं नवीं दुःखें उत्पन्न होण्याचा संभव दिसतो? ह्या मुद्यांवर अद्यापि वादविवाद झाला नाहीं. उलट त्यांतील प्रत्येकाविषयीं विचारी लोकांचीं मतें इतकीं भिन्न आहेत कीं ह्या बाबतींत सुधारणा करणें बहुतेकांस भयंकर वाटत आहे. ह्याला एकच उपाय दिसतो; 'वादे वादे जायते तत्वबोधः' वाद करितां करितां शेवटीं तत्व बाहेर येतें; व ही म्हण येथें अक्षरशः उपयोगी पडेल. ह्या करितां जें विचारशील आहेत

त्यांनीं आपसांत उभय पक्ष स्वीकारून वाद केला पाहिजे व जे आपण स्वतःविचार करीत नाहींत त्यांनीं हा चाललेला वाद तिऱ्हाईतपणें ऐकून त्याचा विचार केला पाहिजे. आतां वादविवादाचा कधीं शेवट होत नाहीं, व बुद्धिमान् लोक आपला पक्ष सोडण्यास किंवा हार घेण्यास कधीं खुषी नसतात हें जरी खरें आहे, तरी ह्या वादविवादाचा असा शेवट व्हावा हा ह्या सुचनेचा हेतु नाहीं. विचारी लोकांव्यतिरिक्त बहुतेक देश ज्या स्वतः विचार न करणाऱ्या लोकांनीं भरलेला आहे, त्यांनीं हा उभयपक्षीं चाललेला वादविवाद ऐकून स्वतःला इष्ट वाटेल असा एक निर्णय ठरविला म्हणजे पुरे. ह्या चालीचे परिणाम खरोखर वाईट आहेत व ते नाहींसें करण्याची फार आवश्यकता आहे अशी त्यांची खातरी झाली पाहिजे. सारांश, मिलमनचे अमोलिक शब्द पुनः पुनः लिहिण्याच्या योग्यतेचे आहेतः—" सुधारणेसंबंधानें जितके फेरफार आजपर्यंत जगांत झाले आहेत ते असे झाले आहेत कीं एखाद्या सामाजिक अथवा धार्मिक चालीनें लोकांस मोठी गैरसोय उत्पन्न होऊन तिचा मध्यम व कनिष्ठ स्थितींतील लोकांत विचार व्हावा, व सर्वांस मोठा उद्वेग उत्पन्न व्हावा; नंतर सर्वांच्या मनांत स्फुर्ति येऊन त्यांनीं जुनी चाल एकदम रद्द करून नवी स्थापन करावी. " एकंदरीनें पाहतां मुद्दा एवढाच आहे कीं वितंडवादी लोक खेरीज करून बाकी सर्व लोकांस ही वाटाघाट समजून ह्या चालीपासून खरोखर शोचनीय परिणाम घडून येत आहेत, व त्या अशाच चालूं देणें म्हणजे शुद्ध अन्याय असून त्यांचीच खुद्द बायकामुलें ते

परिणाम भोगीत आहेत, अशी सर्वांची खात्री झाली पाहिजे; व इतके झाल्यावर ते स्वकार्याच्या खटपटीस लागल्यावांचून राहणार नाहींत.

मागें ज्या चार धर्मांच्या इतिहासांतील अनेक उदाहरणें व अनेक आधार घेतले आहेत त्यांतच वरील विषयासंबंधाचींही उदाहरणें सांपडतात. ह्या निबंधाचा पाया ह्या चार धर्मांच्या इतिहासावरच रचिलेला आहे, व तो तसा रचिला आहे हें प्रथमच वाचकांस सकारण सांगितलें आहे. ह्या मुख्य मुख्य धर्मांचा एवढा विस्तार होण्याचें कारण, त्यांत जुन्या धर्मापेक्षां पुष्कळ गोष्टी चांगल्या होत्या; व त्यांचा प्रसार करणारे पुरुष महंमद पैगंबर, गौतमबुद्ध, किंवा बारा अपॉस्टलस वगैरे महासामर्थ्यवान् होते, यांत तर शंकाच नाहीं; परंतु ह्यांशिवाय आणखीही एक कारण मोठें ठोकळ आहे तें असें कीं, त्या त्या वेळीं जुन्या धर्मांतील कांहीं जबरदस्त अडचणीमुळें लोकांस फार त्रास झाला होता तो नवीन धर्माच्या स्वीकारानें बंद झाला, म्हणून हे धर्म पसरत चालले असें त्यांच्या इतिहासांवरून समजतें. ख्रिस्ती धर्माचा एवढा फैलाव होऊन त्याचा जय कसा झाला ह्याचीं गिबननें अनेक कारणें सांगितलीं आहेत, त्यामध्यें ' आत्मा अमर्त्य आहे, आणि मेल्यानंतर मनुष्यमात्राचा देह जरी नाहींसा होतो, तरी त्याच्या आत्म्यासंबंधानें विचार करितां तो जीवंतच असतो. ' हें जें ख्रिस्ती धर्माचें मत आहे, तेंही एक कारण झालें असें तो म्हणतो; कारण वास्तविक रीतीनें सृष्टींतील सर्व मनुष्यास सारखें सुखदुःख असावें, परंतु

तसें नसून तें कोणास कमी, कोणास जास्ती असें असतें, याचें कारण काय ? असा प्रश्न जेव्हां पूर्वी मनुष्यास पडे तेव्हां त्याचें समाधान होण्यासारखें समर्पक उत्तर माग-ल्या धर्माच्या आधारांवरून देतां येत नसे. आत्मा अनश्वर आहे असें साक्रेटिस व प्लेटो ह्यांचेंही मत असे; परंतु तें त्यांनीं खात्रीपूर्वक सिद्ध करून धर्माच्या तत्वांत सामील केलें नव्हतें. गिबन् ह्याविषयीं असें ह्मणतोः—" पू-र्वीच्या ग्रीक व रोमन लोकांचा भरंवसा पुष्कळ देवांवर असे, परंतु मेल्यानंतर देखील मनुष्याचा आत्मा जीवंत असतो असें ते मानीत नसत. जुपिटरच्या आणि अपालोच्या देवळांतून ज्या प्रार्थना होत असत, त्यांत इहलोकींच्या सुखाचें मात्र मागणें देवाजवळ लोक करीत, परंतु मरणोत्तर पर-लोकांतील सुखदुःखाची किंवा मनुष्याच्या आत्म्याची काय स्थिति आहे हें त्यांस माहीत नसे; व त्यांचे धर्मांत यावि-षयीं कांहीं उल्लेख नव्हता. मरणानंतर मनुष्यास अस्तित्व असतें, व आत्मा अमर आहे, हें मत वास्तविक पाहतां सृष्टिजन्यच असून, तें खरें असावें असें विचारी लोकांस वाटत असे; परंतु धर्मभोळे लोकांचा त्यावर भाव बसण्यास साधन नव्हतें; अशा स्थितींत खिस्तासारख्या महापुरुषाच्या मताचा त्यांस आधार मिळाल्याबरोबर त्याजवर सर्व जगाचा विश्वास बसून तें एक धर्मतत्व बनलें."

तसेंच बौद्ध धर्माचा प्रसार होण्यास अशाच तऱ्हेचीं कारणें झालीं. बुद्ध हा आपल्या धर्माचा उपदेश करूं लागला, त्या वेळेस हिंदु धर्मांत जातिभेद व यज्ञयाग हीं फार वाढत चाललीं असल्यामुळें हिंदू लोकांचीं मनें त्यांस नाखुष होत

चालली होती. एका जातींतून दुसऱ्या जातींत जातां याव-
याचें नाहीं; व परस्परांचे लग्नसंबंध व्हावयाचे नाहींत; अशा
अनेक त्रासदायक अटी उत्पन्न झाल्या. व अनंत युगें लोट-
ल्यामुळें हल्लीं जशा जाति आपल्या समाजाचीं हाडें बनून
राहिल्या आहेत तशा तेव्हां त्या नसल्यामुळें लोकांच्या सव-
यीच्या झाल्या नसून त्रासदायक बंधनांप्रमाणें वाटत असत.
अशा वेळेस बौद्ध धर्म उपस्थित होतांच तो खुषीनें स्वीका-
रून लोक हिंदू धर्माच्या जातिबंधनापासून मुक्त झाले.
तसेंच यज्ञयागांच्या जिकीरीचाही लोकांस कंटाळा आला
होता व कर्ममार्गाच्या अनेक खटपटींत बहुतेक वेळ गेल्या-
मुळें ईश्वराचें ध्यान करून त्याचें स्वरूप ओळखणें वगैरे
जे खरे भक्तिमार्ग, त्यांजकडे साहजिक वळणारें मनुष्याचें
चित्त जखडून गेलें होतें. बौद्ध धर्मातील भक्ति ज्ञानमार्गाची
असल्यामुळें कर्ममार्गाची दगदग त्यांत मुळींच नव्हती;
त्याचा पाया सद्वर्तन आणि परोपकार ह्या दोन तत्वांवर
रचिलेला होता, व हिंदू धर्मांत जशी प्रत्येक जातीला वेगळी
उपासना सांगितली आहे, तसा पक्षपात त्यांत नसे; कोण-
त्याही जातीचे, कोणत्याही वर्गाचे लोक असले, तरी सर्वांस
एकच भक्तिपंथ लागू होता, इत्यादि अनेक कारणांमुळें
जातिवैगुण्य व कर्ममार्गाचा खटाटोप सोडून देऊन लोकांची
प्रवृत्ति साहजिकच बौद्ध धर्माकडे वळत चालली. मुसल-
मानी धर्मांत पुष्कळ व्यंगें आहेत. तरी ईश्वर एक आहे, हें
जें त्यांचें मुख्य मत आहे, तेंच मत मुसलमानी धर्माचा
एवढा प्रसार होण्याचें एक कारण आहे. यहुदी व ख्रिस्ती
लोक हे देखील ईश्वर एक मानणाऱ्यांपैकींच खरे; तथापि

ते मुसलमान लोकांइतके पुरे एकेश्वरी नसून त्यांच्यांत देवा-विषयीं कांहीं वेडगळ मतें असत; ह्यामुळें 'ज्यासि नाहीं एक देव' इत्यादि तुकोबाच्या अभंगाप्रमाणें लोकांची आपल्या धर्मावर पूर्ण श्रद्धा नसे, व कोणा तरी एकाच नियंत्यास भजावें अशी उत्कंठा लोकांस असे. ख्रिस्ती धर्मांत देखील देवाचीं तीन स्वरूपें मानिलीं आहेत, असें मागें एके ठिकाणीं सांगितलेंच आहे. त्यावरून अनेक देवांची भक्ति केल्याचा आरोप मुसलमान लोक ख्रिस्ती लोकांवर करीत. ह्या विषयावर विवाद अलेक्झांड्रिया येथील ख्रिस्ती लोकांत होऊन त्यांत, ख्रिस्ती लोकांचे तीन देव ह्मणजे आकाशांतील पिता, येशू-ख्रिस्त आणि पवित्र आत्मा ह्यांस एकरूप कसें समजावें ह्याची समजूत न पडल्यामुळें ते आपला ख्रिस्तीधर्म सोडून मुसलमानांच्या एकेश्वरींत शिरले. सदर्हूप्रमाणेंच सोळाव्या शतकांत रोमन क्याथोलिक धर्माची स्थिति फार निंद्य झाली होती. त्यांतील उपदेशकांस अविवाहत रहावें लागत असल्यामुळें अर्थातच त्यांची नीति बिघडली होती; ईश्वराची प्रार्थना लाटिन भाषेंत करावी लागे, आणि लाटिन भाषा टयूटा-निक लोकांस समजत नसल्यामुळें तींत प्रार्थना करण्यानें त्यांच्या भक्तीचें समाधान होत नसे; धर्माध्यक्षाचें स्वतः-चें वर्तन दुराचाराचें असल्यामुळें व त्यांस पैसे भरले अस-तां मोठमोठया दुर्धर पातकांची देखील माफी मिळूं लाग-ल्यामुळें अर्थातच दुष्कर्मास फार उत्तेजन आलें होतें; एकं-दरींत धर्मामध्यें ज्या अनेक खोडसाळ चाली आणि दुराचार शिरले होते, ते नाहींसे होण्याविषयीं लोकांचीं मनें आतुर होऊन राहिलीं होतीं; आणि ल्यूथर ह्याला यश आलें तें

कांहीं अंशीं त्याच्या कर्तृत्वामुळें, त्याच्या निश्चयामुळें, आणि त्याच्या धाडसामुळें आलें हें तर खरेंच; परंतु टयूटानिक जातीचीं मनें धर्मांतील ह्या गैरसोयी नाहींशा करण्यासाठीं इतकीं उत्सुक झालीं होतीं, व त्यांस जुन्या धर्माचा इतका कंटाळा आला होता, कीं त्यांच्या अडचणी दूर करणारा ल्यूथरसारखा कोणी तरी महापुरुष निर्माण होण्याची ते वाटच पहात होते. तात्पर्य. नवीन धर्मपंथ सुरू होतो तो, त्यांत अलौकिक चांगलेपणा असतो, किंवा तो अमलांत आणणारे लोक अद्वितीय उत्साहशक्तीचे असतात ह्मणूनच होतो, असें नाहीं, तर जुन्या धर्मांतील वाईट चालींनीं गांजल्यामुळें नवी सुधारणा मान्य करण्याकडे लोकांची उत्सुकता विशेष असते.

"वुइक्लिफ ह्याचा सुधारणा करण्याचा यत्न फुकट गेला, ह्याचें एक कारण तो स्वतः पूर्ण सुधारक नव्हता. तो जुनीं मतें वाईट आहेत, असें खंडन करणारा मात्र होता; परंतु तीं नाहींशीं करून त्यांच्या ऐवजीं एकादी नवी पद्धति स्थापन करण्याचें सामर्थ्य त्याच्या आंगीं नव्हतें." जुनी पद्धति वाईट ठरविण्यापेक्षां तिच्या ऐवजीं नवीन पद्धति योजून ती स्थापन करणें विशेष अवघड आहे, हा अनुभव जगांत चोहींकडे सारखाच आहे; ह्मणून, हल्लींच्या आपल्या लग्नपद्धति वाईट आहेत, आपल्या समाजांत असंख्य दुःखें उत्पन्न होण्याचें मूळ कारण त्याच पद्धति होत, असें ठरविणें फारसें अवघड नाहीं; आणि त्यांच्या वाईटपणाबद्दल लोकांची खात्री केली ह्मणजे सुधारकांचें काम संपलें असेंही नाहीं; तर त्यांच्या बदली दुसऱ्या लोकमान्य

व स्वीकारणीय सुधारणा दाखविणें हेंच सुधारकांचें मुख्य कर्तव्य होय. नवी सुधारणा जुन्या चालीस अगदीं सोडून न सून जुन्या चालींपासूनचे फायदे कायम राखणारी अशी तर असलीच पाहिजे; परंतु शिवाय ती सुधारलेल्या मतांसही अनुसरून असून तींत सर्व इच्छित हेतु साधतील अशी असावी; परंतु ही मोठी दुःखाची गोष्ट आहे कीं, आजपर्यंत सुधारकांनीं ज्या ज्या नवीन पद्धति सुरू करण्यचें योजिलें त्यांत सर्व प्रकारें दोषरहित आणि लोकमान्य अशी एकही नव्हती; आणि ह्मणूनच सुधारणेस यश येण्यास कांहीं अंशीं अडचण झाली आहे. आतां नवीन सुधारणा सुरू करण्याच्या पूर्वी जुन्या चाली वाईट आहेत हें अगोदर ठरविलें पाहिजे, हें खरें; कारण आपलें घर मोडून टाकण्याच्या लायकीचें झालें आहे, अशी आपली खात्री होण्याच्या अगोदरच तें पुनः कसें बांधावें, हा विचार आपल्या मनांत यावयाचा नाहीं. ह्या न्यायानें आजपर्यंतच्या सुधारकांचे प्रयत्न ह्या दुष्ट चालींचें वाईटपण उघडकीस आणण्याकडे चालले होते हें यथार्थच झालें, व त्याप्रमाणें बहुतेकांचा ग्रहही ह्या चाली वाईट असा झाला आहे, परंतु त्यांच्या ऐवजीं दुसऱ्या कोणत्या चाली अमलांत आणाव्या हें सांगण्याची वेळ आतां येऊन ठेपली असून तशी लोकमान्य सुधारणा पुढें आणण्याच्या कामांत सुधारकांना अद्यापपर्यंत यश आलें नाहीं. त्यांनीं मोठ्या धाडसानें बालविवाह आणि विधवाविवाह ह्यांसंबंधीं सुधारणा एकदम अत्युच्च स्थितीस पोंहोचाव्या अशा सूचना केल्या आहेत, परंतु त्या अमलांत आणण्याचे सुचविलेले उपाय केवळ भित्रेप-

णाचे, अप्रशस्त आणि द्राविडी प्राणायामासारखे आहेत. अशा उपायांनीं सुधारणेस तिळमात्रही मदत व्हावयाची नाहीं; कारण, कोणी म्हणेल कीं मी मागल्या चालीरीती मोडून टाकून एकदम फ्रेंच लोकांच्या राज्यक्रांतीप्रमाणें हिंदू लोकांस सुधारणेच्या शिखरावर चढवीन, तर ती गोष्ट कधींही होणें नाहीं; किंवा नवीन सुधारणा चांगली इष्ट आहे अशी लोकांची खात्री केल्यावांचून त्यांस आंधळ्यासारखे वांकड्यातिकड्या रस्त्यानें न्याल तिकडे ते येतील अशी अंधपरंपराही आतां राहिली नाहीं; म्हणून जी नवी सुधारणा अमलांत आणण्याची तिच्या योगानें आपली जात व देशाभिमान कायम राहील, खरोखर सुधारणा होणें एकीकडे राहून तिची दिशा प्राचीन रानटी स्थितीकडे पुनः फिरेल असें होणार नाहीं, व इच्छित हेतु तिच्यांत सर्व साधतील अशी ती बिनतोड असली पाहिजे; व हे सर्व गुण जिच्यांत आहेत अशी हल्लीं हिंदुस्थानांत सुरू करण्यासारखी सुधारणा कोणती हाच आजमितीस महत्वाचा प्रश्न आहे.

सुधारकांनीं ज्या साध्य गोष्टी ठरविल्या आहेत, त्या ह्या कीं, स्त्रियांचीं लग्नें प्रौढ वयांत करावीं; व कोणत्याही वयाच्या विधवेस लग्न करण्याची मोकळीक असावी. ह्यांतील पहिली सुधारणा अमलांत आणण्याकरितां, मुलींचीं लग्नें लहानपणीं होतात म्हणून त्या प्रौढ झाल्यावर खुषी असल्यास तीं रद्द करण्याचा त्यांस हक्क द्यावा; व विधवाविवाहाच्या अडचणी नाहींशा होण्याकरितां पुनर्विवाहित विधवेचा सामाजिक छळ करणें हा फौजदारी गुन्हा आहे, असें ठरवावें; असेही उपाय अगदीं अलीकडच्या देशहितेच्छु व चांगल्या बुद्धिमान्

सुधारकांनीं सुचविले आहेत; परंतु असले उपाय प्रचारांत आणणें ह्मणजे कीती धोक्याचें, किती अग्राह्य आणि निरर्थक आहे, हें पाहिलें पाहिजे. लग्नकरार रद्द करितां येण्यासारखा आहे, असें ठरवून, तो रद्द करण्याचें स्त्रीपुरुषांच्या खुषीवर ठेवणें, ह्मणजे आईबापांना आपली मुलगी पाहिजे त्याला देण्याचा जो अधिकार आहे, तो नाहींसा करून त्याच्या ऐवजीं यूरोपियन लोकां-प्रमाणें मुलींनें आपला नवरा स्वतःच पसंत करण्याचा व अर्थातच मुलानें मुलीशीं लग्नापूर्वीं बोलणें, वागणें वगैरेचा सांप्रदाय सुरू करणें होय; तसेंच लग्न ह्मणजे आपण हल्लीं पवित्र धर्मविधि मानितों, तें अशा ठरावामुळें नाहींसें होऊन लग्न एका प्रकारचा शुद्ध करार होईल; लग्नासारखें उपयुक्त व पवित्र मानलेलें जन्मबंधन हें छांदिष्ट मुली आणि त्यांचे प्रियकर ह्यांचा एक खेळ होऊन त्या पाहिजे तशा निष्प्र-बंध वर्तूं लागतील, अमुक कारणाकरितां मात्र लग्न रद्द करावें, असा निर्बंध करणें कठीण असल्यामुळें द्रव्यलोभी आईबाप आणि परस्त्रीचा अभिलाष करणारे लुच्चे लोक यांस अयोग्य कारणांसाठीं देखील लग्नें रद्द करण्यास संधि सांपडेल; इत्यादि अनेक कारणांमुळें अर्थातच कित्येक कुटुंबांची स्वस्थता नाहींशी होऊन लोकांत परस्पर वैरभाव मात्र अतिशय वाढेल. सारांश, खुषी वाटल्यास नवऱ्यांस सोडून देण्याचा हक्क मुलींस मिळाल्यामुळें इतके अनर्थ होतील कीं, त्यांची कल्पनाही होणें अशक्य आहे. उदाहरणार्थ, एकाद्या नव-राबायकोचा स्त्रीपुरुषविषयक संबंध पूर्वीपासूनच थोडाबहुत सुरू असून आतां तिला पूर्ण स्त्रीत्व प्राप्त झालें आहे व त्यांच्या

आयुष्यांतील अत्यंत सुखाचे दिवस येऊन ठेपले आहेत; परंतु अशा अमोलिक वेळेसच जर तिनें आपलें लग्न रद्द करून नवऱ्यास सोडून दिलें, तर त्याच्या मनाची काय स्थिति होईल? रागाच्या आवेशांत कदाचित् तो त्या बायकोचा किंवा तिला फितविणाराचा खूनही करण्यास चुकणार नाहीं. ह्याप्रमाणें समाजाची स्थिति शोचनीय होईल. कदाचित् कोणी म्हणतील कीं, असे भयंकर परिणाम होण्याचें भय उत्पन्न व्हावें, हाच ह्या ठरावाचा मुख्य उद्देश आहे; कारण लहान मुलीशीं लग्न केलें असतां पुढें ती प्रौढ झाल्यावर कदाचित् आपणांस सोडून देईल ह्या भयानें हिंदू नवरे आपोआप प्रौढ मुलींशींच लग्नें करूं लागतील; व आईबापही ह्याच भयास्तव त्यांचीं लग्नें लहानपणीं करणार नाहींत; परंतु मला वाटतें कीं, ह्या उपायापासून हल्लीं आहे त्यापेक्षां जास्त अहित उत्पन्न होईल. लहानपणीं झालेलें लग्न प्रौढ वयांत रद्द करितां यावें, असा द्राविडी प्राणायामाचा कायदा करण्यापेक्षां मुली प्रौढ वयांत आल्यावांचून त्यांचीं लग्नें करूंच नयेत असा सरळ कायदा केला तर काय वाईट होईल? म्हणजे त्याच्या योगानें कित्येक अविचारी बाप व अविचारी नवरे, मुलींच्या व काळाच्या चांगुलपणावरून ती पुढें आपलें लग्न रद्द करणार नाहीं, अशा विश्वासानें लहानपणीं तिशीं लग्न करून पुढें संकटांत पडण्याचा जो संभव आहे, तो नाहींसा होईल. त्याचप्रमाणें विधवाविवाहाच्या उत्तेजनार्थ जो उपाय सुचविला आहे, कीं, पुनर्विवाहित विधवेचा सामाजिक छळ (बहिष्कार वगैरे) करणें हें दुखापत किंवा दुसऱ्या

एकाद्या फौजदारी गुन्ह्याप्रमाणेंच शिक्षेस पात्र आहे असें ठरवावें, तोही वाईट व असाध्य आहे; कारण कायद्यानें ही गोष्ट मर्यादित करितां येण्यासारखी नाहीं. बरें तसा कायदा चालू केला, तर विधवांचा होणारा छळ उमगून काढून अपराध्यांस शिक्षा करण्याकरितां, लोक परस्परांशीं खासगी संबंध कसा ठेवितात, एकमेकांशीं घरगुती संबंधांत कसे वागतात, इत्यादि विषयांत सरकारास लक्ष पुरवावें लागेल. अर्थातच ही चौकशी करण्याचे अधिकार पोलिसांस किंवा माजिस्ट्रेट लोकांस द्यावे लागून कित्येक विघ्नसंतोषी व दुष्कर्मी लोकांस पाहिजे तसे उत्पात करण्यास मोकळीक मिळेल. सारांश, असा भयंकर परिणाम होणारा कायदा करणें म्हणजे इंग्रजसरकारासारख्या सुधारणेच्या शिखरास पोंहोचलेल्या राज्यकर्त्यांस हीनता आणणें आहे. सुधारकांनीं ह्याप्रमाणेंच दुसऱ्याही ज्या कित्येक सुधारणा सुचविल्या आहेत, त्यांतील गुणदोषांचें वर्णन पुढील एका स्वतंत्र भागांत करण्याचें योजिलें आहे. म्हणून येथें त्याविषयीं मी विशेष लिहीत नाहीं; परंतु सांगण्याचें तात्पर्य इतकेंच कीं सर्व प्रकारें दोषरहित आणि स्वीकरणीय अशी सुधारणा अद्यापपर्यंत कोणीही सुधारकानें लोकांपुढें मांडिली नाहीं.

सामाजिक सुधारक लोक तोंडीं उपदेश मात्र करितात. परंतु स्वतःची वर्तणूक तशी ठेवीत नाहींच, ह्यावरून त्यांच्या मनांतील खरा हेतु फार वेगळाच असावा; किंवा सुधारणेविषयीं त्यांची स्वतःची खात्री नसावी; त्यास पुरेसें धैर्य नाहीं; व त्यांच्यांत खरा उत्साह व खरी कळकळ

नाहीं; असे अनेक दोषारोप लोक त्यांजवर करितात, आणि 'सामाजिक किंवा धार्मिक सुधारणा करण्यास लोकांस खरी कळकळ आणि उत्साह असल्यावांचून सर्व व्यर्थ आहे,' 'गुंजेइतकें आचरण करून दाखविल्यानें जो फायदा होईल तो मणोगणित उपदेशानेंही होणार नाहीं' इत्यादि म्हणीही प्राचीन काळापासून चालत आल्या आहेत; तात्पर्य इतकेंच कीं, उपदेशक लोक आपल्या उपदेशाप्रमाणें वागण्यास तयार आहेत. किंवा नाहींत इकडे नेहमीं लोकांचें लक्ष असतें, व त्यांनीं स्वतः तसें वर्तन करून नव्या पंथानें जाणें निर्धास्त आहे, असें प्रत्यंतर लोकांस दाखविल्यावांचून लोक तिकडे जाण्यास धजत नाहींत. अशा प्रकारें अनेक संकटें भोगून जे लोक आपण उपदेशिलेल्या वाटेनें जाऊन दाखवितात, त्यांच्या कष्टांच्या हृदयद्रावक गोष्टींनीं लोकांच्या अंतःकरणांत पूर्ण कळवळा आणि पूज्यबुद्धि उत्पन्न होते; नवीन धर्माचा प्रसार होऊं नये म्हणून नवीन उपदेशकांचा जों जों छळ आधक होतो, तों तों तो धर्म लोकांच्या मनांत अधिक भरून जास्त फैलावतो, असा आजपर्यंतचा अनुभव आहे. जितके महापुरूष आजपर्यंत प्रख्यातीस आले आहेत त्यांची आपल्या हातीं घेतलेल्या कामावर पूर्ण भक्ति व स्थिर मत असल्यामुळें त्यांस अनेक दुःखें सहन करावीं लागलीं आहेत. ख्रिस्ताला स्वतःला क्रासावर धरून त्याच्या सर्वांगांत खिळे टोकून त्याचा प्राण घेतला, तरी त्यानें आपलीं मतें सोडिलीं नाहींत व शांति ढळूं दिली नाहीं, असा दुर्घट देखावा जर कोणी पाहिला नसता, अथवा आतां त्याची

कोणास आठवण राहिली नसती, तर ख्रिस्ती धर्मांत आज जो परोपकार व जे सद्गुण दृष्टीस पडत आहेत ते त्यांत कधींही आले नसते. सेंट पाल ह्यानें आपल्या धर्माकरितां कित्येक अपमान आणि कितीएक छळ सोशिले. सेंट पीटर ह्याच्या पायांत शृंखला बांधून रोममधील रस्त्यानें त्यास ओढीत नेलें. ख्रिस्ती धर्माच्या आरंभीं कित्येक लोकांनीं धर्माकरितां आपले प्राणही दिले आहेत; व शेवटीं शेवटीं तर लोक इतके बिथरले होते कीं मारटीर ह्मणजे धर्मासाठीं प्राण देणारा हें नांव मिळविण्याकरितां मूर्तिपूजक न्याया-धिशांच्या बळेंच खोड्या काढून ते मरण्यास सिद्ध असत. धर्मप्रसारकांपैकीं महंमद हा मात्र फार भाग्यशाली ह्मटला पाहिजे; परंतु त्याला देखील लोकांनीं एकदा मक्केबाहेर हांकून लाविलें होतें, व धर्माभिमानाकरितां कोणी आपणास मारेकरी घालून किंवा अन्य तऱ्हेनें ठार मारील ह्मणून त्यास फार सावधपणानें राहावें लागत असे. बुद्धाची हकीकतही हृदयद्रावक आहे. त्याची स्त्री प्रसूत होऊन तिला पुत्ररत्न झालें असतां त्यांची ममता, आणि राज्यलोभ सोडून देण्याचा त्यानें केवढा धीर केला! संसार सोडून देऊन अरण्यांत जातेसमयीं एकदां आपली स्त्री व नूतन पुत्र ह्यांचें दर्शन घ्यावें अशा उत्कंठेनें तीं ज्या खोलींत निजलीं होतीं तिच्या दारापर्यंत जाऊन देखील तेथून मागें परतण्याचें त्यानें केवढें आत्मसंयमन केलें! निदान आपल्या नूतन पुत्राचा शेवटचा एक मुका घेण्याची त्यास ममता उत्पन्न झाली; तरी न जाणों, त्याच्या दर्शनानें आपला निश्चय ढळेल व ईश्वरप्राप्त्यर्थ अरण्यांत जाण्याची पुनः आपणास

बुद्धि होणार नाहीं, म्हणून किती कठोर अंतःकरण करून तो मार्गे परतला ! ! ख्रिस्तानें धर्माकरितां इहलोकीं आपला देहयज्ञ केला; त्यावरून आतां यज्ञाची जरूर राहिली नाहीं; तोच यज्ञ स्मरावा, असें ज्याप्रमाणें ख्रिस्ती लोक मानितात, तसेंच बुद्धाच्या ह्या आचरणानें लोकांच्या मनाची पूर्ण खात्री होऊन त्यांचा भाव त्या धर्मावर बसत चालला; व हेंच संसारत्यागाचें फल सर्वत्रांस येतें असें मानितात. बुइक्लिफ ह्याला किती दुःखें भोगावीं लागलीं ! प्रेग येथील जेरोमला जेव्हां लांकडाच्या राशीवर ठेवून पेटवून दिला, तेव्हां आपल्या नवीन पंथाकरितां किती भयंकर यातना त्याला सोसाव्या लागल्या ! तसेंच इंग्लंडची राणी ब्लडी मेरी हिनें क्रॅनमर ह्यास भय घातलें कीं प्राटेस्टंट मतें सोडून न देशील तर आम्हीं तुला जाळून टाकूं; तेव्हां मताभिमानापुढें देहाची मला कांहींच किंमत नाहीं, असें दाखविण्याकरितां किती साहसानें त्यानें आपलें बोट अग्नींत घालून खुशाल जळूं दिलें ! ल्यूथर, कॉल्वीन, क्रॅनमर, मोर आणि अशा अनेक दुसऱ्या सत्पुरुषांनीं आपल्या हातीं घेतलेल्या सुधारणेकरितां आयुष्यांतील प्रत्येक सुख आणि उपभोग, फार तर काय, आपले प्राण देखील मोठ्या आनंदानें खर्ची घातले आहेत; व त्यांना जें यश आलें, त्याचें कारण पुष्कळ अंशीं हें त्यांचें साहसच होय. ह्याकरितां सामाजिक किंवा धार्मिक सुधारणेचा उपदेश करून ती घडवून आणणें, हें काम न्यायासनावरून किंवा विद्याल-ल्यांतील गुरुस्थानावर बसून तेथून उपदेश करण्यानें

कधींही सिद्धीस जाणार न...
मुळावर जाण्यासही न...

सुधारकांचा ... ...हीं; तर खिस्ताप्रमाणें तिजकरितां सांपडली अ... ...धार असलें पाहिजे.

वरकर्णी ... उपहास करण्याची लोकांस ही सोपी युक्ति ... ...ाहे; तुह्मी कांहीं केलें तरी तुमचें सर्व बोलणें ...आहे, असा आरोप लोक त्यांजवर करितात. ह्यावर सुधारकांचें उत्तर, " अद्याप सुधारणेस जसा अनुकूळ काळ असावा लागतो तसा आला नाहीं; व सुधारणा होण्यापूर्वी सर्व देशभर तिची वाटाघाट सुरू व्हावी लागते, तिचा हा काल आहे; " असेंच असतें; परंतु ह्या उत्तरावर लोकांचा लागलाच दुसरा आक्षेप असतो कीं वुइक्लिफ, ल्यूथर, जेरोम, क्रॅनमर ह्या विख्यात सुधारकांचा मार्ग तुह्मी कां स्वीकारूं नयें ? सुधारणेस अमुक काळ योग्य आहे किंवा नाहीं, आपण आपलीं नवीन मतें प्रसिद्ध केलीं तर काय प्रसंग आपणावर गुदरतील, ह्या गोष्टींचा विचार न करितां जसे ते आपलीं मतें बेधडक प्रसिद्ध करून त्यांप्रमाणें आचरण करून दाखवीत होते; तसें तुह्मीं कां करून दाखवीत नाहीं ? गोष्ट खरी आहे, परंतु थोडासा विचार केला असतां वरील आक्षेपकांस कळून येईल कीं ह्या गोष्टी बोलायला सोप्या दिसतात, तरी त्या घडवून आणणें फार कठीण आहे. अनादि काळापासून चालत आलेल्या रीति लोक एकाएकीं सोडीत नाहींत; व एखादद्दुसऱ्यानेंच एकदम त्यांच्या विरुद्ध जाणें फार भयकर आहे; कारण हत्तीच्या पायांशीं बांधून एकदम मारविलेलें पुरवेल, परंतु समाजाचा किंवा जातीचा छळ सोसवणार नाहीं; हें कोणास सांगावयास नको. आतां अशा छळवादासही पुरे पडणारे माहात्मे पृथ्वीवर होत

नाहींत असें नाहीं, पण येशू खिस्त, बुद्ध वगैरे धर्मसंस्थापक आणि क्रॅनमर, ल्यूथर ह्यांच्यासारखे धर्माभिमानी पायरीचे पन्नास उत्पन्न होत नाहींत. युगांचीं युगें लोटतात तेव्हां असा एकादा महापुरुष निर्माण होऊन तो आपल्या बुद्धिकौशल्यानें, अव्याहत श्रमानें आणि साहसानें लोकांचीं मनें आपणाकडे आकर्षून घेऊन, समुद्र किनाऱ्याच्या वाळवंटाप्रमाणें कोणाचा मागमूस ऊरूं न देणारें हें जग, त्याजवर आपल्या कृतीचा चिरकालिक ठसा उठवून ठेवितो. अशा मनुष्यांची गणती करूं लागलें असतां ती हातांच्या बोटांवर करितां येते, इतके ते थोडे आहेत ह्यावरून त्यांचा बहुतेक अभाव असणें हें इतरांस लांछनास्पद आहे, असें नाहीं. असे पुरुष फारच क्वचित् निर्माण होतात, हें त्यांना स्वतःला मात्र मोठें भूषणार्ह आहे. सारांश, हल्लींचे सुधारक त्यांच्यासारख्या अलौकिक बुद्धीचीं आणि धाडसाचीं कृत्यें भराभर करून दाखवीत नाहींत, ह्यांत माझ्या मतानें तर दोष देण्यासारखें कांहीं नाहीं; उलट बाकीच्या लोकांच्या मानानें पाहिलें असतां ते एवढी तरी खटपट करितात व समाजाचा थोडाबहुत जाच केवळ सर्वांच्या हिताकरितां सोशितात ह्मणून त्यांचा आपणांस कळवळा आला पाहिजे. तशांतून, स्त्रिया जुन्या मताला कशा चिकटून राहिल्या आहेत; त्यांच्या इच्छेविरुद्ध नवीन गोष्टी स्वीकारणें किती अप्रशस्त आहे; त्यांचा मोहपाश तोडणें किती दुर्घट आहे; वडील मनुष्यांचा आणि समाजाचा किती दाब मनुष्यावर असतो; वगैरे गोष्टींचें मागें निरूपण होऊन त्या सुधारकांस प्रतिबंधक होतात हेंही सांगितलेंच आहे. मनुष्याच्या इच्छेस

हीं जीं बंधनें असतात तीं न तोडणें हें निंदास्पद समजतां येत नाहीं. तीं स्वभावतःच उत्पन्न झालेलीं असून त्यांपासूनचे परिणामही हितावह आणि स्तुत्य आहेत; व जुन्या मताला चिकटून राहण्याची मनुष्यांची प्रवृत्ति हीही अयंत उपयुक्त आहे; कारण, कोणी सुधारकानें कांहीं नवीन चाल काढिली कीं, लोकांनीं लागलीच जुन्या चाली सोडून देऊन तिच्याच पाठीस लागावें; दुसरा सुधारक येऊन त्यानें दुसरी नवी रीति काढिली, म्हणजे पहिलीस लागलीच रजा; कोणी विचारी, अविचारी कसाही असून त्याला अमुक तऱ्हा बरी सोयीवार आहे असें वाटलें, कीं लागलीच ती सर्व लोकांस पसंत वाटावी; असा जर जगाचा स्वभाव असता, तर जगाची उत्पत्ति होण्यापूर्वी सर्व वस्तूंचा जसा एकच घोटाळा होता, तशी समाजाची अवस्था झाली असती. जसें एखाद्या देशांत मोठें तुफान होऊन त्यांतील झाडें उन्मूलन होऊन पडावीं, घरें कोसळून जमीनदोस्त व्हावीं, नद्या, तळीं यांस अपरंपार पूर येऊन तीं सर्व देशभर पसरून जावीं, व वातावरण धुळीनें आणि वाळूनें व्याप्त असावें, अशाच प्रकारचा देखावा समाजाचा दिसला असता; परंतु दयाळु ईश्वर अशीं भयंकर वादळें जशी नेहमीं होऊं देत नाहीं, तशींच समाजाच्या स्थितींत उलटापालट करणारीं महापुरुषरूपीं वादळें नेहमीं निर्माण होत नाहींत. व असें होणें फार हितावहही आहे. लहानसहान वाऱ्याच्या झुळकेला जशीं घरें दारें, किंवा झाडें वगैरे दाद नाहींत, तसेच साधारण नेहमींचे सुधारक जरी अनेक निर्माण झाले, तरी त्यांनाही कोणी जुमानीत नाहींत.

सामाजिक सुधारकांची उमेद खचण्याचें दुसरें एक असेंच कारण आहे, तिकडेही सूज्ञ लोकांनीं लक्ष पुरविलें पाहिजे. कोणी एखादा मनुष्य सुधारणेच्या पंथानें वागूं लागला तर त्याचें प्रायःश्चित्त पुढें त्याच्या निरपराध मुलांस भोगावें लागतें; ह्यामुळें, कंगाल स्थितींत लग्न करण्याचें परिणाम वाईट. असल्यामुळें जसें तें त्याज्य आहे—कारण आपण पाहतों कीं, भिकार लोकांस बहुतकरून फार मुलें होतात; व पुढें त्या सर्वांचें शिक्षण व बरदास्त तर एकीकडेच राहिली, परंतु त्यांस पोसण्याचेंही सामर्थ्य त्यांच्या आईबापांस नसल्यामुळें तीं भिकेस व दुःस्थितीस पोंचतात. ह्याप्रमाणें आईबापांच्या अविचाराचीं फळें भोगणारे लोक जगांत पुष्कळ आहेत—तसेंच सुधारणेस अनुसरून लोकांच्या चालींविरुद्ध लग्न करण्याचें जर कोणी मनांत आणिलें तर पुढें होणाऱ्या निरपराध मुलांस विनाकारण दुःखें भोगावीं लागतील हा विचार मनांत येऊन त्यांची हिंमत खचते. वास्तविक पाहतां त्या मुलांचा काय दोष असतो! परंतु लोक त्यांस बहिष्कृत करितात; कोणत्याही प्रकारचीं सामाजिक सुखें त्यांस मिळूं देत नाहींत; त्यांच्या येथें कोणी जात नाहीं; त्यांस आपल्याकडे कोणी येऊं देत नाहींत; त्यांच्याशीं कोणी शरीरसंबंध करीत नसल्यामुळें त्यांस आपल्या इच्छेनुरूप वधूवर मिळत नाहींत, व नाइलाजास्तव वाईट बरीं जशीं मिळतील तशा मनुष्यांशीं त्यांस विवाह करावे लागतात. एकंदरींत अनेक बाबतींत त्यांचे हाल होऊन आपण ह्या आईबापांच्या पोटीं कोठून आलों, असें देखील शेवटीं त्यांस वाटूं लागतें.

ह्याप्रमाणें सामाजिक सुधारकांची दशा होते. यापेक्षां धार्मिक सुधारक फार बरी, असें म्हणावें लागतें; कारण धार्मिक सुधारकांची एक वेगळीच मंडळी झाली असल्या-ल्याकारणानें, व त्यांचा धर्महि वेगळा झाल्यानें जशी जशी त्यांची संतति वाढत जाते, तसें तसें त्यांस अधिक बळ येत जातें; परंतु सामाजिक सुधारकांची गोष्ट तशी नाहीं. एकादे वेळेस बापाचीं मतें मुलाला आवडत नाहींत, तरी सुद्धां त्याला बापाच्या मताचें प्रायश्चित्त स्वतः निरपराध असतांही भोगावें लागतें.

वर लिहिल्याप्रमाणें आजपर्यंतच्या सामाजिक सुधारकांस अनेक प्रकारच्या अडचणी हमेशा येत असल्यामुळें हल्लींचे सुधारक नवीन पद्धतीनें आचरण करून आपणावरही तशींच संकटें आणून घेण्यास भितात, ह्यांत नवल नाहीं. आतां सुधारक ह्या नात्यानें त्याचें हें भिणें योग्य नाहीं हें खरें आहे; तरी त्याबद्दल त्यांस निदान दोष तरी देतां येत नाहीं. हिंदुस्थानांत ह्या सुधारणा चालू होण्यास केव्हां तरी एकदा लोकांचा छळवाद सहन केलाच पाहिजे; व मानसिक व शारीरिक दुःखें एकदा भोगावीं लागणार आहेत; परंतु तितकीं सर्व दुःखें आपल्या बिचाऱ्या हिंदु स्त्रियांच्या दुःखविमोचनाकरितां, इतकेंच नव्हे, दिवसानुदिवस अशक्त, क्षीण, निस्तेज होत जाणाऱ्या असंख्य हिंदू लोकांच्या उद्धाराकरितां, जो कोणी महात्मा सहन करून सुधारणा प्रचारांत आणील, त्याच्या स्वदेशाभिमानाचा डंका सर्व जगांत वाजेल, व त्याचें पूज्य नांव हिंदुस्थानाच्या इतिहासांत अजरामर राहील.

सुधारणेकडे लोकांचें लक्ष न वेधण्याचें कारण सुधारक पक्षांत आणखीही एक व्यंग आहे; तें असें:—आजपर्यंत सामाजिक सुधारणेचा पक्ष उचलून तिचा उपदेश आपल्या हिंदू लोकांस करणारांमध्यें रा० बा० आर. रघुनाथराव ह्यांच्यावांचून ज्याच्या हिंदुत्वाविषयीं कोणास शंका नाहीं असा एकही गृहस्थ नाहीं. सुधारणेचा मुख्य रोंख कोणत्या तीन गोष्टींकडे आहे, हें ह्या पुस्तकाच्या आरंभींच एकदा सांगितलें आहे, व सर्व सुधारणेचें बीज इंग्रजी शिक्षण आहे, हाही उल्लेख तेथेंच केला आहे, तेव्हां अर्थातच जो सामाजिक सुधारणेचा उपदेश करितो तो इंग्रजी शिकलेला असून धार्मिक व राजकीय सुधारणांविषयींही असाच उत्सुक असतो; ह्यामुळें सुधारक तितके इंग्रजी शिक्षणानें धर्मभ्रष्ट झाले आहेत, असा सर्वांचा ग्रह होऊन चुकला आहे. सर्वांत पूर्ण धैर्याचे व निश्चयाचे सुधारक मि. मलबारी ह्यांनीं ही सुधारणा बहुत करून शेवटास नेली असती, परंतु दुर्दैवानें ते पारशी असल्यामुळें ह्या वाईट चालींचा संबंध त्यांच्या जातीशीं विशेष नाहीं, म्हणून ते त्रयस्थ असे वाटतात; व एकंदर सुधारकांवर असलेल्या इंग्रजी शिक्षणाच्या आणि धर्मविसंवादीपणाच्या आरोपांतही त्यांस सामील केलें तरी हरकत नाहीं. सारांश, जे सामाजिक सुधारक आहेत तेच धार्मिक सुधारक असल्यामुळें सुधारणेच्या कामाला मोठा अपाय झाला आहे, व सामाजिक सुधारणा म्हणजे आपला धर्म बुडविण्याचें कृत्य असा सर्वांचा गैरसमज झाला आहे. जो कोणी असा उपदेश करितो कीं लहानपणीं मुलींचीं लग्नें केल्यामुळें पुढें त्यांस

अपरिमित दुःखें भोगावीं लागतात ह्मणून तीं करूं नका, त्यांच्या ह्मणण्यांत, आणि जो हिंदुधर्माचीं आधारस्तंभ असलेलीं मतें बदलण्याचा यत्न करितो त्याच्या ह्मणण्यांत काय फरक आहे, हें अज्ञ लोकांस कळत नाहीं एकाद्या विधवेनें पुनर्विवाह केला, तर तिचा द्वितीय भर्ता आणि ती स्वतः देखील दारूबाज असावी, किंवा मासभक्षण करीत असावी, गोमास देखील त्यांस चालत असेल, तीं प्रार्थनासमाजांतील किंवा येशूच्या कळपांतलीं असतील, मूर्तीवर त्यांचा भरंवसा नसेल, तीं वेदांस पौरुष व तुच्छ मानीत असतील, इत्यादि ज्या ज्या गोष्टी हिंदुधर्मांत भयंकर आणि त्याज्य मानिल्या आहेत, त्या त्या त्यांचे ठायीं असल्यावांचून त्यांनीं पुनर्विवाह केला नाहीं, अशा जुन्या मतांच्या लोकांच्या कल्पना असतात. मनोरंजनाचीं जितकीं पुस्तकें निघतात, त्यांना सामाजिक सुधारणेची अशा बाबतींत निंदा करणें हा चांगला विषयच सांपडला आहे. 'आजकालच्या गोष्टी' च्या कर्त्यानें आपल्या कादंबरींतील सुधारकास मद्यपी बनविला आहे; तसेंच पुनर्विवाहाच्या फार्सांतील नायकास व्यभिचारी ठरविला आहे. साधारणपणें जुन्या मताच्या लोकांच्या बोलण्यावरूनही प्रत्येक सामाजिक सुधारकावर ते कांहीं तरी एका दुर्गुणाची स्थापना करितात, व शेवटीं सुधारणा ह्मणजे दुराचार असें ठरवितात, असेंच आढळून येईल. 'कांहीं सोनाराचा गुण व कांहीं सवागीचा गुण' ह्या न्यायाप्रमाणें सुधारकाचेही कांहीं दोष अशा प्रकारचीं भयें उत्पन्न करण्यासारखे आहेत हेंही येथें कबूल केलें पाहिजे. कित्येक लोकांची इतकी

कायम राखण्यासाठीं लग्नपद्धति स्वीकारण्याची आवश्यकता आली ह्मणून लग्न करण्याचा मुख्य हेतु हाच आहे कीं समाजाचें अस्तित्व चिरकाल रहावें हा उद्देश एका पुरुषानें एक बायको करावी या नियमानें इतर विवाहाच्या चालींपेक्षां जास्त साधतो. हल्लींच्या काळांत राष्ट्राची शक्ति फार वाढली आहे; तसेंच परोपकारबुद्धि आणि दुसऱ्याचा कळवळा हींही लोकांचे मनांत जागृत होऊं लागलीं आहेत, ह्यामुळें पूर्वी-सारख्या सतत लढाया होत नाहींत. लढाई केव्हां उद्भवेल ह्याचा नेम नसल्यामुळें विचारदृष्ट्या ती सतत जवळच येऊन ठेपलेली आहे, असें धरून जरी चालावें लागतें तरी प्रत्यक्ष लढाई फारच क्वचित् घडते, ह्यामुळें पूर्वीप्रमाणें लढाईनें पुरुषांची संख्या कमी न होतां स्त्री व पुरुषांचे दोन्ही वर्ग समसमान झाले आहेत व त्यांची परस्पर चढा-ओढ लागून दोन्ही वर्ग महत्वानेंही सारखेच होत आहेत. तेव्हां अशा स्थितींत एकच स्त्री करण्याची चाल असणें अवश्य आहे आणि एकंदर राष्ट्राची लोकसंख्या पुष्कळ व निरोगी होण्यास हीच रीति उपयुक्त आहे. त्याप्रमाणें एकपत्नीक धर्माचें महत्व लोकांच्या मनांत पूर्ण बिंबल्यामुळें आणि उद्योगशीलतेचा प्रसार होत असल्याकारणानें एक स्त्री असणें हा एक जणुं सृष्टिनियमच आहे किंवा मनुष्याची उपजत बुद्धि आहे असा भास होतो. व त्याविरुद्ध पक्षाचा ह्मणजे अनेक स्त्रिया करणाऱ्या पुरुषांचा आणि अनेक पति करणाऱ्या स्त्रियांचा आपणांस तिरस्कार वाटतो शिवाय हल्लींच्या काळांत अनेक बायका करण्याची चाल असती तर तिचे परिणाम दुःखदायकच झाले असते. ह्मणजे एक

तर बायकांचा तोटा येऊन कित्येक पुरुषांस अविवाहित रहावें लागेल. आणि दुसरें असें कीं एकच बायको व एकच नवरा यांस जितकीं मुलें होणार तितकीं एक पुरुषास अनेक बायका असल्यानें न होऊन समाजाचा उत्तरोत्तर ऱ्हास होत जाईल. तसेंच एक स्त्री करण्याच्या रीतीपासून जितका कुलाभिमान जागृत असतो, तितका अनेक बायका केल्यानें नसतो. परंतु उलट कुटुंबांत द्वैत वाढून तेंच सर्व घराण्यांत, जातींत आणि राष्ट्रभर पसरतें. सावत्र भावांनीं आपसांत लढाया करून किती रक्तपात केला आहे, हें वाचतांना इतिहासाचीं पानें देखील रुधिरमय झालेलीं भासतात* ह्यावरून लग्न करण्याची अत्युच्च तऱ्हा समाजाचे उत्कर्षासंबंधें पाहिलें असतां प्रचारांत येऊन चुकली आहे, आणि ती एक बायको करण्याची चाल होय. हिंदुस्थानांतील लोकांची रीति व समजूत प्रायः अशीच आहे, कीं एक स्त्री करणें चांगलें. आमच्या शास्त्रांत देखील असेंच लिहिलें असून एकीहून अधिक बायका करण्याची जी सवड ठेविली आहे, ती कांहीं विशेष कारणाकरितां मात्र आहे. तथापि कित्येक राजे व श्रीमंत लोक त्या सवडीच्या कारणांचा विचार न करितां पुष्कळ बायका कराव्या एवढ्या परवानगीचाच तेवढा फायदा घेतात ह्या करितां आपल्या शास्त्राचा जो नियम

---

*हिंदुस्थानाचा इतिहास सूक्ष्म दृष्टीनें पाहिला तर रजपूत व मुसलमानी राज्यांचा नाश अनेक लग्नाच्या चालीमुळें झाला आहे असें ह्मणावें लागेल.

आहे कीं केवळ चैनीकरितां कोणीही पुष्कळ बायका करूं नयेत तो कडक रीतीनें अमलांत आणण्याची सुधारणा आपल्या लोकांत होणें अवश्य आहे. या पलीकडे आपल्या लग्नपद्धतींत ह्या संबंधानें दुसरी सुधारणा करण्यासारखी दिसत नाहीं. हिंदुस्थानच्या विशेष स्थितीकडे लक्ष देऊन एकच बायको करण्याच्या नियमाला कांहीं अपवाद शास्त्रकारांनीं करून ठेविले आहेत ते अवश्य आहेत.

१७. लग्नाचा दुसरा हेतु हा आहे कीं त्यापासून पुढील संततीचें कल्याण व्हावें. ह्मणून ज्या लग्नपद्धतीच्या योगानें आईबापांवर फारसा त्रास न पडतां सशक्त आणि पुष्कळ मुलें होतात, तीच तऱ्हा उत्तम असें म्हटलें पाहिजे. आपल्या लग्नापासून पुढें होणाऱ्या मुलांवर काय परिणाम होईल याचा विचार प्रत्येक लग्न करणाऱ्या जोडप्यानें लग्नापूर्वी करणें अवश्य आहे. परंतु चमत्कार असा आहे कीं, तिकडे कोणीही लक्ष पुरवीत नाहींत, व कोणी कायदे करणारांनींही आजपर्यंत ह्याचा विचार केलेला आढळत नाहीं. याचें कारण असें आहे कीं लग्न करण्याचे लोकांचे हेतु फार वेगळेच असतात. कित्येकांची परस्परप्रीति जमते म्हणून ते लग्न करितात, कित्येक असें मानितात कीं धर्मात सांगितल्याप्रमाणें लग्न करणें अवश्यच आहे. कित्येक निवळ स्वतःच्या सोयीसाठीं लग्न करितात. अर्थात्‌च ह्या प्रकारच्या लग्न करणाऱ्या जोडप्याच्या मनांत लवलेश देखील असा विचार नसेल कीं लग्न करून ज्या मानवी प्राण्यांना पुढें आपण ह्या भवसमुद्रांत लोटणार आहोंत त्यांच्या प्रारंभीच्या अवश्य असणाऱ्या

शिक्षणास आणि शुश्रूषेस लागणारीं भरपूर साधनें आपगा-पाशीं आहेत किंवा नाहींत? अथवा आपली संतति चांगली निरोगी होईल, इतके आपण स्वतः सशक्त आणि पूर्ण वयाचे आहोंत किंवा नाहीं, हाही विचार कोणी करीत नाहींत. ग्रीक देशांतील लायकरगस नांवाच्या कायदेकाराला मात्र हें तत्व पूर्ण कळलें होतें असें दिसतें; कारण त्यानें स्पार्टा येथें लग्नसंबंधाचे जे कायदे केले, त्यांतील मुख्य उद्देश पुढील संतति शूर व दगडासारखी बळकट व्हावी हाच होता; परंतु त्या नियमांनीं फक्त शरीर मजबूत होण्यावांचून आयुष्यांत जीं इतर अनेक सुखें मनुष्यास मिळण्यासारखीं आहेत त्यांची बंदी केल्यामुळें लवकरच लोकांस त्यांचा कंटाळा वाटूं लागला; व ते कायदे नाहींसे होऊन त्यांचें अनुकरण पुनः कोणीही केलें नाहीं. स्पार्टन लोकांचा अपवाद खेरीज करून आजपर्यंतच्या दुसऱ्या कोणत्याही लोकांत मुलाच्या कल्याणाचा विचार झालेला दिसत नाहीं. लग्नाची सुधारणा होत जाऊन तें हल्लींच्या स्थितीस येईपर्यंत त्यास चार निर-निराळीं स्वरूपें आलीं; म्हणजे प्रथम स्त्रियांना धरून आणून केवळ गुलामाप्रमाणें वागवीत; नंतर स्त्रियांस उदार-पणानें वागवून त्यांची प्रीति संपादन करणें लोकांस आवडूं लागलें; त्यानंतर लग्न म्हणजे केवळ धार्मिक विधि झाला; आणि हल्लीं लग्न करण्यांत स्त्रीपुरुषांची दृष्टि परस्पर सोयी-कडे असते. परंतु ह्यांपैकीं एकाही प्रकारांत संततीच्या हिताकडे बुद्धिपुरःसर लक्ष दिलेलें नसून शारीरिक इच्छा तृप्त करून घेणें, प्रीति संपादणें, धार्मिक विधि करणें किंवा मनाच्या लहरीप्रमाणें वागणें इत्यादि तात्कालिक फायदे

करून घ्यावे इतकेच लग्न करणारांचे हेतु असतात. आतां दैवयोगानें ह्यां निरनिराळ्या लग्नपद्धतींत मुलांचें कल्याण निरनिराळ्या रीतीनें आपोआप होत गेलें हें खरें आहे; परंतु तें खात्रीनें होणारे बुद्धिपुरःसर उपाय आजपर्यंत कोणीं योजिले नाहींत. सर्व पद्धतींत युरोपांतील प्रस्तुतची लग्नपद्धति मुलांच्या कल्याणास चांगली अनुकूळ आहे असें दिसतें. कारण तिच्या योगानें प्रत्येक जोडप्यास पुष्कळ व निरोगी मुलें होतात. तसेंच, तिकडील उच्च प्रतीचे आणि मध्यमप्रतीचे लोक चांगली खाण्यापिण्याची सोय असल्या-वांचून बहुतकरून लग्नें करीत नाहींत. तेथील लोकांचें समाजमतच असें आहे कीं, ज्या मनुष्यास आपल्या योग्य-तेनुरूप शिक्षण देण्याचें सामर्थ्य नसेल त्यांनीं लग्न न करणें बरें. दुसरें असें आहे कीं, युरोपांतील सुशिक्षित लोकांत बहुतकरून स्त्रीचें लग्न १६ व्या आणि पुरुषांचें २९ व्या वर्षानंतर करण्याची चाल आहे, आणि तीही सशक्त मुलें होण्यास फारच उपयुक्त आहे. एकंदरींत यूरोपांतील चाली मुलांस पुष्कळ हिता-वह आहेत यांत संशय नाहीं. परंतु अलीकडे पाश्चात्य देशांत फ्री म्यारेजेस म्हणजे ऐच्छिक लग्नें करण्याची सुधा-रणा होऊं पाहत आहे व मुलांच्या संगोपनाकरितां एक शिक्षणगृह काढून त्यांत लहानपणापासून मुलांस ठेवावें अशाविषयीं कल्पना चालू झाल्या आहेत, ही गोष्ट मात्र फार शोचनीय वाटते. कारण मुलें मोठीं होऊन कांहींशीं वयांत येईपर्यंत तीं आईबापांच्या देखरेखींतच असलीं पाहिजेत. आणि त्यांच्या ऐवजीं नोकर ठेविलेल्या दाया

आणि शिक्षक ह्यांच्या नजरेंत त्यांस ठेविलें असतां पुष्कळ वाईट परिणाम घडून मुलांचें नुकसान झाल्यावांचून राहणार नाहीं. स्पेन्सर ह्याचें मतही ह्याप्रमाणेंच ह्या नवीन सुधारणेस प्रतिकूळ आहे. असो. वास्तविक रीतीनें ह्या गोष्टींचा वादविवाद करण्याची आपणास गरज नाहीं. व फार पुढें सरसावलेल्या आणि सुशिक्षित अशा पाश्चात्य लोकांस हीं नवीन मतें सोडून देण्याविषयीं उपदेश करण्याचा माझा हेतुही नाहीं. कारण ते आपली स्वतःची काळजी घेण्यास पूर्ण समर्थ आहेत. परंतु अनुसंधानाच्या प्रसंगानें आलेल्या गोष्टीचा उल्लेख करावा लागला.

३८. मुलांच्या कल्याणासंबंधानें हिंदुस्थानांतील लग्नपद्धतीचा विचार केला असतां असें आढळून येईल कीं ह्या बाबतींत आपल्या चाली फारच दुष्ट आहेत. किंबहुना त्यांच्या पलीकडे वाईटपणाची सीमा राहिली नाहीं. हिंदु लोकांस आपल्या मुलांची माया कमी आहे, किंवा त्यांच्या शिक्षणाविषयीं ते बेपर्वा असतात, असें माझें ह्मणणें नाहीं; परंतु आपल्यांतील चालीच अशा वाईट आहेत कीं, मुलें अशक्त आणि निस्तेज व्हावीं हा त्यांचा स्वाभाविक परिणाम आहे. शिवाय लहानपणापासून मुलांस वळण लावण्याचें व शारीरिक शिक्षण देण्याचें काम आईबापांवर असतें; परंतु आपलीं मुलें नुस्तीं रोगरहित किंवा व्यसनरहित असलीं ह्मणजे झालें शारीरिक शिक्षण आणि नीतिशिक्षण, अशी त्यांची समजूत अगदीं कोती असल्यामुळें अर्थात्च मुलांस लहानपणापासून उत्साहोद्योगादि गुण अथवा धाष्ट्‌र्य, तेज इत्यादि शारीरिक उत्कर्ष प्राप्त

होत नाहींत. हिंदू मुलांची उत्कर्षस्थिति न होण्यास बाल-विवाह हें दुसरें मोठें कारण निःसंशय आहे, व त्याविषयीं पूर्ण विचार मी पुढील एका भागांत करणार आहें. येथें इतकेंच सांगणें बस्स आहे कीं, आपल्या हिंदुस्थानांत लग्न ह्मणजे केवळ धर्माचरण करण्याकरितां करावयाचें अशी समजूत आहे, व त्यामुळें स्त्रीपुरुषांचा स्वभाव आणि परस्पर प्रेमभाव कसा आहे ह्याचा यत्किंचितही विचार लग्नापूर्वी केला जात नाहीं. जेथें लग्न करणारीं जोडपीं नवरा बायको होण्यास योग्य आहेत किंवा नाहींत इकडे कोणी लक्ष पुरवीत नाहींत; मुली अगदीं अशक्त व कुरूप असल्या तरी त्यांची लग्नें झालींच पाहिजेत असा जेथें जुलूम आहे; जेथें वृद्धपुरुष देखील पुत्रप्राप्ति होऊन आपला उद्धार व्हावा अशा समजुतीनें ( अर्थात् बालस्त्रियांशीं ) लग्नें करूं इच्छितात;-अशी स्थिति आहे, तेथें एकमेकांना योग्य अशा स्त्रीपुरुषांचीं जोडपीं असणें कचित् शक्य आहे. आणि असा शारीरिक व मानसिक रीतीनें जोडा जमल्यावांचून उत्कृष्ट संतति प्राप्त होण्याची आशा बाळगणें व्यर्थ आहे. मुलें चांगलीं वाढण्यास प्रथमतः आई प्रौढ आणि सुशिक्षित असावी लागते. परंतु आपल्या लोकांतील बालविवाहाच्या चालीनें प्रजाजननाचें काम स्त्रियांवर अल्पवयांत आल्यामुळें मुलांच्या लहानपणीं त्यांची योग्य काळजी घेण्याचें काम त्यांजकडून चांगलें होत नाहीं. मुलांना मरूं न देतां सरासरी त्यांचा जीव जगविला ह्मणजे मातृप्रेमास उचित असें आपलें कर्तव्य सरलें, असें त्यांस वाटतें, आणि कुटुंबांतील इतर मनुष्यांची आणि लोकां-

चीही अशीच समजूत असल्यामुळें तेही समाधान पावतात. ह्याप्रमाणें आपली हल्लींची लग्नपद्धति संततीच्या हितास अत्यंत प्रतिकूळ आहे, असें ह्मटल्यावांचून गत्यंतर नाहीं.

३९. परंतु सशक्त आणि पुष्कळ संतति व्हावी हा हेतु लग्नापासून प्रथम साधला पाहिजे, हें अक्षरशः खरें आहे व तिकडे आपणांस लक्ष पुरविलें पाहिजे. पुष्कळ संतति होणें हें तर अवश्यच आहे; कारण तसें न झाल्यास समाज क्षीण होत जाऊन नाहींसा होईल, हें सांगावयास नको. परतु नुस्ती पुष्कळ संतति उपयोगाची नाहीं, ती चांगली सशक्तही असली पाहिजे. कारण एकाद्या समाजांत अशक्त मनुष्यांची सख्या वाढत जाऊन तो समाज पुष्कळ मोठा झाला, तरी मोठ्या होण्यानें त्याचा निभाव लागणार नाहीं. उलट असें आहे कीं, ज्यांस आयुष्यांत पडणारे कष्ट सोसण्याची आणि व्यवहार, युद्ध, बुद्धि इत्यादिकांत इतर मनुष्यांस हटविण्याची शक्ति नाहीं अशा असंख्य दुर्बळ मनुष्यांनीं जरी समाज भरलेला असला तरी तो केवळ निरुपयोगी आणि भारवत् समजला पाहिजे; व त्याच्या योगानें लोकांचीं दुःखें कमी न होतां उलट वाढत मात्र जातील. अशा समाजांत उलट अज्ञान मुलें आणि निराश्रित मनुष्यें मरण्याचा झपाटा सुरू असल्यास तोच फायदेशीर होऊन त्याच्या योगानें तो समाज उच्छिन्न होत नाहीं. सारांश; मनुष्यांची फक्त संख्याच वाढत जाऊन उपयोग नाहीं; तिच्या प्रमाणानें त्यांचें बळ आणिं श्रम करण्याची शक्तीही वाढत जाऊन सर्व समाज पूर्वीपेक्षां संख्येनें आणि शक्तीनें बलवत्तर होत

जाणें अवश्य आहे. ह्याप्रमाणें एकेक पिढी मोठी होऊन त्यांस पुनः सशक्त आणि पुष्कळ मुलें होण्याचा क्रम अक्षयीं सुरू असावा असें वर सांगितलें. परंतु नवीन संततीच्या योगानें पहिल्या प्रौढ झालेल्या पिढींतील मनुयांस शारीरिक त्रास न पडेल, व समाजाचें अस्तित्व राखण्यास अवश्य अशीं सामाजिक कामें करण्याची उमेद त्यांस राहील, अशी त्यांची स्वतःची स्थिति असली पाहिजे. कारण प्रत्येक मनुष्यास आपलें जीवित राखण्याकरितां जसें अनेक तऱ्हांनीं झटावें लागतें, तसेंच इतर समाजांत आपल्याही समाजाचें अस्तित्व राखण्याकरितां त्यांशीं टक्कर मारून त्यांस नेहमीं पुरें पडावें लागतें; आणि हें काम प्रत्येक वेळीं पुढली पिढी तयार होईपर्यंत समाजांतील ह्या प्रौढ मनुष्यांवरच अवलंबून असतें. ह्याप्रमाणें आपलें स्वतःचें, आपल्या मुलांचें आणि समाजाचें हित, हीं निरनिराळीं असून हीं तिन्हीं परस्परांशीं विरुद्ध आहेत, ह्मणजे एकाचें महत्व धरून चाललें तर दुसरें चांगलें साधत नाहीं. आतां समाजाचें हित प्रथम साधलें पाहिजे व नंतर स्त्रीपुरुषांनीं स्वतःचे हित साधण्यापूर्वी, मुलांच्या हिताकडे लक्ष देणें अत्यंत अगत्याचें आहे कारण प्रत्येक पिढी अशक्त होत गेल्यानें तो समाज उत्तरोत्तर क्षीण होऊन त्याचा पूर्ण अपकर्ष होईल व इतर ज्या समाजांत संततीचे उत्कर्षास अनुकूल स्थिति असेल अशा समाजांतील लोक त्यास जिंकून टाकितील ह्याप्रमाणें समाजशास्त्रदृष्ट्या लग्नाचा दुसरा मुख्य हेतु हाच आहे कीं त्यापासून भावी प्रजेचें हित व्हावें, ह्मणजे पुष्कळ व सशक्त प्रजा व्हावी.

न्यायदृष्टीनें पाहिलें असतांही मुलांचें संगोपन करून त्यांस वाढविण्याचें जोखिमीचें काम आईबापांवर हवालेलें आहे; म्हणून जे लोक आईबापांची संज्ञा मात्र मिळवितात परंतु आईबापांचें कर्तव्य योग्य बजावीत नाहींत, ते निंदेस पात्र आहेत.

४०. हिंदुस्थानांतील लोकांच्या मनांत भावी प्रजेचें काय होईल याचा कधींच विचार येत नाहीं. केवळ अंधत्वानें अशक्त अपूर्ण वाढीच्या मुलींचीं व मुलांचीं लग्नें करून टाकितात व एक आपलें कर्तव्य आपण केलें असें आईबाप समजतात. विचारदृष्ट्या पाहिलें तर तुह्मी लग्न करूं नका, हा उपदेश करणें फार सोपें आहे हें खरें आहे. प्रत्येक मनुष्य ह्मणजे स्त्री व पुरुष यांस संसारसुख घेणें व नीतीनें समागमेच्छा तृप्त करणें अगदीं जरूर आहे. कोणी कितीही कारणांनीं लग्नाला अयोग्य असो, तरी त्यासही लग्नाची इच्छा आवरणें फार कठीण आहे. ही नैसर्गिक लग्नाकडे ओढणारी प्रवृत्ति आपल्या लोकांत धर्माज्ञेमुळें जास्तीच बलवत्तर झाली आहे. म्हणजे लग्नाशिवाय स्त्रियांस परलोक नाहीं व गृहस्थाश्रम पुरुषास प्रशस्त मानिला आहे.—यामुळें बहुतेक सर्व स्त्रीपुरुषांचीं लग्नें होतात; ह्याप्रमाणें मनुष्याची स्वाभाविक प्रवृत्ति आणि धर्माज्ञा ह्या दोहोंचा एकच रोख आहे, हें खरें आहे. परंतु हिंदु लोकांनीं हें लक्षांत वागविलें पाहिजे कीं, ह्या पृथ्वीतलावर जीं राष्ट्रें आहेत त्यांतून हिंदू समाजाचें अस्तित्व नाहींसें होणें योग्य नाहीं. इतकेंच नाहीं, तर ज्या आर्य लोकांचा त्यांच्या स्वगुणांनीं पृथ्वीवरील

चढाओढींत उत्कर्ष होत आहे, त्याच आर्य लोकांची पुरातन शाखा आपण हिंदु लोक आहोंत; व आपण ह्या पार्थिव कलहांत मागसणें हें आपणास कमीपणा आणणारें आहे. म्हणूनच स्वाभाविक देहप्रवृत्ति व धर्माज्ञा ह्या दोहोंचाही मेळ समाजहित व भावी प्रजेचें हित ह्यांशीं घातला पाहिजे.

४१. स्पेन्सर साहेबांच्या सिद्धांताप्रमाणें हें समाजहित व भावी संततीचें हित, स्त्रीपुरुषें प्रजोत्पादनास योग्य होईपर्यंत समागम न होण्याची व्यवस्था ठेविल्याशिवाय साधणार नाहीं. तात्पर्य, शरीराची वाढ पूर्ण होईपर्यंत प्रत्येक मुलास स्वतंत्र वाढूं दिलें पाहिजे. ज्या देशांत प्रौढवयांत लग्नें करण्याची, स्वयंवराची व स्त्रीपुरुषांनीं अविवाहित राहण्याची चाल आहे, त्या देशांत स्त्रीपुरुषें बहुतकरून परस्पर योग्य होऊन चांगली प्रजा उत्पन्न होण्यास हरकत पडत नाहीं; व म्हणून ह्या चाली चांगल्या असें म्हणावें लागतें. आपल्या हिंदुस्थानांत ह्या चाली प्रचारांत आणणें कितपत हितावह होईल, व ज्या धर्माच्या आकलमानें लोकांची वैवाहिक स्थिति फार निष्कलंक राहते, व जें धर्मबंधन हिंदु लोकांच्या मनाला इतकें प्रिय होऊन खिळून गेलें आहे, तें कमी करणें किंवा नाहींसें करणें प्रशस्त आहे किंवा नाहीं, ह्याचा विचार स्वतंत्र लेखांत केला पाहिजे. येथें इतकें सांगणें पुरें होईल कीं, आपल्या धर्मविषयक कल्पना कायम राहून, स्त्रीपुरुषांची वाढ पूर्ण होऊन त्यानंतर प्रजाजनन व्हावें, अशी विवाहपद्धति आपणांस अमलांत आणितां येईल. मात्र प्रौढ वयांत आल्यानंतर संतति होणें हें समाजाला व भावी प्रजेला

अत्यंत श्रेयस्कर .आहे, हें हिंदू समाजानें निश्चयपूर्वक पूर्ण लक्षांत ठेविलें पाहिजे.• तसेंच लोकमतही असें झालें पाहिजे कीं, जर मुलांचें योग्य संगोपन व शिक्षण होण्याचें सामर्थ्य नाहीं, तर लग्न न करणें प्रशस्त. कारण लोकमताचाही जोर कायद्याइतकाच असतो. कायद्यानें जी गोष्ट होते तीच लोकविद्वेषाचे भयानेंही पूर्ण अमलांत येऊं शकते.

४२. लग्नापासून आपणा स्वतःलाही सुखप्राप्ति करून घेण्याची इच्छा लग्न करणारांस असणें वाजवी आहे. परंतु आधीं मुलांचा विचार केल्यानंतर मग त्यांनीं स्वहिताकडे दृष्टि द्यावी. सशक्त मुलें व्हावी व त्यांचें संगोपन व शिक्षण यथास्थित व्हावें, मग स्त्रीपुरुषांच्या सुखाचें नुकसान झालें तरी हरकत नाहीं, असें मात्र त्यांच्या संबंधानें समजतां येत नाहीं. कारण, मुलांच्या संबंधाचें कर्तव्य करण्यांत आईबापांस अति शारीरिक त्रास पडला असतां दुसरीं अवश्य सामाजिक कामें करण्याचें सामर्थ्य त्यांस राहणार नाहीं. व असें झाल्यास फार वाईट परिणाम होतील. कल्पना करू कीं एका समाजांतील प्रौढ मनुष्यांपैकीं तीनचतुर्थांश मनुष्यें तिशीच्या सुमारास क्षीण होऊं लागून चाळिशींत मरूं लागलीं, तर तो समाज कायम राहण्याकरितां इतर समाजांतील लोकांशीं चढाओढ करून त्यांस हटविण्याचें किंवा आपलें संरक्षण करण्याचें सामर्थ्य त्यांच्यांत राहणार नाहीं. व हें काम मुलांना आणि तरुण पुरुषांना करणें भाग पडून नेपोलियनच्या लढायानंतर फ्रेंच राष्ट्रास जशी अवस्था आली होती तसा त्या समाजाचा अपकर्ष लवकरच होईल. ह्यासंबंधें स्पेन्सर ह्यानें असा

उपाय सुचविला आहे कीं, स्त्रीपुरुषांना उतार वयांत संतति न व्हावी अशी समाजव्यवस्था असावी, व मातापितरांनीं मुलांच्या संगोपनांत फार सप्रेम लक्ष पुरवावें. आतां स्त्रीपुरुषांची वाढ पूर्ण झाल्यावर प्रजाजनन सुरू व्हावें, हेंही ह्या मुद्यासंबंधें जरूर व इष्ट आहेच. आपल्या हिंदुविवाहरीतीविषयीं पहिल्या उपायासंबंधें विशेष लिहिणें नको आहे, व दुसऱ्या उपायासंबंधें ह्यापूर्वी उल्लेख आलाच आहे. सारांश, समाजशास्त्रसंबंधें विचार केला व समाजहित, संततीचें हित, व स्त्रीपुरुषांचें हित, तिघांच्याही हिताचा विचार केला, तर असें म्हटलें पाहिजे कीं, हिंदुस्थानचे विवाहपद्धतींत, बालविवाह बंद करणें नसेल तर निदान बालप्रजाजनन हें तरी समूळ बंद झालें पाहिजे; हीच अत्यंत अवश्य सुधारणा आहे.

४३. हा भाग संपविण्यापूर्वी स्पेन्सरच्या समाजशास्त्रांतील एक साद्यंत उतारा येथें घेऊं. त्यांत लग्नाचे खरे हेतु काय आहेत; व त्यांचें परस्पर महत्व कसें आहे; व ते साधण्यास कोणत्या चाली फार सोयीच्या आहेत ह्याचा स्पेन्सर ह्यानें इतिहासदृष्ट्या आणि समाजशास्त्रदृष्ट्या विचार थोडक्यांत केला आहे, ह्मणून तो उतारा घेण्यासारखा आहे.

"साधारणरीत्या जेव्हां कोणत्या सामाजिक चाली *चांगल्या किंवा गृहस्थिति कशी असावी, ह्याविषयीं वादविवाद* निघतो, तेव्हां त्याचा निर्णय करितांना ज्यांचा विवाहांत प्रत्यक्ष परस्परसंबंध येतो त्यांच्याच कल्याणाचा मात्र विचार आपण करितों. स्त्रीपुरुषांच्या लग्नासंबंधाचे नियम ठरवितांना

त्यांपासून चालेल्या पिढीला कितपत सुख होईल किंवा कितपत अपाय होतील इकडे काय तें लक्ष असतें; परंतु त्या चालींचा आपल्या भावी प्रजेवर काय परिणाम होईल हें कोणी पाहत नाहीं. मग अर्थात्‌च त्यांच्याही मागूनच्या पिढ्या कशा होतील, किंवा त्यांना कशी स्थिति येईल ह्याचा विचार त्यांच्या स्वप्नींही येत नसेल. ही विचारसरणी उलट केली पाहिजे.

" तसेंच आपली कुटुंबव्यवस्था कशी असावी हें ठर-वितांना जी व्यवस्था आपला समाज परंपरेनें उत्कर्षस्थितींत राहण्यास विशेष अनुकूळ असेल, तीच स्वीकारिली पाहिजे. प्रत्येक समाज त्यांतील सर्व मनुष्यें मिळून एका वेगळ्या प्राणिकोटीप्रमाणें आहे, आणि इतर प्राणिकोटींप्रमाणें त्याचेंही अस्तित्व परंपरेनें राहणें अवश्य आहे; कारण मागें सांगितल्याप्रमाणें इतर जातींपैकीं प्रत्येक जातीचे प्राणी एक समुदायानें राहिल्यामुळें त्यांचें अस्तित्व परंपरेनें राहतें; परंतु मनुष्यजातीचें अस्तित्व वेगवेगळ्या समाजरूपानें राहतें, ह्यामुळें सृष्टींतील सर्व मनुष्यजातीची परंपरा चालत जाणें ह्मणजे तिच्या वेगवेगळ्या समाजांची परंपरा चालत जाणें होय, ह्मणून समाजाची परंपरा चालत जावयास जी कुटुंबव्यवस्था फार हितावह ती चांगली असा प्रथम सिद्धांत ठरविला पाहिजे.

" सशक्त आणि पुष्कळ मुलें होऊन तीं सर्व प्रौढ दशेंत यावीं, हा दुसरा हेतु लग्नाच्या योगानें साधला पाहिजे, व याचा उपयोग समाजाचें अस्तित्व राहण्यास विशेष

असल्यामुळें महत्वानेंही याला दुसरा नंबर देणें योग्य आहे. कोणी ह्मणतील कीं, संतति पुष्कळ असून पुनः ती सशक्तही असण्याची काय गरज आहे? कोणता तरी एक प्रकार असला ह्मणजे पुरे. हें प्रथमदर्शनीं खरें दिसतें; परंतु अनुभवावरून असें सिद्ध आहे कीं, कोणत्याही समाजांत आणि विशेषेंकरून नवीन स्थापन झालेल्या समुदायांत त्यांतील मनुष्यांची केवळ संख्या जरी अनियंत्रित वाढत गेली, तरी त्याचा उत्कर्ष होत नाहीं, परंतु प्रसंगीं त्यांचें अस्तित्व कायम राहण्याची देखील पंचाईत पडते, आणि उलट लहान मुलांच्या मृत्यूंची संख्या वाढणें हेंच त्या समाजाच्या बचावाचें साधन होतें.

" ह्याप्रमाणें प्रथम समाजाचें हित साधलें पाहिजे; त्यानंतर मुलांचें; आणि त्याच्या खालोखालची महत्वाची गोष्ट आईबापांचें स्वतःचें हित होय; ह्मणून ज्या लग्नपद्धतीच्या योगानें वरील दोन्ही परिणाम चांगले घडून शिवाय लग्न करणाऱ्या स्त्रीपुरुषांच्या शरीरास फारसा त्रास न पडतां तेही सुखाच्या आणि भरभराटीच्या स्थितींत असतात, ती लग्नपद्धति उत्तम होय.

" लग्नाचा चौथा आणि शेवटला परिणाम असा झाला पाहिजे कीं, लग्न करणाऱ्या स्त्रीपुरुषांच्या वयाच्या उत्तरार्धांत त्यांच्या मुलांनीं आनंदानें त्यांची चांगली बरदास्त ठेवावी; व हालअपेष्टा न होतां त्यांचा तो काळ सुखांत जावा. ह्यापासून त्या मुलांसही एक प्रकारचा आनंद वाटत असतो, हें आपल्या पाहण्यांत आहेच.

" हे सर्व नियम एकत्र करून पाहतां त्यापासून आपणांस असा एक उपसिद्धांत ठरवितां येतो कीं, अमुक प्रकारची लग्नपद्धति सर्वांत उत्तम असें असणें ह्मणजे तिच्या योगानें समाजाचा आणि त्यांतील मुलें व तरुण पुरुष ह्या दोहोंचाही उत्कर्ष होणें; मुलें जन्मल्यापासून प्रौढ दशेंत येतपर्यंतच्या अवकाशांतील त्यांच्या मरणाची संख्या फार कमी होणें; आणि त्यांस वाढविण्याच्या कामीं त्यांच्या आईबापांस फारच थोडा त्रास पडणें; हें त्या लग्नपद्धतीपासून साधलें पाहिजे. ह्या तिहीं गोष्टींचा मेळ तीन रीतींनीं होऊं शकतो. प्रथम मुलें होऊं लागण्यापूर्वी आयुष्याचा बराच भाग स्वतःच्या वृद्धीकडे लागला पाहिजे; दुसरें अतिशय मुलें होऊं नयेत, व जीं होतील त्यांस यथायोग्य काळजीनें आणि प्रेमानें वाढवावें; आणि तिसरें, फार वार्धक्य होईपर्यंत प्रजोत्पत्तीचा क्रम ठेवूं नये. ह्मणजे पुढें पुष्कळ दिवस सुखांत घालविण्यास सांपडतात. "

१४. " प्राणिवर्गांतील स्त्रीजातीच्या आणि नरजातीच्या अनियंत्रित शरीरसंबंधाचा, आणि त्यांच्यांतील आईबाप आणि मुलांच्या नात्यांचा विचार केला असतां हल्लींची (यूरोपांतील) कुटुंबव्यवस्था जशी सर्वांत उत्तम अशी ठरते, त्याचप्रमाणें मनुष्याच्या रानटी स्थितीचा आणि सुधारलेल्या स्थितीचा विचार केला असतां हीच व्यवस्था सर्वांत उत्तम ठरेल. रानटी लोकांत लहान मुलांच्या मृत्यूची संख्या फारच मोठी असते असें आढळतें; थोडीबहुत तरी बालहत्येची चाल त्यांच्यांत असतेच; व दुसऱ्याही कित्येक अडचणींमुळें मुलांस

अल्पवयांत मृत्यु फार येतात. किंबहुना हे सर्व प्रकार एकाच ठिकाणींही सुरू असतात. तसेंच ह्या निकृष्टाव-स्थेंतील लोकांत स्त्रीपुरुषांच्या समागमास अल्पवयांत आरंभ होऊं लागतो; अर्थात्च प्रजोत्पत्तीही लवकरच होऊं लागते; ह्यामुळें त्यांची शारीरिक स्थिति फार खराब होते. शिवाय विशेषेंकरून बायकांना अनेक प्रकारचे काबाडकष्ट करावे लागल्यामुळें प्रजोत्पत्ति व काबाडकष्ट ह्यांनीं त्यांची दुहेरी दुर्दशा होते. सुधारलेल्या लोकांत स्त्रीपुरुषांस परस्पर प्रेमसुख प्राप्त होतें तितकें त्यांस होत नाहीं; व थोडेंबहुत होतें तें अल्पकाळपर्यंत मात्र टिकतें. शेवटीं मुलांना वाढवून तीं मोठीं झाल्यावर मग जें वृद्ध मातापितरांस सुख होणार तोंवर हीं क्षीण झालेलीं आईबापें बहुतकरून मरणाच्या पथांत असतात, किंवा कोणी तरी त्यांस मारून टाकितात, अथवा त्यांचीं पोरें त्यांस सोडून देऊन विचारीतनाशीं होतात, ह्मणून त्यांची प्रकृति क्षीण होऊन त्यांत दुसरा कांहीं रोग होऊन व योग्य बरदास्त न राहिल्यामुळें हाल होऊन ते मरतात. ह्या एकंदर विचारांवरून असें दिसतें कीं, हल्लींचे* (यूरोपांतील) कुटुंबविषयक जे नियम

---

* एथें एवढें सुचविणें आहे कीं, अमेरिकेंत व यूरोपांतील देशांत जे लग्नसंबंधांत फेरफार होऊं पाहत आहेत व धर्मबंधन नाहींसें होऊन केवळ कराराचें स्वरूप लग्नास येण्याचा संभव दिसत आहे, ही स्थिति प्रशंसनीय नाहीं व ती स्पेन्सर यांस पसंत आहे असें समजूं नये. वरील उताऱ्यांतील 'हल्लींचे नियम' हे शब्द या नवीन होऊं पाहणाऱ्या स्थितीस लक्षून नाहींत.

आपण पाळितों ते नीतिदृष्ट्या सर्वोत्कृष्ट आहेत, इतकेंच नाहीं, परंतु शिवाय शारीरिक शास्त्रदृष्ट्या आणि समाजशास्त्रदृष्ट्याही ते उत्तम आहेत असें ह्मटलें पाहिजे. "

४९. हें भयंकर गृहस्थितिवर्णन आपल्या लोकांस किती अक्षरशः लागू पडतें! मातापितरांचा आणि अपत्यांचा मात्र संबंध आपल्या लोकांत निर्दयतेचा नाहीं. बाकी वरील निकृष्टावस्थेंतील गृहस्थितीचें वर्णन अक्षरशः लागू पडेल. आपल्या समाजस्थितीचें पूर्ण बिंब आपल्या विचारदर्पणांत न्याहाळून पहा, आणि ज्या पुरातन सुधारणेविषयीं आपण गर्व मानितों ती सुधारणा आपल्यांत असूनही हा आपला समज अद्याप केवळ रानटी स्थितींतच आहे किंवा नाहीं, ह्याचा निर्णय करा. ज्यांत बालवध मधून मधून होतच आहेत; स्त्रियांचें आयुष्य काबाडकष्ट व अल्पवयांत प्रजाजनन यांमुळें अगदीं अल्प झालें आहे; लहान मुलांच्या मृत्यूंची संख्या फारच मोठी आहे; स्त्रीपुरुषांचा प्रेमसंबंध ह्मणजे केवळ एकमेकांविषयीं समाधानवृत्ति असणें इतकाच ज्यांत मानितात; असा हा समाज केवळ रानटी स्थितींतच नाहीं काय? बालवध हा एक निंद्य गुन्हा आहे, परंतु तो देखील नुसत्या लोकमताच्या जोरावर बंद झाला नसून सरकारच्या दयाळू प्रयत्नांनीं कमी झाला आहे. पण ह्या कोमळ अनुकंपनीय स्त्रियांची आपणास कींव येत नाहीं, व सरकारही त्यांच्याविषयीं दयाळू होऊन कांहीं करूं शकत नाहीं. माझी पूर्ण खातरी आहे कीं, आमच्या समाजांतील दयार्द्र व समंजस मातापितरें लवकरच ही आपल्या समाजाची दुः-

स्वस्थिति नाहींशी करून टाकतील; आपल्या स्त्रियांची स्थिति वाईट आहे हें ते कबूल करतील; आणि त्याजबद्दल सुधारणा करण्याचे उपाय हल्लींच्या समाजशास्त्रांत आधारभूत मानलेल्या स्पेन्सर साहेबांनीं दर्शविलेल्या दिशेनें अमलांत आणण्याचा उद्योग करतील.

---

दिसेंबर स. १८९० त हा लेख छापला जाऊन केसरीबरोबर वाटला गेला.



# अबलोन्नतिलेखमाला.

## लेख तिसरा.

### बालविवाहापासून होणारे दुष्परिणाम व बालविवाहाचा इतिहास.

१. प्रत्येक समाजांतील लोकांच्या जशा लग्नाच्या चाली असतील त्याप्रमाणें त्या समाजाचा उत्कर्ष किंवा अपकर्ष होईल व त्या समाजांतील लोकांची शरीरस्थिति चांगली किंवा वाईट राहील, ह्या स्पेन्सरच्या सिद्धांताची परिस्फुटता सामाजिकशास्त्राधारानें मागील लेखांत झाली. तसेंच हीं दोन्ही हितें, ह्मणजे समाजहित व व्यक्तिहित, साधण्यास होतां होईल तों उशिरा लग्नें झालीं पाहिजेत, हेंही स्पेन्सरचें मत मागील लेखांत व्यक्त झालें. आतां हा सामान्य नियम आपल्या देशांस लागू करून दाखविण्याचें या लेखांत योजिलें आहे. आपल्या लोकांत बालविवाहाची चाल बरेच दिवस अमलांत आहे; तेव्हां या चालीपासून आपल्या लोकांचें समाजहित व व्यक्तिहित न साधतां उलटें आपलें अनहित झालें आहे कीं काय किंवा ह्या सिद्धांतास आपला देश अपवाद आहे, ह्याचा विचार केला पाहिजे. बाल-विवाह आपल्या लोकांत सार्वत्रिक सुरू आहे हें सिद्ध करून दाखविण्याची विशेषशी आवश्यकता नाहीं. या विष-यावर सर्व हिंदुस्थानांत बरीच चर्चा झाली असल्यामुळें ठिकठिकाणच्या विद्वानाचीं मतें प्रसिद्ध झालीं आहेत त्यांज-

वरून, काशीपासून रामेश्वरापर्यंत व सिंध देशापासून तों बंगाल देशापर्यंत सर्व जातींत बालविवाह होतात, असें म्हणण्यास अपवादक ठिकाणें व जाति थोड्याच सांपडतील. सारांश, आपल्या देशाचा एकंदर इतिहास व आपली हल्लींची स्थिति ह्यांवरून वरील नियम आपल्या देशास कितपत लागू आहे हें ठरविण्यास हरकत नाहीं; कारण ज्या चालींचे परिणाम पहावयाचे आहेत ती एकदेशीय नसून सर्व हिंदुस्थानव्यापी आहे.

## शारीरिक ऱ्हास.

२. समाजहित व व्यक्तिहित यांपैकीं प्रथम व्यक्तिहिताचा आपण विचार करूं; कारण कांहीं अंशीं समाजहिताचा विषय कठिण असून व्यक्तिहिताचा विचार झाला म्हणजे तो समजण्यास सुगम पडेल. बालविवाहापासून किंवा बालसंभोगापासून संतति अशक्त होते, हा सिद्धांत खोटा आहे असें म्हणण्यास कोणी वादी उभा राहील असें मला वाटत नाहीं. पिढ्यानुपिढ्या स्त्रीपुरुषांच्या शरीराची हानि होणें व पुढील संतति खराब निपजणें, असें होत आल्यामुळें हिंदुस्थानांतील २८ कोटी प्रजा केवळ घास म्हणजे गवत आहे, हें दयानंदाचें म्हणणें कांहीं अतिशयोक्तीचें नव्हे. प्रजाजनन होण्यापूर्वी स्त्रीपुरुषांची वाढ पूर्ण झाली पाहिजे, असें स्पेन्सर म्हणतो; डा० पीची ह्मणतात, डा० देशमुख ह्मणतात, सर्व जग ह्मणतें. निदान पुरुषांचें २५ वें वर्ष व स्त्रियांचें १६ वें वर्ष यापूर्वी त्यांची वाढ बंद होत नाहीं, व ह्मणून यापूर्वी त्यांणीं प्रजोत्प-

तीच्या उद्योगास लागतां कामा नये, अशी ओरड सुश्रुत करतात, डा० देशमुख यांणींही सुरस रीतीनें हेंच सिद्ध करून दिलें, व आपणही ब्रह्मचर्याची व बंदिस्तीची थोरवी गातों; पण इतकें असूनही आह्मी जागे कां होत नाहीं? व या चंद्रप्रकाशासारख्या विशद विषयावर इतकें कां बोलावें लागतें, व लिहावें लागतें याचा सूक्ष्म विचार केला पाहिजे. मला वाटतें आपल्या दुर्दैवानें दोन कल्पना जुन्या मताच्या लोकांच्या मनांत खिळून गेल्या असल्यामुळें बालविवाहापासून शारीरिक नुकसान अत्यन्त होतें असें त्यांचें वरपांगीं कबूल करणें व्यर्थ होऊन जातें. प्रथम बालविवाहामुळें आमच्या जुन्या कुटुंबव्यवस्थेंत बालसंभोग कधींच घडत नसत व दुसरी आमचे वाडवडील मुळींच अशक्त नव्हते. ज्या मराठे लोकांनीं हिंदुस्थान देश जिंकून मोंगल व तुर्क लोकांचा फडशा उडविला त्यांची उत्पत्ति बालविवाहापासूनच आहे, असा युक्तिवाद जुन्या मताचे लोक व पुष्कळ सुशिक्षित लोक करतात व आपल्या वाडवडिलांपासून चालत आलेल्या रीतीस मनाची कांहीं तरी समजूत करून चिकटून बसतात. अशी दृढ समजूत जुन्या मताच्या लोकांची नसती, तर मुखानें बालविवाहापासून होणारें नुकसान कबूल करून आचरणानें त्याचेंच अवलंबन करणाऱ्या, समजून उमजून अग्नींत पाय टाकणाऱ्या, हिंदुलोकांपेक्षां अधिक मूढ कोणीच नसतील असें म्हणण्याचा प्रसंग आला असता. याकरितां शारीरिक अनहितासंबंधानें विचार करतांना या दोन समजुतींचें पूर्ण निराकरण केलें म्हणजे पुरे होईल. पहिली, बालविवाहापासून

पूर्वी बालसंयोग घडत होते कीं नाहीं ! दुसरी, आमचे मराठेशाहींतील वाडवडील सशक्त होते किंवा नाहीं.

१. हिंदुस्थानांत जरी सर्वत्र बालविवाह सुरू आहेत, तथापि स्त्रीपुरुषांच्या समागमाविषयीं निरनिराळ्या चाली दृष्टोत्पत्तीस येतात. तसेंच अविभक्त कुटुंबव्यवस्था ही एकाच प्रकारची व सारख्याच जोराची सर्वत्र होती असें नाहीं. परंतु इतकें कबूल करावें लागेल कीं अविभक्त कुटुंबव्यवस्थेपासून कांहीं अंशीं बालसंयोग घडण्यास हरकत येत असे. आपण आपल्या पश्चिम हिंदुस्थानचेंच उदाहरण घेऊं. हल्लींच्या अगदीं जुन्या पद्धतीच्या अविभक्त कुटुंबांत राहणाऱ्या स्त्रीपुरुषांस स्त्रीस ऋतु प्राप्त होण्यापूर्वी एकमेकांची एकांतीं गांठ घेण्याची संधि क्वचित्च सांपडते. कुटुंबांत कर्त्या मनुष्याचा मोठा दरारा असतो. दुसऱ्या माणसांदेखत नवराबायकोचें कधींच भाषण होत नाहीं. अप्रौढ पत्नीशीं लाडक्या मुलाचा समागम व्हावा, अशी इच्छा थोडक्याच आयांस होते. त्यांचें सासूचें नातें असल्यामुळें नहाण आल्यावरही त्यांच्यासमोर सुनेस नवऱ्याकडे जाण्याची पंचाईत ! तेव्हां ऋतुप्राप्तिपूर्वी समागम होण्यास सासवांचा नेहमी विरोधच असावयाचा. कित्येक खाष्ट सासवा ऋतुप्राप्तीनंतरही पतिपत्नींचा समागम न होण्याविषयीं बंदोबस्त करतात. नणंदा तर सासवांपेक्षांही डोळ्यांत तेल घालून पाळतीवर बसलेल्या असतात, व स्त्रीपुरुषांची एकांतीं गांठ होण्याच्या वेळेस त्या आपल्या दत्त ह्मणून उभ्याच ! सारांश; अशा कुटुंबांत ऋतुप्राप्तीपूर्वी बहुतकरून स्त्रीपुरुषांचा समा-

गम होत नाहीं. जुन्या पद्धतीचीं कुटुंबें आतां जरी थोडीं राहिलीं आहेत, तथापि इंग्रजी राज्य होण्यापूर्वी सर्वत्र अशींच कुटुंबें असत, ह्मणून त्या वेळीं ऋतुप्राप्तीपूर्वी संभोग होत नसत असें ह्मणावें लागतें.

४. पण येवढें प्रतिपक्षाचें ह्मणणें कबूल केल्यानें पूर्वी बालसंभोग मुळींच घडत नसत, असें सिद्ध होत नाहीं; कारण एकत्र कुटुंबव्यवस्थेमुळें स्त्रियांना ऋतुच लौकर प्राप्त होतो, असें जर सिद्ध आहे, तर लौकर संभोग घडत असत असेंच ह्मणावें लागेल. ऋतुप्राप्ति ही पूर्ण वाढ झाल्याचें दर्शक नाहीं; पुष्कळदा अनेक मनोविकारांनीं लौकर ऋतु प्राप्त होतो. एकाच घरांत राहणें, परस्परांकडे पहाणें, परस्परांचे शब्द ऐकणें, परस्परांविषयीं मनांत विचार घोळणें इत्यादि गोष्टी स्त्रीपुरुषांची शरीरावस्था अल्पवयांत परिपक्व होण्यास कारणीभूत होतात. अशीं कचाट्यांत सांपडलेलीं वधूवरें प्रेमातिशयानेंच सुचणाऱ्या युक्तींनीं एकमेकांची एकांतांत गांठ घेतात व आपला कार्यभाग सिद्धीस नेतात. असे प्रसंग जरी फार थोडे मिळतात, तरी त्यांचा परिणाम व त्यांजविषयींचा निदिध्यास हे संतत समागमाप्रमाणेंच शरीरस्थिति बिघडण्यास कारण होतात. ह्या ह्मणण्याची सत्यता जुन्या चालीच्या कुटुंबांत राहिलेल्या पुष्कळ मनुष्यांस स्वानुभवावरून जाणतां येईल. दुसरी एक अत्यंत महत्वाची गोष्ट आपल्यास विसरतां कामा नये. तिचा परिणाम मुग्ध मुलींच्या मनावर जबरदस्त होतो व त्यामुळेंही त्यांस लवकर ऋतु प्राप्त होतो. आपल्या जुन्या कुटुंबव्यव-

स्थेत नवराबायको आपआपलीं झालीं ह्मणजे तीं निराळीं राहत नाहींत; यामुळें सर्वच मुली एके ठिकाणीं वागतात, खेळतात, गोष्टी सांगतात. त्यांत कांहीं प्रौढ व कांहीं अप्रौढ असतात. तसेंच नहाण, गर्भाधान, इत्यादि सोहाळेही फार समारंभानें व मोहक रीतीनें करण्याची चाल आपल्यांत आहे. असे सोहाळे मुग्ध मुलींच्या नजरेसमोर नेहमीं होत असल्यामुळें त्यांच्या कल्पनाशक्तीवर त्यांचा परिणाम झाल्यांवाचून राहत नाहीं. सारांश, एकपक्षीं एकत्र कुटुंबव्यवस्थेमुळें जरी स्त्रियांच्या ऋतुप्राप्तीपर्यंत स्त्रीपुरुषसमागम होण्यास अनेक अडचणी असतात, तरी दुसऱ्या पक्षीं एकत्र वास व मोहक वैवाहिक समारंभ इत्यादि अनेक मन बिघडविणारीं साधनें एकत्र कुटुंबांतच असतात व त्यामुळें मुलींस लौकर ऋतु प्राप्त होण्यास फार मदत मिळते.

५. वरील वर्णन साधारण मध्यस्थितींतील कुटुंबांचें आहे. श्रीमंत कुटुंबांची गोष्ट याहून अगदीं भिन्न आहे व अशा लोकांत मुग्ध पतिपत्नीस परस्परप्रीतीचा आस्वाद घेण्यास फारच थोड्या अडचणी असतात. अगोदर सुख किंवा चैन अधिक व इतर व्यासंग कमी, यामुळें कामवासनेचें बीज लवकरच अंकुरित होतें, त्यांत मोठमोठे वाडे, चाकरमाणसें, वडील माणसांचें दुर्लक्ष्य इत्यादि अनेक गोष्टी त्यांस अनुकूल असतात, व त्यामुळें अल्पवयांत स्त्रीपुरुषांचे समागम श्रीमंत लोकांत होतात. ही गोष्ट अलीकडेच अनुभवास येते, असें नाहीं. काव्येतिहाससंग्रहांत प्रसिद्ध झालेल्या नानाफडनविसांच्या आत्मचरित्रांत अशाच प्रकारच्या

कांहीं गोष्टी लिहिल्या आहेत; त्यांवरून वरील ह्मणण्याची सत्यता सहज लक्षांत येईल.

पूर्वीच्या काळच्या श्रीमंत लोकांत काय व हल्लींच्या काळच्या श्रीमंत कुटुंबांत काय, जसे स्त्रीपुरुषसमागम फार लवकर घडतात, तसेच पूर्वी व हल्लीं द्वितीय वर ह्मटले ह्मणजे अप्रौढस्त्रीकुसुमांचे अगदीं ठराविक भोक्ते आहेत, असें ह्मणावें लागतें. बालविवाहाच्या चालीमुळें बिजवरास मोठ्या नवऱ्या मिळत नाहींत; ह्या घोडनवऱ्यांस पुष्कळ काळपर्यंत आत्मसंयमन करवत नाहीं, व ते बहुतकरून कुटुंबांत कर्ते असल्यामुळें त्यांच्या मनाप्रमाणें सर्व गोष्टी साहजिक घडून येतात. या तिन्ही कारणांमुळें द्वितीय वरापासून मुग्ध वधूस त्रास पोंचल्यावरून राहत नाहीं; व अशा संबंधांत बहुतकरून मुलीस लवकरच ऋतु प्राप्त होतो.

६. श्रीमंत वर व द्वितीय वर यांचे संबंध असें हानिकारक होतात, ही गोष्ट मागील काळास व या काळास सारखीच लागू आहे. अल्प वयांत संभोग न होण्याचें जें कारण वडिलांचा धाक, तें त्यांच्या ठिकाणीं असत नाहीं. इतर वधूवरांना ऋतुप्राप्तीपर्यंत समागम होण्यास पूर्वीच्या कुटुंबावस्थेंत अडचणी असत, परंतु त्याच कुटुंबावस्थेमुळें मुलीस लवकर ऋतु प्राप्त होत असे. सारांश, पूर्वीही एकंदर आपल्या समाजांत बालसंभोग पुष्कळ घडत असत असें ह्मणावें लागतें. हीच गोष्ट इतर हिंदुस्थानच्या भागांस कमीजास्ती प्रमाणानें लागू पडते. बंगालदेशांत बालविवाहाचें प्रस्थ पूर्वीपासून फारच आहे, व तिकडे

ऋतुप्राप्तीपूर्वी संभोग होण्यास आपल्या इकडल्यासारख्या कधींच अडचणी नव्हत्या. संमतिवयासंबधानें जो वाद-विवाद झाला त्यांत सर रोमेशचंद्र यांणीं धडधडीत कबूल केलें आहे कीं, लग्न झालेली मुलगी सासरीं आली म्हणजे तिला नेहमीं नवऱ्याशेजारीं एक शय्येवर निजावयास लाव-तात. अशा कुटुंबावस्थेपासून बालसंभोग घडत नाहीं, असें सर रोमेशसारख्या स्वमताभिमानी पुरुषाखेरीज दुसरा कोण प्रतिपादन करील? नुसतें एकत्र कुटुंबांत राहिल्यापासून मनोविकार प्रबल होतात. मग एकांतांत एकशय्यारोहणापा-सून मनोविकार किती प्रबळ होतील! बंगाली लोकांत ही चाल आहे, हें आपल्यास माहीत झालें असूनही आम-च्यांत हानिकारक बालविवाह नाहींत, असें प्रतिपादन करणें किती हटवादाचें आहे? उत्तर हिंदुस्थान, पंजाब, मध्यप्र-देश वगैरे देशांत कांहीं जातींत मुलींस ऋतु प्राप्त होईपर्यंत सासरीं पाठवावयाची नाहीं, असा संप्रदाय आहे, यामुळें त्या लोकांत बालविवाहापासून होणारे शारीरिक परिणाम कमी दृष्टीस पडतात; परंतु ते अगदींच नाहींत असें म्हणतां येत नाहीं, कारण मुग्ध व प्रौढ मुली एकत्र राहणें, मुग्ध मुलींच्या नजरेस प्रौढ मुलींचे सोहळे पडणें, इत्यादि मनोविकार जागृत करणारीं कारणें त्या लोकांतही आहेतच. सारांश, बालविवाहापासून जुन्या तऱ्हेच्या कुटुंबावस्थेंत सर्व हिंदु-स्थानांत अल्पवयांत ऋतु प्राप्त होणें व बालसंभोग घडणें, ह्या हानिकारक गोष्टी पूर्वीपासून आहेत असें कबूल करावें लागतें.

७. बालविवाहापासून मुलीस लवकर ऋतु प्राप्त होतो ही गोष्ट कदाचित् कांहीं वाचकांस संमत होणार नाहीं, व कांहीं थोड्या जातींस ही गोष्ट पूर्णपणें लागूही नाहीं. पण काशीपासून रामेश्वरापर्यंत व कुळंब्यापासून ब्राह्मणापर्यंत सर्व लोकांत वधूवरें व मातापितरें वधूस ऋतु प्राप्त होण्याची केवळ वाट पहात बसलीं असतात; व ऋतु प्राप्त झाला कीं स्त्रीपुरुषाचा नैसर्गिक व्यवहार लागलीच सुरू होतो ही गोष्ट निर्विवाद आहे. वैद्यशास्त्रदृष्ट्या रजोदर्शन हें पूर्ण वाढीचें दर्शक नाहीं व रजोदर्शनानंतर सृष्टिक्रम लागलीच सुरू होणें हानिकारक आहे. कांहीं काळ गेल्याशिवाय स्त्रियांस पत्नीत्वाचें नातें पूर्ण कळत नाहीं व मनापासून आवडतही नाहीं. कामशास्त्रज्ञत्वाचा तोरा मिरविणाऱ्या लोकांनीं यासंबंधानें कांहींही ह्मटलें व या मताचा कितीही उपहास केला, तरी प्रत्येक समंजस मनुष्य ही गोष्ट कबूल करील; व ती प्राच्य व पाश्चात्य वैद्यग्रंथांसही मान्य असून अनुभवावरूनही सिद्ध आहे. साहेब लोकांत लग्न झाल्यावर बहुतकरून एक वर्षांत मूल होतें व आपल्यांतही ऋतु प्राप्ति लवकर झाली तरी साधारण सोळाव्या वर्षापुढें स्त्रियांस मुलें होतात. तेव्हां ऋतुप्राप्तीनंतर तात्कालिक संभोग जर आपल्या देशांत सर्व ठिकाणीं सर्व जातींत सुरू आहेत, तर आपल्या लोकांत बालसंभोग नाहींत हें ह्मणणें कितपत टिकेल ?

८. मनुष्यस्वभावांत सुवासना जशी नैसर्गिक आहे, तशी दुर्वासनाही अयत्नसिद्ध भरलेलीच आहे. दारिद्र्यानें किंवा

आपआपले अधिकार फार लवकर समजू लागतात व त्यांच्याकडूनही बालसंभोगाकडे साहजिक धांवणाऱ्या प्रवृत्तींचा प्रतिबंध होत नाहीं. तिसरें, अविभक्त कुटुंबांची राहटी मोडून स्वतंत्र राहण्याची चाल अडचणीमुळें असो किंवा कोणत्याही कारणामुळें असो, थोडथोडी अमलांत येत चालली आहे. उदाहरणार्थ, पुष्कळ तरुण मुलांस आपल्या अल्पवयी बायकांस घेऊन दूरदेशीं स्वतंत्र रहावें लागतें. अशा कोंवळ्या मुलींवर पत्नीत्वाचा व नोकरीचा बोजा एकदम पडल्यामुळें तिच्या शरीरस्थितीची फारच दुर्दशा होते व तरुणपणांतच तिच्या मुद्रेवर म्हातारपणाचीं चिन्हें दिसूं लागतात. सारांश, पूर्वीकदाचित् आपल्यांत बालसंभोग नव्हते असें जरी मानलें, तरी हल्लींच्या काळांत मुलांच्या अधिक महत्वामुळें, अधिक सज्ञानतेमुळें व अधिक स्वतंत्र राहण्याच्या प्रवृत्तीमुळें बालविवाहापासून होणारे बालसंभोगादि शरीरहानिकारक दुष्परिणाम जोरावत आहेत. पण पूर्वी बालविवाह नव्हते काय? पूर्वी बालसंभोग कोठें घडत होते? इत्यादि युक्तिवाद करून सद्यः—स्थितीचा विचार न करितां या भयंकर परिणामांकडे आह्मी दुर्लक्ष करितों; किंवा जाणूनबुजून डोळ्यांवर कातडें ओढतों, हें आमचें दुर्दैव आहे.

१०. येथें वाचक अशी शंका घेतील कीं, हें विवेचन मध्य स्थितींतील किंवा श्रेष्ठ स्थितींतील हिंदु लोकांस लागू आहे, पण शेतकरी, मजूर वगैरे हिंदु लोकांत यद्यपि ' यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरो जनः ' या न्यायानें बाल-

विवाह जारी असले, तथापि त्या लोकांस वरील विवेचन लागू पडत नाहीं. माझ्या मतें या लोकांत बालसंभोगादि दुष्ट सांप्रदाय व परिणाम पहिल्यापासून आहेत; कारण बहुतकरून अशा कुटुंबांत प्रत्येक मनुष्य मिळविता असतो, व त्याचें महत्व अशा लोकांत पूर्वीपासूनच अधिक असतें. याशिवाय वडिलांच्या मर्यादेचें निर्बंधन या लोकांत कमी असतें. सारांश, खालच्या प्रतीच्या लोकांत बालविवाह जेथें जेथें होतात तेथें तेथें बालसंभोग घडण्यास मुळींच कधींही हरकती नव्हत्या.

११. अहो, पण हें तुमचें लांबलचक विवेचन व्यर्थ कंठशोष नव्हे काय? पहिल्यापासूनच शेतकरी, मजूर वगैरे लोकांत बालसंभोग आहेत; पण मावळे लोकांनीं व मराठे लोकांनीं शेंकडों लढाया मारल्या, मुसलमानांस जेरीस आणलें, स्वराज्य स्थापन केलें, त्या लोकांवर बालविवाह, बालसंभोग, इत्यादि जाड शब्दांचा काय परिणाम झाला व हल्लींही दोन दोन मण ओझें तटकन् उचलून घेऊन ताठ चालणाऱ्या मजूरदार लोकांस बालविवाहानें काय धाड झाली आहे? तसेच शिवाजी, बाजीराव, परशुरामभाऊ पटवर्धन इत्यादि अलौकिक शक्ति व धैर्याचे लोक बालविवाहापासूनच उत्पन्न झाले हें कसें? ज्या गृहस्थानें घोड्यावर बसून शेंकडों कोस दौड केली व वरच्यावर ज्वारीचे मुट्टे हातावर चोळून दिवसांचे दिवस काढले, त्या गृहस्थास इतकी शक्ति कोठून आली व कशी राहिली? आतां तुह्मांस खावयास मिळत नाहीं, तुह्मी धर्म बाळगीत नाहीं,

तुह्मी परतंत्र झालांत ह्मणून तुह्मी निःशक्त, निस्तेज झालांत; त्याचा दोष बालविवाहावर टाकतां काय ? इत्यादि आक्षेप जुन्या मताचे लोक घेतात.

या प्रश्नाचा विचार फार सूक्ष्म रीतीनें व निरभिमान बुद्धीनें केला पाहिजे. आमचे पूर्वज पेशवाईच्या वेळेस फार सशक्त होते ही कल्पना आपल्या स्वदेशप्रीतीस योग्य आहे, परंतु सत्यास अनुसरून नाहीं असें मला वाटतें. आपले लोक पेशवाईचे वेळेस जर्मन लोकांसारखे धिःपाड, इंग्लिश लोकांसारखे हाडानें मोठे, अफगाण व आरब लोकांसारखे ताकतदार खचित नव्हते. मुसलमान लोकांचा पराभव करून मराठ्यांनीं स्वराज्य स्थापिलें ही गोष्ट खरी; परंतु त्या वेळेस मुसलमान लोकांतही आपल्यासारखे बालविवाह जारीं झाले होते; मुसलमानांची संख्या आपल्यापेक्षां फारच कमी होती; व दोनशें वर्षांच्या बादशाही ऐषआरामानें त्यांच्या शक्तीचा अगदीं ऱ्हास झाला होता. अशा लोकांस मराठे लोकांनीं जिंकलें यांत आश्चर्य नाहीं; पण जेव्हां खऱ्या अफगाण लोकांशीं प्रसंग पडला, तेव्हां आपल्या लोकांचें शरीरसामर्थ्य कसोटीस लागलें. ज्या रणभूमीवर भीम, कर्ण इत्यादि महायोद्ध्यांनीं अलौकिक शरीरसामर्थ्याचीं कृत्यें केलीं, ज्या रणक्षेत्रांत पृथ्वीराजानें सन ११०० त अबदालीच्या अफगाण लोकांच्या पूर्वजांस दोनदा जेरीस आणलें. त्याच रणांगणांत सन १७६१ त हजारों मराठे लोकांच्या रक्ताचा पूर वाहला ! हातघाईच्या लढाईंत अफगाणबाहूच्या शक्तीपुढें मराठ्यांच्यानें टिकाव

धरवेना. त्यांनीं शेवटीं पळ काढला, आणि त्यांस गवता-सारखें अफगाण लोकांनीं कापून काढलें, इत्यादि हकीकत वाचून आपलें हृदय करपून जातें आणि आपले लोक अफगाण लोकांपेक्षां शरीरानें अशक्तच होते असें कबूल करावें लागतें.

१२. मनुष्याचें शरीर अनेक कारणांनीं बळकट होतें. स्वतंत्रता व स्वास्थ्य, मांसाहार, प्रौढवयांत विवाह करणें, हरएक प्रकारच्या व्यायामाची हौस, व मेहनत, इत्यादि अनेक कारणांनीं शरीरसामर्थ्य वाढवितां येतें, हें आपण पाहतों. याच साधनांचें सेवन तालीमबाज लोक करतात. यापैकीं एकही गोष्ट कमी असली तर त्याच मानानें शरीर-सामर्थ्य कमी होईल. जर तालीम करणारा मनुष्य सशक्त व प्रौढ मातापितरांच्या उदरीं आलेला नसेल, तर तो हाडा-पिंडानें कधींही मोठा होणार नाहीं व कितीही व्यायाम केला व कितीही खुराक खाल्ला तरी, सर्व साधनें ज्यास अनुकूल आहेत, त्याची शक्तीनें बरोबरी करूं शकणार नाहीं. इंग्रजी राज्य झाल्यापासून आम्ही या सर्व साधनांस एकदम मुकलों, हें निर्विवाद आहे. दारिद्र्य, उदरनिर्वाहाकरितां होणारे कष्ट, परवशतेचें औदासिन्य, यामुळें अलीकडे आमच्या शक्तीचा एकदम ऱ्हास झाला आहे लढाईचे, व दंग्याधोप्याचे प्रसंग अगदीं नाहींसे झाले, सर्वत्र शांतता झाली, आगगाडी, तारायंत्र, वगैरे सुखाचीं व आरामाचीं साधनें सर्व ठिकाणीं प्रसृत झालीं; सर्व लोक निःशस्त्र झाल्यामुळें सर् फेरोजशहा मेथा यांच्या ह्मणण्याप्रमाणें हिंदुलोक खच्ची झाले. या सर्व कारणामुळें, व प्रौढविवाह हे आह्मांत पूर्वीपासून बंद अस-

त्यामुळें, शक्ति उत्पन्न करणाऱ्या सर्व साधनांस आम्ही मुकलों व गेल्या ५० वर्षांत तर अगदीं निःशक्त पाण्याचीं पितरें बनलों आहों. आतां आम्हांस आमच्या पूर्वजांच्या सामर्थ्याचें मोठें आश्चर्य वाटतें. अमक्यानें हा खांब एकट्यानें उचलून आणला; आमचे आजे एका दिवसांत पुण्याहून जाऊन येत असत, म्हणजे १४ तासांत ४० कोस जमीन चालत असत; धोंडभटानें वाड्याचा खांब उचलून त्याच्या खालीं जाजम सारिलें, वगैरे पूर्वजांचे धन्यवाद आम्हीं गातों. आमचे पूर्वज नेटानें पानिपतच्या लढाईत ठाम उभे राहून अफगाणांसमोर लढले व मुहूर्तपर्यंत तरी त्यांस त्यांनीं जेरीस आणिलें; पण हल्लीं एकाद्या गांवांत फेरी करणारा एखादा पिसाट हिंगविक्या अफगाण बिथरला तर गांवचा गांव ओसाड टाकून आम्ही पळून जातों. सारांश, आमच्या हल्लींच्या मानानें आमचे पेशवाईतील पूर्वज फार बळकट होते, ह्यांत कांहीं संशय नाहीं. पण अशा दिशेनें विचार करतां कामा नये. आमच्या पूर्वजांची व अफगाण, आरब, जर्मन, इंग्लिश इत्यादि इतर देशांतील लोकांची तुलना केली पाहिजे. अशी तुलना केली म्हणजे आपले पूर्वज या लोकांपेक्षां कमी बळकट होते, असें इतिहासदृष्ट्या कबूल करावें लागेल. आमचे पूर्वज अगदीं अशक्त होते असें नाहीं. स्वतंत्रता, खाण्याची सुबत्ता, व्यायामाची हौस व दंग्याधोप्याचे प्रसंग यामुळें शक्ति येऊन ती नेहमीं त्यांच्यांत जागृत राहत असे; परंतु प्रौढविवाह हें एक साधन कमी पडल्यामुळें इतर लोकांपेक्षां ते कमी सशक्त असलेच पाहिजेत, हें अनुभवानें सिद्ध आहे. इतकेंच नाहीं, तर

प्रत्यक्ष इतिहासाच्या अनुभवावरूनही सिद्ध आहे. सारांश, हाडाचा मोठेपणा शरीराची उंची, इत्यादि गोष्टी सामर्थ्यसूचक आहेत व ह्या गोष्टींत आपले पूर्वज इतर प्रसिद्ध लोकां-पेक्षां कमी होते, असें कबूल केलें पाहिजे. मराठे लोकांनीं मुसलमानांस जिंकून हिंदुराज्य स्थापिलें, येवढ्यावरूनच आपल्या समतोल दृष्टीस स्वदेशप्रीतीचें खोटें पटल झांकून टाकण्याचा यत्न करितें, परंतु आपल्यास सारासार विचार केला पाहिजे; आपली व पाश्चात्य लोकांची तुलना केली पाहिजे व आपला कमीपणा उदार बुद्धीनें व शहाणपणानें कबूल केला पाहिजे.

१९. पूर्वी बालविवाहापासून होणाऱ्या बालसंयोगास कांहीं हरकती असत, त्या ब्रिटिश राज्याच्या अमलाखालीं नाहींशा झाल्या व तेणेंकरून बालसंयोग अनियंत्रित होऊन प्रजा अशक्त होत चालली आहे, हें प्रथम प्रश्नाचा विचार करितांना आपल्या नजरेस आलें, व तीच गोष्ट दुसऱ्या प्रश्नाची आहे. पूर्वी मराठेशाहींत बालविवाहामुळें जरी प्रजा अशक्त होती, तरी दुसऱ्या कारणांनीं लोकांच्या शक्तीचा पूर्ण ऱ्हास होण्यास अडथळा होत असे. दंगधोपे असल्या-मुळें शक्तीची सर्वांस अवश्यकता असे. शस्त्रें असल्यामुळें व्यायाम करण्याची हौस असे. स्वतंत्रता असल्यामुळें व खाण्यास पुरे असल्यामुळें, देह निष्काळजीपणांत पुष्ट होत असे; परंतु आतां त्यांपैकीं एकही गोष्ट राहिली नाहीं, व बालविवाहापासून होणाऱ्या शारीरिक ऱ्हासांमध्यें दुसऱ्या कार-णांपासून होणाऱ्या शारीरिक ऱ्हासाची भर पडत चालली आहे.

सारांश, हल्लींच्या स्थितींत आह्मांस चोहोंकडून नुकसान पोचत आहे व आपल्यास या शारीरिक ऱ्हासाच्या पुरास बांध घातला पाहिजे. पूर्वी बालसंभोग होत नव्हते व पूर्वीचे आमचे लोक अशक्त नव्हते इत्यादि वडिलांच्या कीर्तीवर आपण अवलंबून राहतां कामा नये. येथवर जुन्या मताच्या मुख्य दोन समजुतींचा विचार केला; आतां कांहींच्या आणखी दोन कमी महत्वाच्या समजुती आहेत त्यांचा विचार करूं.

१४. पुष्कळ लोकांचें असें ह्मणणें आहे कीं, बालविवाहापासून शारीरिक अनिष्ट परिणाम होतात हें कबूल आहे, परंतु वधूवरांचीं लग्नें उशिरां केलीं तरी तिकडूनही नुकसान होतें. या देशाच्या उष्ण हवेमुळें स्त्रीपुरुषांस लवकर कामवासना उत्पन्न होते; यामुळें लवकर लग्न न केलें तर मुलें दुर्मार्गास लागतात व शरीराची हानि करून घेतात व मुलींस क्षयादि भावना होतात. सारांश, इकडे आड आणि तिकडे विहीर असें होतें. अशा स्थितींत मुलांचीं व मुलींची लवकर लग्नें करणेंच चांगलें; कारण उशिरां लग्नें केल्यापासून नीति व शरीर दोहोंचीही हानि होते. हें ह्मणणें प्रथमदर्शनीं सयुक्तिक दिसतें व मुद्दाम उशिरा लग्नें केल्यामुळें मुलांची नीति व शरीरप्रकृति बिघडल्याचीं उदाहरणें मीं पाहिलीं आहेत. सदरील आरोप रा० मोडक यांणींही आपल्या निबंधांत कबूल केला आहे. मात्र त्यांचें ह्मणणें असें आहे कीं, उशिरां लग्नें केल्यापासून होणाऱ्या नुकसानापेक्षां बालविवाहापासून होणारें नुकसान अधिक आहे. व्हान्हरनियर ह्मणून

एक इटालियन गृहस्थ अकबराच्या वेळीं हिंदुस्थानांत फिरावयास आला होता, त्यानेंही आपल्या प्रवासाच्या हकीकतींत असें लिहिलें आहे कीं, "हिंदुलोकांत फार लहानपणीं मुलांमुलींचीं लग्नें करतात; त्या लोकांची अशी समजूत आहे कीं, असें न केलें तर तीं बिघडून जातात." परंतु पूर्ण विचार केला तर ही समजूतच आहे, असें ह्मणावें लागेल; कारण उशिरां लग्नें केल्यापासून इतर देशांत वधूवरांची नीति व शक्ति बिघडली आहे, असें आपल्यास दिसत नाहीं. मुलें बिघडल्याचीं प्रत्यक्ष उदाहरणें आहेत याचें कारण भिन्न आहे. कांहीं काळपर्यंत हें असें होणारच; जर १०० मुलें व मुलींतून ९९ चीं लग्नें लौकर होतात, जर मुलींस लवकर ऋतु येऊन त्यांचें समागम सुरू होतात; तर अशा स्थितींत एकाचें लग्न उशिरां होणें व त्यानें आपल्या इष्टमित्रांची चैन स्वतः इंद्रियनिग्रह करून पहात बसणें, हें कसें संभवेल? पाश्चात्य समाजस्थितीचा विचार केला तर विवाहित व अविवाहित मुली किंवा पुरुष एकत्र वागत नाहींत; यामुळें अविवाहितांचें चित्त बिघडण्यास पुष्कळ प्रत्यवाय येतो. तसेंच आपल्या इकडेही जर उशिरां लग्नाची चाल सार्वत्रिक झाली तर असे समवयस्कांच्या समागमापासून होणारे मनाचे विकार बंद होऊन शरीराचें व नीतीचें नुकसान होणार नाहीं, असें वाटतें. हवा उष्ण हवा उष्ण म्हणून आपण ओरडतों, पण ही उष्ण हवा काय हिंदुस्थानच्याच बोकांडीस बसली आहे? आरबस्तान, आफ्रिका, स्पेन वगैरे देशांत बालविवाह आवश्यक झाले नाहींत. पूर्वीच्या काळीं बायकांस लवकर ऋतु येत

नसत, अशी आमच्या लोकांची समजूत आहे. तेव्हां हवा कोठें गेली होती? सारांश, जरी कांहीं अंशीं हिंदुस्थानच्या उष्ण हवेपासून हिंदुलोकांच्या शरीरावर अनिष्ट परिणाम घडतात, तरी हवेच्या सबबीनें बालविवाहास चिकटून बसणें हें मला बरोबर वाटत नाहीं.

१९. कांहीं लोकांची दुसरी अशी कल्पना आहे कीं, मुलीची वाढ सासरीं जशी होते तशी माहेरीं होत नाहीं. हल्लींच्या स्थितीच्या मानानें ही गोष्ट कांहीं अंशीं खरी आहे. मुली सासरीं असतात तेव्हां त्यांना काम करावें लागतें; वेळच्या वेळीं खावयास मिळतें; त्यांचें अद्वातद्वा वर्तन बंद असतें, यामुळें कांहीं अंशीं त्यांची प्रकृति चांगली राहण्यास मदत होते. मुली माहेरीं आल्यावर आईबापांस असें वाटतें कीं दोन दिवस मुली त्रासांतून सुटल्या आहेत; यामुळें त्यांचे लाड होतात; त्या स्वछंदीपणानें खेळतात; वाटेल तें खातात व काम मुळींच करीत नाहींत. इत्यादि कारणांमुळें शरीराच्या सुस्थितीस अनेक अडथळे येतात. पण याज-वरून सासरींच मुली चांगल्या वाढतात असें ठरत नाहीं. जर सर्वांचींच लग्नें उशिरां होतील तर सुनांच्या ऐवजीं मुलींस काम करावें लागेल, व हल्लीं मातापितरें जितके लाड करतात तितके न करितां मुलींच्या प्रकृति चांगल्या राहाव्या व त्यांस नवरा चांगला मिळावा, म्हणून अधिक जपतील, व मुलींची वाढ माहेरीं चांगली होईल. परंतु याहूनही एक सूक्ष्म गोष्ट अशी आहे कीं मुली सासरी चांगल्या होतात,ही गोष्ट दर्शनी आहे. त्यांची खरी वाढ सासरीं होतच नाहीं. उंची व हाडाचा

मोठेपणा सासरीं वाढत नाहीं. सासरीं राहिल्यापासून कामवासना जागृत होऊन मुलींना लवकर ऋतु प्राप्त होतो, हें वर निर्दिष्ट झालेंच आहे. यामुळें मुलींच्या शरिराची वाढ सासरीं होते, ती केवळ त्या दिशेची होते; व खऱ्या वाढीचा व या शारीरिक सुस्थितीचा विरोध आहे, हें वैद्यशास्त्रदृष्ट्या सहज समजून येईल. तोंडावर ठवटवी येणें, स्तनोद्गम होणें, श्रोणीभाग विस्तृत होणें, इत्यादि लक्षणांस वाढ समजून जों जों ही कल्पना आह्मांस अधिकाधिक खरी वाटते, तों तों मुलींस माहेरीं राहूं न देतां त्यांस सासरीं ठेवण्याचा आपण यत्न करितों व बालसंभोगास उत्तेजन देऊन लोकांच्या शारीरिक ऱ्हासांत भरच पाडीत चाललों आहों, हें आमचें दुर्दैवच समजलें पाहिजे.

## राष्ट्रीय अवनति.

१६. वाचकहो! पृथ्वीच्या नकाशाकडे दृष्टी द्या आणि आज आठशें वर्षेपर्यंत पारतंत्र्याच्या पंकोदधींत लोळणारे देश किती आहेत याचा विचार करा. मला वाटतें हिंदु लोकांशिवाय दुसरे कोणतेही लोक पृथ्वीतलावर असे दुर्दैवी सांपडणार नाहींत. बरें, बालविवाहाची चाल ज्या लोकांत आहे, असे तरी किती लोक आहेत व त्यांची राजकीय स्थिति कशी आहे, याची चौकशी करा. या गणनेंतही हिंदु लोकांचें नांव कनिष्ठिकाग्रीं बसलेंच. पण इतिहासप्रसिद्ध दुसरा एखादा समाज नजरेस येता तर त्याच्या व हिंदुस्थानच्या राजकीय स्थितीची तुलना करून

पाहिली असती, व बालविवाहाचा व पारतंत्र्याचा जो अवि- वार्य संबंध दिसत आहे त्याच्या सत्यासत्यतेचें प्रत्यंतर पाहण्यास बरें पडलें असतें. असो. दुसरे लोक व दुसरा देश जरी आपल्यास प्रत्यंतरास सांपडत नाहीं तरी बाल- विवाहाचा व आपल्या हल्लींच्या पारतंत्र्याचा कार्यकारण- संबंध आहे असें पृथ्वीच्या नकाशाचें व इतिहासाचें मनन केलें असतां वाटल्यावांचून राहत नाहीं.

१७. थोडा विचार केला तर हा सकृद्दर्शनीं चमत्का- रिक वाटणारा सिद्धांत चमत्कारिक नाहीं असें दिसून येईल. सामाजिक सुस्थिति विवाहपद्धतीवर अवलंबून असते हें स्पेन्सरचें मत पूर्वी निर्दिष्ट केलेंच आहे. अनेक लोकांच्या तुलनेवरूनही हें मत सिद्ध होतें. पूर्वीच्या बार्बेरियन लोकां- वर ग्रीक लोकांनीं जें वर्चस्व संपादन केलें, त्याचे एक कारण ग्रीक लोक आपल्या बायकांस गुलामाप्रमाणें न मानतां आपल्या बरोबरीच्या व संसाररहाटींत सहाय्यकारिणी आहेत असें मानीत हें होय, असें अरिस्टाटलचे मत आहे. एका रोमन ग्रंथकाराचें असें ह्मणणें आहे कीं, "रोमन लोक आपल्या स्त्रियांस ग्रीक लोकांपेक्षां अधिक चांगल्या रीतीनें वागवितात म्हणूनच ग्रीक लोकांच्या सुधारणेपेक्षां रोमन लोकांची सुधारणा अधिक बलवान् आहे." एका लहानशा शहरापासून वाढत सर्व ज्ञात जगाच्या आधिपत्यास रोमन लोक चढले, व "ज्याप्रमाणें रोमन लोकांची उन्नति विस्मयकारक आहे, त्याप्रमाणेंच त्यांची अवनतीही फार हृदयद्रावक आहे." पण रोमन लोकांच्या भरभराटीच्या

वेळीं त्यांच्या स्त्रियांच्या अंगीं जें पातिव्रत्य व जें स्वावलं-बन होतें तेंच त्यांच्या अवनतीच्या वेळेस नाहींसें होऊन त्याच्या ऐवजीं दुराचार व स्वच्छंदीपणा हे गुण वास करूं लागले. " प्युनिक वार्स नंतर लवकरच रोमन लोकांच्या नीतिमत्तेची इमारत पूर्णपणें ढांसळून गेली, आणि हीच गोष्ट त्यांच्या लोकसत्तात्मक राज्याच्या नाशास कारणी भूत झाली. " बार्बेरियन लोकांस ग्रीक लोकांनीं जिंकलें, ग्रीक लोकांस रोमन लोकांनीं पादाक्रांत केलें, रोमन लोकांचा विध्वंस जर्मन लोकांनीं केला. जशी बार्बेरियन लोकांपेक्षां ग्रीक लोकांत स्त्रियांची स्थिति चांगली होती, जशी ग्रीक लोकांपेक्षां रोमन लोकांत स्त्रियांची स्थिति चांगली होती, तशीच रोमन लोकांपेक्षां जर्मन लोकांच्या स्त्रियांची थोरवी इतिहासांत अधिक वर्णिली आहे. ज्या काळांत जर्मन लोक अरण्यांत वास करीत असत, त्या वेळीं देखील जर्मन लो-कांची वैवाहिक नीति इतकी उत्तम होती कीं, रोमन इति-हासकार टासिटस यानें जर्मन स्त्रियांची फारच प्रशंसा केली आहे. सर्व पृथ्वीतलावर जेव्हांपासून इतिहास उप-लब्ध आहे, तेव्हांपासून आजपर्यंत जर्मन लोकांस कोणीही जिंकिलें नाहीं. राष्ट्रमालिकेंत जसा हिंदु लोकांचा स्वतं-त्रतेसंबंधानें शेवटचा नंबर आहे, तसाच जर्मन लोकांचा पहिला नंबर आहे. रोमन लोकांच्या सार्व-भौमत्वाच्या जोराखालीं त्यांणीं आपली मान कधींही वांक-विली नाहीं व सरते शेवटीं त्यांच्या गर्वाचा उच्छेद त्यांणींच केला. सातव्या शतकांत धर्मश्रद्धेच्या उन्मादानें खवळलेले आरब लोक आपल्या मरु देशांतून बाहेर पडले व एकाद्या

प्रचंड पुराप्रमाणें सिरिया, इजिप्त, आफ्रिका, स्पेन वगैरे देशांवर पसरून पिरिनीज ओलांडून गेले; व आतां भूमध्यसमुद्रास वळसा घालतात कीं काय असें भासूं लागलें. "ही धाड इंग्लंड देशापर्यंत पोंचली असती, तर आज कदाचित् आक्सफर्ड येथील विद्यालयांत व देवालयांत सुंता झालेल्या लोकांपुढें कुराणाच्या तत्वाची चर्चा चालली असती." ज्या आरब लोकांचा पराभव हिंदुस्थानापासून तों आटलांटिक महासागरापर्यंत झाला नाहीं, त्यांस चार्लस मार्टेलनें व त्याच्या जर्मन लोकांनीं जमीनदोस्त केलें. लायर नदीच्या कांठीं जो जबरदस्त युद्धप्रसंग झाला, त्याजवर एकंदर जगाच्या इतिहासाचें स्वरूप अवलंबून होतें; व युरोपखंडांतील जर्मन लोक व आशिया खंडांतील आरब लोक पृथ्वीच्या आधिपत्याकरितां जिवावर उदार होऊन तयार तयार झाले. "परंतु सातव्या दिवसाच्या तुमुल युद्धांत जर्मन लोकांच्या सामर्थ्यापुढें व धिप्पाड शरीरांपुढें प्राच्य लोकांच्यानें टिकाव धरवला नाहीं." याचप्रमाणें दहाव्या शतकांत हन्स लोकांच्या स्वाऱ्यांनीं युरोपखंडास त्राहि त्राहि करून सोडलें; परंतु युरोपांतील ख्रिस्ती राष्ट्रांची सुटका ओथो धि ग्रेट व हेन्री धि फाउलर या जर्मन राजांनीं केली. पुनः पंधराव्या शतकांत टर्कस लोकांनीं कान्स्टांटिनोपल जिंकून रोमन बादशाहीचा बहुतेक वाळलेला वृक्ष उलथून पाडला व ही लाट आरब लोकांच्या स्वारीप्रमाणें युरोपावर पूर्वेकडून पसरत चालली; परंतु प्रेग येथील लढाईत जर्मन लोकांच्या पराक्रमरूपी पाषाणावर ही लाट फुटून गेली. सारांश, आजपर्यंत जर्मन लोकांवर अनेक प्रचंड स्वाऱ्या झाल्या; पण त्या सर्वांस तोडून जर्मन

लोकांनीं आपली स्वतंत्रता कायम राखिली. आजमितीस याच जर्मन लोकांच्या शाखांनीं इंग्लंड, फ्रान्स, आस्ट्रिया व अमेरिकेंतील युनाइटेड्स्टेट्स हीं बलिष्ठ राष्ट्रें बनलीं आहेत व इतकें असूनही या शाखांचा मूलस्तंभ जें जर्मन राष्ट्र तें पूर्ववत् आपलें अद्वितीय वर्चस्व गाजवीत आहे.

१८. जर्मन लोकांच्या राजकीय वर्चस्वाला अनुरूप त्यांची विवाहपद्धति पहिल्यापासून होती, हें वर लिहिलेंच आहे. माझें असें ह्मणणें नाहीं कीं जर्मन लोकांचें वर्चस्व त्यांच्या विवाहपद्धतीमुळेंच होतें. या जगांत एकच कार्य अनेक कारणांच्या एकीभूत परिणामांमुळें घडतें. त्याप्रमाणेंच राष्ट्राची उन्नति अनेक कारणांच्या समवायामुळें होते; परंतु चांगली विवाहपद्धति कांहीं अंशीं राष्ट्राच्या उन्नतीस कारणीभूत आहे, हा सामाजिक सिद्धांत इतिहासावरून खरा ठरतो. पर्शियन, ग्रीक, रोमन व जर्मन अशीं उत्तरोत्तर बलिष्ठ राष्ट्रें आजपर्यंतच्या इतिहासांत झालीं व त्यांची वैवाहिक नीति त्याच पायरीनें उत्तरोत्तर श्रेष्ठ होती. तसेंच राजकीय स्वतंत्रतेच्या मानानें पाहतां हिंदुस्थान देश निकृष्ट स्थितींत आहे, व या देशांत बालविवाहाचें प्रस्थ माजलें आहे. सारांश, हा सामाजिक व ऐतिहासिक सिद्धांत आपल्या देशास लागू करण्यास प्रत्यवाय दिसत नाहीं, व आपल्या देशाची राजकीय निकृष्ट स्थिति बालविवाहामुळें ही झाली आहे, असें ह्मटल्यावांचून राहवत नाहीं.

१९. बालविवाहामुळें प्रजा अशक्त होते, प्रजा अशक्त झाल्यानें राष्ट्र बलहीन होऊन परतंत्र होतें, ही वरील

सिद्धांताची उपपत्तीही स्पष्ट आहे; तथापि या सिद्धांताची सत्यता मनांत ठसण्यास दोन प्रश्नांचा ऐतिहासिकरीत्या उलगडा झाला पाहिजे. बालविवाह हिंदुस्थानांत कधीं सुरू झाले ? हिंदुस्थानाची कधीं तरी राजकीय उत्कृष्ट स्थिति होती काय व होती तर ती कधीं नष्ट झाली ?

२०. बालविवाहाची चाल हिंदुस्थानांत कधीं उत्पन्न झाली याजविषयीं दोन मतें प्रचलित आहेत. कांहीं लोक असें मानतात कीं बालविवाहाची चाल स्मृतिपुराणविहित असून फार जुनी आहे. सर वुइल्यम हंटरप्रभृति कांहीं लोकांचें असें मत आहे कीं मुसलमान लोकांनीं हिंदु प्रजेवर जो जुलूम केला, त्यामुळें व तेव्हांपासून ही चाल उत्पन्न झाली असावी. माझ्या मतें हीं दोन्ही मतें निराधार आहेत; यांजकरितां या दोन्ही मतांविषयीं आपण सविस्तर विचार करूं.

बालविवाह स्मृतिपुराणविहित आहे, ह्मणजे किती जुना आहे याची कल्पना मुळींच करतां येत नाहीं. स्मृत्या केव्हां झाल्या याचा कालनिर्णय करतां येत नाहीं व कालनिर्णय करणें ह्मणजे आपल्या हिंदुधर्माच्या मूलस्तंभास धक्का बसविणें आहे. बरें, स्मृतींत फेरफार झाले नसून त्या जशाच्या तशाच कायम आहेत, असें इतिहासदृष्ट्या सांगवत नाहीं; कारण भिन्न भिन्न स्मृतींत विरोध आहेत, इतकेंच नव्हे, तर एकाच स्मृतींत विरोधी वचनें सांपडतात. रा० ब० रानडे यांनीं दयाराम गिडुमलकृत पुस्तकाच्या शेवटीं जो निबंध लिहून जोडला आहे, त्यांत फार सुरस रीतीनें

स्मृतींचा काल क्रमानुसार लावून विवाहाची चाल कशी उत्पन्न झाली, हें दाखविलें आहे; परंतु त्याजवरून पक्का कालनिर्णय होत नाहीं; ह्मणजे अमुक वर्षांपूर्वी बालविवाह उत्पन्न झाले, हें ठरत नाहीं, व स्मृतिशास्त्राची कालभेदानें व्यवस्था लावणें किंवा त्यांचा ऐतिहासिकरीत्या विचार करणें बरोबर नाहीं. किंबहुना असा विचार करण्यास स्मृतींत ऐतिहासिक साधनच नाहीं, असें ह्मटलें तरी चालेल. हिंदुस्थानचा प्राचीन इतिहास क्रमवार उपलब्ध नाहीं ही मोठी शोचनीय गोष्ट आहे; व ह्मणूनच मुसलमानी राज्यापूर्वीचा हिंदुस्थानचा इतिहास विश्वसनीय व संगतवार मिळत नाहीं. फार प्राचीनकाळीं इतिहास लिहिण्याची चाल होती असें दिसतें. परंतु अलीकडे इतिहासाचें वारेंही आपल्या लोकांत राहिलें नाहीं. स्मृतींपुराणें कधीं लिहिलीं गेलीं, याचा आपल्यास पत्ता नाहीं, किंवा कोणीं त्यांजविषयीं चौकशी केली नाहीं. शालिवाहनानें विक्रमाचा पराभव केला किंवा भवभूतीनें 'रात्रिरेवं व्यरंसीत्' लिहिलें होतें तें कालिदासानें 'रात्रिरेव व्यरंसीत्' असें सुधारलें, इत्यादि धडधडीत अविश्वसनीय दंतकथा आपल्यांत खऱ्या मानिल्या जातात; तेव्हां अशा इतिहासानभिज्ञ लोकांत स्मृती केव्हां झाल्या याचा पत्ता कसा लागणार ? मला वाटतें बालविवाह केव्हां सुरू झाले, याचा ऐतिहासिकदृष्ट्या विचार योग्य आधारावरून केला पाहिजे.

२१. प्राचीनकाळची हिंदुस्थानाविषयींची विश्वसनीय माहिती अव्वल शिकंदर बादशहाच्या आरायननामक इतिहा-

पधानमेव ते " असें उत्तररामचरित्रांत रामानें सीतेस म्हटलें आहे. त्यावरून लग्न झाल्यादिवसापासून पतिपत्नींचा समागम भवभूतीच्या वेळेस होत असे असें दिसतें, व या वाक्यावरूनच " शिशुर्दधती मुखम् " इत्यादि ठिकाणचा शिशुशब्द इंग्रजी " गर्ल " शब्दाप्रमाणें नववयाचा वाचक समजला पाहिजे.

२१. सातव्या शतकांत हुएनसंग नांवाचा चिनी बौद्धधर्मी प्रवासी हिंदुस्थानांत आला. त्यानें सत्तावीस वर्षेंपर्यंत या देशांत वास्तव्य केलें. नालंद येथील बुद्धमठांत संस्कृत भाषेचा व हिंदुशास्त्रांचा अभ्यास केला; व या देशांतील स्थितीचें फारच सुरस व माहितीनें भरलेलें वर्णन लिहून ठेविलें. त्या चिनी ग्रंथाचें भाषांतर पाश्चात्य विद्वज्जनांच्या परिश्रमानें आपल्यास उपलब्ध झालें आहे. हा ग्रंथ हिंदुस्थानच्या प्राचीन इतिहासाच्या अंधप्रदेशांत एक मोठा टेंभाच आहे, असें म्हटलें पाहिजे. हुएनसंगनें आपल्या वर्णनांत बालविवाह असल्याचें कोठेंच लिहिलें नाहीं. कोणत्याही परकीयाचें आपल्या लोकांशीं थोडेंसें जरी दळणवळण पडलें, तरी तितक्यांत आपल्या बालविवाह व असंमतवैधव्य या दोन चाली त्याच्या निदर्शनास आल्यांवाचून राहणार नाहींत. मग हुएनसंगसारख्या हुशार, शोधक व २७ वर्षांच्या माहितगाराच्या नजरेस बालविवाहाची चाल आली नाहीं, असें संभवत नाहीं हिंदुलोकांत स्त्रिया एकपतिमरणोत्तर दुसरा पति करीत नाहींत किंवा त्यांस करतां येत नाहीं, अशी चाल आहे, असें त्याणें स्पष्ट लिहिलें आहे.

यावरून असंमतवैधव्य हुएनसंगाच्या वेळेस होतें, असें दिसतें. मग त्या वेळेस बालविवाह असते तर त्यांजविषयींही त्याणें उल्लेख केला नसता काय? सारांश, सातव्या शतकापर्यंत बालविवाहाची दुष्ट चाल आपल्या लोकांत नव्हती असें स्पष्ट सिद्ध होतें.

२४. मुसलमान लोकांच्या जुलुमामुळें हिंदुस्थानदेश मुसलमानाच्या हस्तगत झाल्यावर ही चाल उत्पन्न झाली, या मताचें खंडन पहिल्या मताच्या खंडनापेक्षां अल्पप्रयासानें होण्यासारखें आहे. यासंबंधानें दोन गोष्टी प्रथम ध्यानांत ठेविल्या पाहिजेत. प्रथम गोष्ट ही कीं, हिंदुलोकांची सामाजिक स्थिति फार सावकाश बदलते. क्षणिक पराधीनता झाल्यामुळें हिंदुलोकांच्या समाजस्थितींत चलबिचल होत नाहीं. " या लोकांच्या चालीरीति इतक्या दृढ व नम्र आहेत कीं नदीकांठच्या लोहाळ्यावरून एकादा मोठा पूर निघून गेल्यावर जसे ते पुनः उभे राहतात त्याप्रमाणेंच हिंदु लोक कांहीं प्रयत्न न पडतां आपल्या पूर्वांवर चालत आलेल्या रीतींनीं पुनः वागूं लागतात. व गेल्या वादळाचें जितकें विस्मरण त्यांना पडतें, तितकेंच भावी येणाऱ्या प्रसंगाचेंही भय त्यांना कमीच वाटतें. " यावरून साहजिक अनुमान होतें कीं, बालविवाहाची चाल हिंदुस्थानांत मुसलमानी जुलुमामुळें रूढ होण्यास हा जुलूम शंभर वर्षें तरी सतत चालू असला पाहिजे. आतां मुसलमानांनीं ठोकळ मानानें, ख्रिस्ती शकाच्या १००० वर्षी पंजाब, १२०० वर्षी उत्तरहिंदुस्थान, १३०० वर्षी गुजराथ व

महाराष्ट्र व १४०० वर्षी तुंगभद्रेच्या दक्षिणेस विजयानगर जिंकिलें. या सर्व प्रदेशांच्या सीमा निरनिराळ्या, स्पष्ट, सृष्टिनिर्मित असून यांतील लोकही निरनिराळे दिसतात, व जरी मूळसंबंध एक आहे, तरी त्यांच्या भाषेत, रीतींभातींत व पूर्वापार समजुतींत फारच अंतर आहे. एका देशांत मुसलमान लोकांच्या जुलुमामुळें बालविवाहाचा प्रचात पडला ह्मणून तात्काळ दुसऱ्या देशांत पडेल, असें ह्मणतां येत नाहीं. सारांश बालविवाहाची चाल पंजाबांत, हिंदुस्थानांत, दक्षिणेंत व तैलंगणांत अनुक्रमें या मताप्रमाणें ११००, १३००, १४००, १५०० वर्षांच्या सुमरास पडली असावी. आतां दुसरी गोष्ट ध्यानांत ठेवावयाची ही कीं इतर लोकांपेक्षां क्षत्रिय लोकांत एखादी चाल फार उशिरानें स्वीकारली जाते. अद्यापिही बालविवाह व शाकान्नभक्षण त्यांच्यांत पूर्णपणें सुरू आहेत असें नाहीं. हिंदुस्थानचे जे इतिहास उपलब्ध आहेत, त्यांत राजे लोक व क्षत्रिय यांशिवाय दुसऱ्याचें वर्णन सांपडत नाहीं, हें साहजिक आहे. राजकीय विषयांचा विचार करण्याचें काम एकीकडे ठेवून भक्तीनें लोकस्थितीचाच इतिहास लिहिणारे मेकालेसारखे इतिहासकार या देशांत उत्पन्न होण्यास कित्येक शतकें गेलीं पाहिजेत; परंतु येवढें निर्विवाद आहे कीं रजपूत लोकांत बालविवाहाचीं उदाहरणें ज्या काळीं सांपडतात, त्याच्या पूर्वी पुष्कळ वर्षें इतर लोकांत ही चाल असली पाहिजे. ह्या दोन गोष्टी लक्षांत ठेऊन जीं उदाहरणें इतिहासांत बालविवाहाची सांपडतात त्याचा विचार करूं.

२५. धारानगरीच्या एका राजाचा ज्येष्ठ पुत्र जगदेव परमार म्हणून होता; परंतु तो नावडत्या राणीचा मुलगा असल्यामुळें राजाचे त्याजवर प्रेम नव्हतें. त्याच्या धाकट्या भावास एक मुलगी सांगून आली होती, तिला पाहण्याकरितां कांहीं लोक राजानें पाठविले होते. त्यांजबरोबर जगदेवही गेला. रस्त्यांत एका क्षत्रियराजानें जगदेवाचें तेज पाहून व त्याचें कुलशील ऐकून आपली मुलगी त्यास दिली. त्या वेळेस त्याचें वय १६ वर्षांचें होतें. पुढें जगदेव धारानगरीस परत आला. कांहीं वर्षांनंतर ध्रुवाप्रमाणें आपला व मातुश्रीचा अपमान झालेला त्यास सहन न होऊन तो देशांतरास जाण्याकरितां स्वनगर सोडून निघाला, व रस्त्यांत त्याच्या उपवर झालेल्या पत्नीची गांठ पडली. तीही त्याजबरोबर निघाली. गुजराथ देशाचा प्रसिद्ध राजा सिद्धराज हा कांहीं संबंधानें आपला आप्त आहे असें जाणून जगदेव पट्टणास गेला. पुढील हकीकत मनोरंजक आहे, तत्रापि लांबलचक असल्यामुळें येथें देण्याची जरूरी नाहीं.

दुसरी गोष्ट मेवाडचा राजा हमीर याची आहे.—

प्रसिद्ध पद्मिनीस प्राप्त करून घेण्याकरितां अल्लाउद्दिन याणें चितोडचा किल्ला महाप्रयासानें घेतला, परंतु रजपूत लोकांनीं इतिहासप्रसिद्ध चितोडचा प्रथम जोहार करून पद्मिनीसह हजारों स्त्रियास अग्निमुखीं बळी दिल्या व स्वतः शत्रूवर तुटून पडून प्राणास मुकले. या वेळेस रजपूत लोकांनीं हमीर नांवाच्या बालराजपुत्रास जंगलांत पळवून

वांचविलें. हा राजपुत्र मोठा झाल्यावर आपल्या पूर्वजांची राजधानी परत मिळावी या विचारांनीं रात्रंदिवस चरफतड असे. निदान चितोड शहर आपल्या दृष्टीस पडावें अशी त्यास फार उत्कट इच्छा होती. चितोड शहराचा कारभार अल्लाउद्दिनानें मालदेवास दिला होता. त्यानें आपली मुलगी हमीर यास देण्याचें मनांत आणून त्याजकडे चाली-प्रमाणें नारळ पाठविला. ही प्रार्थना आपल्या शत्रूचीही असून त्या शूर राजपुत्रानें मान्य केली व थोडक्या लोकां-बरोबर तो चितोड शहरांत शिरला. शहरांत कोठेंच लग्नो-त्सव नाहीं, किल्याच्या दरवाज्यावर मंगल तोरणें नाहींत, हें पाहून यांत कांहीं दगा आहे असें त्या शूर राजपुत्रास वाटलें; परंतु तो अति धाडसी असल्यामुळें बेफिकीर कि-ल्ल्यांत शिरला. मालदेवानें हमीराचें स्वागत करून त्यापुढें त्याची वधू उभी केली व दोघांच्या पदरांची गांठ बांधिली. वाद्यें नाहींत, वऱ्हाडी नाहींत, ब्राह्मणसमाराधान नाहीं, इत्यादि गोष्टी पाहून हमीरास वाईट वाटलें व शोधा अंतीं आपली बायको बालविधवा आहे व हें लग्न नव्हे, तर पाट लागला असें त्यास समजलें. तेव्हां त्या राजपुत्रास अत्यंत कोप आला व त्यानें आपल्या निरपराध पत्नीस प्रथम गांठींतच ठार मारलें असतें; परंतु त्या साध्वीनें चितोड शहर त्याच्या स्वाधीन करण्याचें वचन देऊन त्याचें मन प्रसन्न केलें. अपमानापेक्षां स्वदेशवियोग त्या स्वदेशभक्तास विषतुल्य वाटे, ह्मणूनच त्यानें आपल्या बायकोचें ह्मणणें कबूल केलें; तत्रापि तिच्या वंशाशीं मेवाडच्या घराण्यानें कांहींही संबंध करूं नये अशी त्यानें शपथ घातली. कांहीं दिवसानंतर

भालदेव आपल्या लोकांसह शहराबाहेर गेला आहे अशी संधि पाहून हमीर आपल्या बायकोस भेटण्याच्या मिषानें शहरांत गेला, व त्यानें किल्ला व शहर आपल्या हस्तगत करून घेतलें.

२६. पहिलें उदाहरण गुजराथेंतील सिद्ध राजाचे वेळचें आहे, ह्मणजे इ० स० १०३७ च्या सुमाराचें आहे. या वेळेस गुजराथेंत मुसलमानांचें नांवसुद्धां ठाऊक नसेल. दुसरें उदाहरण मेवाडचें सन १३०० च्या सुमाराचें आहे. यासुमारास मेवाडांत मुसलमानांचा नुकताच शिरकाव झाला होता. पण मेवाडांत मुसलमानांचा अंमल कधींच बसला नाहीं. या उदाहरणांवरून मुसलमानांच्या जुलुमामुळें ही बालविवाहाची चाल उत्पन्न झाली, हें ह्मणणें निराधार ठरतें. पण इतकें इतिहासाच्या खोल पाण्यांत जाण्याचें प्रयोजनच नाहीं. या मताचा व्यतिरेकदृष्टीनें विचार केला, तर त्याच्या असत्यतेविषयीं तेव्हांच खात्री होईल. मुसलमान लोक जुलूम करीत ह्मणून लवकर लग्नें करूं लागले, या ह्मणण्याचा अर्थ असा होतो कीं मुलींचीं लग्नें झाल्यावर मुसलमान लोक त्यांस धरीत नसत; किंवा बापापेक्षां मुलीचें संरक्षण करण्यास नवरा अधिक समर्थ असे. पण थोडासा विचार केला तर कामांध मुसलमान लोक विवाहित स्त्रियांवर हात टाकण्यास मागेंपुढें पाहात असत. ही गोष्ट संभवत नाहीं व बापापेक्षां लहान मुलीचा लहान नवरा अधिक काय करणार, हेंही लक्षांत येत नाहीं. ज्या लाखों निस्तेज हिंदु लोकांना मुसलमानांनीं पादाक्रांत

केलें, त्यांपैकींच नवरा आणि त्यांपैकींच बाप, दोवे मिळून आपल्या बायकापोरांचें काय संरक्षण करणार हें सहजच दिसतें आहे. इतिहासावरूनही हेंच सिद्ध होतें कीं, मुसलमान लोकांनीं मुलींस व प्रौढ स्त्रियांस स्वेच्छेप्रमाणें पकडण्यास कोणतीच आडकाठी मानिली नाहीं. पद्मिनीकरितां अल्लाउद्दीनानें काय प्रयत्न केले ? हतभाग्य कर्णराजाच्या बायकोस जनानखान्यांत घालतांना ही विवाहित आहे, किंबहुना हिला मुलें झालीं आहेत, याचा विचार अल्लाउद्दिनानें कधींही मनांत आणिला नाहीं. देवळदेवीस तीन नवरे करावे लागले. दुर्गावती नांवाची गोंडवणची शूर राणी अकबराच्या सैन्याशीं लढून मेली व तिचा मुलगाही मेला. त्याची बायको अनुपभुक्ता होती तिला सेनाधिपतीनें अकबराकडे उत्तम नजर समजून पाठविलें. तिच्या लग्नाची अकबरानेंसुद्धां परवा केली नाहीं. पण अशीं नांवें देत बसण्याचें प्रयोजन नाहीं. शेंकडों शहरें मुसलमानांनीं काबीज केल्याचीं वर्णनें इतिहासांत आहेत. त्या वेळेस हजारों अनुपभुक्ता व उपभुक्ता विवाहिता व अविवाहिता स्त्रिया त्यांनीं पकडून नेल्या ही गोष्ट निर्विवाद आहे. सारांश, मुसलमानांच्या जुलुमामुळें बालविवाहाची चाल प्रचारांत आली, हें ह्मणणें सुयुक्तिक दिसत नाहीं.

२७. कांहीं ब्राह्मण जातींत अद्याप बालविवाहाची चाल सुरू नाहीं. कनोजे लोकांत बायका वृद्ध होईपावेतों सुद्धां अविवाहित राहतात. कधीं कधीं त्यांचें आमरणांत लग्न होत

नाहीं. अशा जाति विशेषेंकरून दिल्ली व अहमदाबाद या शहरांजवळच सांपडतात, व हे प्रदेश तर नेहमीं मुसलमान लोकांच्या जुलुमाच्या ऐन तडाक्यांत सांपडलेले असत. नादिरशहाच्या वेळेस त्याच्या कामांध शिपायांनीं मथुरेंत शिरून ब्राह्मण स्त्रियांवर भयंकर जुलूम केले, व हजारों स्त्रिया यमुनेंत व विहिरींत पडून मेल्या. सारांश, या प्रदेशात शेवटपर्यंत मुसलमानाचा जुलूम मूर्तिमंत वास करीत होता; परंतु तेथें बालविवाह इतर प्रदेशांप्रमाणें सुरू झाला नाहीं, हें खरोखर आश्चर्यकारक आहे.

२८. यासंबंधानें माधवाचार्याचा ग्रंथही एक सबळ प्रमाण आहे. माधवाचार्य हा विजयनगरच्या प्रथम संस्थापक बुक्क राजाचा प्रधान होता व सुमारें १३४५ वे वर्षी हें राज्य स्थापिलें गेलें. माधवाचार्यानें पराशरमाधव हा ग्रंथ लिहिला आहे व हा ग्रंथ हल्लींच्या हिंदुधर्माचें जें स्वरूप आहे त्याचा आधारस्तंभच आहे. जशी आपल्या धर्माची स्थिति हल्लीं आहे तशीच माधवाचार्याच्या वेळीं होती असें या ग्रंथावरून पूर्ण दिसून येतें. पांचव्या वर्षापासून दहाव्या वर्षाच्या आंत मुलीचें लग्न करावें, असें माधवाचें मत आहे. तात्पर्य, सन १३०० च्या वेळेस तुंगभद्रेच्या दक्षिणेस बालविवाह पूर्णपणें अमलांत होते असें या ग्रंथावरून स्पष्ट दिसतें; परंतु या वेळेस नुकतेच मुसलमान लोक दक्षिणेंत येऊं लागले होते व त्यांच्या दक्षिणेंतील राज्याचा मागमूसही नव्हता. यावरूनही मुसलमान लोकांच्या जुलुमामुळें बालविवाह अमलांत आले, हें म्हणणें निराधार ठरतें.

२०. वरील विवेचनावरून बालविवाह सातव्या शतकानंतर हिंदुस्थानांत प्रवृत्त झाले व सुमारें हजार किंवा अकराशें वर्षांच्या पूर्वी सर्व देशभर रूढ होऊन गेले असें स्पष्ट होतें. विवाहपद्धति व राजकीय उत्कर्ष यांचा निकट संबंध आहे; तेव्हां आपल्यास हिंदुस्थानचा राजकीय उत्कर्ष कधीं होता, या गोष्टीचा आता विचार केला पाहिजे.

या देशाचे जे इतिहास प्रसिद्ध आहेत व जे लोकांच्या नेहमीं वाचण्यात येतात, त्यांवरून हिंदुलोक म्हणजे म्याड; जो बाहेरून येईल त्याने आपलें हिंदुलोकांस चिरडून टाकावें, अशी आपली नेहमींची दैन्यावस्था होती असें वाटतें. हिंदुदेश समृद्ध व हिंदुजात दुबळी या दोन कारणांमुळें अफगाण, तुर्क, मोगल, पारसिक व पाश्चात्य राष्ट्रें यानीं या देशावर स्वाऱ्या करून आपल्या लोभाची तृप्ति करून घेतली. नांव घेण्यास काय तें मेवाडच्या डोंगरांत व मारवाडच्या वाळवंटांत स्वतंत्र रजपुतांनीं आपलें स्वराज्य मोठ्या कष्टानें संभाळून ठेविलें आहे व शंभर वर्षेपावेतों मराठे लोकांच्या नशिबानें धूमकेतूच्या प्रकाशाप्रमाणें त्याचें राजकीय वैभव चमकलें; पण या दोन अपवादाखेरीज आज आठशें वर्षें सर्व हिंदुस्थानच्या लोकांनीं परकीयांच्या सत्तेखालीं आपल्या माना वांकविल्या आहेत. सुमारें शंभर वर्षें हिंदुस्थान देश ब्रिटिश लोकाच्या सुखावह राजसत्तेखालीं आहे. ब्रिटिशलोकाचा राजसिंह रूसदेशाच्या अस्वलास इकडे फिरकूं न देवो अशी आमची इच्छा आहे व ही इच्छा आपल्या राजभर्त्यास उचित आहे इतकेंच नाहीं, पण

आमच्या शहाणपणासही योग्य आहे; कारण आमच्या आ-
जच्या स्थितीचा विचार केला तर कधींकाळीं आमची
स्वतंत्रता आह्मांस मिळेल असा संभवच दिसत नाहीं.
सारांश, आठशें वर्षांपासून आमची अशी स्थिति झाली आहे,
हें निर्विवाद आहे. यापूर्वी तरी आमची स्थिति चांगली
होती काय ?

१०. मुसलमानांनीं हिंदुस्थानदेशांत आपलें सार्वभौ-
मत्व स्थापन केलें, त्यापूर्वींच्या इतिहासाचें नीट मनन
केलें तर त्या वेळेस आमची राजकीय स्थिति फार
चांगली होती असें दिसून येईल. महाभारतांतील
योद्धयांचें उदाहरण घेण्याचें प्रयोजन नाहीं; कारण
त्यांचे अलौकिक पराक्रम कवीच्या कल्पनाशक्तीच्या
टांकसाळींतून निघाले आहेत, असा आक्षेप येऊं शकतो.
परंतु परकीय लोकांनीं वेळोवेळीं या देशाविषयीं जे लेख
लिहून ठेविले आहेत, तेवढेच या गोष्टीच्या पुराव्यास पुरे
आहेत. इतिहासांत उपलब्ध अशी या देशावर प्रथम
स्वारी शिकंदरानें केली. त्या वेळीं हिंदुलोकांनीं व हिंदु-
राजांनीं जें शौर्य, पराक्रम व आवेश दाखविला त्याची साक्ष
शिकंदराचे इतिहासकारच देतात. जेलम नदीवरच्या लढा-
ईत हिंदुलोकांचेच हत्ती त्यांच्यावर उलटल्यामुळें हिंदु-
सैन्यानें पळ काढिला ही गोष्ट खरी, पण पोरसराजानें रणां-
गण सोडलें नाहीं व मृत्यूपेक्षां अपमान भयंकर आहे, असें
समजून क्षत्रियधर्माची त्यानें पराकाष्ठा केली. हें पाहून
अलेक्झांडर यानें आश्चर्य केलें व त्यानें पोरसराजास राज-

गौरवास योग्य अशा रीतीनें वागविण्याचें वचन दिलें, तेव्हांच तो त्याच्या स्वाधीन झाला. त्या राजाचें धिप्पाड शरीर व सुस्वरूप पाहून शिकंदर बादशहा फार खुष झाला व त्यानें त्याचें राज्य त्यास परत दिलें. शिकंदराच्या इतिहासकारानें असें स्पष्ट लिहिलें आहे कीं, हिंदुलोक इतर एशियाटिक लोकांपेक्षां उंच, बळकट व शूर होते. शिकंदर बादशहा अंतर्वेदींत उतरला नाहीं व त्यानें येथेंच आपल्या जयाची सीमा केली. जर त्या वेळचे हिंदु इतिहासकार असते तर शिकंदरबादशहा दिल्ली, कनोज वगैरे बलाढ्य राष्ट्रांशीं सामना करण्यास काचावला, असेंच त्यांनीं म्हटलें असतें. जर तो अंतर्वेदींत उतरता, तर हिंदुस्थानची अगणित संपत्ति त्याच्या पादतळीं लोळली असती व दंतकथेंत वर्णिलेल्या हिंदुभूमीचें प्रत्यक्ष दर्शन त्यास झालें असतें. सारांश, शिकंदरानें आपल्या शिपायांस चार शब्द सांगितले असते, तर ते त्यानीं ऐकले नसते असें नाहीं, पण ज्यांचे वंशज तुवर व राठोड अद्यापीही पराक्रम व शक्तीच्या केवळ मूर्तीच आहेत त्या दिल्ली व कनोजच्या क्षत्रियांशीं युद्धप्रसंग शिकंदरानें जाणून बुजून टाळला, असें ह्मणण्यास प्रत्यवाय नाहीं; कारण थोडक्याच काळानें मगधदेशांतील चंद्रगुप्तराजानें अलेकझांडर गेल्यानंतर त्याच्या सेनाधिपतीस पंजाबांतून हांकलून लाविलें, व जेव्हां अलेक्झांडर मेल्यावर सेल्यूकसानें त्याच्या राष्ट्राचें पूर्वेकडील हिस्शाचें स्वामित्व संपादिलें, व तो ग्रीक सैन्यानिशीं बॅक्ट्रिया जिंकून हिंदुस्थानाकडे वळला, तेव्हां त्यास चंद्रगुप्ताच्या पराक्रमी सैन्यामुळें काबूलच्या पलीकडेस रहावें लागलें, इतकेंच नाहीं,

तर त्यानें चंद्रगुप्ताशीं सल्ला करून आपली मुलगी त्यास दिली. हिंदुराजास ग्रीक राजानें आपली मुलगी दिली, याहून त्या वेळच्या हिंदु राजाच्या पराक्रमाचें व वैभवाचें अधिक काय प्रत्यंतर पाहिजे ? असो. सेल्यूकसाचा मेगास्थिनीस नामक वकील चंद्रगुप्ताच्या दरबारांत राहत होता. त्यानें जें हिंदुलोकांचें वर्णन लिहून ठेविलें आहे, त्यांतही हिंदुलोकांच्या शौर्याची निंदा कोठेंच केली नाहीं. सारांश, खिस्ती शकापूर्वी ३०० वर्षांच्या सुमारास हिंदुलोक बळकट, शूर व पराक्रमी होते.

३१ यानंतर हिंदुस्थानचा साधार इतिहास सांपडत नाहीं, परंतु पंजाब व सिंध देशांवर सिथियन् व पारसिकांनीं स्वाऱ्या केल्या व कांहीं दिवस राज्यही केलें असें दिसतें. ज्या हूण लोकांनीं रोमराष्ट्र हालवून रोम शहर लुटलें, त्याच लोकांनीं पंजाब जिंकला यांत नवल कोणतें ? पारसिकांनीं सापोर व नौशिरवाँ यांच्या कारकीर्दीत पूर्वी झालेल्या अपमानाचा बराच सूड उगवला व समरांगणांत एका बादशहास सुद्धां कैद केलें, त्या लोकांनीं सिंध देश जिंकला यांतही आश्चर्य नाहीं. पण या दोन्ही लोकांचीं राज्यें हिंदुस्थानांत पंजाब व सिंधच्या अलीकडे आलीं नाहींत व तेथूनही त्यांस हिंदुलोकांनीं लवकरच हाकलून दिलें असें दिसतें. विक्रमानें व शालिवाहनानें हूण व शक लोकांस जिंकून नाहींसें केलें अशाविषयीं त्यांचे शक साक्ष देत आहेत. सारांश, स्किथियन व पारसिकांनीं चिरस्थायी राज्यें स्थापिलीं नाहींत व त्यांस हिंदुस्थानांतून लवकर जावें लागलें. रजपूत

लोकांची उत्पत्ति स्किथियन लोकांपासून आहे असें कांहीं इतिहासकार मानतात; पण भाषा, स्वरूप, चालीरीति, दंतकथा व स्किथियन येण्यापूर्वीची पोरस राजाची गोष्ट यांवरून रजपूत हे खरे आर्य आहेत, यांत शंका नाहीं. हल्लींच्या मिळमिळीत हिंदु लोकांची व शूर रजपूत लोकांची जात एकच आहे, असें मानणें कित्येक इतिहासकारांस फार जड वाडतें ह्मणूनच रजपूत लोक स्किथियन असावे अशी कल्पना निघाली आहे. वस्तुत: तीस कांहींच आधार नाहीं.

१२. हुएनसांगनें लिहिलेल्या वर्णनांत हिंदु लोकांच्या शौर्याविषयीं, विशेषत: मराठे लोकांविषयीं फारच तारीफ केलेली दिसून येते. तो ह्मणतो "हे लोक स्वभावानें साधे व विश्वासू आहेत. व बांध्यानें उंच व शौर्यानें उद्धत आहेत. धर्मयुद्धाचें नियम ते इतक्या बारकाईनें पाळतात कीं शत्रूनें केलेल्या अपकाराबद्दल शासन करण्यापूर्वी त्यास अगोदर सूचना पाठवितात. जर एकाद्या लढाईत सेनापतीचा पराजय झाला, तर त्यास स्त्रीवेष घ्यावा लागतो व अशा प्रसंगीं बहुतकरून तो आत्महत्या करून घेतो. लढाईस जाण्यापूर्वी लोक मद्यप्राशन करून उन्मत्त होतात व जिवावर उदार होऊन आपल्यापेक्षां दसपट सैन्यावरही तुटून पडण्यास भीत नाहींत. त्यांचा राजा पुलकेशि हा खरा क्षत्रिय, दानशूर व कनोजचा राजा शिलादित्य याच्या बरोबरीचा आहे." हें मराठे लोकांचें वर्णन बालविवाह सुरू होण्यापूर्वीच्या काळचें आहे. तेव्हांपासून आपले लोकांचा केवढा शारीरिक ऱ्हास व केवढी राजकीय अव-

नति झाली आहे ! मराठे उंच ह्मणून जी ख्याति होती त्याऐवजीं हल्लीं मराठे ह्मणजे ठेंगणे अशी ह्मणच पडली आहे. दसपट सैन्यावर चालून जाणें, शत्रूस अगोदर सूचना करणें, व रणांगणांतून मेल्याशिवाय परत न फिरणें, इत्यादि शौर्यसीमेच्या गोष्टी आपल्यांतून नाहींशा होऊन त्यांऐवजीं भित्रेपणा, छापा घालणें, व पळती लढाई करणें याविषयीं मात्र आपली कीर्ति होऊन राहिली आहे. पेशवाईच्या ऐन भरांत जनकोजी शिंदे, मल्हाळराव होळकर यांसारखे महावीर आपल्या शिपायांची अशी तारीफ करतात कीं, हे झाडास बांधल्यास झाड उपटून घेऊन पळून जातील ! वा: ! केवढा पराक्रम ! पण शेंकडों वर्षे सुरू असलेल्या बालविवाहाचा परिणाम असाच झाला पाहिजे. इतिहासकार टाल्बाईस व्हीलर असें ह्मणतो कीं " पुलकेशी राजा ज्या काळांत होऊन गेला, तो मराठ्यांचा उत्तम काळ आतां राहिला नाहीं; परंतु अशी उमेद आहे कीं मराठ्यांचे फिरून असे चांगले दिवस येतील कीं मराठ्यांचे वैभव पुलकेशीच्या वेळेपेक्षांही अधिक वाढेल. " हे दिवस कधीं येणार, हा प्रश्न करतांना आमच्या अंतःकरणांत निराशेच्या दुःखाचा कळस होऊन जातो.

३३. पोरसाच्या वेळेस, चंद्रगुप्ताच्या वेळेस, विक्रमादित्याच्या वेळेस, पुलकेशीच्या व शिलादित्याच्या वेळेस आमचे लोक शरीरानें उंच, बळकट व शौर्यानें बहादूर होते यांत शंका नाहीं. हुएनसंगच्या नंतर आपल्या देशाविषयीं आरब इतिहासकारांनीं थोडें थोडें वर्णन लिहून

ठेविलें आहे. गिझनीचा महंमद सन १००० 'त हिंदुस्थानांत आला, त्यापूर्वीच्या कांहीं हकीकतींत कोठें कोठें हिंदुलोकांच्या शौर्याविषयीं प्रशंसा केलेली आढळते. जरी राजे एकमेकांस जिंकीत असत, तरी जिंकणाऱ्या राजास जित राजाच्या कोणातरी आप्तास त्याच्या गादीवर बसवावें लागत असे. " असें केल्यावांचून तेथील लोक निमूट बसावयाचे नाहींत." सारांश, हिंदुलोकांना आपलें स्वराज्य असावें अशी नेहमीं इच्छा होती दुसऱ्या एका आरब इतिहासकारानें असें लिहिलें आहे कीं " एशियांतील सर्व लोकांत हिंदुलोक कांहीं विशेष प्रकारचे आहेत. राज्यपद्धति, तत्वज्ञानावरील ग्रंथ, शरीरसामर्थ्य, व वर्णाची विशुद्धता यांविषयीं त्यांची ख्याति आहे;" आणखी एका ग्रंथकारानें त्या वेळची प्रसिद्ध म्हण लिहून ठेविली आहे: " हिंदुस्थानची सैन्याविषयीं, कंदाहारची हत्तीविषयीं व तुर्कस्थानची घोड्याविषयीं ख्याति आहे."

३४. अशी ही पूर्वी आपली शरीरानें व शौर्यानें उत्तम स्थिति असतां मुसलमानी राज्य होण्याच्या वेळेस आपण इतके नादान कां झालों, हें समजण्याकरितां आठवे शतकापासून तों बारावे शतकापर्यंत हिंदुस्थानच्या इतिहासांत काय काय घडामोडी झाल्या याचा आपल्यास विचार केला पाहिजे. या काळचा इतिहास जरी साद्यंत उपलब्ध नाहीं, तरी एक मोठा धर्मसंबंधीं फेरफार हिंदुस्थानांत होऊन गेला व त्याच फेरफारामुळें हिंदुस्थानच्या अवनतीचें बीजारोपण झालें. हुएनसंगच्या वेळेस हिंदुधर्म व बौद्धधर्म या

देशांत सारखे प्रसृत होते व या दोन्ही धर्मांचे लोक परस्परांशीं प्रेमानें व सलोख्यानें वागत असत. दोन्ही धर्मांचे वादविवाद ऐकण्याची राजे व श्रीमंत लोकांस हौस असे, व अशोक राजाप्रमाणें शिलादित्यासही ब्राह्मण व श्रमण हे सारखेच प्रिय होते व त्या दोघांस सारखाच धर्म होत असे. परंतु आठव्या किंवा नवव्या शतकाचे सुमारास अलौलिक बुद्धिमत्ता व चातुर्यानें विभूषित असा एक धर्मप्रसारक दक्षिणेंत उत्पन्न झाला. त्याणें सर्व हिंदुस्थानभर फिरून बौद्ध धर्माचा उच्छेद केला; बौद्ध धर्माच्या मूळ तत्वांचें खंडन केलें व हिंदुधर्माचा विजयध्वज उभारला. परंतु लाखों बुद्ध लोकांस हिंदु करतांना शंकराचार्यास अनेक अडचणी उत्पन्न झाल्या व यामुळें बौद्ध लोकांत खिळून गेलेल्या कांहीं बौद्धमतांचा स्वीकार करून त्यांस त्याणें आत्मवश केलें; यामुळें कांहीं कांहीं वाईट गोष्टी बुद्ध धर्माच्या हिंदु धर्मांत शिरल्या व हिंदु धर्मास कांहीं विलक्षण स्वरूप मिळालें. अखेरीस बौद्धधर्म या देशांतून नाहींसा झाला; परंतु हिंदु धर्मास जें नवीन स्वरूप आलें त्यांत जातिनिर्बंध, शाकान्नभक्षण, व बालविवाह यांस पूर्वीपेक्षां विशेष जोर आला व तेथपासून आपल्या शारीरिक दौर्बल्यास व राजकीय पतितावस्थेस आरंभ झाला.

१५. शरीर दुर्बल होण्यास किंवा राजकीय स्थिति निकृष्ट होण्यास बालविवाह हें एकच कारण नाहीं. हिंदुस्थानास दैन्यावस्था कां आली हा एक विषय स्वतंत्र निबंध लिहिण्यासारखा आहे. पण वरील विवेचन वाचून वाच-

कांची अशी चमत्कारिक समजूत होण्याचा संभव आहे कीं हें विवेचन अतिशयोक्तीचें आहे. बालविवाहापासून राजकीय निकृष्टावस्था झाली व हिंदुस्थानास पारतंत्र्य आलें हा बादरायण संबंध कोठचा, असा समज होणें अशा निबंधाचा साहजिक परिणाम आहे. आपल्या पारतंत्र्यास बालविवाहाशिवाय दुसरीं अनेक कारणें आहेत यांत संशय नाहीं. पण हा निबंध बालविवाहाचे अनिष्ट परिणाम या विषयावर आहे. यांत दुसऱ्या कारणांचा विचार होऊं शकत नाहीं, यामुळें कदाचित् वाचकांच्या मनांत भलताच समज होण्याचा संभव आहे. किंबहुना वाचकांस उलट असें वाटूं लागेल कीं आपल्या पारतंत्र्याचें बालविवाह हें मुळींच कारण नाहीं; याकरितां येथें अशी सूचना करणें भाग आहे कीं आपल्या निकृष्ट स्थितींचीं दुसरीं कारणें बिलकूल नाहींत असें माझें ह्मणणें नाहीं; पण बालविवाह हें अनेक कारणांपैकीं एक कारण आहे, हेंच या प्रतिपादनाचें तात्पर्य आहे.

शरीराचा जो भाग अधिक उपयोगांत येतो तो सदृढ होऊन त्याचीच वाढ होते व इतर शरीराचे भाग अशक्त होऊन जातात. हीच गोष्ट मानसिक वृत्तीची आहे. सारांश, स्पेन्सरचा उत्क्रमणासिद्धांत शरीर, बुद्धि व मनोविकार यांसही लागू आहे. हिंदुस्थानांत बुद्धि, शरीरसामर्थ्य, व उद्योग हे तीन जातींनीं निरनिराळे स्वीकृत करून पिढ्यानुपिढ्या त्यांनीं त्याचाच व्यासंग केला. यामुळें ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य हे आपआपल्या कामांत फार प्रवीण झाले आहेत. ब्राह्मणांसारखे बुद्धिवान्, क्षत्रियांसारखे सामर्थ्यवान्

व वैश्यांसारखे उद्योगी लोक या जगांत थोडेच असतील. परंतु लढवय्येपणाचा धंदा एकाच जातींत राहिल्यामुळें इतर जाति अशक्त होऊन गेल्या व ब्राह्मण व वैश्य हे लढाईच्या अगदीं निरुपयोगी झाले व त्यांच्यांत बालविवाह पूर्ण प्रसृत होऊन हे लोक विशेषत: वैश्य जाति अगदीं बलहीन व सत्वहीन होऊन गेल्या. क्षत्रियांनीं कांहीं दिवसपर्यंत आपलें वंशपरंपरा प्राप्त झालेलें शौर्य व सामर्थ्य कायम ठेविलें व त्यांनीं अनेक शूरत्वाचीं कृत्यें केलीं ह्मणूनच परकीयांनीं हिंदुस्थानच्या सैन्याची तारीफ केली आहे. हुएनसंग गेल्यानंतर महंमद येईपावेतों क्षत्रियांच्या पराक्रमरूपी छत्राखालीं हिंदुस्थानदेश स्वतंत्रतेचा अनुभव घेत होता; परंतु या अवकाशांत हिंदु व बौद्ध धर्मांचा विरोध चालून हळूहळू बुद्धधर्म नाहींसा होऊन हिंदुधर्मास निराळें रूप येत होतें.

१६. याप्रमाणें हिंदुलोक ऐहिक सुख व पारत्रिक वादविवाद यांत गुंग असतां अफगाण व तुर्क लोकांचे सोटे पाठींत बसल्यामुळें खडबडून जागे झाले, व पाहतात तों ज्या साधनानें परवशतेच्या दु:सह त्रासापासून ते मुकले असते, तें साधन ह्मणजे शक्ति व शौर्य अगदीं समूळ नाहींसें झालें. येथपासून जी आज आठशें वर्षेंपर्यंत अव्याहत चालू आहे, त्या आपल्या कष्टप्राय स्थितीस प्रारंभ झाला. महंमदानें पंजाब देश सर केला. या वेळच्या इतिहासाचें वर्णन ह्मणजे हजारों हिंदु शिपायांनीं तुर्क व अफगाणांपुढें घाबरून पळत सुटावें याच गोष्टीनें भरलें

आहे. रजपुतांनीं मात्र आपल्या पूर्वजांप्रमाणें मृत्यूस तुच्छ मानलें, परंतु त्या पूर्वजांचें शौर्य व सामर्थ्य त्यांच्यांत दिसलें नाहीं. परकीय राजानें आपणांस लढाईत धरलें ह्मणून आपण राज्य करण्यास अयोग्य झालों, असें मानून पंजाबचा राजा जयपाळ हा अग्निचितेवर जळून मेला. पण एवढ्यानें हिंदु-राजांस चांगले दिवस आले नाहींत. अश्लाघ्य धर्मश्रद्धा व शरीरदौर्बल्य यामुळें हिंदुस्थानचे लोक अगदीं भितरे झाले होते, आणि सोमनाथाच्या लढाईत हिंदुस्थानच्या सर्व राजांच्या एकवट झालेल्या सैन्याच्यानें महंमदाच्या सैन्यापुढें टिकाव धरवला नाहीं. तत्रापि रजपूत अजूनही कांहीं अंशीं प्रबळ होते, ह्मणून परत जातांना चोहाण रजपुतांच्या अजमीर शहरावरून न जातां सिंध देशच्या वाळवंटाचा मार्ग महंमदानें पतकरिला.

३७. आणखी दोनशें वर्षेपर्यंत हिंदुस्थानांत पुनः सामसूम झाली. ह्या काळांत परचक्र आलें असतां जीं जीं साधनें उपयोगी पडतील त्यांच्या तयारीकडे लक्ष न देतां हिंदु लोक तसेच असावध राहिले आणि नेहमींप्रमाणें आपसांतील लढाया व धर्मवाद करीत होते. इतक्या अवधींत देशाच्या ऱ्हासाचें बीज रुजून त्याचा मोठा वृक्ष बनला व त्या वृक्षाचीं मुळें जमिनींत दृढ होऊन गेलीं. रजपूत लोकांतही शाकान्नभक्षण आणि बालविवाह शिरले. गुजराथचा राजा कुमारपाल हा जैन झाला. रजपूत लोकांच्या जातीच्या जातीस ह्या नवीन मतानें ग्रासून टाकिलें. भाटे लोक पूर्वी अस्सल रजपूत होते, ते बानिये

बनले आणि त्यांच्यांत पाळण्यांतील मुलांचीं सुद्धां लग्नें होऊं लागलीं. रजपूत हेच हिंदुस्थानचे रक्षक राहिले होते, तेही अशक्त झाल्यामुळें सर्व हिंदुस्थान देशाची अशी स्थिति झाली कीं या देशास परकीयांनीं येऊन सहज जिंकावें व त्याप्रमाणें लवकरच मुसलमानांच्या स्वाऱ्या पुनः होऊन देशाची वाताहात झाली.

३८. हिंदुस्थानची बादशाही एका गुलामानें स्थापन केली. ह्या गुलाम बादशाहचा उंच मनोरा आजदिवसपर्यंत ज्या दिवशीं हिंदुस्थानचें स्वातंत्र्य पुनः उदयास येण्याची अशा नाहीं अशा रीतीनें नष्ट झालें त्या दिवसाची साक्ष देत आहे. पंचवीस वर्षांचे आंत प्रयाग, बंगाल व माळवा ह्यांसुद्धां सर्व हिंदुस्थान सर झाला. इतकी मोठी प्रजा इतक्या अल्पकाळांत मुसलमानांच्या स्वाधीन व्हावी, अशी स्थिति हिंदुस्थानास येण्यास हिंदु लोकांच्या तेजाची किती हानि झाली असावी, याची कल्पना वाचकांनींच करावी. चवदाव्या शतकाच्या प्रारंभीं अल्लाउद्दिन खिलजी यानें दक्षिणदेश व गुजराथ हे प्रांत सर केले. या एका शतकाचे अवधींत हिंदुलोक अधिकच बलहीन झाले होते. कवीच्या कल्पनेस वीररसाची स्फूर्ति होईल अशी एकही गोष्ट या सर्व मोहिमेच्या इतिहासांत सांपडणार नाहीं. ज्याप्रमाणें एकाद्या मेंढ्यांच्या कळपांत वाघ उडी मारून घुसतो, आणि रंगांत येऊन वेड्यावांकड्या उड्या मारीत आपल्या पंजाच्या तडाक्यांत जें जें सांपडेल तें फन्ना करून टाकतो, त्याप्रमाणें अल्लाउद्दिन व त्याचा सेनापति मलिक

काफर यांनीं महाराष्ट्र, गुजराथ व दक्षिण प्रांतांवर स्वाऱ्या करून सर्व देश धुळीस मिळविला, हिंदुलोकांच्या दावणीच्या दावणी कापून काढिल्या, हजारों मुग्ध कुमारिकांस लज्जास्पद दास्य भोगावयास लावलें आणि राजमंदिरांतून व देवालयांतून मणोगणती सोनें लुटून नेलें. अशा रीतीच्या हृदयास घरें पाडणाऱ्या गोष्टींशिवाय दक्षिण देशाच्या मोहिमेच्या इतिहासांत दुसरें कांहींच सांपडावयाचें नाहीं ! हिंदुलोक इतके दुर्बल होऊन गेले होते कीं, आपल्या मुग्ध मुलींची लज्जा राखण्यास व आपल्या वाचाहीन मूर्तींचें धन संरक्षण करण्यास त्यांस अवसान राहिलें नव्हतें. वायूच्या झटक्याप्रमाणें हें अनिवार्य दुःख आहे किंवा हा कलियुगाचा फेरा आहे असें ह्मणून हें दुर्धर संकट हिंदुलोकांनीं निमूटपणें सोसलें. विजयानगरच्या देवराय राजानें ज्या वेळेस आपल्या इष्टमित्रांची व शहाण्या लोकांची सभा भरवून असा प्रश्न केला कीं, आह्मीं हिंद लोक मुसलमान लोकांस नेहमीच हार कां जातों ? त्या वेळेस ब्राह्मण लोकांनीं खरोखरच हाच जबाब दिला. ते ह्मणाले " हर! हर! हा कलियुगाचा तडाका आहे. हें असें होणारच ह्मणून आमच्या शास्त्रांत पूर्वींच लिहून ठेविलें आहे, व भाललिखित दुःख टाळण्यास ब्रह्मदेवही समर्थ नाहीं. " परंतु क्षत्रिययोद्ध्यांनीं साफ सांगितलें कीं हिंदु लोकांपेक्षां तुर्क लोक अधिक बळकट आहेत व ते युद्धशास्त्रांत चांगले निपुण आहेत. त्यांचीं हत्यारं अधिक चांगलीं आहेत, व ते फार शूर आहेत, व त्यांणीं राजास शहाणपणानें आपलें सैन्य सुधारण्याविषयीं उपदेश केला. ब्राह्मणांच्या विद्वत्तेविषयीं आप-

त्यास कांहीं ह्मणणें नाहीं. परंतु हिंदु लोक पराजित कां झाले याचें रजपूत लोकांनीं जें कारण दाखविलें, तेंच इतिहासकारांस व तत्त्ववेत्त्यांस पसंत पडेल.

३९. याप्रमाणें हिंदु लोकांच्या शौर्याच्या संबंधानें हिंदुस्थानच्या इतिहासाची थोडक्यांत माहिती आहे. त्यांनीं अलेक्झांडरच्या ग्रीक योद्ध्यांशीं, हूण लोकांशीं, शक लोकांशीं, परशियन लोकांशीं सामना केला, त्या वेळेस ते दमदार व शूर असून त्यांस भीति मुळींच ठाऊक नव्हती आणि आपलें स्वातंत्र्य कायम ठेवण्यास ते नेहमीं तयार होत, असें आपणांस आढळून आलें. हुएनसंग याणें सातव्या शतकांत मराठे लोकांच्या शौर्याविषयीं फारच प्रशंसा केली आहे. हिंदुलोकांस आपल्यावर अंमल करणारे आपलेच राजे असावे असें वाटत असे. यानंतर बुद्धधर्माचा व हिंदुधर्माचा समेट झाला, व बालविवाह प्रचारांत आले. १००० सनांत महंमदानें पंजाब काबीज केला. १२०० वर्षी शाबुद्दीन याणें दिल्लीच्या पृथ्वीराजाचा व कनोजच्या जयचंद राजाचा पराभव केला. अजूनही रजपूत लोकांचें पाणी पुष्कळ कायम होतें, ह्मणून ते लोक देश सोडून डोंगरांत व मरुदेशांत जाऊन राहिले. परंतु हिंदुस्थानचें विस्तीर्ण क्षेत्र भित्र्या व नरम लोकांच्या हातीं राहिल्यामुळें तें लवकरच परकीयांच्या हस्तगत झालें. १३०० वर्षी अल्लाउद्दीन याणें दक्षिण देश जिंकला. कत्तल, जुलूम, लूट ह्यांशिवाय या इतिहासांत दुसरें कांहींच नजरेस येत नाहीं. १४०० वर्षी विजयानगर काबीज झालें. व भोळ्या ब्राह्मणांनीं हा कलि-

युगाचाच परिणाम आहे ह्मणून आपल्या कप्पाळास हात लाविला.

४०. हिंदुस्थानच्या राष्ट्रीय अवनतीसंबंधानें ज्या दोन प्रश्नांचा उलगडा करावयाचा होता, तो येथवर झाला. बालविवाह केव्हां उत्पन्न झाले, याविषयीं ऐतिहासिक प्रमाण पाहतां हुएनसंगच्या प्रवासानंतर व मुसलमानी राज्य होण्यापूर्वी बालविवाह रूढ झाले असें ठरतें. येथें बालविवाह कसे प्रचारांत आले, ही शंका उत्पन्न होते. कारण मुसलमान लोकांच्या जुलुमामुळें बालविवाह सुरू झाले, ही उपपत्ति आपण निराधार ठरविली आहे. मला वाटतें कीं हिंदुधर्माचें आजकालचें जें स्वरूप आहे, तें ज्या वेळेस कायम झालें, त्या वेळेसच बालविवाह उत्पन्न झाले असावे; ह्मणजे बुद्धधर्म व हिंदुधर्म यांच्या संमेलनापासून ते उत्पन्न झाले आहेत. इसवी सन ७०० पासून ९०० पर्यंत या दोन धर्मांचा युद्धप्रसंग होत होता व या काळाचे मुख्य ऐतिहासिक पुरुष शंकराचार्य हे होत. हिंदुधर्माचा बौद्धधर्माशीं झगडा होऊन शेवटीं त्याचा जय कसा झाला, याजविषयीं सविस्तर हकीगत सांपडत नाहीं, ही मोठ्या दिलगिरीची गोष्ट आहे. या काळचा इतिहास संगतवार नाहीं व मुद्दाम असा केलेला दिसतो. मुख्य मुख्य गोष्टींच्या तारखा मिळत नाहींत, त्या मुद्दाम नाहींशा करून टाकिल्या असें दिसतें. ज्या गोष्टी हिंदुधर्मांत पूर्वींच्या काळीं करण्यास हरकत नव्हती व ज्या आतां बुद्धधर्माशीं समेट झाल्यामुळें निषिद्ध ठरल्या, त्या कलिवर्ज प्रकरणें ह्मणून त्यांत घातल्या

आणि खरोखरच ज्या कलियुगांत शारीरिक दौर्बल्य, अनीति व पारतंत्र्य येणार आहे, तें कलियुग या वेळेपासून हिंदुस्थानदेशावर सुरू झालें. पण इतर राष्ट्रांत कलियुग जाऊन सत्ययुगाचा याच सुमारास प्रारंभ झाला, हें आश्चर्य करण्यासारखें आहे.

दुसऱ्या लेखांत कोणत्याही लोकांच्या विवाहपद्धतींत स्त्रियांच्या नुकसानास कारण असा जो फरक होतो, तो बहुतकरून राजकीय जुलूम व धर्मबंधन या दोन गोष्टींमुळें होतो, हें दाखविलें आहे. बालविवाह राजकीय जुलुमामुळें उत्पन्न झाले नाहींत. ते हिंदुधर्मास बौद्धधर्माचा उच्छेद झाल्यावर जो जोर आला, त्यामुळें उत्पन्न झाले आहेत. ही गोष्ट नीट समजण्याकरितां कोणत्याही धर्माच्या वैराग्यप्रवृत्तीकडे लक्ष दिलें पाहिजे. बौद्धधर्म असो, किंवा ख्रिस्तिधर्म असो, किंवा हिंदुधर्म असो, सर्वांची वैराग्यप्रवृत्ति लग्न हें पाप आहे व स्त्रिया जात्या पापी आहेत व त्या मोक्षास जाण्यास अधिकारी नाहींत, असें मानण्याकडे असते. हिंदुधर्मामध्यें ही प्रवृत्ति बौद्धधर्मातून आली आहे, ती स्वतःसिद्ध नाहीं असें जरी मानलें तरी इतकें निर्विवाद आहे कीं हल्लीं आमची समजूत अशीच आहे. परंतु पूर्वकाळीं आमची अशी समजूत नव्हती. पूर्वकाळीं त्यांचा व्रतबंध होत असे— ( पुरा कल्पे तु नारीणां मौंजीबंधनमिष्यते. ) त्यांस वेदाध्ययनाचा अधिकार होता. त्यांस वैदिक कर्माचाही अधिकार असे, व त्यांस अविवाहित राहून ब्रह्मवादिनी होतां येत असे. परंतु बौद्धधर्म व जैनधर्म यांचें मत याहून अगदीं

भिन्न आहे. स्त्रियांस मोक्ष मिळेल किंवा नाहीं, या प्रश्नावर कुमारपाल राजाच्या दरबारांत दोन पंडितांमध्यें मोठा विवाद झाला व शेवटीं त्यांस अधिकार नाहीं असाच निर्णय झाला. ज्या वेळेस बौद्धधर्मी लोक हिंदु झाले, त्या वेळेस हा त्यांचा समज नाहींसा होईना, व हिंदु लोकांचा समज उलट होता; तेव्हां ह्या दोन उलट समाजांचा असा समेट झाला कीं, विवाहित स्त्रियांस आपल्या पतिद्वारा सर्व वैदिक कर्मांचा अधिकार आहे, पण अविवाहित स्त्रियांस मोक्ष नाहीं, हें मत ठाम झालें.

स्त्रियांना विवाह हाच संस्कार मौंजीबंधनाप्रमाणें आहे असें लोक समजूं लागले यामुळें दोहोंची वयासंबंधानें यत्ता एकच आहे, ह्मणजे मुलींचें लग्न ८ वे वर्षी करावें असा समज झाला. बौद्धधर्माची दुसरी एक अशी गोष्ट आहे कीं स्त्रियांना जोगिणी होऊन मठांत रहाण्याची त्या धर्मांत परवानगी असे. ज्याप्रमाणें युरोपांतील देशांत जोगी व जोगिणी यांची अनीति फार वाढल्यामुळें लोकांत त्यांचा इतका तिट्कारा झाला कीं लग्न अतिपवित्र वाटूं लागलें, व अविवाहित धर्मोपदेशक शत्रूसारखे भासूं लागले त्याप्र-माणेंच हिंदुस्थानांतील बौद्ध जती, व जतिणी, यांत अनीति फार पसरली, यामुळें हिंदुधर्माचा कल जोगिणींचा वर्ग समूळ नाहींसा करण्याकडे वाहूं लागला. प्रत्येक स्त्रीनें लग्न केलेंच पाहिजे असा नियम झाला. तिला जोगीण होतां येऊं नये ह्मणून लहानपणींच तिचें लग्न करण्याकडे हिंदुलोकांची प्रवृत्ति झाली. तिसरें, या बौद्ध लोकांच्या

अनीतीमुळें स्त्रियांविषयीं जें वाईट मत "तेन नारद नारीणां सतीत्वमुपजायते" या वाक्यांत दृष्टोत्पत्तीस येत आहे, त्या मताला जोर आला व हिंदुलोकांचे ग्रह असे झाले कीं, मुलीस कामवासना उत्पन्न होण्यापूर्वीच नवरा करून द्यावा, म्हणजे त्यांची नीति बिघडण्याचा संभव नाहीं, यांमुळेंही मुलींचें दहाव्या वर्षापूर्वी लग्न करण्याकडे लोकांची प्रवृत्ति झाली. या तिन्ही कारणांमुळें बालविवाहाचा प्रघात या काळांत पडला असावा.

४१. हिंदुस्थानच्या शोचनीय राष्ट्रीय स्थितीचें एक कारण बालविवाह आहे. या वाक्यांची सत्यता निरनिराळ्या तऱ्हेनें सिद्ध करण्याचा यत्न वरील विवेचनांत केला आहे. स्पेन्सरचा सामाजिक सिद्धांत पर्शियन, ग्रीक, रोमन व जर्मन लोकांच्या उदाहरणावरून पुष्ट होतो. त्या सिद्धांताचेंच हिंदुस्थान एक उदाहरण आहे. दुसरें बालविवाहापासून प्रजा अशक्त होते, प्रजा अशक्त झाल्यानें कांहीं कालानंतर समाज बलहीन होतो, व समाज निःसत्व झाल्यानें इतर बलिष्ठ राष्ट्रांचा सहजच तो अंकित होऊन जातो. तिसरें बालविवाह सातव्या शतकानंतर व मुसलमान येण्यापूर्वी उत्पन्न झाले असावे म्हणजे ते हुएनसंगच्या पूर्वी नव्हते व मुसलमान हिंदुस्थानांत आले त्या वेळेस सर्व हिंदुस्थानांत रूढ होते. तसेंच हुएनसंगच्या पूर्वी हिंदुलोक बळकट व शूर होते, पण मुसलमान आले त्या वेळेस ते अगदीं सत्वहीन होऊन गेले होते. ह्यावरूनही कालैक्यानें बालविवाह आपल्या पारतंत्र्याचें एक कारण आहे हें सिद्ध

होतें. ' बालविवाह या काळांत कसे उत्पन्न झाले याविषयींही शंका निवारण झाली. सारांश, हा सिद्धांत कालदृष्टयाही अबाधित झाला. हिंदुस्थानच्या निरनिराळ्या भागांचा विचार केला तर देशपरिमाणानेंही हा सिद्धांत खरा ठरेल, ह्मणजे ज्या काळीं बालविवाह प्रसृत झाले त्याच काळापासून आपला राजकीय ऱ्हास झाला; इतकेंच नव्हे, तर ज्या ज्या प्रदेशांत बालविवाह पूर्ण रूढ झाले त्या त्या प्रदेशांत राष्ट्रीय अवनति पूर्ण झाली व त्या त्या प्रदेशांतील लोक अशक्त व नामर्द आहेत. बंगाल देशांत बालविवाहाचा अम्मल पूर्ण बसला, व बंगाल्यांतील लोक अशक्त आहेत, इतकेंच नाहीं, तर तेथें हिंदुलोकांचें स्वतंत्र राज्य मुसलमानी प्रथम झाल्यापासून आज आठशें वर्षांत झालें नाहीं. हीच गोष्ट गुजराथ, मद्रास व सिंधदेशांची अनुक्रमें आहे. रजपूत लोकांत बालविवाहाचें प्रस्थ अद्याप नाहीं. त्यांच्यांत शेंकडा पाउणशें मुली विवाहसमयीं प्रौढ असतात. १६ वर्षांच्या आंत फार थोड्याच मुलींचा विवाह होतो, व रजपूत लोकांनीं आपलें स्वातंत्र्य पुष्कळ हिश्शानें आजमितीपर्यंत कायम ठेविलें आहे. मुसलमानांच्या चढावामुळें या स्वातंत्र्यप्रिय लोकांनीं आपले देश सोडिले व मरुस्थळांत व पर्वतांत त्यांनीं वसाहत करून मुसलमानांस दाद दिली नाहीं. पण जितक्या अंशानें बालविवाह त्यांच्यांत रूढ झाले तितक्या अंशानें त्यांचें तेज कमी झालें. हीच गोष्ट मराठ्यांची आहे. मराठे लोकांत शेंकडा २९ मुलींचा प्रौढ वयांत विवाह होतो असें ह्मटलें तरी चालेल व या मराठे लोकांनीं कांहीं थोडा काळपर्यंत आपलें शौर्य गाजविलें व

अद्यापिही मराठे लोक बळकट व शूर आहेत. स्वातंत्र्यप्रिय शूर लोकांत, मग ते जर्मन असोत, किंवा रजपूत असोत, स्त्रियांना अधिक मान व अधिक हक्क असतात व स्त्रियांचा अभिमान पुरुषांस असतो. जेथें मुलींचीं लग्नें आठव्या वर्षी किंवा त्यापूर्वी होतात, तेथें स्त्रियांना ही स्पृहणीय स्थिति कधीं प्राप्त होणार नाहीं. एखाद्या रजपूताला आपल्या नूतन विवाहित तरुणस्त्रीचा जो अभिमान असतो तो ज्याची प्रीतिधारा लहान वयांत लग्न झालेल्या आपल्या अर्भकबायकोच्या संघट्टणानें कुंठीत होऊन गेली असते त्याच्या ठिकाणीं कोठून असणार? असो. याप्रमाणें बालविवाहानें आपल्या देशाची राजकीय अवनति झाली, ही गोष्ट सिद्धांतदृष्टीनें, उपपत्तीनें, कालपरिमाणानें, व देशपरिमाणानेंही सिद्ध आहे, असें मला वाटतें.

४२. हा सिद्धांत दूराकृष्ट आहे असा ग्रह वाचकांचा होईल. याकरितां त्याची सिद्धता जितकी होईल तितकी केली पाहिजे. बालविवाहापासून प्रजा अशक्त होते ही गोष्ट अकबराच्याही लक्षांत आली होती. हिंदूलोकांच्या सहवासानें बालविवाह मुसलमान लोकांतही शिरले व हल्लीं बालविवाह मुसलमानांतही रूढ आहेत. मुलींस देण्याचा अधिकार बापाला असतो, या कारणानें मुसलमान व इतर लोकांतही क्वचित् मुलींस बाळपणांत देऊन टाकल्याचीं उदाहरणें सांपडतील; पण अशी सर्वत्र समाजरीत होऊन जाणें हें हिंदुलोकांच्या सहवासाचेंच फळ आहे. आईबापांनीं मुलांच्या लग्नाचे सोहाळे करावे व भोगावे ह्या मोहक हिंदु

चालीचा परिणाम तुर्क व मोंगल लोकांवर झाला यांत आश्चर्य नाहीं. परंतु अशा विवाहापासून मुसलमान लोक अशक्त होतील हा परिणाम अकबराच्या दूरदर्शी नजरेंत तेंव्हांच आला, व त्याणें १६ व्या वर्षापूर्वी मुलाचें व १४ व्या वर्षापूर्वी मुलीचें लग्न करूं नये असा कायदा केला. पण तो बहुत दिवस चालला नाहीं. विवाहापूर्वी वधूवराचे वय पोलिसाच्या अधिकाऱ्यांनीं पहावयाचें असल्यामुळें पोलिसाच्या जुलमास व लांचखोरीस ऊत आला व लोकांनीही अनेक प्रकारच्या लुच्चेगिऱ्या चालू केल्या. सारांश, या कायद्यानें बालविवाहाचें बंड मोडलें नाहीं व अखेरीस मोंगलराज्य शक्तिहीन होऊन मराठ्यांच्या तडाक्यांत व इंग्रजांच्या अमलांत विलयास गेलें.

४३. बालविवाह बंद झाल्याशिवाय हिंदुलोक स्वातंत्र्य उपभोगण्यास योग्य होणार नाहींत, असें टाल्बाईस व्हीलर या प्रसिद्ध इतिहासकाराचेंही मत आहे व या मताचाही आपण योग्य विचार केला पाहिजे. तो ह्मणतो "हिंदुलोकांपेक्षां पाश्चात्यलोक बळकट आहेत याचें कारण निराळी हवा व निराळी जात हीं आहेत हें खरें, पण एक गोष्ट कधींही विसरतां कामा नये. जोंपर्यंत हिंदुस्थानचे लोक लहान मुलांचीं घरांत कोंडून ठेविलेल्या लहान मुलींशीं लग्नें करतील तोंपर्यंत त्यांची प्रजा लहान पोरांपेक्षां अधिक चांगल्या स्थितींत कधींही येणार नाहीं. स्वतंत्रता व स्वराज्य यांस अवश्य लागणाऱ्या चळवळीनें ते निःशक्त होऊन जातील अशा राजकीय अधिकाराचा उपभोग घेण्यास

कोणत्याही शिक्षणानें ते समर्थ होणार नाहींत. शिक्षणानें प्रौढ मनुष्याप्रमाणें ते बोलूं शकतील, पण बालांप्रमाणें त्यांचे विचार व आचरण झाल्यावांचून कधींही राहणार नाहींत."

वरील सर्व प्रमाणांवरून बालविवाहाचा व आपल्या पारतंत्र्याचा कार्यकारणसंबंध आहे याजविषयीं कोणास शंका राहील असें वाटत नाहीं. बालविवाहापासून प्रजा अशक्त व भ्याड होते, व हेंच बीज राष्ट्रीय दुःस्थितीचें आहे. असें होण्याचीं आणखी दोन कारणें आहेत. त्यांचा उल्लेख पुढें सामाजिक दुर्व्यवस्था या सदराखालीं केला आहे.

## सामाजिक दुर्व्यवस्था.

बालविवाहापासून शारीरिक ऱ्हास व राष्ट्रीय अवनति ह्या सर्वव्यापी व भयंकर नुकसानाशिवाय आणखीही अनेक अनहितें होतात, परंतु तीं गौण व एकदेशव्यापी असल्या- मुळें त्यांचा येथवर ऊह केला नाहीं, व तीं एक प्रकारानें सामाजिक दुर्व्यवस्थेचीं स्वरूपें आहेत ह्मणून तीं स्वतंत्र सदराखालीं पुढें नंबरवारीनें दिलीं आहेत. प्रथम व तिसऱ्या अनहितापासून एकंदर देशांतील लोकांच्या शरीरावर व स्वभावावर अनिष्ट परिणाम होतो व थोडक्याच प्रमाणानें कां होईना, पण या दोन अनहितांनीं लोक अशक्त व भ्याड होण्यास मदत मिळते ह्मणून त्यांचा राष्ट्रीय अनहितांशींही संबंध मानल्यास हरकत नाहीं.

४४. लहान मुलांचें संगोपन अज्ञ मुलींना करावें लागतें, हें बालविवाहापासून प्रथम सामाजिक अनहित आहे. लहान वयांत मुलींचीं लग्नें झालीं ह्मणजे साहजिक लहान

वयांत त्यांस मुलें होतात. परंतु मातृत्वाला अवश्य लागणारी शक्ति व मनोनिग्रह या वयांत त्यांस असत नाहीं. एकत्र कुटुंबांत मुलांची जपणूक पुष्कळ अंशीं घरांतील वडील स्त्रियांकडे असते; परंतु मुलांस पाजणें व त्यांची शुश्रूषा करणें, हें मुख्य कर्तव्य मातेसच करावें लागतें. मुलांस दूध चांगलें मिळावें ह्मणून तिनें भोजनांत कोणतेंही वावडें खातां कामा नये. तसेंच मुलांस वेळच्या वेळेवर दूध पाजिलें पाहिजे. व तें रडलें व त्रास देऊं लागलें, तर तिनें न संतापतां त्याचें संगोपन केलें पाहिजे, ह्या गोष्टी मनोनिग्रहावांचून व शक्तीवांचून कशा होतील व ती शक्ति व तो मनोनिग्रह लहान मुलींच्या ठिकाणीं कसा सांपडेल? सारांश, अशा दुर्व्यवस्थेमुळें मुलांची आबळ होते. अलीकडे तर एकत्र कुटुंबाची व्यवस्था नाहींशी होत चालली आहे, यामुळें पूर्वी लहान आयांस वडील बायकांची जी मदत मिळत असे, तीही मिळेनाशी झाली आहे. याचा परिणाम असा झाला आहे कीं, हल्लीं आपल्या लोकांत सशक्त मूल क्वचितच दृष्टीस पडतें. जिकडे पहावें तिकडे अशक्त, रोगट, घाळकीं, अन्नवस्त्राची अबळ झालेलीं मुलें दिसतात, व युरोपियन लोकांच्या सशक्त, मांसल, लालगुंज मुलांशीं त्यांचा इतका विरोध दृष्टीस पडतो कीं हिंदुस्थान व पाश्चात्य देशांच्या एकंदर सद्यःस्थितींत जो अत्यंत फरक आहे, त्याचीं हीं मूर्तिमंत स्वरूपेंच आहेत असें वाटल्यावांचून राहत नाहीं.

४६. दुसरें अनहित असें आहे कीं मुलांच्या व मुलींच्या शिक्षणांत बालविवाहामुळें व्यत्यय येतो. फार प्राचीन

काळीं, गुरूच्या गृहीं राहून वेदाभ्यास व इतर शास्त्राध्ययन करावें व पूर्ण विद्या झाल्यावर लग्न करून गृहस्थाश्रम घ्यावा असा सांप्रदाय असे, यामुळें पुरुष वयानें व विद्येनें साहजिकच विवाहकालीं योग्य असत. द्विजांनीं दोन तीन किंवा एक वेद शिकावा असें मनूनें सांगितलें आहे व येवढा अभ्यास होण्यास ३६, २४, किंवा १२ वर्षांचा काळ लागतो. सारांश ८ व्या वर्षी उपनयन झाल्यावर निदान बारा वर्षे पावेतों पूर्वी मुलांचीं लग्नें होत नसत. परंतु बालविवाह झाल्यापासून ही सुव्यवस्था मोडून गेली. आतां १६ व्या किंवा १८ व्या वर्षी मुलांचें माथें कामविचारांनीं फिरून जातें, त्यांच्या शक्तीचा भलतीकडे व्यय होऊन जातो व त्यांच्या चित्ताची एकतानता नाहींशी होऊन जाते. अर्थात्च शेकडों मुलांना आपलें लक्ष लागत नाहीं ह्मणून या वयाच्या सुमारास विद्याभ्यास सोडून द्यावा लागतो. मुलींची स्थिति अशीच किंवा याहूनही वाईट आहे. १० व्या वर्षी किंवा त्यापूर्वी लग्न झालें ह्मणजे शाळा व अभ्यास सुटतात, व तेथेंच त्यांच्या शिक्षणक्रमाचा अंत होतो. इतक्या थोड्या मुदतींत त्या काय शिकणार? लग्न झाल्यानंतर नवऱ्यानें कितीही मनांत आणिलें तरी गृहस्थितीच्या अनेक कारणांनीं स्त्रियांचा अभ्यास जागृत राहण्याची किंवा नवीन होण्याची आशाच नको. मुलें झाल्यावरही पुरुषांनीं नेटानें विद्याभ्यास करून कृतार्थता मिळविल्याचीं उदाहरणें आहेत. तसेंच लहानपणीं ज्यांना कांहीं येत नव्हतें अशा स्त्रिया विवाह झाल्यावर शिकून फार विद्वान् झाल्या असतील. परंतु हीं उदाहरणें अपवादक आहेत व त्यांवरून

इतर स्त्रीपुरुषांची काय स्थिति आहे याजविषयीं अनुमान बांधतां येतें. शेतकरी, कारागीर वगैरे लोकांची स्थिति याहून भिन्न आहे, पण कांहीं अंशानें मेहनत करण्याची शक्ति, स्त्रियांची व पुरुषांची, लौकर मुलें झाल्यानें कमी होत असेल, व बालविवाहामुळें आपलें धंद्याचें हस्तकौशल्य संपादण्यास हरकत येत असेल, यांत संशय नाहीं.

४६. बालविवाहापासून हिंदु लोकांच्या स्वभावावर एक अत्यंत वाईट परिणाम झाला आहे हें तिसरें अनहित होय. आपल्या बायकोचें व आपल्या लहान अर्भकाचें काय होईल ही काळजी फारच अल्प वयांत आपल्या लोकांच्या चित्तांत खिळून जाते, यामुळें जेथें जेथें धाडसाचें काम करावयास पाहिजे, तेथें तेथें ही काळजी पायांतल्या बेडीप्रमाणें त्यांस जखडून टाकते. पंचविशीच्या अमदानींत मनुष्याच्या हातून एकादें साहसी महत् कृत्य होऊं शकेल, कारण या वयांत शरीरांत शक्ति असते; मनांत उमेद असून भीतीचा लेशही असत नाहीं. पण या वयांत येण्यापूर्वींच बायका व पोरें आपल्या गळ्यांत पडल्यामुळें या अत्यंत प्रिय वस्तूंचा पाश तोडवत नाहीं, आपलें पाऊल कोणत्याही धाडसाच्या कृत्यांत पडत नाहीं व आपण कूपमंडूकाप्रमाणें आपल्या क्षुद्र स्थितींतच संतोष मानून राहतों. बालविवाहाच्या चालीमुळें अशी मनाची स्थिति पिढ्यानुपिढ्या चालत आल्यामुळें इतकी दृढ झाली आहे कीं, हिंदु लोक निरुत्साही व भितरे अशी आपली यथार्थ निंदा इतर लोक करतात. स्त्रियांच्या स्वभावांसही याच प्रकारचा दोष बालविवाहामुळें उत्पन्न

होतो, ह्मणजे स्वावलंबन व स्वतंत्रता ह्या गुणांचा अगदींच बीमोड होऊन जातो. ज्या वयांत हे गुण उत्पन्न होऊन वाढावयाचे त्यापूर्वीच मुलींचें लग्न होऊन त्या सासुरवासाच्या तावडींत सांपडतात व त्यांस नम्रपणा व परावलंबन यांचा धडा मिळूं लागतो. हिंदु स्त्रिया फार नम्र व संतुष्ट असतात अशी आपण व पाश्चात्य लोक त्यांची स्तुति करतों. परंतु समजोत्कर्षाला अनुकूळ असे जे दोन स्त्रियांचे गुण त्यांचा नाश करून आह्मी ही स्तुति संपादिली आहे असें ह्मणावें लागेल. निरुत्साही बाप व नम्र आया यांची पिढ्यानुपिढ्या संतति इतकी गरीब व भितरी झाली आहे कीं पृथ्वीतलावरील स्वतंत्र व धाडसी लोकांच्या समाजांत हिंदुलोक शून्यवत् आहेत याचें आश्चर्य नाहीं.

४७. बालविवाहामुळें विजोड स्त्रीपुरुषांचे संबंध होतात, असें कित्येकांचें ह्मणणें आहे, पण तें खरें नाहीं. ज्या लोकांत स्त्रीपुरुषें मोठीं होऊन स्वयंवर करतात, अशा लोकांतही आपआपले संसारमित्र पसंत करण्याच्या कामांत लहर, लोभ, व मूर्खत्व यांचें प्राबल्य दिसून येतेंच; यामुळें विजोड संबंध आमच्यांत होतात, तितके त्या लोकांतही होतात. परंतु प्रेमातिशय ही वस्तु आपल्या लोकांत क्वचित्च सांपडेल, ही गोष्ट निर्विवाद आहे. आईबापांनीं बांधून दिलेल्या प्रणालिकेनें आपल्या प्रेमजलाचा पाट वाहतो. परंतु स्वर्गांतून वृष्टि होऊन जसा एखादा पाण्याचा लोट जमावा व त्यास वाटेल तिकडे तो पर्वत डोंगर फोडून आपला रस्ता काढतो त्या प्रकारचा प्रेमपूर आपल्यांत

दिसत नाहीं. स्वयंवर व बालविवाह यांच्या परिणामांचा हा फरक आहे. याजविषयीं दुसऱ्या लेखांत बरीच चर्चा झाली आहे सबब येथें जास्त लिहीत नाहीं.

४८. बालविवाहाच्या व्यवस्थेमुळें इतर लोकांच्या मानानें हिंदु समाजांत अधिक लग्नें होतात; ह्मणजे एकंदर लोकसंख्येच्या मानानें विवाहित अधिक आहेत हा एक फायदा आहे, अशी कित्येकांची समजूत आहे. या समजुतीच्या सत्यतेस मनुष्यगणतीच्या रिपोर्टावरून किंवा स्टाटिस्टिक पुस्तकांत सबळ आधार मिळेल असें मला वाटत नाहीं. कारण अर्थशास्त्रदृष्ट्या कमी किंवा अधिक लग्नें होणें हें समाजाच्या आर्थिक सुस्थितीवर अवलंबून आहे. पुरुषांचीं लग्नें याच नियमानें होतात; ह्मणजे ज्यांना ऐपत आहे, जे आपलें व आपल्या बायकोचें पोट भरूं शकतात, तेच लग्नें करतात, हीही गोष्ट निर्विवाद आहे. प्रत्येक मुलीचें लग्न झालें पाहिजे अशी जरी अट आपल्यांत आहे तरी असंमतवैधव्याचीही चाल आपल्यांत आहे, यामुळें पुरुष प्रथमवर व बीजवर मिळून सर्वांना लहान मुलींशीं लग्न करावें लागतें यामुळें लग्न करूं इच्छिणाऱ्या पुरुषांपेक्षां लग्न झालेंच पाहिजे व लग्न करण्यास तयार अशा बायकांची संख्या अधिक होत नाहीं. सारांश, ज्या देशांत सर्व मुलींचीं लग्नें झालीं पाहिजेत अशी अट नाहीं व विधवा स्त्रिया लग्न करूं शकतात, त्या देशांतील आर्थिक संपत्तीच्या मानानें जितक्या स्त्रियांचीं लग्नें होतील त्यापेक्षां अधिक राहिलेल्या स्त्रिया अविवाहित राहतील. त्यांत मुलींना

व विधवांना सारखेंच अविवाहित राहवें लागतें. हा प्रश्न जरी विशेष महत्वाचा नाहीं, तथापि हल्लींच्या सेन्सस रिपोर्टा-वरून त्याचा चांगला विचार करतां येईल. आपल्या लो-कांत नवराबायकोचें पोट भरण्यास आर्थिक शक्ति कमी पुरते, ही गोष्ट ध्यानांत धरली ह्मणजे या देशांत व इतर देशांत विवाहितांच्या प्रमाणांत जो फरक सांपडेल तो अ-धिक वाटणार नाहीं. व विवाहितांचें प्रमाण आर्थिक सुस्थि-तीवर अवलंबून आहे, या अर्थशास्त्राच्या सिद्धांतास बाध येणार नाहीं.

४९. लहानपणीं लग्नें केल्यापासून प्रजा फार वाढते असें कित्येकांचें मत आहे. हल्लींच्या हिंदुस्थानच्या स्थितींत प्रजा वाढणें इष्ट आहे किंवा नाहीं याचा मी विचार करीत नाहीं, पण हें मत निराधार आहे असें मला वाटेत.

प्रथम तर लहानपणीं लग्नें झाल्यामुळें मातापितरांची आयुर्मर्यादा कमी होते, ह्मणजे तीं जर साधारणरीत्या शंभर वर्षें जगतील तर लवकर प्रजोत्पादन सुरू झाल्यामुळें ७५ वर्षेंच जिवंत राहतील. मनुष्याच्या आयुष्याचे तीन काल करतां येतात; वाढ, प्रजाजनन किंवा संपूर्णता, व ऱ्हास हे तिन्ही काळ बहुधा सारखेच असतात. ठोकळ मानानें तीस वर्षें वाढ, तीस वर्षें संपूर्णता व तीस वर्षें ऱ्हास, असें मा-नतां येईल. जनावरांची स्थिति पाहिली तरी हाच नियम दिसतो. ज्यांच्या वाढीस फार दिवस लागतात, तीं फार दिवस टिकतात व बकऱ्यासारख्या जनावरांची अशी स्थिति असते कीं दोन तीन वर्षांच्या आंतच त्याचे अष्टाधिकार

संपून जातात. वनस्पतींचीही स्थिति अशीच आहे. मग मनुष्याची स्थिति यांसारखीच आहे यांत नवल कोणतें? ज्या स्त्रीपुरुषांची वाढ लवकर बंद होते, त्यांची संपूर्णताही लवकर समाप्त होते व ऱ्हासही लवकरच होतो. सारांश, अल्प वयांत प्रजोत्पादन सुरू झालें ह्मणजे प्रजाजननाची शक्तीही थोडींच वर्षे राहते व पुढें ऱ्हासही लवकरच होतो. दुसरें अपक्वदशेंत व्यवहार सुरू झाल्यामुळें संततिही कमी होते. तिसरें, जी प्रजा होते ती अशक्त असल्यामुळें लहानपणींच पुष्कळ मुलें मृत्युमुखीं पडतात. वरील सर्व गोष्टींचा विचार केला तर उशीरां लग्नें केल्यापासून प्रजा जितकी वाढेल, त्यापेक्षां लहानपणीं लग्नें केल्यापासून कमी वाढेल असेंच म्हणावें लागेल.

उशीरां लग्न करणें याचा अर्थ ४० किंवा ५० व्या वर्षी लग्न करणें असा मात्र समजतां कामा नये. स्त्रीपुरुषांची वाढ अनुक्रमे १६ व २५ व्या वर्षी किंवा त्या सुमारास पूर्ण होते; तरी या वयाच्या सुमारास लग्न केलें तर तें पुष्कळ संतति होण्यास फार अनुकूल आहे, या ह्मणण्यास कधींही बाध यावयाचा नाहीं. लोकगणतीच्या आंकड्यांवरून वरील सिद्धांताची सत्यता दाखवितां येणार नाहीं. कारण विवाहस्थितिव्यतिरिक्त हवा, संपत्ति, रोग इत्यादि दुसऱ्या अनेक कारणांवर लोकसंख्येची वाढ अवलंबून असते व म्हणूनच या देशाची व पाश्चात्य देशाची तुलना करणें योग्य होणार नाहीं. तत्रापि आंकड्यांच्या पुस्तकांवरून असें माहीत होतें कीं, फ्रान्स देशाखेरीजकरून

युरोपांतील इतर देशांत दर लग्नास चार अपत्यें होतात. हिंदुस्थानांत दर जोडप्यास सरासरीनें किती मुलें होतात हें समजण्यास कांहींच साधन नाहीं. परंतु साधारण कल्पनेवरून प्रत्येक हिंदु आईबापांस तिहींपेक्षां अधिक मुलांचें प्रमाण पडणार नाहीं. सारांश, बालविवाहापासून प्रौढविवाहापेक्षां अधिक प्रजा उत्पन्न होते, असें मला वाटत नाहीं. आतां हा विषय प्रत्येक मनुष्याच्या मतावर अवलंबून असल्यामुळें जास्त निश्चित रीतीनें लिहितां येत नाहीं, ही दिलगिरीची गोष्ट आहे.

५०. लवकर लग्नें झाल्यापासून ज्या वेळेस स्त्रीपुरुषांस कामवासना उत्पन्न होते, त्या वेळेस कामवासनेचें न्याय्य रीतीनें समाधान करण्याचें साधन स्त्रीपुरुषांस असल्यामुळें तरुणपणीं त्यांची नीति बिघडत नाहीं, असें कित्येकांचें ह्मणणें आहे, व आपल्या देशांत लग्नापूर्वी उत्पन्न झालेलीं मुलें, ज्यांस इंग्रजींत 'इल्लेजिटिमेट' ह्मणतात, फारच थोडीं असतात, किंबहुना मुळींच नाहींत, हा बालविवाहापासून फायदा आहे. हें ह्मणणें पुष्कळअंशीं खरें आहे; व अशा मुलांस आपल्या भाषेंत योग्य शब्दच नाहीं, हेंही एक समाजास भूषण आहे. इतर देशांची स्थिति कशी आहे व आपली स्थिति कशी आहे, या असाध्य व अप्रयोजक तुलनेंत मी शिरत नाहीं. परंतु या विषयासंबंधानें माझें असें ह्मणणें आहे कीं, आपल्याच देशाचा विचार केला असतां जरी लग्नापूर्वी स्त्रीपुरुषांचे गैरकायदेशीर संबंध आढळत नाहींत, तरी लग्न झाल्यानंतर पुष्कळ काळानें स्त्रीपु-

स्त्रांच्या नीतीवर व्यभिचारपटल येतें यांत संशय नाहीं. उदाहरणार्थ विवाहित स्थितींत व्यभिचारी व बाहेरख्याली लोक पुष्कळ असतात. हा परिणाम कांहीं अंशीं बालविवाहाचा असावा असें मला वाटतें. पुरुषानें एकपत्नीव्रतानें राहिलेंच पाहिजे, असा आपल्यांत सामाजिक निर्बंध नाहीं, हेंही या गोष्टीचें पुष्कळअंशीं कारण आहे. या विषयावर अधिक लिहिणें मला प्रशस्त वाटत नाहीं.

५१. लहानपणापासून नवऱ्याच्या कुटुंबांत वाढणें, त्याच्या स्वभावाची पूर्ण ओळख होणें, त्याजवर प्रेम जडणें, प्रौढदशेंत दृढसमागमामुळें उत्तरोत्तर एक विचार, एक इच्छा, एक उमेद अशी मनाची स्थिति होणें, ही शंसनीय स्थिति बालविवाहामुळें आपल्यांत दिसून येते, असा कित्येक लोकांचा समज आहे. रा० रा० भोडक यांनीं आपल्या सुप्रसिद्ध निबंधांत बालविवाहापासून होणारें हेंच पांचवें हित सांगितलें आहे, व उलटपक्षीं विचार करतांना या हितास दोष देण्यास त्यांना मुळींच जागा सांपडली नाहीं. अलीकडे कांहीं इंग्लिश लोकांनींही बालविवाहाची तारीफ हिंदुस्त्रियांच्या याच सुस्वभावावरून मासिक पुस्तकांतून केलेली आढळते. हिंदुस्त्रियांची लीनता, पतिसुख तें आपलें सुख, पतिदुःख तें आपलें दुःख, असें मानून त्यांस सदोदित तत्परायण ठेवणारी त्यांची मनोवृत्ति, पति अयोग्य असला तरी त्याजविषयीं अव्यभिचारी भक्ति व त्याच्या शुश्रूषेंत तत्परता इत्यादि गुण फारच प्रशंसनीय आहेत खरे, परंतु ही हिंदुस्त्रियांच्या मनाची थोरवी बालविवाहाचा परिणाम होय, ही

कल्पना मात्र चुकीची आहे. अशी मनाची स्थिति होण्यास दुसऱ्या गोष्टी कारणीभूत झाल्या आहेत. प्रथम अपल्या धर्माचा व पूर्वापार समजुतींचा असा एक जबरदस्त पगडा स्त्रियांच्या मनावर बसला आहे कीं खरोखर पति ह्मणजे दैवत ही कल्पना नव्हे, तर हें खरें तत्व आहे, असें त्यांच्या आचरणावरून स्पष्ट दिसतें. सीता, सावित्री इत्यादि अनुकरणीय स्त्रियांचीं सच्चरित्रें त्यांच्या डोळ्यांसमोर नेहमीं असतात व त्यांसारखें आचरण हें मोक्षसाधन आहे, इतकेंच नव्हे, तर लोकांत चांगलें ह्मणून घेण्याचेंही साधन आहे, असें त्या मानतात. याप्रमाणें धर्मबंधन व सामाजिक बंधन यांची 'प्रवृत्ति असून स्त्रियांची इतर स्थितिही तशीच आहे. त्यांस नावडत्या किंवा त्रास देणाऱ्या नवऱ्यापासूनही काडी मोडून घेण्याचा अधिकार नाहीं, किंबहुना एक पति मेला तरी त्यांस दुसरा करतां येत नाहीं, तसेंच त्यांस स्वतंत्रतेनें कोणत्याही मिळकतीचा उपभोग घेतां येत नाहीं व बहुतकरून त्यांची निराळी मिळकत असत नाहीं. सारांश, ज्या एका पुरुषाशीं विधीनें त्यांचा संबंध घातला आहे, त्याच्या सुखावर व शारीरिक सुस्थितीवर हिंदु स्त्रियांचें जन्मसौख्य अवलंबून असतें, व ह्मणूनच त्या आपल्या लंगड्यालुल्या नवऱ्यासही दैवत समजून एकभावानें त्याची सेवा कारितात व त्याजवर प्रेम करून त्याच्या संसारांत गढून जातात यांत नवल नाहीं. सारांश, हा परिणाम बालविवाहाचा नव्हे. ही गोष्ट उदाहरणांवरूनही स्पष्ट होईल. कांहीं मुलींचीं लग्नें फार उशीरां झालेलीं आपण पाहतों;

परंतु सहाव्यासातव्या वर्षी लग्न झालेल्या मुलींपेक्षां त्या आपल्या पतीच्या ठिकाणीं कमी प्रेमळ किंवा त्यांच्या संसारांत कमी दक्ष असतात काय? तसेंच ज्या जातींत मोठेपणीं स्त्रियांचीं लग्नें होतात त्या जातींच्या स्त्रियांच्या आंगीं ज्या गुणांची आपण प्रशंसा करतों, ते गुण वसत नाहींत काय? यावरून हे गुण बालविवाहाचा परिणाम नसून वर निर्दिष्ट केलेल्या दुसऱ्या कारणांनींच उत्पन्न झाले आहेत यांत संशय नाहीं.

५२. बालविवाहाचा शेवटला व सर्वांत अत्यंत भयंकर परिणाम बालवैधव्य होय. बालविवाह व असंमतवैधव्य या चालींच्या मिश्रणानें ज्याहून अधिक दुर्दैवी प्राणी या पृथ्वीतलावर सांपडणार नाहींत, असा बालविधवांचा वर्ग हिंदु समाजांत उत्पन्न झाला आहे. बालविवाहाच्या ऐवजीं प्रौढविवाह आपल्यांत असते, तर नुसत्या असंमतवैधव्यानेंच ज्या अनुकम्पनीय स्त्रियांवर तो प्रसंग पडता त्यांचें एवढें दुःख वाटलें नसतें. पण या जोडगोळीमुळें बालविधवारूपी भयंकर छिद्र आमच्या हृदयास पडलें आहे. खरोखरच बाल्यावस्थेंत वैधव्य प्राप्त झालेल्या व इष्टमित्रांनीं अव्हेरलेल्या या-करुणरस मूर्तिरथवा शरीरिणी-मुलीपेक्षां कष्टतर जिणें कोणाचेंही नसेल! व तिचा कांहीं तरी अपराध आहे काय? ती ह्या राक्षसीस्वरूपी दुष्ट चालीच्या दाढेंत जुलमानें कोंबलेला बळीच नाहीं काय? पतिसमागमें अनुभवलेल्या सुखाचें स्मरण करून तन्मय होऊन त्याच्या प्रीतिरूप फलकाचा आश्रय करून या

आयुष्याच्या दुःखोदधींत प्रौढ विधवा कदाचित् तरूं शकेल, पण बिचाऱ्या बालविधवेनें पतिसुख स्वप्नांतही पाहिलें नसतें; ज्याच्या मृत्युकुठारानें तिच्या सर्व आशावृक्षाचा उच्छेद झाला, त्याचें स्मरण देखील त्या मंदभागिनीस नसेल! पोटच्या गोळ्याकरितां पुत्रवती विधवेचा जीवतंतु तुटणार नाहीं, पण पोरवयांतच जिच्यावर घाला पडला तिला पुत्रसुख कोणीकडून असणार! सारांश, प्रियपतीबरोबर भोगिलेल्या विलासांची आठवण करून प्रस्तुत दुःखाचा क्षणभर विसर पाडील, किंवा आपल्या तान्हुल्यास न्हाऊं-माखूं घालण्यांत, त्यास वाढविण्यांत ती आपल्या मनाची करमणूक करील, तर ह्या दोन्ही गोष्टी बालविधवेच्या ठिकाणीं संभवत नाहींत. अशा स्थितींत बालविधवेचें आयुष्य कसें कंठावें? व यदाकदाचित् तिचें पाऊल वांकडें पडून तिच्यावर दुःखाचा डोंगर कोसळला व जनापवादाचा जबरदस्त डाग तिच्या सुकलेल्या हृदयावर बसला, तर तिणें आपल्या मातांपितरांच्या नांवानें रडत बसावें काय? मूढ मातांपितरांस असें वाटतें कीं, आपल्या मुलींचें लग्न लहानपणीं केलें ह्मणजे आपण आपलें कर्तव्य बजाविलें. पण लग्न होऊन मुलीस ऋतु येऊन नवऱ्याच्या स्वाधीन होऊन जाईपर्यंत किती वर्षें जावीं लागतात? या अवधींत बराबर नानाप्रकारचीं अरिष्टें येतात. त्यांत जर का आकाशाची कुऱ्हाड त्या पोरक्या पोरीवर कोसळली, तर त्या पितरांनींच आपल्या पोटच्या गोळ्यास दुःखसमुद्रांत ढकलून दिलें, असें होत नाहीं काय? व शेवटीं त्या रंडक्या पोरीस आपल्या घरांतच ठेवणें त्यांस भाग

पडत नाहीं काय? पण इतकें असूनही आमच्या हिंदुसमाजास द्रव येत नाहीं! कालचक्राचा फेरा, जन्मोजन्मींच्या पापाचें फळ, किंवा महामारीचा उपद्रव इत्यादि समजुती काढून आपण क्षणभर क्षुब्ध झालेल्या आपल्या अनुकम्पेस शांत करितों, आपल्या दुःखाच्या उमाळ्यांस गिळून टाकितों, व डोळ्यांवर कातडें ओढून पूर्वीपासून चालत आलेल्या मार्गानें पुनः अंधवत् जाऊं लागतों. शिव! शिव! केवढा अविचारीपणा! केवढें क्रौर्य! थोडा विचार केला तर हें वेदांती समाधान निर्मूल आहे, असें स्पष्ट दिसून येईल. नशिबानें ओढलेल्या इतर दारुण प्रसंगांहून बालवैधव्य अगदीं भिन्न आहे. महामारीचा उपद्रव होणें हें अनिवार्य भवितव्यतेचें फल आहे खरें. पण बालविधवेचा जिवंतपणीं मृत्यु आपण होऊन उत्पन्न केलेल्या बालविवाहरूपी काळ्न्याचें फळ आहे, तो मृत्यु, आपण होऊन आणतों व त्याचें निवारण व त्याचें औषध आपल्या हातांत आहे. पण जितकें जितकें जास्ती लिहावें तितकें तितकें विचारी पुरुषांचें हृदय भडभडून येतें, व या अन्यायराक्षसीच्या तडाक्यांत सांपडलेल्या अर्भकाकरितां आणखीं किती लिहावें व जागृतास जागें काय करावें, या विचाराने निराशेचा कळस होऊन जातो! बालविवाहापासून शारीरिक हानि होते, प्रजा अशक्त होते, समाज सत्वहीन व परतंत्र होतो, राजकीय अवनति होते, पुरुष निरुत्साही, व भितरे होतात, स्त्रिया नम्र व परावलंबी होतात, प्रजा कमी होते, बालविवाहापासून अनेक प्रकारचीं दुःखें आपल्यास प्राप्त झालीं आहेत, व एकही फायदा झाला आहे असें सांगतां येत नाहीं. पण, जरी आपलें यापैकीं एकही

नुकसान न होतें-किंवा झालें नसेल, बालविवाहापासून जरी दुसरे कित्येक फायदे झाले असतील, तरी ज्या बालविवाहा-हापासून अन्यायानें दुःखसमुद्रांत ढकललेल्या या बालवि-धवा निःसंशय उत्पन्न झाल्या आहेत, त्या बालविवाहाच्या चालीचा त्याग करणें हें आपलें अव्वल कर्तव्य आहे. विधवा-विवाह शास्त्रसिद्ध नसेल व तसें करणें पाप असेल; पण शास्त्रदृष्ट्याही प्रौढविवाहांत कांहीं दोष नाहीं, व इतकी गोष्ट खचित आहे कीं परमेश्वरासमोर व जगासमोर बाल-विवाहानें मोठा अन्याय होत आहे व या अन्यायाच्या हतभाग्य बळींपैकीं एकाही बळीस पंकांतून काढल्याचें जें पुण्य आहे, तें बालविवाहाच्या सर्व शास्त्राज्ञाही पाळल्यानें लाग-णार नाहीं.

---

सदर लेख जानेवारी १८९२ मध्ये छापून केसरीबरोबर वांटला गेला.

# अबलोन्नतिलेखमाला.

## लेख चवथा.

## बालविवाह शास्त्रसंमत नाहीं.

बालविवाह शास्त्रसंमत नाहीं, हें या लेखांत प्रतिपादन करण्याचें योजिलें आहे. सामाजिकदृष्ट्या बालविवाहापासून फार नुकसान आहे याजविषयीं मागील लेखांत विवेचन झालें. ज्या गोष्टीपासून व्यवहारांत व समाजांत आपलें नुकसान होतें, ती गोष्ट बहुधा धर्मशास्त्र आपल्यास करावयास सांगत नाहीं, व याप्रमाणेंच धर्मशास्त्रांचा योग्य विचार केला असतां बालविवाह शास्त्रास संमत नाहीं, हेंच आपल्यास दिसून येईल. दिवाणबहादूर रघुनाथराव यानीं या विषयावर अनेक लेख लिहिले आहेत. हेमन्तोत्सवव्याख्यानमालेंत बापूसाहेब आठल्ये यांनींही एक निबंध याच विषयावर वाचल्याचें वाचकांच्या लक्षांत असेल. अशा विद्वद्रत्नांनीं जें प्रतिपादन केलें त्यांत दोष काढणें मजसारख्यास उचित नाहीं. तथापि या विषयावर पुनः लेख लिहून वाचकांस आणखी तसदी देण्याचें धाडस करण्याचें प्रयोजन सांगितल्यावांचून मला गत्यंतर नाहीं. दिवाणबहादुरांनीं दीर्घ प्रयासानें व विद्वत्तेनें श्रुतिस्मृतींतून अनेक प्रमाणें काढून स्वमताचें शास्त्रीय रीतीनें समर्थन केलें, याजबद्दल त्यांचे आभार जितके मानावे तितके थोडेच; परंतु त्यांणीं विरुद्ध वाक्यांकडे दुर्लक्ष केलें किंवा त्यांची यथायोग्य गति लाविली

नाहीं, असें ह्मणावें लागतें. रावबहादूर आठल्ये यांचें विवेचन जरी अपुरें आहे तरी सर्व वाक्यांचा निःपक्षपातानें विचार करण्याचें श्रेय त्यांणीं घेतलें आहे. ' परंतु कांहीं अंशीं दिवाणबहादुरांच्या उलट दिशेकडे त्यांणीं चुकी केली आहे, ह्मणजे प्रतिपक्षाचें ह्मणणें वाजवीहून अधिक कबूल केलें आहे; तसेंच शास्त्रीय विवेचनांत ऐतिहासिक दृष्ट्या विचार केला तेंही रास्त नाहीं. हे दोष टाळण्याचा यत्न यथामति या विवेचनांत मीं केला आहे. तो कितपत सिद्धीस गेला आहे याजविषयीं सुज्ञ वाचकच विचार करतील.

धर्मशास्त्र कशास ह्मणावें याजविषयीं प्रथम व्याख्या झाली पाहिजे. मुसलमान लोकांत कोणताही धर्मविषयक विवाद उत्पन्न झाला ह्मणजे प्रथम प्रश्न असा विचारतात कीं, प्रतिपक्षास कुराण संमत आहे किंवा नाहीं ? जर संमत नसेल तर ते लोक वादासच प्रवृत्त होत नाहींत. ही त्यांची समजूत हटदर्शक समजतां कामा नये. " अलौकिकार्थसाधको धर्मः " ही व्याख्या विचारसिद्ध आहे, आणि अलौकिक तत्त्व दर्शविणारें साधन अलौकिक ग्रंथाशिवाय दुसरें कोणतेंच होऊं शकत नाहीं; कारण हें तत्त्व इंद्रिय किंवा बुद्धि यांणीं ज्ञेय नाहीं. अशा अलौकिक ग्रंथांस इंग्रजींत रिव्हेलेशन ह्मणतात. हिंदुधर्मांत वेदाचें प्रामाण्य याच प्रकारचें मानिलें जातें. तसेंच स्मृत्यादि ग्रंथ ऋषिकृत आहेत, तेही प्रमाणभूत मानले जातात. सारांश, धर्मशास्त्र ह्मणजे वेदादिप्रमाण मानलेले ग्रंथ होत.

अमुक ग्रंथ प्रमाण मानल्यावर मग विवाद कशाविषयीं? हा प्रश्न साहजिक उत्पन्न होतो; परंतु शब्दप्रामाण्य मानून हीं शंकास्थानें नाहींशीं होतात असें नाहीं. हा दोष भाषेचा आहे व तो काढून टाकणें हें कोणत्याही भाषेंत संभवत नाहीं. शब्दार्थ व वाक्यार्थ अनेक होतात हें सुप्रसिद्ध आहेच. काकर्थेही भिन्न होतात. उदाहरणार्थ कोणी असें ह्मणेल कीं 'अमुक मनुष्य फार शाहाणा आहे' तर याच वाक्याचे ह्मणणाऱ्याच्या झोंकाप्रमाणें अगदीं विरुद्ध अर्थ होतात. सारांश, शास्त्रीय वचनांचा खरा अभिप्राय काय आहे हें ठरविणें नेहमीं वादग्रस्त असतें; ह्मणूनच व्याकरण, न्याय, मीमासा इत्यादि अनेक शास्त्रांचा उपयोग धर्मशास्त्र समजण्यास करावा लागतो. धर्मशास्त्र कशास ह्मणावें व धर्मशास्त्र कसें लावावें, हे दोन प्रश्न अत्यंत महत्वाचे आहेत. या प्रश्नांचें उत्तर जसें द्यावें, त्याप्रमाणें पुढील विवेचन शास्त्रीय रीतीचें आहे किंवा नाहीं हें वाचकांस ठरवितां येईल. माझ्या समजुतीप्रमाणें शिष्टसांप्रदायास विरुद्ध न जातां जो शास्त्रार्थ ठरविला जाईल, तो धर्मशील व श्रद्धाळु लोकांस पसंत पडेल व ह्मणून तोच सांप्रदाय स्वीकारण्याचा मी निश्चय केला आहे. त्याजविषयीं शंका राहूं नये ह्मणून धर्मशास्त्र ह्मणजे काय व तें कसें लावावें याजविषयीं जी सरणी या विवेचनांत मीं स्वीकारली आहे, ती सविस्तर सांगतों.

**श्रुतिः स्मृतिः सदाचारः स्वस्य च प्रियमात्मनः**
**सम्यक्संकल्पजः कामो धर्ममूलमिदं स्मृतम् ।**

हें याज्ञवल्क्याचें वचन प्रसिद्ध आहे. वेद, स्मृति, शिष्टाचार, आपलें दैहिक व आत्मिक सुख आणि उत्तम मनोव्यापारापासून होणारी इच्छा, यांजवरून धर्म ठरवावा. प्रथम वेद ह्मणजे मंत्र, ब्राह्मण, आरण्यक, उपनिषद् वगैरे अपौरुषेय मानलेले ग्रंथ. आतां यांचे अर्थ समजणें फार कठीण आहे, व अलीकडे मॅक्स-मुलर, रा० ब० पंडित, दयानंदस्वामी इत्यादि विद्वानांनीं स्वसंमत अर्थ छापले आहेत; परंतु जुन्या मताचे लोकांस संमत होईल असा शास्त्रार्थ झाला पाहिजे, ह्मणून यास्कादि मुनींनीं केलेला अर्थ प्रमाणभूत धरून सायनाचार्यांनीं केलेलें भाष्य संमत धरलें पाहिजे. श्रुत्यंतर्गत सूत्रें मानलीं जातात व मुख्यत्वें धर्मशास्त्र समजण्यास हींच साधनें आहेत. सूत्रें हीं कठीण आहेत, ह्मणून त्यांवरील प्रसिद्ध भाष्यें आहेत तींही संमत मानलीं पाहिजेत. ही श्रुति शब्दाची व्याख्या व फोड झाली.

दुसरें धर्ममूल स्मृति. ऋषिकृत ह्मणून स्मृति प्रमाणभूत मानिल्या जातात. आतां कांहीं स्मृति उपलब्ध नाहींत, परंतु त्यांतील वाक्यें निबंधग्रंथांतून पठित आहेत तींही कबूल केलीं पाहिजेत किंवा नाहींत, याजविषयीं मतभेदास जागा आहे. याविषयींची मी येथें विशेष चर्चा करीत नाहीं. योग्य प्रसंगीं ती करतां येईल. आतां स्मृत्यांचा अर्थ कोश-व्याकरणावरूनच लाविला पाहिजे. स्मृतिव्याख्याकार आदरणीय आहेत; परंतु प्रमाण मानलेच पाहिजेत अशी प्रतिज्ञा होऊं शकत नाहीं. 'आप्तवाक्यं प्रमाणं' ही उक्ति ऋषींनाच लागू करावी, हें युक्त आहे. प्राचीन-अर्वा-

चीन पंडितांस लागू केल्यास ऋषींचें माहात्म्य कांहींच राह-णार नाहीं व दयानंद स्वामीचें मत कां मानूं नये, हा प्रश्न जड होईल. तिसरें मूळ शिष्टाचार. पुराणास धर्ममूळ याज्ञ-वल्क्यांनीं कां ह्मटलें नाहीं, हें समजत नाहीं. परंतु शिष्टा-चारांत पुराणांचा अंतर्भाव करण्यास हरकत नाहीं; पुराणे-तिहासावरून दृष्टीस येणारा शिष्टांचा आचार हाही धर्माचें अनुमान करण्यास साधन आहे. स्वात्मसुख व सुसंकल्पजन्य इच्छा, यांजविषयीं अधिक व्याख्या नको.

पांच धर्ममूळें निश्चित झालीं, परंतु यावरून धर्म्याधर्म कसें ठरवावें हा दुसरा प्रश्न आहे. हीं धर्ममूळें अनेक अस-ल्यामुळें त्यांत भाऊबंदकी होण्याचा संभव आहे. तसेंच सर्व धर्ममूलांनीं सिद्ध होईल तरच तो धर्म किंवा कसें? अशा अनेक अडचणी उत्पन्न होतात. त्याजविषयीं निर्णय झालाच पाहिजे. वरील श्लोकावरची विज्ञानेश्वराची टीका पाहिली, ह्मणजे याचा चांगला उलगडा होईल. 'एतेषां पूर्वापूर्व प्रामाण्यं' ह्मणजे सर्वांत श्रेष्ठ प्रामाण्य श्रुतीचें. श्रुति व स्मृति यांत विरोध असेल, तर श्रुतीच मानली पाहिजे. 'स्वस्य च प्रियमात्मनः' ह्याचा उपयोग ज्या वेळेस कोणत्याही गोष्टीचा विकल्प असेल, तेव्हांच केला पा-हिजे; ह्मणजे 'गर्भाष्टमेऽष्टमे वाब्दे ब्राह्मणस्योपनायनम्' गर्भापासून आठवे किंवा जन्मापासून आठवे वर्षी उपनयन करावें असा विकल्प आहे; तर ज्या वेळेस आपल्यास हित असेल त्या वेळेस मुलाची मुंज करावी. सारांश, स्मृत्याज्ञा आहे खरी, पण आपल्यास हित नाहीं, असें ह्मणून ती टा-

कून देण्यास हा आधार नव्हे. जेथें विकल्प असेल तथेंच ह्याचा उपयोग आहे. जेथें श्रुति-स्मृति-सदाचार यांची कांहींच आज्ञा नसेल, तेथें पांचवें धर्ममूल उपयोगांत येतें. मनःपूतं समाचरेत्' हा न्याय तेथें लाविला पाहिजे; आणि खरेंच, जेथें श्रुतिस्मृत्यादि धर्मशास्त्रास विरोध येत नाहीं, तेथें वरील वाक्याच्या लौकिकार्थाप्रमाणें जरी वागलें तरी प्रत्यवाय येईल असें वाटत नाहीं.

येथवर श्रुतिस्मृतिपुराणांत विरोध असतां त्यांच्या व्यवस्थेविषयीं विचार झाला. आतां श्रुति अनेक आहेत, स्मृति अनेक आहेत, पुराणें अनेक आहेत. श्रुतिश्रुतींत विरोध आला असतां विकल्प मानावा अशाविषयीं स्पष्ट वचन आहे; पण स्मृतिस्मृतींत विरोध असतां काय करावें याजविषयीं मात्र निर्णायक वचन आढळत नाहीं. 'कलौ पाराशरस्मृतिः' हें वचन धरून कांहीं ठिकाणीं अडचणी दूर केल्याचें निबंधकारांच्या ग्रंथांत आढळतें, परंतु हें वचन केवळ अर्थवादपर आहे असें इतर ठिकाणच्या लेखांवरून दिसतें, हें वचन जरी खरें मानलें तरी निर्वाह होत नाहीं; कारण पाराशरस्मृतींत ज्यांचा उल्लेख नाहीं, असे पुष्कळ विषय आहेत; तेव्हां अशा विषयांवर पुष्कळ विरोधी स्मृति लब्ध झाल्या तर काय करावें हा प्रश्न राहतोच. या प्रश्नावर अलीकडील सुशिक्षित लोकांचीं मतें अनेक प्रकारचीं दृष्टीस पडतात, परंतु तीं माझ्या समजुतीनें यथार्थ व धर्मशास्त्राच्या मूलकल्पनेस अनुसरून नाहींत. कांहींचें ह्मणणें असें कीं सर्व ऋषींची एक सभा करून बहुमतानें निकाल

करावा। 'विरोधो यत्र वाक्यानां प्रामाण्यं तत्र भूयसाम्' असें एक अप्रसिद्ध वचन आहे. पण असें करण्यांत प्रथम अडचण ही कीं ऋषि किती आहेत? त्यांचे ग्रंथ सर्वप्रसिद्ध आहेत किंवा नाहींत? समान मतें पड-ल्यास कसा शास्त्रार्थ ठरवावा? व नवीन स्मृतिवाक्य कोणीं शोधकानें काढल्यास निश्चितार्थ अशास्त्र ठरेल कीं नाहीं? शिवाय कमी मताच्या ऋषींचें वचन मानणारांस कोणत्या आधारानें सशास्त्र दोषी ठरवावें व त्यांना प्रायश्चित्त काय? इत्यादि अडचणी उत्पन्न होतात. दुसरी अशी कल्पना आहे कीं, जेथें विरोधी वचनें दृष्टीस पडतील तेथें विकल्प मानावा. जसें 'लोपः शाकल्यस्य' असें पा-णिनीय सूत्र असलें ह्मणजे याचा अर्थ लोप विकल्पानें होतो असें मानतात, तसें निरनिराळे ऋषि सारखेच पूज्य अस-ल्यामुळें विकल्प मानावा हें ठीक पडेल. पण असें मानलें असतांही अनर्थापत्ति आहे; कारण स्मृतींतून अनेक प्रका-रचे विरोध सांपडतात. विकल्प मानल्यास व्यक्तिस्वातंत्र्य फार वाढेल व धर्माचें निबन्धन शिथिल होईल. एका ग्रामांत, एका कुळांत, एका घरांत विरुद्ध आचार उत्पन्न होतील व विरुद्धार्थप्रतिपादक धर्म उपहासास्पद होईल. तिसरी व्यवस्था कांहीं लोक अशी लावतात कीं, स्मृति आचारमूलक समजून देशकालभेदानें विरुद्ध वचनांची व्य-वस्था लावून युक्ताचार सिद्ध करावा. ही कल्पना जुनीच आहे, परंतु ती फारच थोडक्या अंशानें आहे. रावबहादूर आठल्ये यांनीं याच व्यवस्थेस एकवाक्यता करण्याचा शिष्टसांप्रदाय ह्मणून दर्शविलें आहे तें मात्र सयुक्तिक

वाटत नाहीं. रूढाचारास फांटा देऊन विरोधी वचनाध्या आधारानें नवीन आचार उत्पन्न करतां येतील; किंवा जें नको असेल तें इतर देशांस लागू करण्याचा यत्न होईल. दुसरें, ज्या वाईट रूढि आहेत, ज्या भ्रमात्मक आहेत, त्याही काढून टाकण्यास कठीण पडेल व उत्तम उत्तम ऋषींचे आचार पुराकल्पाचे ह्मणून किंवा दुसऱ्या देशाचे म्हणून पुनः सुरू होणें असंभवनीय होईल. तिसरें, अमुक वचन अमुक देशास किंवा काळास लागू आहे अशी व्यवस्था करण्यास प्रमाणभूत मानलेला आधार कोणता? जर सर्वच ऋषि आम्हा सर्व हिंदूंस सारखेच पूज्य आहेत किंवा ते सर्वच पुराण व धर्मव्यवस्थापक आहेत, तर जोंपर्यंत 'कलौ पाराशरस्मृतिः' यासारखीं दुसऱ्या ऋषींबद्दल वचनें सांपडत नाहींत, तोंपर्यंत, अमुक विरोधी वचन अमुक देशपर किंवा कालपर लावावें हें मोठमोठाल्या भट्टोजी दीक्षितांसारख्यांचें ह्मणणेंही कबूल होणार नाहीं, व झालें तर दुसरें एकादें कोण्या पंडिताचें सयुक्तिक मत कां कबूल करूं नये? तात्पर्य, एकंदर विचार करितां जो सिद्धांत आजपर्यंत शिष्टसंमत होत आला तोच अबाधित ठरतो; ह्मणजे विरुद्धार्थभासक वचनांचा एकच अर्थ करावा, व यालाच एकवाक्यता म्हणतात. विरुद्धार्थाचा आभास काढून टाकण्यांत एक प्रकारची अर्थाची ओढाताण करावी लागते, परंतु त्यावांचून गत्यंतर नाहीं. आतां एक अर्थ जर होतच नाहीं, तर प्रथम विषय भिन्न करावयाचा ह्मणजे 'विषयभेदाद्व्यवस्था' लावावयाची. 'देशभेदाद्व्यवस्था' लावल्याचें उदाहरण फारच थोड्या ठिकाणीं सांपडेल. 'कालभेदेन व्यवस्था'

कण्ठरवोक्त कोठें आप्तवचन असेल तरच केली जाते. सारांश, येथें माझा व रा० ब० आठल्ये यांचा मतभेद आहे.

विरुद्धार्थाचा आभास होणाऱ्या वचनांचा एक अर्थ करावयाच्या रीति अनेक प्रकारच्या आहेत. त्यांचें अधिक सविस्तर वर्णन येथें केल्यास हा उपोद्घातच मुख्य विषय होऊन बसेल, परंतु एक उदाहरण घेऊन वरील विवेचनाचें स्पष्टीकरण केल्यानें वाचकांच्या मनांत विषय सहज भरेल.

**काममामरणात्तिष्ठेद्गृहे कन्यर्तुमत्यपि**
**न चवैनां प्रयच्छेत गुणहीनाय कर्हिचित् ।**

मनु.

**दद्याद्गुणवते कन्यां नग्निकामेव शक्तितः**
**अपि वा गुणहीनाय नोपरुंध्याद्रजस्वलाम् ।**

यम.

आतां हीं दोन विरुद्ध वचनें दोन ऋषींचीं आहेत. यांची एकवाक्यता ' कलौ पाराशरस्मृतिः ' यावरून होऊं शकत नाहीं; कारण यांपैकीं एकही पराशराची स्मृति नाहीं. असती तर हल्लींच्या कलियुगांत तेंच मानून बाकीचें सोडून दिलें असतें. कालभेदानेंही अशी व्यवस्था होऊं शकत नाहीं कीं मनु फार जुना आहे, यम नवीन आहे, तेव्हां मनु मानावा; कारण जुन्या मताप्रमाणें आपल्यास मनु व यम सारखेच जुने व सारखेच पूज्य. आतां देशभेदानें व्यवस्था लावावी; ह्मणजे मनूचें वचन अन्तर्वेदी किंवा दुसऱ्या प्रांताच्या ब्राह्मणांस लावावें; कारण तिकडे ब्राह्मणां-

तही मुली आमरणांत अविवाहित राहण्याचा आचार दृष्टीस पडतो, तेव्हां त्या देशाला मनु लावावा, व इतर देशांस यम लावावा; परंतु अशी व्यवस्था लावल्याचें कोठेंच दृष्ट नाहीं. कदाचित् असें मानलें तर एवढ्याचपुरता मनु आपल्याला लागू नाहीं, किंवा सर्वतोपरी लागू नाहीं? आणि अंतर्वेदीची चाल भ्रांतिमूलक असेल तर ती दुरुस्त कशी व्हावी? अमुक ऋषि अमुक देशाचा असें कोणत्याही स्मृतिवाक्यावरून सिद्ध नाहीं. मग आह्मी मनूस कां मानूं नये? व आमच्या इकडे मुली अविवाहित कां ठेवूं नयेत? सारांश, अमुक ऋषीचा अमुक काळ किंवा अमुक देश असें ह्मणतां येत नाहीं. मताधिक्य किंवा विकल्पही मानतां येत नाहीं. तेव्हां वरील विरोधाभासी वचनांची एकवाक्यता अशी करतात कीं मनूचें तात्पर्य इतकेंच समजावें कीं गुणवानाला कन्या द्यावी. 'ऋतुमत्यपि' व 'कामम्' या शब्दांवरून ऋतुमती राहणें हें चांगलें नाही हें मनूसही संमत आहे; तेव्हां ही वाईट गोष्ट सुद्धां करावी, परंतु गुणहीनाला मुलगी देऊं नये, ह्मणजे होतां होईल तों गुणवानाला कन्या द्यावी, असा अर्थवाद मनूनें केला आहे. अमक्याला मुलगी देण्यापेक्षां विहिरींत ढकलून द्यावी, इत्यादि मराठी वचनाप्रमाणें किंवा 'छेत्तव्यौ चरणौ तस्य' इत्यादि संस्कृत वचनांप्रमाणें हा अर्थवाद समजला ह्मणजे दोन्ही वचनांचा एक अर्थ झाला. अपिशब्दात् कामशब्दाच्च तद्वचनं न स्वार्थपरं किं तु गुणवते दानप्रशंसार्थम्। अशी व्यवस्था संस्कारमयूखांत दृष्ट आहे.

अर्थवादाचे, विरुद्धार्थाचें स्मृति लावण्याच्या वेळेस वारंवार प्रयोजन पडतें. अमुक अर्थवाद आहे किंवा नाहीं याचा निर्णय पूर्वापरसंबंध, कांकु, धडधडीत अप्रशस्तता, शिष्टाचार, इत्यादिकांवरून करतां येतो.

धर्म ह्मणजे काय व शास्त्रार्थ कसा लावावा हे विषय अत्यंत गहन व वादग्रस्त आहेत. मीमांसादि शास्त्रांचें मी अध्ययन केलें नाहीं, परंतु साधारण माहितीवरून ज्या कांहीं माझ्या कल्पना आहेत, त्या वाचकांसमोर मी थोडक्यांत ठेविल्या आहेत. यावरील नियमाप्रमाणें जें मीं विवेचन करणार आहें, तें जुन्या मताच्या लोकांस सर्वथैव ग्राह्य होईल अशी मी आशा करीत नाहीं. माझा यत्न एवढाच आहे कीं जुन्या मताच्या ठरींव रीतींप्रमाणेंही निःपक्षपातानें व हठवाद न करितां जर कोणी धर्मशास्त्राचा विचार करील, तर पुढील विवेचन एकदेशीय किंवा नास्तिक्यमूल आहे असें त्यास वाटूं नये. मी पहिल्या लखांतच लिहिलें आहे कीं पुराणमताभिमानी शास्त्री व नूतन शिक्षणालंकृत व्यक्तिस्वातंत्र्यप्रिय विद्वान् यांस हा यत्न जरी पसंत पडणार नाहीं, तरी ज्या साधारण स्थितींतील गृहस्थ लोकांस आपल्या विवाहपद्धतींतील व्यंगें दिसतात, पण धर्मश्रद्धेमुळें ज्यांस एखादा नवीन मार्ग संमत होत नाहीं, अशा कोमळ अंतःकरणाच्या श्रद्धाळु लोकांच्या मतांत जर कांहीं सुविचार उत्पन्न होतील व धर्मांच्या भीतीचें प्राबल्य कमी पडेल, तर मी आपल्यास कृतार्थ समजेन. असो. हा उपोद्घात फार लांबला; आतां आपण मुख्य विषयाकडे वळूं.

बालविवाह शास्त्रसंमत आहे या पूर्वपक्षाचें आपल्यास खंडन करावयाचें आहे; तेव्हां त्या पूर्वपक्षाचें स्वरूप प्रथम नीट मनांत आणिलें पाहिजे. जुन्या मताच्या लोकांची समजूत अशी आहे कीं शास्त्रांत मुलीच्या लग्नाचा उत्तम काळ आठवें वर्ष सांगितला आहे, व मुख्य लग्नाचा काळ एक दोन वर्षे अलीकडे किंवा पलीकडे आहे; तेव्हां बालविवाह ह्मणजे आठ नऊ वर्षांच्या मुलीचा विवाह व शास्त्रसंमत ह्मणजे 'शास्त्रे सम्यक् मतः' उत्तम मानलेला असा अर्थ घेऊन हा पूर्वपक्ष आहे असें आपण समजूं; तात्पर्य 'स्त्रीणामष्टमवर्षतस्त्रिषु' स्त्रियांचें लग्न आठव्यापासून तीन वर्षे उत्तम, या लोकमत दाखविणाऱ्या मार्तंडांत दिलेल्या वचनाच्या सत्यासत्यतेचा आपल्यास विचार करावयाचा आहे. तेव्हां प्रथम श्रुतींत लग्नाचा काळ कोणता सांगितला आहे तें पाहूं.

श्रुतींत विधिवाक्यें बहुतकरून सांपडत नाहींत. अमुक करा किंवा अमुक करूं नका, अशी आज्ञा मंत्रांत सांपडावयाची नाहीं. अमुक गोष्ट अमक्यानें केली, असेच उल्लेख मंत्रांत व ब्राह्मणांतही येतात; परंतु अशीं वाक्येंच विधिपर समजलीं जातात, हें सुप्रसिद्ध आहे.

ऋग्वेद अ० ८, अ० ३-२१

**सोमो वधूयुरभवदश्विनास्तावुभा वरा ।**
**सूर्यां यत्पत्ये शंसंतीं मनसा सवितादद्दात् ॥**

## भाष्य.

सोमः वधूयुः वधूकामः वरः अभवत् । तस्मिन् समये अश्विनाश्विनौ उभा उभौ वरा वरौ आस्ताम्। यत् यदा सूर्या पत्ये शंसंतीं पतिं कामयमानां पर्याप्तयौवनामित्यर्थः । मनसा सहिताय सोमाय वराय सविता तत्पिता अददात् दित्सां चकार ।

## अर्थ.

सोमास लग्न करण्याची इच्छा झाली, अश्विनीकुमारही वर होते, तेव्हां पतीची इच्छा करणारी ह्मणजे पर्याप्तयौवना अशी सूर्या तिला बापानें सोमाचें मन तिच्यावर आहे, असें पाहून सोमास देऊं केली.

यांत पतीची इच्छा करणारी सूर्या होती हें स्पष्ट आहे. कोणी अशी शंका करील कीं आठ वर्षांच्या मुलीला सुद्धां असें वाटतें कीं मला नवरा असावा; आणि खरोखरच आपल्या बालविवाहप्रपूरित समाजांत मुलीला बोलतां येऊं लागलें कीं तिला प्रथम प्रश्न हा, तुला नवरा करायचा कीं नाहीं? ह्मणजे बोबड्या वाणीनें मुलीनें जबाब द्यायचा कीं 'कलायचा.' अग काळा कीं गोरा? ह्मणजे मुलीनें 'गोला' ह्मणून जबाब दिलाच. सारांश, अशा समाजांत कोणी अशी शंका करील ह्मणून 'पतिं कामयमाना' याचा पर्याप्तयौवना ह्मणजे जिचें यौवन पूर्ण झालें आहे असाच अर्थ आहे, असें माधवाचार्यांनीं स्पष्ट लिहिलें, व तें पदरचें नाहीं. त्यास वेदांत दुसरीं प्रमाणें आहेत. उदाहरणः—

तै. संहि. कां. ७ प्र ३. अ. ११.

वधूर्जजान नवगज्जनित्री ।

भाष्य.

यथा नवं वरं गच्छतीति नवगत् नूननविवाहवती वधूः जनित्री उत्तरोत्तर प्रजोत्पादिका भवति तद्वदियं व्युष्टिः जजान जाता ।

अर्थ

नूतन विवाह झालेली वधू जशी उत्तरोत्तर एकामागून एक प्रजा उत्पन्न करते, तशी ही व्युष्टि सूर्याशीं संगत हो-ऊन उत्पन्न करिती झाली.

यांत नवगत् हा शब्द मार्मिक आहे. विवाह झाल्यावर पुष्कळ वर्षांनीं मुलीस ऋतु येऊन प्रजा उत्पन्न व्हावी अशा बालविवाहाच्या व्यवस्थेला नवगत् नूतनविवाहवती या शब्दानें टोलाच मारला. विवाह झाल्याबरोबर वधू प्रजा उत्पन्न करण्यास योग्य असली पाहिजे, ह्मणजे पर्याप्तयौवना पाहिजे. तसेंच,

ऋग्वेद अ० ८ अ २ व ११

कामद्युवं विमदायोहथुर्युवम् ॥

भाष्य.

कामद्युवं कामस्य दीपनीं वेनपुत्रीं जायां विमदायर्षये युवं ऊहथुः प्रापयथ

अर्थ.

कामाचें उद्दीपन करणारी वेनराजाची मुलगी विमद ऋषीला तुह्मीं दिलीत.

पर्याप्तयौवना शब्दाचाच हा कामस्य दीपिनी शब्द दुसरा पर्याय आहे. पतीची इच्छा करणारीं वधू असावी

अशाविषयीं तैत्तिरीय ब्रा० कां. २ प्र. ३ अ. १० तही एक गोष्ट आहे. प्रजापतीची कन्या सीता इचें प्रेम सोमावर बसलें, परंतु सोमाचें प्रेम श्रद्धेवर होतें; तेव्हां सीतेनें बापास सांगितलें कीं सोम मला आवडतो, पण तो मला वरीत नाहीं; तेव्हां प्रजापतीनें स्थगर वनस्पतीचा एक दागिना करून तो अभिमंत्रून तिच्या मस्तकावर लाविला व तिला सोमाकडे पाठविलें; तेव्हां सोमास मोह होऊन त्यानें तिला आपल्यापाशीं बोलाविलें. ती ह्मणाली: 'भोगं तु म आचक्ष्व। एतन्म आचक्ष्व। यत्ते पाणाविति.' यासारखीं दुसरीं प्रमाणें बहुत सांपडतील.

विवाहाच्या वेळेस जे मंत्र ह्मणतात त्यांवरूनही विवाहकालीं वधू मोठी उपभोगार्ह असावी, असें स्पष्ट सिद्ध होतें.

या न ऊरू उशती विश्रयाते यस्यामुशंतः

प्रहरामशेपम् ।

तसेंच:—

अमोहमस्मि सा त्वं सा त्वमस्यमोहम्
सामाहस्मि ऋक् त्वं द्यौरहं पृथिवी त्वम्
तावेहि विवहावहै सह रेतो दधावहै
प्रजां जनयावहै पुत्रान् विंदावहै बहून्

हे मंत्र चारी वेदांत आहेत व चारी वेदांच्या सूत्रांत हे मंत्र विवाहकाळीं ह्मणण्याविषयीं आज्ञा आहे. या प्रकारचीं वाक्यें पति विवाहसमयीं पत्नीस उद्देशून ह्मणतो. पण दहा वर्षांच्या आंतच विवाह झाला पाहिजे, असा जर शास्त्र-

सिद्धांत आहे तर १२।१४ वर्षांच्या मुलानें ८ वर्षांच्या मुलीस वरील वाक्यें ह्मणणें ह्मणजे शिमग्यांत लहान मुलें फांका घालून अनिर्वाच्य शब्द उच्चारितात, त्यासारखेंच निष्फळ नाहीं काय ?

विवाहापूर्वी मुलीचा उपभोग तीन देव करितात, अशी एक चमत्कारिक कल्पना वेदांत प्रसिद्ध आहे. हा उपभोग हे देव केव्हां करितात, याजविषयीं माधवानें भाष्यांत एके ठिकाणीं उल्लेख लिहिला आहे.

ऋग्वेद अष्टक. १ सू० ६६ ऋ० ४.

**जारः कनीनां पतिर्जनीनाम् ।**

भाष्य.

जनीनां जायानां कृतविवाहानां पतिर्भर्ता तथा च व्याख्यायते अनुपजातसंभोगेच्छावस्थां स्त्रियं सोमो लेभे । स च सोम ईषदुपजातभोगेच्छां तां विश्वावसवे गंधर्वाय प्रादात्। स च गंधर्वो विवाहसमये अग्नये प्रददौ । अग्निश्च मनुजाय भर्त्रे धनपुत्रैः सहितामिमां प्रायच्छदिति । इममर्थं काचिदृक् स्पष्टं ब्रूते—

**सोमोददद्गंधर्वाय गंधर्वोददग्नये ।**
**रयिं च पुत्रांश्चादादग्निर्मह्यमथो इमान् ॥**

अर्थ.

जीस पुरुषसंभोगेच्छा उत्पन्न झाली नाहीं अशी मुलगी सोमाला प्राप्त होते. मुलीस थोडी पुरुषसंभोगेच्छा उत्पन्न झाली ह्मणजे तिला सोम विश्वावसु गंधर्वास देतो. तो गंधर्व विवाहकालीं मुलीस अग्नीला देतो व नंतर अग्नि

मुलीस धनपुत्रांसहित पतीस देतो. हाच अर्थ एका ऋचेंत स्पष्ट सांगितला आहे. 'सोमोददद्गंधर्वाय' इत्यादि.

हा मंत्र चारी वेदांत आहे व या मंत्राचाही उपयोग विवाहकालीं करावा असें सर्व सूत्रांत सांगितलें आहे. या सायनव्याख्येवरून विवाहसमयीं मुलगी उत्पन्नपुरुषसंभोगच्छा असावी असें स्पष्ट होतें. 'सोमोददद्गंधर्वाय' या ऋचेंत जरी गंधर्वाचा उपभोगकाल सांगितला नाहीं, तरी वरील सायणवचनाला आधार दुसऱ्या ऋचेंत आहे तो असा.

ऋ० मं० १० सू० ८५.

भाष्य.

उदीर्ष्वातो विश्वावसो नमसेळामहे त्वा ।
अन्यामिच्छ प्रफर्व्यं स जायां पत्या सृज ॥

अतः अस्माच्छयनात् हे विश्वावसो कन्यास्वामिन् गंधर्व उदीर्ष्व उत्तिष्ठ त्वां नमसा नमस्कारेण ईळामहे स्तुमः । स त्वं अन्यां प्रफर्व्यं बृहन्नितंबां कन्यामिच्छ । जायां मां पत्यासह पुनः संसृज ।

अर्थ.

या शयनापासून, हे विश्वावसो कन्यास्वामि गंधर्वा! ऊठ. तुला नमस्कारानें आह्मी स्तवितों; तो तूं जिचा श्रोणीभाग मोठा आहे अशा दुसऱ्या मुलीची इच्छा धर व मला (पत्नीला) पतीशीं संसर्ग करूं दे.

या ऋचेंत प्रफर्व्यं हें पद महत्वाचें आहे. जिचा श्रोणीभाग मोठा झाला आहे, अर्थात् जिला संभोगेच्छा थोडी

उत्पन्न झाली आहे, अशा प्रौढ मुलीची इच्छा गंधर्वा करावी यावरून गंधर्वाचा उपभोगकाल नियत होतो; व सोमाचा उपभोग गंधर्वाच्या पूर्वी आहे तेव्हां श्रोणिविस्ता-रादि उपभोगेच्छादर्शक चिन्हें जिला नाहींत, अशा मुलीवर सोमाचा हक्क आहे, हें साहजिक आहे. असो. सोमादि देवांचा उपभोग केव्हां होतो, याजविषयीं स्मृतिवचनें आहेत त्यांचा विचार पुढें करण्यांत येईल.

वरील अनेक प्रमाणांवरून श्रुतींचा आशय असा स्पष्ट दिसतो कीं विवाहसमयीं वधू पर्याप्तयौवना असावी व विवा-हानंतर लागलीच प्रजाजननास समर्थ असावी असा जर श्रुतींचा आशय आहे, तर आठव्या वर्षी मुलीचें लग्न करावें हें धर्मशास्त्रांत उत्तम मानलें आहे, असें कसें ठरेल? श्रुति स्मृतींहून बलवान् आहेत या न्यायानें वधू पर्याप्तयौवना असावी हाच उत्तम पक्ष आहे असें ठरतें.

जर श्रुतीच साफ आज्ञा करीत आहेत तर विवादच राहिला नाहीं व पुढील खटाटोप करण्याचा आपला त्रास चुकला; पण जे लोक असें समजतात कीं श्रुत्यर्थ समजणें फार कठीण आहे त्या लोकाकरितां तो खटाटोप केलाच पाहिजे. श्रुतींचा अभिप्राय काय आहे व आपण कसें वागावें याजविषयीं विधिनिषेधरूपानें आज्ञा देण्याकरितां आश्वलायनादि सूत्रकार उत्पन्न झाले. प्रत्येक शाखेस तत्त-च्छाखीय सूत्र वेदतुल्य मानणें आहे व सूत्र व स्मृति यांत विरोध उत्पन्न झाला तर सूत्रेंच प्रमाण धरलीं पाहिजेत. तेव्हां या सूत्रांचा काय अभिप्राय हें पाहिलें पाहिजे. प्रथम ऋग्वेदाचें आश्वलायनसूत्र, या सूत्राची सरळ, निश्चितार्थ व

संकलित रीतीनें धर्म सांगण्याची शैली फारच प्रसिद्ध आहे. विवाहसंबंधांत आश्वलायनाचीं सूत्रें आहेत तीं येणेंप्रमाणें:—

आश्वलायन सूत्र.

**उदगयन आपूर्यमाणपक्षे चौलकर्मोपनयनगोदान विवाहाः।**

**सार्वकालमित्येके विवाहं।**

**बुद्धिमते कन्यां प्रयच्छेत्।**

**बुद्धिरूपशीललक्षणसम्पन्नामुपयच्छेत्।**

वराचें लक्षण सांगून मुलीचें लक्षण सांगितलें त्यांत वयाची इयत्ता सांगितली नाहीं, यावरून पाहिजे त्या वयाच्या स्त्रीशीं लग्न करावें असें सिद्ध होतें. परंतुः—

**अत ऊर्ध्वमक्षारलवणाशिनौ ब्रह्मचारिणावलंकुर्वाणावधः शायिनौ स्यातांम् त्रिरात्रं द्वादशरात्रम्। संवंत्सरं वैक ऋषिर्जायत इति।**

अर्थ.

विवाहानंतर तीन रात्री किंवा द्वादश रात्रीपर्यंत वधूवरांनीं ब्रह्मचर्य ठेवावें. फारच फार तपश्चर्या केली तर एक वर्ष करावी ह्मणजे ऋषिकल्प पुत्र होईल. यावरून आठ वर्षांच्या मुलींचा विवाह आश्वलायनाच्या वेळेस रूढ किंवा इष्ट होता, हें अगदीं निराधार ठरतें. अशा मुलीशीं विवाह केल्यावर एक वर्ष ब्रह्मचर्य बाळगल्यामुळें केवळ ऋषिकल्प मुलगा होईल अशी थेरवी गाण्याचें कांहीं प्रयो-

अन नव्हतें. वास्तविक पाहतां बालविवाहाच्या पद्धतीमुळें घरोघरीं एक वर्ष काय पण तीन तीन, चार चार वर्षेंपर्यंत वधूवरें ब्रह्मचर्यानें राहतात. पण ऋषिकल्प पुत्र न होतां उलट बलसत्वहीन पोरें मात्र उत्पन्न होतात. सारांश, या सूत्रावरून आश्वलायनमतें ऋतुमती कन्यासुद्धां विवाहकालीं प्रशस्त आहे, असें होतें मग ती प्रौढ तेरा,चौदा वर्षांची असल्यास त्यास हरकत कोठून असणार ? या कारिकेच्या पूर्वी एका ठिकाणीं सूत्रवृत्तींत असें ह्मटलें आहे 'वैदेहेषु सद्य एव व्यवायो दृष्टः। गृह्ये तु ब्रह्मचारिणौ त्रिरात्रमिति ब्रह्मचर्यविहितं तद्गृह्योक्तमेव कार्यं न देशधर्मः.' । अर्थ–वैदेहदेशांत ह्मणजे बहार देशांत लग्न झाल्याबरोबर स्त्रीपुरुषसंभोग होतो, परंतु सूत्रांत तीन रात्रीं ब्रह्मचर्यानें रहावें ह्मणून लिहिलें आहे; तेव्हां सूत्राप्रमाणें वागावें देशाचाराप्रमाणें वागूं नये. यावरून त्रिरात्र ब्रह्मचर्य हें सांगण्यांत संभोगाची प्राप्ति आली होती, त्याची निवृत्ति केली. जर आठ वर्षांच्या स्त्रीचा विवाह आहे तर अशा संभोगाची पांच साहा वर्षें प्राप्तिच नाहीं.

## सांख्यायन.

ऋग्वेदाचें सांख्यायन ह्मणून दुसरें सूत्र प्रसिद्ध आहे. त्यांतील विवाहसंबंधीं कारिका येणेंप्रमाणें:—

**विवाह उदगयन आपूर्यमाणपक्षे पुण्याहे । कुमार्यै पाणिं गृण्हीयात् या लक्षणसम्पन्ना स्यात् । त्रिरात्रं ब्रह्मचर्यं चरेयाताम् । अथ चतुर्थीकर्म । त्रिरात्रे निर्वृत्ते स्थालीपाकस्य जुहोति ।' इत्यादि.**

याचें तात्पर्य निराळें सांगावयास नको. आश्वलायनानें चतुर्थीकर्म सांगितलें नाहीं तें सांख्यायनानें सांगितलें आहे. त्याजविषयीं हिरण्यकेशी सूत्रांत विचार करूं. ऋग्वेदाचीं दुसरीं सूत्रें प्रसिद्ध नाहींत. यजुर्वेदाचीं बरींच सूत्रें आहेत त्यांत कात्यायन, आपस्तंब व हिरण्यकेशी सूत्रें प्रसिद्ध आहेत.

## हिरण्यकेशीसूत्र.

या सूत्रांतील विवाहकारिका येणेंप्रमाणें आहे.

**'समावृत्त आचार्यकुलान्मातापितरौ बिभृयात् ताभ्यामनुज्ञातोभार्यामुपयच्छेत सजातानग्निकां ब्रह्मचारिणीम् ।**

येथें सजातां अनग्निकां अशीं पदें पाडिलीं पाहिजेत व मातृदत्त वृत्तिकारानें तशींच पाडिलीं आहेत. प्रथम दर्शनीं नग्निका याचा अर्थ अनागतार्तवा ( ऋतु प्राप्त झाला नाहीं ) असा कोशप्रसिद्ध आहेच, तेव्हां अनग्निका ह्मणजे ऋतुमती असा स्पष्ट अर्थ होतो. व ज्या अर्थी चतुर्थीकर्म या सूत्रांत सांगितलें आहे, ह्मणजे चवथ्या रात्रीं पतिपत्नीसमागम होणें आहे व ऋतुपूर्वी स्त्रीसमागम निषिद्ध आहे तेव्हां नहाण आलेली मुलगी असावी हाच अर्थ योग्य असावा असें दिसतें. पण मातृदत्तानें येथें विलक्षण चातुर्य चालविलें आहे. मुलीचा विवाह ऋतुमती होण्यापूर्वी करावा असा स्मृत्यभिप्राय आहे तो लक्षांत आणून नग्निका याचा अर्थ कोशांत होतो याच्या उलट करून अनग्निका ह्मणजे आसन्नार्तवा ह्मणजे जी अगदीं ऋतु येण्यासारखी झाली आहे असा केला आहे. अनग्निका ह्मणजे नुसती नहाण न आलेली

असा अर्थ करता तर आठव्या वर्षांच्या मुलीचा समावेश झाला असता, परंतु अशा मुलीशीं चतुर्थीकर्म करणें ह्मणजे गरीब बिचारीचा देह चिरडून टाकणें होईल; याकरितां मुलगी अगदीं नहाण येण्यास झालेली असावी असा त्याणें निर्बंध केला तोही जरी आह्मी मानिला, तरी आठव्या वर्षी लग्न करावें हें ह्मणणें अशास्त्र व वेडेपणाचेंच ठरतें.

आतां चतुर्थी कर्म काय आहे, याजविषयींच्या कारिका देतों. प्रथम 'त्रिरात्रमक्षारलवणाशिनौ ब्रह्मचारिणौ वसतः' हें आहेच. नंतर 'चतुर्थ्यामपररात्रेग्निमुपसमाधाय प्रायश्चित्तिपर्यंतं कृत्वा नव प्रायश्चित्तीर्जुहोति । प्राचीमुदीचीं वा संवेश्याथास्यै योनिमभिस्पृशति। सत्वा कामस्येत्यादिना परिष्वजते । मामनुव्रता इत्यथास्यै मुखेन मुखमीक्षते ।' इत्यादि कारिका आहेत, त्यांचा स्पष्टार्थ करण्याची जरूरी नाहीं. चतुर्थी कर्माचा उद्देश पतीचा पत्नीशीं समागम होऊन ती पतीची सर्वांशीं व्हावी असा आहे.

चतुर्थीहोममंत्रेण त्वङ्मांसहृदयेंद्रियैः
भर्त्रा संयुज्यते पत्नी तद्गोत्रा सा भवेदिति ।

अर्थ--चतुर्थी होमानें त्वचा, मांस, हृदय आणि इंद्रियें ईहींकरून पत्नी भर्त्याशीं संयोग पावते व ह्मणून त्याच्या गोत्रांत मिळून जाते. सारांश, हिरण्यकेशीसूत्रानें चालणाऱ्या ब्राह्मणांस ऋतुमती कन्या फार झालें तर आसन्नार्तवा कन्या विवाहास पाहिजे. अष्टवर्षा बिलकुल चालावयाची नाहीं, व तीच गोष्ट आपस्तंबादि सूत्रांची आहे. असें असून यजुर्वेदी लोक सूत्र सोडून स्मृतींचे भ्रांतिमूलक

अर्थ करून बालविवाह अन्धपरंपरेनें करतात व सूत्रोक्त चतुर्थीकर्म करीत नाहींत हा त्यांच्या सूत्रानें मोठा अधर्म नाहीं काय ? व आठव्या वर्षाच्या मुलीचें लग्न करणें उत्तम असें मानतात हें केवढें अज्ञान आहे ?

## गोभिलसूत्र.

गोभिलसूत्र सामवेदाचें आहे. या वेदाचे ब्राह्मण व इतर लोक फार थोडे आहेत. परंतु त्यांत कांहीं विरुद्धाभास करणारीं वचनें आहेत, स्बब त्यांचाही विचार केला पाहिजे. त्यांतील कारिका येणेंप्रमाणें.

'अनुज्ञातो दारान् कुर्वीत असगोत्रान्मातुरसपिण्डान्। नग्निका तु श्रेष्ठा। तावुभौ तत्प्रभृतित्रिरात्रमक्षारलवणाशिनौ। ब्रह्मचारिणौ भूमौसह शयीयाताम्। अथातश्चतुर्थीकर्म ऊर्ध्वं त्रिरात्रात्संभवः इत्येके। यदर्तुमती भवत्युपरतशोणिता तदा संभवकालः।

नग्निका ह्मणजे नहाण न आलेली अशी मुलगी उत्तम इतकें ह्मटल्यानें अनग्निका नाहाण आलेली त्याज्य किंवा दुष्ट असें होत नाहीं. नहाण आलेली असल्यास दोष नाहीं असें उलट सिद्ध होतें. तसेंच तिसऱ्या रात्रीनंतर संभव ह्मणजे संभोग करावा असें कित्येकांचें मत आहे, माझ्या मतें जेव्हां ऋतुमती होऊन शोणित बंद होईल तेव्हां संभोग करावा असें गोभिल ह्मणतात. यावरून मतभेद गोभिलानेंही खास कबूल केला. ह्मणजे कांहींच्या मतें स्त्रीशीं संभव लागलीच प्राप्त आहे, यावरून ती स्त्री प्रौढ

असलीच पाहिजे. आतां या लेखांत प्रशस्त काल कोणता याजविषयीं वाद आहे आणि गोभिलमतें नग्निका प्रशस्त आहे, अशी कोणी शंका घेइल. त्यास दोन दोन उत्तरें आहेत; पहिलें गोभिलसूत्र आमचें नाहीं. जर आमच्या सूत्रांत आज्ञा नसेल तर तें सूत्र घ्यावयाचें आहे; दुसरें नग्निका ह्मणजे नहाण न आलेली इतकाच अर्थ आहे. आतां नहाण न आलेली या शब्दांत एक वर्षापासून तों चौदा पंधरा वर्षांच्या मुलींचा समावेश होतो, तेव्हां यांत उत्तम काल कोणता हें पाहिलें पाहिजे. तें गोभिलानें सांगितलें नाहीं ह्मणून मातृदत्ताच्या मताप्रमाणें आसन्नार्तवा घ्यावी, किंवा सूत्रांत उल्लेख नाहीं ह्मणून मन्वादि स्मृति घ्याव्या, किंवा दोन पक्ष उत्पन्न होतील तेथें 'स्वस्य च प्रियमात्मनः' हें शास्त्र लावावयाचें आहे. त्यास आपलें हित उशीरां लग्न केल्यापासून आहे हें सिद्धच आहे. सारांश 'नग्निका तु श्रेष्ठा' हें जरी गोभिलमत आह्मी घेतलें, तरी आठव्या वर्षी मुलीचा विवाहकाल उत्तम हा पक्ष सिद्ध होत नाहीं.

चतुर्थीकर्म गोभिलमतानें संभोगाशिवाय होतें किंवा कसें हा प्रश्न आहे.

### पाराशर सूत्र

उदगयन आपूर्यमाणपक्षे पुण्याहे कुमार्याः पाणिं गृह्णीयात्। त्रिरात्रमक्षारलवणासिनौ स्याताम्। संवत्सरं न मिथुनमुपयाताम्। द्वादशरात्रं षड्रात्रं त्रिरात्रमन्ततः।

यावरील वृत्ति अशी आहे.

संवत्सरादि विकल्पाः शक्त्यपेक्षया व्यवस्थिता ज्ञेयाः। संवत्सरपक्षाशक्तौ त्रिरात्रपक्षाश्रयणेपि चतुर्थीकर्मानन्तरं पंचम्यादि रात्रावभिगमनम् चतुर्थीकर्मणः प्राक् तस्या भार्यात्वमेव न संवृत्तम्।

## अर्थ

संवत्सरपर्यंत ब्रह्मचारी रहावें किंवा बारा सहा तीन रात्रीं रहावें. हे पक्ष शक्ति नसेल तर आहेत. ह्मणजे ब्रह्मचर्य एक वर्षपर्यंत न ठेववेल तर तीन रात्री ठेवावें. व तीन रात्री ठेवण्याचा पक्ष स्वीकारिला असतां चतुर्थीकर्म झाल्यावर मग गमन करावें. तात्पर्य मोठ्यांत मोठा कठिण पक्ष एक संवत्सराचा ठेविला आहे यावरूनही कन्या विवाहसमयीं प्रौढ असावी असा सिद्धांत दिसतो.

असो; उपलब्ध सूत्रांचा विचार करितां ऋग्वेदी लोकांस ऋतुमती कन्या असल्यास हरकत नाहीं पण मोठी इष्ट आहे. हिरण्यकेशी सूत्रवाल्यास ऋतुमती किंवा आसन्नार्तवाच असली पाहिजे व हीच गोष्ट आपस्तम्बादि इतर यजुःशाखांस लागू आहे. सामवेदी लोकांस ऋतुमती नसून आसन्नार्तवा असावी हा पक्ष उत्तम. सर्व सूत्रांत संवत्सर ब्रह्मचर्याची थोरवी आहे असें दिसतें, यावरून आठव्या वर्षी लग्न करावें असें कोणीच पसंत करीत नाहीं.

आश्वलायनादि सूत्रकारांनीं विवाहसमयीं कन्या कोणत्या वयाची असावी असें कण्ठरवानें सांगितलें नाहीं ह्मणून आपल्यास स्मृतिशास्त्रांचा विचार करणें भाग आहे. तसेंच गो-

भिल नग्निका श्रेष्ठ सांगतो, तेव्हां नहाण येण्यापूर्वींचा कोणता काल उत्तम हें पाहण्यास स्मृतींचाच आधार घेतला पाहिजे. याकरितां येथपासून आपण अनेक स्मृतिकार काय इयत्ता सांगतात तें पाहूं.

प्रसिद्ध स्मृतिकार याज्ञवल्क्यानें सांगितले आहेत ते येणें-प्रमाणें—

मन्वत्रिविष्णुहारीतयाज्ञवल्क्योशनोंगिराः ॥
यमापस्तम्बसंवर्ताः कात्यायनबृहस्पती ॥ १ ॥
पराशरव्यासशंखलिखिता दक्षगौतमौ ॥
शातातपो वसिष्ठश्च धर्मशास्त्रप्रयोजकाः ॥ २ ।,

यांतील प्रत्येक स्मृतिकाराचें विवाहासंबंधें काय मत आहे तें पाहूं.

मनु.

गुरुणानुमतः स्नात्वा समावृत्तो यथाविधि ॥
उद्वहेत द्विजो भार्यां सवर्णां लक्षणान्विताम् ॥

या वचनांत मुलीच्या वयाचा निर्देश नाहीं, व यापुढें अमुक प्रकारची मुलगी करूं नये, वगैरे निषेध सांगितलें आहेत, त्यांतही वयासबंधानें कांहीं निषेध सांगितले नाहींत. परंतु नवव्या अध्यायांत कांहीं वचनें महत्वाचीं आहेत, त्यांचा विचार अवश्य केला पाहिजे.

उत्कृष्टायाभिरूपाय वराय सदृशाय च
अप्राप्तामपि तां तस्मै कन्या दद्याद्यथाविधि ।

तात्पर्य—उत्तम नवरा मिळत असेल तर ज्या मुलीचा लग्नाचा काळ झाला नसेल त्या मुलीचा देखील त्याशीं विवाह करावा. मुलीचा लग्नाचा काळ कोणता हें मनूनें सांगितलें नाहीं तेव्हां अर्थात् 'अप्राप्तां' या पदाचा अर्थ टीकाकारांनीं निरनिराळा त्यांच्या वेळेस रूढ असलेल्या चालींप्रमाणें केला फार जुना टीकाकार मेधातिथि आहे. त्या वेळेस बालविवाह रूढ नव्हते ह्मणून त्यानें अप्राप्तां याचा अर्थ 'कामस्पृहा यस्या नोत्पन्ना सा च अष्टवर्षा षड्वर्षा वा' असा केला आहे. व तो श्रुतिसूत्रास अविरुद्ध आहे. कारण श्रुतीवरून व सूत्रांवरून मुलीचा योग्य विवाहकाळ होण्यास तिला काम उत्पन्न झाला पाहिजे, ती पतीची इच्छा करणारी असावी, तेव्हां अशी जरी मुलगी नसेल म्हणजे ती जरी आठ, सहा वर्षांची आहे तरी उत्कृष्ट वर मिळत असतां त्यास देऊन टाकावी. यावरून मेधातिथिमतें आठ वर्षांचा विवाह अगदीं गौण आहे असें सिद्ध होतें. कुल्लूकभट्टांनीं वरील श्लोकाचा अर्थ निराळा केला आहे, म्हणजे आठ वर्षांहून कमी वयाच्यासुद्धां मुलीचा विवाह करावा, असें त्यांनीं लिहिलें आहे, पण तें श्रुतिसूत्रास विरुद्ध आहे इतकेंच नाहीं, तर मनूच्या पुढील वचनाशीं विरुद्ध आहे.

**त्रिंशद्वर्षो वहेद्भार्यां हृद्यां द्वादशवार्षिकीम्**
**त्र्यष्टवर्षोऽष्टवर्षां वा धर्मे सीदति सत्वरः ॥**

**अर्थ**—३० वर्षांच्या पुरुषानें बारा वर्षांची सुंदर बायको करावी पण धर्महानि होत असेल तर सत्वर होत्साता

२४ वर्षांच्या पुरुषानें आठ वर्षांच्या मुलीशीं विवाह करावा. या श्लोकाच्या टीकेंतही मेधातिथि व कुल्लूकभट्ट यांचा मतभेद आहे. पण इतकें खचित आहे कीं, ' ह्यां ' या पदावरून व प्रथम निर्देशावरून मुलीचा बाराव्या वर्षी विवाह उत्तम असा मनूचा साफ अभिप्राय आहे. त्वरापक्षीं आठव्या वर्षी मुलीचा विवाह गौण सांगितला आहे. यांत संशय नाहीं. या श्लोकांत वयाचा फरक किती पटीनें असावा हें सांगितलें आहे असें मेधातिथि ह्मणतो. पण तसें इतर स्मृतिवचनांवरून मानतां येत नाहीं. याज्ञवल्क्यांनीं नुसतेंच ' यवीयसीं ' असें ह्मटलें आहे, तसेंच भारतांत:—

त्रिंशद्वर्षः षोडशाब्दां भार्यां विन्देत नग्निकाम् ।

असें ह्मटलें आहे. स्कंदपुराणांत काशीखंडपूर्वार्धांत

रोगहीनां भ्रातृमतीं स्वस्मात्किंचिल्लघीयसीम्
उद्वहेत द्विजो भार्यां सवर्णां लक्षणान्विताम् ॥

असेंही वचन आहे. सारांश, असा तिप्पटीचा फरक इष्ट नाहीं असें दिसतें. याशिवाय वधुवरांच्या वयाचे फरक अमुकपटीनें असावे हें ह्मणणें वेडेपणाचें आहे, असें ज्यांनीं थोडीबहुत वयाचीं उदाहरणें अंकगणितांत केलीं आहेत त्यांस सहज दिसून येईल. ह्मणजे मुलगी ४ वर्षांची व मुलगा १२ वर्षांचा यांचा जो संबंध झाला, त्यापेक्षां मुलगी ८ वर्षांची व मुलगा २४ वर्षांचा हा संबंध फार निराळा व विजोड आहे. कारण पहिल्या संबंधांत लग्नानंतर चार वर्षांनी वधूचें वय ८ वर्षांचें व मुलाचें वय १६ वर्षांचें

होतें. सारांश वधूवरांच्या वयाचा फरक पटीनें सांगणें हा वेडेपणा आहे. असो. या सर्व कारणांवरून वरील मनूच्या श्लोकांचें तात्पर्य पट सांगण्याकडे नाहीं, तर वरांचा व वधूचा योग्य काळ सांगण्याकडे आहे. मुलगा ३० वर्षांचा असला ह्मणजे तो बहुतकरून पूर्णविद्य असतो. त्याचा विद्याभ्यास होऊन तो विवाह करण्यास योग्य होतो. हेंच मत कुल्लकाचें आहे 'प्रायेणैतावता कालेन गृहीतवेदो भवति' तसेंच मुलीचें योग्य वय बारावर्षांचें असावें ह्मणजे ती ह्य प्राप्तयौवना ( आसन्नार्तवा ) असावी. बारावेंच वर्ष असावें असें तात्पर्य नाहीं कारण महाभारतांतील वचनांत सोळाव्या वर्षाचा उल्लेख आहे. तेव्हां बारा किंवा सोळा या शब्दांचें रहस्य मुलगी मोठी संसारायोग्य असावी हेंच आहे.

तिसरें मनूचें वचन

त्रीणिवर्षाण्युदीक्षेत कुमार्तृमती सती ।
ऊर्ध्वं तु कालादेतस्माद्विन्देत सदृशं पतिम् ॥

हें आहे. याचा भावार्थ असा आहे कीं ऋतु प्राप्त झाल्यावर तीन वर्षे पावेतों बाप आपलें दान करील याची वाट मुलीनें पहावी. नंतर स्वतः सदृश पति पाहून त्याशीं लग्न लावावें. मनूचें चवथें वचन या लेखाच्या आरंभींच दिलें आहे. त्याचा व या वचनाचा मेळ घातला ह्मणजे बापानें होतां होईल तों मुलीस ऋतु प्राप्त होण्यापूर्वी तिचें लग्न करावें असा अर्थ त्या वचनाचा होतो. कारणपरत्वें न झाल्यास तीन वर्षे पावेतों त्यास मुदत आहे. पण पुढें

मुलीनें बापाची वाट न पहातां स्वतः लग्न करावें; अविवाहित राहूं नये.

मनुस्मृति ही सर्व स्मृतींत श्रेष्ठ आहे ह्मणून त्यांतील वचनांचा विशेष विचार केला. मुलीचें लग्न प्रौढ वयांत बारा वर्षांवर व ऋतुप्राप्तीच्या आंत करावें आपत्पक्षीं ऋतुप्राप्तीनंतर तीन वर्षेपर्यंत करण्यांत प्रत्यवाय नाहीं. तसेंच उत्तम वर मिळत असेल तर आठव्या वर्षीही मुलीचें लग्न करावें, इतका पिण्डितार्थ मनुस्मृतिवचनांचा आहे, असें माझें मत आहे व हाच सिद्धांत इतर सर्व स्मृतींचा आहे असें आपल्यास दिसून येईल.

अत्रि

अत्रिस्मृतींत विशेष वचनें नाहींत. पण एक वचन अत्यन्त महत्वाचें आहे. आसन्नार्तवा मुलगी लग्नांत असावी असा साम्प्रदाय असला ह्मणजे लग्नांत मुली अस्पर्श होण्याचा संभव असतो, तेव्हां अशा अडचणींत काय करावें ?

**विवाहे वितते तंत्रे होमकाल उपस्थिते ॥**

**कन्यामृतुमतीं दृष्ट्वा कथं कुर्वंति याज्ञिकाः ॥ १ ॥**

**हविष्मत्या स्नापयित्वा वस्त्रैरन्यैरलंकृताम् ॥**

**युंजानामाहुतिं कृत्वा ततः कर्म प्रवर्तते ॥ २ ॥**

विवाह चालला असतां कन्या ऋतुमती झाली तर हविष्मतीनें कन्येस स्नान घालून दुसरीं वस्त्रें नेसवून युंजानेति मंत्रानें आहुति देऊन पुढें कर्म चालवावें. यांत बाप, कन्या किंवा वर यांस प्रायश्चित्त सांगितलें नाहीं.

विष्णु

गृहस्थधर्ममाकांक्षन् गुरुगेहादुपागतः
अनेनैव विधानेन कुर्याद्दारपरिग्रहम् ॥
कुले महति संभूतां सवर्णां लक्षणान्विताम्
परिणीयात्तु षण्मासान् वत्सरं वा न संविशेत् ॥२॥

यांत मुलीचें वय काय असावें याजविषयीं मर्यादा नाहीं परंतु षण्मास किंवा वर्ष पावेतों संभोग करूं नये हें सूत्रानुवृत्तीनें सांगितलें तेव्हां संभोगप्राप्तीवरून मुलगी प्रौढ संभोगार्ह असावी. असें दिसतें.

ऋतुत्रयमुपास्यैवं कन्या कुर्यात्स्वयंवरम्
पितृवेश्मनि या कन्या रजः पश्यत्यसंस्कृता ॥
सा कन्या वृषली ज्ञेया हरंस्तां न विदुष्यात ॥

ऋतुप्राप्तीपूर्वी लग्न करावें ही मर्यादा सांगितली आहे. वृषलीत्वाविषयीं पुढें विचार करूं

हारीत.

गृहीतवेदाध्ययनः श्रुतशास्त्रार्थतत्ववित् ।
असमानार्षगोत्रां हि कन्यां सभ्रातृकां शुभाम् ॥
सर्वावयवसंपूर्णां सुवृत्तामुद्वहेन्नरः ।

यांत वयाविषयीं कांहींच निर्देश नाहीं.

याज्ञवल्क्य.

याज्ञवल्क्यस्मृति सर्व स्मृतींत निश्चितार्थ व संकलित आहे. त्यांत

**अविप्लुतब्रह्मचर्यो लक्षण्यां स्त्रियमुद्वहेत्**
**अनन्यपूर्विकां कांतामसपिण्डां यवीयसीम् ।**

इतकेंच आहे. यांत फक्त यवीयसीम् ह्मणजे नवऱ्यापेक्षां लहान इतकाच निर्देश केला आहे. ऋतुप्राप्तीपर्यंत बापानें लग्न करावें असाही याज्ञवल्क्याचा अभिप्राय आहे.

**अप्रयच्छन समाप्नोति भ्रूणहत्यामृतावृतौ**

विज्ञानेश्वरानें याजवर 'एतदुक्तलक्षणवरसंभवे वेदितव्यम्' असा शेरा मारून ठेविला आहे.

उशनाः व अंगिरा.

या स्मृतींत विशेष वचनें नाहींत.

आपस्तम्ब.

**विवाहे वितते यज्ञे संस्कारे च कृते तथा**
**रजस्वला भवेत्कन्या संस्कारस्तु कथं भवेत् ।**
**स्नापयित्वा तदा कन्यामन्यवस्त्रैरलंकृताम् ।**
**पुनः प्रत्याहुतिं कृत्वा शेषं कर्म समाप्यते ॥**

याचा अर्थ अत्रिवचनासारखाच आहे.

कात्यायन व बृहस्पति.

यांतही विशेष वचनें विवाहसंबंधानें नाहींत.

शंख.

**विंदेत विधिवद्भार्यामसमानार्षगोत्रजाम्**

इतकेंच वचन आहे. यांत वयाची इयत्ता सांगितली नाहीं.

लिखित व दक्ष.

यांत विशेष वचनें नाहींत.

गौतम.

**गृहस्थः सदृशीं भार्यां विंदेतानन्यपूर्विकां यवीयसीं त्रीनृतून् कुमार्यतीत्य स्वयं युज्येत । प्रदानं प्रागृतोरप्रयच्छन् दोषी प्राग्वाससः प्रतिपत्तेरित्येके ।**

तात्पर्य.—आपल्यापेक्षां लहान वयाची बायको करावी. तीन ऋतूंनंतर कन्येनें स्वतः विवाह करावा. ऋतुप्राप्तीपूर्वी बापानें दान करावें. न केल्यास तो दोषी. पदर घेण्यापूर्वी दान करावें असें कित्येकांचें मत आहे.

शातातप.

या स्मृतींत विशेष वचन नाहीं.

वसिष्ठ.

**गृहस्थः असमानार्षां अस्पृष्टमैथुनां यवीयसीं सदृशीं भार्यां विंदेत । कुमारी ऋतुमती त्रीणि वर्षाण्युपासीत । उर्ध्वं त्रिभ्यो वर्षेभ्यः पतिं विंदेत तुल्यम् ।**

**प्रयच्छेन्नग्निकां कन्यामृतुकालभयात्पिता ।**
**ऋतुमत्यां हि तिष्ठत्यां दोषः पितरमृच्छति ॥**

याप्रमाणें या सर्व स्मृतींचा अभिप्राय मनुस्मृतीशीं बहुतेक अभिन्न दिसतो. ऋतुप्राप्तीनंतर बापास

किती दोष आहे व कोणत्या स्थितींत; तसेंच मुलीनें तीन वर्षे ऋतुनंतर वाट पहावी, किंवा तीनच महिने याजविषयीं कांहीं विरोधाभास आहे, त्याची एकवाक्यता केली पाहिजे, ती प्रसंगानुसार करीन; परंतु सर्व स्मृतींचा असा अभिप्राय दिसतो कीं, बापानें होतां होईल तों ऋतुप्राप्तीच्या आंत लग्न करावें. पण एवढें ह्मटल्यानें आपला शास्त्रार्थ निश्चित होत नाहीं; ह्मणजे मनूनें १२ वें वर्ष हा उत्तम काळ मुलीच्या विवाहाचा सांगितला, तसा वरील स्मृतींत कोठेंच सांगितला नाहीं, ही गोष्ट खरी आहे. ऋतुप्राप्तीपर्यंत लग्न करावें ह्मणजे प्रयोगपारिजातकाराच्या मताप्रमाणें 'जननादूर्ध्वं अर्वाग् ऋतोः' काळ आहे असें ह्मणण्यांत उत्तम काळ कोणता याचा निर्णय होत नाहीं. यम, संवर्त, व पाराशर या स्मृतिकारांच्या वचनाधारें ह्या प्रश्नाचा निर्णय होतो, व ह्मणूनच त्यांचीं वचनें वर दिलीं नाहींत. आतां आश्चर्याची गोष्ट ही आहे कीं, असंमजस गतानुगतिक लोक यमसंवर्तपराशरवचनांचा भलताच अर्थ समजून बालविवाहाचे आधारस्तम्भ हे ऋषि आहेत असें मानतात, व श्रुतिसूत्रांविरुद्ध व मनुस्मृतिविरुद्ध आपण आचरण करतों हें मनांतही आणीत नाहींत! यासंबंधानें जुन्या मताच्या लोकांच्या दोन प्रबळ समजुती आहेत. एक, 'दशवर्षा भवेत्कन्या अत ऊर्ध्वं रजस्वला' ह्मणजे मुलीला अकरावें वर्ष लागलें कीं तिला प्रत्यक्ष रजोदर्शन झालें नाहीं, तरी रजस्वला ही संज्ञा प्राप्त होते, व अकराव्या वर्षानन्तर लग्न करण्यांत रजस्वलेच्या लग्नाला जो दोष आहे तो प्राप्त होतो दुसरी, 'विवाहोऽष्टमवर्षायाः कन्यायास्तु प्रशस्यते' आठव्या

वर्षी लग्न करणें हा उत्तम काळ आहे असें संवर्तानें कण्ठरवानें सांगितलें आहे. या दोन्ही समजुती चुकीच्या आहेत, इतकेंच नव्हे, तर बालविवाह रूढ असलेल्या काळांत झालेले नीलकंठपारिजातकार इत्यादि निबंधकारांनींहीं ह्या समजुतीचें निराकरण केलें आहे. थोडासा विचार केला ह्मणजे या लोकसमजुती साधार आहेत, असें मानण्यास जागाच नाहीं, असें दिसून येईल. येथें संवर्तपराशराचा पूर्ण उतारा घेतला पाहिजे. प्रसिद्ध यमस्मृतींत एकच श्लोक आहे त्याचा निराळा विचार करावयास नको.

संवर्त.

दानप्रशंसाप्रसंगेन—

अलंकृत्य पिता कन्यां भूषणाच्छादनासनैः
दत्वा स्वर्गमवाप्नोति पूजितस्तु सुरादिषु ।
रोमदर्शनसंप्राप्ते सोमो भुंक्तेथ कन्यकाम्
रजो दृष्ट्वा तु गंधर्वः कुचौ दृष्ट्वा तु पावकः ।
अष्टवर्षा भवेद्गौरा नववर्षा तु रोहिणी
दशवर्षा भवेत्कन्या अत ऊर्ध्वं रजस्वला ।
माता चैव पिता चैव ज्येष्ठो भ्राता तथैव च
त्रयस्ते नरकं यान्ति दृष्ट्वा कन्यां रजस्वलाम् ।
तस्माद्विवाहयेत् कन्यां यावन्नर्तुमती भवेत्
विवाहोष्टमवर्षायाः कन्यायास्तु प्रशस्यते ।

पराशर.

शुद्धिकथनप्रसंगेन

**अष्टवर्षा भवेद्गौरी नववर्षा तु रोहिणी ।**
**दशवर्षा भवेत्कन्या अत ऊर्ध्वं रजस्वला ।**
**प्राप्ते तु द्वादशे वर्षे यः कन्यां न प्रयच्छति ।**
**मासि मासि रजस्तस्याः पिबंति पितरः स्वयम् ।**

या उताऱ्यांत आठव्या वर्षी गौरी, नवव्या वर्षी रोहिणी, दहाव्या वर्षी कन्या व यानंतर रजस्वला, असें ह्मटलें आहे; पण अकराव्या वर्षी रजस्वला संज्ञा येत्ये असें याचें तात्पर्य नाहीं याविषयीं अनेक प्रमाणें आहेत. प्रथम जर रजस्वला शब्द पारिभाषिक समजावा तर त्याच्या ऐवजीं दुसरा शब्द घालतां येत नाहीं व दुसऱ्या शब्दांत ती शक्ति नाहीं; 'तस्माद्विवाहयेत् कन्यां यावन्नर्तुमती भवेत्' असें लागलीच पुढें ह्मटलें आहे तेव्हां रजस्वला शब्द पारिभाषिक होऊं शकत नाहीं; ह्मणजे अकराव्या वर्षाच्या आंत लग्न करावें असा अर्थ निघूं शकत नाहीं. दुसरें प्रमाण—पराशरानें 'अत ऊर्ध्वं रजस्वला' ह्मणून नंतर 'प्राप्ते तु द्वादशे वर्षे' इत्यादि श्लोक लागलाच पठन केला आहे ह्मणजे बाराव्या वर्षी विवाह न केला तर दोष सांगितला; पण 'अत ऊर्ध्वं रजस्वला' यावरून अकराव्या वर्षी रजस्वला संज्ञा प्राप्त होऊन दोष प्राप्त झाला; तेव्हां अकरावें वर्ष पराशरानें कां सोडून दिलें ? ह्मणून अकराव्या वर्षी रजस्वलात्व नाहीं हें सिद्ध होतें. तिसरें प्रमाणः—संर्वतपराशरांसारखें,

**अष्टमे तु भवेद्गौरी नवमे रोहिणी भवेत् ।**
**दशमे कन्यका प्रोक्ता द्वादशे वृषली भवेत् ॥**

असेंही वचन ग्रंथपठित आहे. यावरूनही अकराव्या वर्षी रजस्वलात्व येत नाहीं; कारण या श्लोकांत दहाव्यावरून एकदम बाराव्यावर उडी मारिली आहे.

चवथें प्रमाण:—द्वादश वर्षांच्या मुलीचें दान जो न करील त्याचे पितर तिचें रज प्रत्येक मासीं पितात, असें म्हटलें आहे. यावरून पारिभाषिक रजस्वलात्व द्वादश वर्षांच्या मुलीवर नाही, असे दिसतें; कारण 'मासि मासि' या पदावरून प्रत्यक्ष रजोदर्शनाचा बोध होतो. तेव्हां द्वादश वर्षे याचा अर्थ बाराच वर्षांवर निश्चित नाहीं, तर रजोवती असा घेतला पाहिजे.

असाच अर्थ माधवानें केला आहे. ऋतुदर्शनमुपलक्षयितु द्वादशे वर्षे इत्युक्तम् । अत एव गौतमेन प्रदान प्रागृतोरित्युक्तम् । यमोपि एतदेवाह तस्माद्विवाहयेत् कन्यां यावन्नर्तुमती भवेत् । अतश्च ऋतुदर्शनात्प्राक् यो न ददाति तस्यपितरः प्रतिमासं रजः पिबन्ति । असति ऋतुदर्शने द्वादशेपि वर्षे कन्यादानप्रतिग्रहौ न निषिद्धौ । अत एव मनुः त्रिंशद्वर्षो वहेत्कन्यां हृद्यां द्वादशवार्षिकीम् ॥

**अर्थ**—"बाराव्या वर्षी" असें ऋतुदर्शन झालें एवढेंच दाखविण्याकरितां म्हटलें आहे; म्हणूनच गौतमानें ऋतुदर्शनापूर्वी दान करावें असें लिहिलें आहे, व यमानेंही जोंपावेतों कन्येस ऋतु आला नाहीं, तोंपावेतों लग्न करावें असें लिहिलें आहे. सारांश, पाराशरवचनाचा असा अर्थ आहे कीं,

ऋतुप्राप्तीपूर्वी जो बाप दान न करील त्याचे पितर प्रतिमासीं रज पितात. प्रत्यक्ष रजोदर्शन झालें नसेल तर बारावे वर्षीही कन्या देणें व घेणें निषिद्ध नाहीं; ह्मणूनच मनूनें तीस वर्षांच्या पुरुषानें बारा वर्षांच्या मुलीशीं लग्न करावें असें लिहिलें आहे. ”

या स्मृतिवचनांचा हाच अर्थ आहे असें नीलकंठांनींही आपल्या संस्कारमयूखांत लिहिलें आहे.

द्वादशवर्षग्रहणं प्रायिकं कस्याश्चित्तत्रापि तद्दर्शनाभावात् । अतो रजोदर्शनं न विवाहात्पूर्वं यथा कुर्यादित्युक्तं भवति । अतश्च त्रिंशद्वर्षो वेहत्कन्यां हृद्यां द्वादशवार्षिकीमिति मनूक्तिः संगच्छते ।

याचें तात्पर्य वरील माधवाच्या उक्तीप्रमाणेंच आहे.

पांचवें प्रमाणः—प्रयोगपारिजातांत आश्वलायनोक्त ह्मणून एक वचन दिलें आहे तें असें:—

**ऊर्ध्वं दशाब्दात् या कन्या प्राक् रजोदर्शनात्तु सा ।**
**गांधरी स्यात्समुद्वाह्या चिरं जीवितुमिच्छता ॥**

दहा वर्षांनंतर व रजोदर्शनापूर्वी गान्धारी संज्ञा मुलीस आहे; ज्याला दीर्घायुष्याची इच्छा असेल त्याणें तिच्याशीं विवाह करावा.

सारांश, दहा वर्षांनंतर अकरावे वर्षी किंवा बारावे वि-रजोदर्शन झालें नाहीं तरी मुलगी रजस्वला होते व तेंच दान दुष्ट आहे अशी जी लोकांची समजूत आहे ती निरा-धार आहे व ती निबंधकारही पसंत करीत नाहींत यांत संशय उरत नाहीं.

असो; अकराव्या वर्षीं रजस्वला संज्ञा येत नाहीं व प्रत्यक्ष रजोदर्शन जर नाहीं तर बारावे वर्षीही लग्न करण्यास निषेध किंवा दोष नाहीं हें माधवनीलकंठमतें सिद्ध झालें व असमंजस लोकांच्या समजुतींत दृढ झालेल्या प्रथम चुकीचें निराकरण झालें. आतां दुसऱ्या लोकसमजुतीविषयीं विचार करूं. 'अत ऊर्ध्वं रजस्वला' 'प्राप्ते तु द्वादशे वर्षे' इत्यादि वचनांचा अर्थ स्मृतिकारांप्रमाणेंच ऋतुप्राप्तीपर्यंत लग्न करावें असा ठरला; पण आठव्या वर्षीं मुलीचें लग्न करण्यांत फल अधिक आहे ह्मणून 'विवाहोष्टमवर्षायाः कन्यायास्तु प्रशस्यते' असें सांगितलें आहे, अशी दुसरी समजूत लोकांत प्रबल आहे. तेव्हां फलोद्देशानें कोणतें वय चांगलें याचा विचार केला पाहिजे.

गौरीं ददन्नाकपृष्ठं वैकुण्ठं रोहिणीं ददत् ।
कन्यां ददद्ब्रह्मलोकं रौरवं तु रजस्वलाम् ।

असें एक मरीचिवचन आहे. आठव्या वर्षीं मुलीचें दान करणारास स्वर्गपृष्ठ, नवव्या वर्षीं दान केल्यास वैकुण्ठ, व दहाव्या वर्षीं ( व पुढें ऋतुप्राप्तीपर्यंत ) दान केल्यास ब्रह्मलोक प्राप्त होतो. आतां नाकपृष्ठापेक्षां वैकुण्ठ अधिक, वैकुण्ठापेक्षां ब्रह्मलोक अधिक. तात्पर्य, आठव्या वर्षापेक्षां नवव्या वर्षीं अधिक, नवव्यापेक्षां दहाव्यांत अधिक, असें उत्तरोत्तर अधिक फल आहे; पण विचार न करणारे वेडे लोक याच्या उलट समजतात; या अज्ञानाला व अंधपरंपरेला काय ह्मणावें? सारांश, जो श्लोक बालविवाहाचा केवळ आधारस्तंभ समजला जातो, तोच त्याच्या उलट आहे. उत्तरोत्तर फल

अधिक आहे यास आणखीं प्रमाणें अनेक आहेत. प्रयोग-पारिजातकारानें असें लिहिलें आहे:—गौर्यादिविवाहे यथोत्तरं फलविशेषमाह । मरीचिः । गौरीं ददन्नित्यादि । अर्थ— गौर्यादिविवाहांत उत्तरोत्तर फल अधिक आहे. विवाहाच्या वेळेस 'ब्रह्मलोकावाप्तये तुभ्यं कन्यां संप्रददे' असाच नेहमीं संकल्प करतात; ह्मणजे ब्रह्मलोकाची प्राप्ति हेंच विवाहाचें मुख्य व उत्तम फल मानिलें आहे. पण ब्रह्मलोकप्राप्ति वरील श्लोकाप्रमाणें आठ वर्षांच्या कन्येच्या दानानें होणार नाहीं. दहा वर्षांच्याच मुलीच्या दानानें होईल. असें असून आठवे वर्षी कन्यादान उत्तम असें लोक समजतात ही केवढी चुकी? तिसरें, साधारण कन्यादानाचें फल स्वर्ग आहे असें संवर्ताच्या पहिल्या श्लोकावरून दिसतें, आणि गौरीदानाचेंही फल तेंच आहे; किंबहुना नाकपृष्ठ आहे; तेव्हां गौरीदानांत कांहीं विशेष फल नाहीं. चवथें, हीच गोष्ट व्यावहारिक रीत्या विचार केला असतांही सिद्ध आहे. विवाहाचे हेतु गार्हपत्य व प्रजोत्पादन असे दोन आहेत. मह्यं त्वादुर्गार्हपत्याय देवाः । तावेहि विवहावहै प्रजां जनयावहै । वगैरे श्रुतिवचनें उत्तानार्थ प्रसिद्ध आहेत. तसेंच 'जायमानो वै ब्राह्मणस्त्रिभिर्ऋणवान् जायते ब्रह्मचर्येणर्षिभ्यो यज्ञेन देवेभ्यः प्रजया पितृभ्य इति ।' असेंही बौधायनानें ह्मटलें आहे. आतां गार्हपत्य व प्रजोत्पादन या विवाहहेतूंची सिद्धि प्रौढ स्त्री केल्यानें होणार आहे. आठ वर्षांची मुलगी होमादि कर्मांत कितपत उपयोगी पडेल? प्रजाजननास तर अगदींच निरुपयोगी. सारांश, कोणतेंही दान करणें तें अशा

वस्तूचेंच करण्यांत अधिक श्रेय आहे कीं, तेणेंकरून दान-हेतु लवकर व उत्तम रीतीनें सिद्ध व्हावे. एकाद्या एक वर्षाच्या वत्सापेक्षां दुभती पहिलार गाय देण्यांत अधिक श्रेय आहे. तेव्हां प्रौढ मुलीचें दान करण्यांत अधिक श्रेय आहे, ही गोष्ट व्यवहारदृष्ट्याही सुयुक्तिक आहे.

असो. या सर्व प्रमाणांवरून दहा वर्षांच्या मुलीचें दान अधिक श्रेयस्कर आहे, व युवतीच्या दानांत अनंत फळ आहे, याजविषयीं कण्ठरवोक्त वचनें आहेत; तेव्हां आठव्या वर्षीं दान करणें हें प्रशस्त नाहीं, हें फलश्रुतीवरून निर्विवाद सिद्ध होतें. आतां 'विवाहोऽष्टमवर्षायाः कन्यायास्तु प्रशस्यते' या वचनाचा विचार करूं. प्रथमदर्शनीं जो अर्थ वाटतो, तसा अर्थ घेतला, तर दोन विरोध या वचनांत येतात. प्रथम आठ वर्षांच्या मुलीचें दान प्रशस्त आहे, हें 'गौरी ददन्नाकपृष्ठं' वगैरे श्लोकांवरून सिद्ध झालें. तेव्हां आठव्या वर्षीं दान प्रशस्त कसें? दुसरा विरोध; या वचनापूर्वी 'अष्टवर्षा भवेद्गौरी नववर्षा तु रोहिणी, दशवर्षा भवेत्कन्या' हा श्लोक असून त्यानंतरचें हें वचन आहे, तेव्हां कन्या शब्द या वचनांत पारिभाषिक समजला पाहिजे, व तसें मानलें तर 'अष्टमवर्षायाः कन्यायाः' हें ह्मणणेंच वंध्यापुत्रासारखें अनर्थक होतें. 'अष्टमवर्षाया गौर्याः' असें म्हटलें पाहिजे होतें. कन्या शब्दाचा अर्थ साधारण अविवाहित स्त्री असा घेतला तर हा विरोधाभास नाहींसा होतो, परंतु 'अष्टवर्षा भवेद्गौरी दशवर्षा भवेत्कन्या' हा श्लोक पूर्वीं असल्यामुळें कन्यापरिभाषेची अनुवृत्ति येते, यामुळें कन्या शब्दाचा साधारण

अर्थ घेतां येत नाहीं. असो. हा बिरोध टाळण्यासारखा आहे, असें जरी मानलें तरी 'अष्टवर्षाया: कन्याया: विवाह:' प्रशस्त नसून प्रशस्त आहे, असें म्हणण्यांत जो विरोध आला तो अपरिहार्य आहे. हे दोन्ही विरोध या वचनाचे दोन तुकडे केले म्हणजे नाहींसे होतात. ' विवाहोष्टमव-र्षाया: शक्य: ' हें निराळें करून ' कन्यायास्तु प्रशस्यते, उक्तलक्षणकन्याया: दशवर्षाया इति यावत् प्रशस्यते ' असा अर्थ केल्यानें या वचनाचा ' कन्यां दद‌्द्ब्रह्मलोकं ' या वचनाशीं मेळ बसतो व ' अष्टमवर्षाया: कन्याया: ' असा असंबद्धार्थ प्रयोग राहत नाहीं. तु शब्दावरूनही कन्यायास्तु येथून निराळा वाक्यच्छेद होतो. ' त्वंताथादि न पूर्वभाक् ' ही अमराची परिभाषा साधारण संस्कृत वाक्यांस जरी ला-विली तरी हरकत नाहीं.

' विवाहोष्टमवर्षाया: कन्यायास्तु प्रशस्यते ' या वच-नाचा अर्थ दिवाणबहादूर रघुनाथराव यांनीं केला नाहीं, व त्यांनीं केवळ प्रश्नचिन्ह लिहून वचन तसेंच सोडून दिलें आहे. रा० ब० आठल्ये यांनीं या वाक्याची गति अशी लाविली आहे कीं, आठव्या वर्षी विवाह प्रशस्त असें ह्मण-ण्यांत साहव्या वर्षी विवाह निषिद्ध आहे, तेव्हां आठव्या वर्षी विवाह पूर्वींच्या मानानें प्रशस्त असें या वचनांत सां-गितलें आहे. निर्णयसिंधूंत भारतांतील एक वचन दिलें आहे.

**सप्तमाद्वत्सरादूर्ध्वं विवाहः सार्ववर्णिकः ।**
**कन्यायाः शस्यते राजन्नन्यथा धर्मगर्हितः ॥ १ ॥**

सातव्या वर्षानंतर सर्व वर्णांत विवाह प्रशस्त आहे; त्यापूर्वी निंद्य आहे. या वचनाशीं वरील वचन संगत होतें खरें, परंतु पूर्वापर संबंध असा नाहीं. 'तस्माद्विवाहयेत्कन्यां यावन्नर्तुमती भवेत्'। ह्यानंतर ' विवाहोष्टमवर्षायाः कन्यायास्तु प्रशस्यते ' हा श्लोकार्ध आहे, तेव्हां तु शब्दानें पूर्ववचनाचा विरोध सांगितला. यांत सहा सात वर्षांच्या संबंधानें प्रशस्त सांगितला असें मानण्यांत सहा सात वर्षांची कल्पना पूर्वसंबंधानें येत नाहीं, ती कल्पित करावी लागते; शिवाय ' अष्टमवर्षायाः कन्यायाः ' असें ह्मणण्यांत जो विरोध आहे त्याचा परिहार यांत होत नाहीं. रा० ब० आठल्ये यांनीं जी वरील वचनाची गति लाविली ती एकंदर शास्त्रार्थाशीं विरुद्ध नाहीं व तीही मानल्यास माझ्या विवेचनांत हरकत येत नाहीं. तथापि मी जो अर्थ लाविला आहे, तो विशेष ग्राह्य आहे असें मला वाटतें.

कन्या ही संज्ञा दहा वर्षांच्याच मुलीला नसून दहा वर्षांपासून रजःप्राप्तीपर्यंत मुलीस ही संज्ञा आहे, हाही सिद्धांत प्रमाणांवरून व्यक्त करितां येईल. ' दशवर्षा भवेत्कन्या अत ऊर्ध्वं रजस्वला, ' याचा अर्थ माधवचार्यांनीं ' रजस्वलासंभवः ' असा घेतला आहे; पण तसा न घेता ' कन्यात्वादूर्ध्वं रजस्वला ' असा अर्थ घ्यावा ह्मणजे इतर वचनांशीं मेळ बसून श्रुतिसूत्रावरून जो काल प्रशस्त ठरतो तोच या वचनावरून ठरेल. तसेंच दहा वर्षांनंतर रजस्वला होईपावेतों मुलीस काय संज्ञा हा प्रश्न राहतो. कांहीं संज्ञा नाहीं, असें ह्मणण्यापेक्षां कन्या हीच संज्ञा कायम रहाते असें ह्मणणें सुयुक्तिक दिसतें.

अष्टवर्षा भवेद्गौरी नवमे रोहिणी स्मृता।
दशमे कन्यका प्रोक्ता द्वादशे वृषली स्मृता।

यांत दहाव्यावरून एकदम उडी मारून बाराव्या वर्षी वृषली ह्मणजे रजस्वला असें ह्मटले आहे आणि यमपराशरसंवर्तांनीं 'अत ऊर्ध्वं रजस्वला' सांगितली तेव्हां बाराव्या वर्षी रजस्वला किंवा अकराव्या वर्षी हा विरोध साहजिक उत्पन्न झाला. हा विरोध कन्यात्व दहाव्या वर्षापासून प्रत्यक्ष रजोदर्शन होईपावेतों मानलें ह्मणजे नाहींसा होतो, व दोन्ही वचनांचा एकच अर्थ होतो; कारण दुसऱ्यांत द्वादशवर्षग्रहण प्रायिकऋतूचें उपलक्षण समजावें असें निबंधकारांनी लिहिलें आहे. याच अर्थाला अनुकूल प्रयोगपारिजातोक्त आचार्यवचनें आहेत तीं अशीं:—

सप्ताब्दा कन्यका नाम्नी शैशवी स्यादुमान्विता
तामष्टादशवर्षीयो विवहेद्विजितपुमान्।
याष्टवर्षा भवेद्गौरी पुत्रपौत्रप्रवर्धिनी
पंचविंशतिवर्षीयस्तां कन्यामुद्वहेद् द्विजः।
रोहिणी नववर्षा स्याद्धनधान्यविवर्धिनी
तामुद्वहेद् मतिमान् सर्वकामार्थसिद्धये।
ऊर्ध्वं दशाब्दात् या कन्या प्राक् रजोदर्शनात्तु सा
गांधारी स्यात्समुद्वाह्या चिरंजीवितुमिच्छता।

यांत सात वर्षांची कन्या शैशवी, आठ वर्षांची गौरी, नऊ वर्षांची रोहिणी व दहा वर्षांपासून तों रजस्वला होईपावेतों गांधारी अशा संज्ञा केल्या आहेत. दहाव्या वर्षी

कन्या ही संज्ञा यांत केली नाहीं, पण तिच्या ऐवजीं गांधारी ही संज्ञा केली आहे व त्या गांधारी संज्ञेप्रमाणेंच कन्या संज्ञा समजली जावी ह्मणजे दहा वर्षांपासून रजस्वला होई-पावेतों कन्या संज्ञा समजावी, असा अभिप्राय स्मृतिवच-नांची एकवाक्यता केल्यानें साहजिक निघतो. गांधारीदाना-पासून वरील श्लोकांवरून सर्वांत श्रेष्ठ फल आहे असें स्पष्ट दिसतें. सातव्या वर्षी विवाह वर्ज्य आहे, तेव्हां त्यापासून कांहींच फल सांगितलें नाहीं आठव्या वर्षी कन्येचा विवाह केला असतां पुत्रपौत्र मिळतील, नवव्या वर्षी धनधान्य मिळेल व दहापासून ऋतुप्राप्तीपर्यंत दीर्घायुष्य मिळेल. सर्व कामांत दीर्घायुष्काम श्रेष्ठ आहे, तेव्हां गांधारी विवाहाचें फल सर्वांत श्रेष्ठ आहे. गांधारी संज्ञा कन्या संज्ञेचे ठिकाणीं आहे याचें हें दर्शक आहे; कारण कन्या दिल्याचें फळही दात्यास सर्वांत श्रेष्ठ आहे. सारांश, कन्या ही संज्ञा दहा वर्षांपासून ऋतुप्राप्तीपर्यंत समजावी हें इष्ट दिसतें व श्रुति-सूत्रांवरून प्रौढ आसन्नार्तवा मुलीचा विवाह करावा, असा जो पूर्वी निर्णय झाला त्याचाच अनुवाद यमपराशरसंवर्त करतात असें होऊन एकवाक्यता होते.

एकंदर संवर्ताचीं वचनें वरील विवेचन केलेल्या अर्था-न्वयें कशीं सयुक्तिक रीतीनें सगतवार लागतात हें येथें थोडक्यांत दाखवितों. प्रथम साधारण कन्यादानाचें फळ पहिल्या श्लोकांत सांगितलें आहे. नंतर

**रोमदर्शनसंप्राप्ते सोमो भुंक्तेऽथ कन्यकाम् ।**
**रजो दृष्ट्वा तु गंधर्वः कुचौ दृष्ट्वा तु पावकः ।**

हें वचन आहे. यांत वेदांत प्रसिद्ध असलेल्या. कल्पनेचा अनुवाद केला ह्मणजे मनुष्याशीं विवाह होण्यापूर्वी मुलीस सोम, गंधर्व व वन्हि असे तीन पति होतात हें सांगून त्यांचा उपभोगकाल सांगितला. रोमदर्शनकालीं सोम उपभोग करतो. रजः याचा ऋतु असा अर्थ करणें इतर स्मृतींशीं विरोधी होईल, कारण ऋतुमती होण्यापूर्वी मनुष्याशीं विवाह करावा असा त्यांचा अभिप्राय आहे. तेव्हां रजः याचा अर्थ रागः संभोगेच्छा असा घ्यावा ह्मणजे 'ईषदुपजातसंभोगेच्छां गंधर्वो लेभे' असें जें माधवानें भाष्यांत लिहिलें आहे, त्याशींही एकवाक्यता होऊन रजःसंभोगेच्छा पाहून गंधर्व उपभोग करतो, असा सर्व वचनांशीं अविरोधी अर्थ होतो. पुढें कुचोद्गम पाहून अग्नि उपभोग करतो असा अर्थ या श्लोकाचा झाला. यांत कुचोद्गम झाल्यावर मनुष्याशीं विवाह करावा असा प्राप्तकालाचा ध्वनि उत्पन्न झाला. नंतर

> अष्टवर्षा भवेद्गौरी नववर्षा तु रोहिणी।
> दशवर्षा भवेत्कन्या अत ऊर्ध्वं रजस्वला ॥

हा श्लोक आहे. यांत आठव्या वर्षाच्या मुलीस गौरी संज्ञा केली, नववर्षा मुलीस रोहिणी, दाहाव्या वर्षापासून कन्या संज्ञा केली व नंतर रजस्वलापर्यंत ही संज्ञा आहे असा निर्णय केला. वरच्या श्लोकांत कुचोद्गम झालेली कन्या प्राप्तकाल झाली असा ध्वनि निघाला. त्याला या श्लोकांत आकुंचित केला; कारण स्मृतींतून आठव्या वर्षापासून विवाहाचें फल सांगितलें आहे. पुढें

**माता चैव पिता चैव ज्येष्ठो भ्राता तथैव च ।**
**त्रयस्ते नरकं यान्ति दृष्ट्वा कन्यां रजस्वलाम् ॥**

यांत कन्येस ऋतु प्राप्त झाला असतां माता, पिता व बंधू हे नरकास जातील, ह्मणजे ऋतुप्राप्तीनंतर विवाह करण्यांत दात्यास दोष सांगितला. सारांश, या तीन श्लोकांत तीन अडचणी झाल्या. सोम, गंधर्व व वन्हि अमुक वेळेस उपभोग करतात; त्यानंतर विवाह मनुष्याशीं व्हावा; स्मृतींत आठ वर्षांपासून संज्ञा विवाहसंबंधानें सांगितल्या आहेत, आणि सोम-गंधर्व-वन्हींच्या उपभोगानंतर विवाह करावा असें आहे, ह्मणजे कुचोद्गम झाल्यानंतर लग्न व्हावें, तेव्हां आठव्या वर्षीं कसें लग्न व्हावें? तसेंच ऋतुप्राप्तीनंतर विवाह करण्यांत दोष आहे; तेव्हां या तीन अडचणींचा निकाल चवथ्या श्लोकांत केला.

**तस्माद्विवाहयेत् कन्यां यावन्नर्तुमती भवेत् ।**
**विवाहोष्टमवर्षाया: कन्यायास्तु प्रशस्यते ॥**

**अर्थ**—कन्या ह्मणजे दहा वर्षांनंतरच्या मुलीचा ऋतुमती होण्याच्या पूर्वीं ह्मणजे आसन्नार्तवेचा विवाह करावा, ह्मणजे सोमादि देवांचाही उपभोग होईल आणि ऋतुप्राप्तीनंतरचाही दोष येणार नाहीं. आतां अष्टमवर्षाया-गौर्यादींचा विवाह होऊं शकतो. पण गौर्यादि संज्ञा करून जी फलश्रुति सांगितली आहे त्यांतही कन्या ह्मणजे दहा वर्षांनंतरच्या मुलीचाच विवाह प्रशस्त सांगितला आहे.

अत ऊर्ध्वं रजस्वला, प्राप्ते तु द्वादशे वर्षे य: कन्यां प्रयच्छति, विवाहोष्टमवर्षाया: कन्यायास्तु प्रशस्यते, हीं वचनें

असमंजस लोकांना बालविवाहाचीं अगदीं • आधारस्तंभ असून प्रथमदर्शनीं बालविवाहनिषेधपक्षीय लोकांना बाऊ-सारखीं वाटतात. पण या सर्पवत् भासणाऱ्या रज्जूंना आजपर्यंत कोणींच हातांत घेऊन न्याहाळून पाहिलें नाहीं, व श्रुति, प्रत्यक्ष सूत्रें व मन्वादि स्मृति यांशीं यमपराशरसं-वर्तवचनें विरुद्ध कशीं असतील, याचाही विचार कोणीं केला नाहीं. कन्या शब्दाचा अर्थ जितका मी करितों तितका जरी माधवांनीं केला नसेल, तरी बालविवाह सुरू असलेल्याही काळांत झालेल्या माधवाचार्य–नीलकंठ–नृसिं-हादि विद्वानांना सुद्धां इतर श्रुतिस्मृतींशीं मेळ घालून असेंच ह्मणावें लागलें कीं आठव्या वर्षापेक्षां दहाव्या वर्षी, कन्या-दानांत फल अधिक आहे, व दहाव्या वर्षानंतर अकराव्या वर्षी, बाराव्या वर्षी, तेराव्या वर्षी जर प्रत्यक्ष रजोदर्शन नसेल तर विवाह ह्मणजे दान आणि प्रतिग्रह दोन्ही निषिद्ध नाहींत. मग आठव्या किंवा पांचव्या वर्षापूर्वी विवाह करणें निषिद्ध असून लोक पाळण्यांतही लग्नें लावितात व आह्मी शास्त्राप्रमाणें चालतों असें मानतात त्यांच्या, अधर्म करून धर्म करतों, अशा समजुतीच्या वेडेपणाची कमालच झाली असें ह्मणावें लागतें.

आतां व्यासस्मृतींतील एका वचनाचा विचार करणें बाकी आहे.

धृताधोवसनां गौरीं विख्यातदशपूरुषाम् ।

यांत गौरी शब्दाचा अर्थ कोशप्रसिद्ध केला पा-हिजे, कारण ‘ अष्टवर्षा भवेद्गौरी ’ ही पारिभाषा व्या-

सानें सांगितलें नाहीं; तेव्हां 'गौरी तु नग्निकाऽनागतार्तवा' ह्या अमरोक्तीवरून गौरी शब्दाचा अर्थ ऋतु प्राप्त न झालेली असाच केला पांहिजे. याच्यापुढें 'यदि सा दातृवैकल्याद्रजः पश्येत् कुमारिका' इत्यादि वचनें आहेत; त्यांवरून रजःप्राप्तीची मर्यादा केलेली दृष्टीस पडते. व्यासमतें मुलगी लग्नांत आसन्नार्तवा असावी असेंही दृष्टीस येतें; कारण लग्न झालेल्या मुलीचीं कर्तव्यें त्यानें यापुढें दिलीं आहेत.

कृतदारोऽग्निपत्नीभ्यां कृतवेश्मा गृहं वसेत्।

ह्मणजे अग्निसेवा करण्यास विवाह झाल्यापासून पतिपत्नी यांना आज्ञा आहे; आणि अशी सेवा करण्यास मुलगी जाणती असली पाहिजे. येथें एक गोष्ट सांगण्यासारखी आहे. मुलीचें लग्न झालें ह्मणजे ती वैदिककर्माची अधिकारिणी होते; पतीबरोबर होमादि कृत्यें तिला केलीं पाहिजेत. अग्निहोत्र असल्यास पतीच्या ऐवजीं तिला एकटीला होम देतां येतो. सारांश, ती सर्व तऱ्हेनें पूत असतां गर्भाधान होईपावेतों तिच्या हातचें पाणीसुद्धां सोंवळ्या विधवा घेत नाहींत, किंवा सोवळे ब्राह्मणही एकादे वेळेस घेण्यास मागेंपुढें पाहतात, तिला सोवळें नेसावयास देत नाहींत, ओंवळ्यानें जेवावें लागतें, या प्रवृत्तीस शास्त्राधार काय? हा प्रश्न मीं पुष्कळांना केला. पण यास शास्त्राधार कोठेंच सांपडत नाहीं. मला वाटतें, याचें बीज बालविवाहाचा प्रघात स्मृत्यादिविरुद्ध अलीकडे पडला यांत आहे. लग्नांत मुलगी प्रौढ असावी असा स्मृतींचा अभिप्राय असल्यामुळें गर्भाधान

होईपावेतों लग्न झालेली मुलगी अशुद्ध व .गर्भाधानानंतर तिला सोंवळें देऊन सर्व कर्मांत तिला येऊं द्यावी असा रूढीनें निर्बंध करण्याची जरूरी पडली नाहीं. पण जेव्हां पांच,–सहा–आठ वर्षांच्या मुलींचे विवाह होऊं लागले, तेव्हां साहजिकच अशा लहान मुलींकडून शुद्ध वर्तणूक होणें असंभवनीय झालें; शूद्रादिकांना शिवणें, अभेध्य पदार्थांना शिवणें; इत्यादि साहजिक होणाऱ्या बाललीलांचा विरोध सोंवळ्याशीं येऊं लागला व शास्त्रसिद्ध विवाहित स्त्रियांची मेध्यता नाहींशी झाली, यामुळें गर्भाधानानंतर बायकांस सोंवळें देण्याचा प्रघात पडला असावा. असो. लग्नानंतर सद्यः गार्हपत्य सुरू करावें असें स्मृतीस इष्ट आहे, यावरूनच मुलगी प्रौढ असावी ही मर्यादा ठरते.

दाहा वर्षांनंतर ऋतुप्राप्तीपर्यंत मुलीचा विवाह करणें प्रशस्त आहे असें सर्व स्मृतिवरून ठरतें व हाच अभिप्राय श्रुतिसूत्रांचा आहे खरा, परंतु ऋतुप्राप्ति ही दाहा वर्षांसारखी निश्चित नाहीं; कित्येक मुलींस अकराव्या वर्षींच रजोदर्शन होतें; आणि ऋतुनंतर कन्यादान करणें अत्यंत दोषार्ह आहे, तेव्हां प्रशस्त कालाची वाट पाहतांना बापास दोष येण्याचा संभव आहे, या अडचणीचा परिहार काय? असा प्रश्न कित्येक करितात. या शंकेचें समाधान करतांना प्रथम अकराव्या वर्षी किती मुलींना रजःप्राप्ति होते याचा विचार केला पाहिजे. साधारण हिंदुस्त्रियांस चवदा वर्षांच्या सुमारास ऋतु प्राप्त होतो. कचित् अकराव्या वर्षी रजोदर्शन होतें व तेंही बहुतकरून बिजवरांच्या बायकांस होतें. जर मुलींचें लवकर लग्न होणार नाहीं तर त्यांस लवकर ऋतु

खचित येणार नाहीं. तसेंच एखादी मुलगी मोठी उफा-ड्याची सशक्त असेल तर स्तनोद्गमादि चिन्हांवरून मुलीस लवकर ऋतु येईल यांची कल्पना करतां येते. 'रोमदर्शनसंप्राप्ते' या श्लोकाचें तात्पर्य स्तनोद्गम झाल्यावर विवाह करावा असेंच आहे. आतां जर रजःप्राप्तीपूर्वी हीं चिन्हें नियत आहेत तर पितरांस आसन्नार्तवेचा विवाह करण्यास कांहीं अडचण पडणार नाहीं; परंतु इतक्या अडचणींत मुलीस विवाहापूर्वी ऋतु प्राप्त झाला तर बापास दोष नाहीं हेंही शास्त्रसिद्ध आहे.

पित्याच्या घरीं अविवाहित मुलीस ऋतु आला असतां त्यास केव्हां व किती दोष आहे या प्रश्नाचा निकाल येथें केला पाहिजे. साधारण समजूत या बाबतींत 'अत ऊर्ध्वं रजस्वला' इत्यादि श्लोकाप्रमाणेंच चुकीची आहे असें दिसून येतें. प्रथम मनूनें काय सांगितलें आहे तें आपण पाहूं.

त्रीणि वर्षाण्युदीक्षेत कुमार्यृतुमती सती ।
ऊर्ध्वं तु कालादेतस्माद्विन्देत सदृशं पतिम् ॥

ऋतुमती मुलीनें बापाची तीन वर्षें वाट पहावी नंतर सदृश नवरा स्वतः करावा. याशिवाय मनूनें बापाला कोठेंच दोष सांगितला नाहीं व तीन वर्षांनतरही बाप दोषी होतो असें स्पष्ट सांगितलें नाहीं. पण निदान तीन वर्षेंपर्यंत बापास मुलीचें लग्न करण्याचा अधिकार आहे व त्या अधिकाराची मुलीनें वाट पहावी असें स्पष्ट आहे. याप्रमाणेंच पुष्कळ स्मृतिकारांनीं तीन वर्षांची मुदत ऋतुप्राप्ती-

नंतर बापास दिली आहे. मग प्रशस्तकालीं कन्यादान करूं इच्छिणाऱ्या बापास भीति कां असावी? तीन वर्षेपावेतों त्यास दोष नाहीं असें मनूचें मत आहे. आतां याविरुद्ध कांहीं वचनें आहेत त्यांचा विचार केला पाहिजे.

**कन्यां ददद्ब्रह्मलोकं रौरवं तु रजःस्वलाम्**–मरीचि.

**माता चैव पिता चैव ज्येष्ठो भ्राता तथैव च**

**त्रयस्ते नरकं यांति दृष्ट्वा कन्यां रजस्वलाम्**–संवर्त.

इत्यादि वचनें आहेत.

**पितृवेश्मनि या कन्या रजः पश्यत्यसंस्कृता।**

**तस्यां मृतायां नाशौचं कदाचिदपि शाम्यति ॥**

या शंखवचनांत सांगितलेलें अशौच अर्थवादाचें आहे असें निर्णयसिंधुकारांनींही कबूल केलें आहे. तत्रापि यांत गर्भित निंदा स्पष्ट आहे. तेव्हां अविवाहित मुलीस ऋतु आला असतां बापास दोष व तो तिचें दान न करील तर नरकास जाईल इत्यादि वचनें आहेत त्यांची गति काय? याच अर्थाचें याज्ञवल्क्याचेंही वचन आहे–'अप्रयच्छन् समाप्नोति भ्रूणहत्यामृतावृतौ' प्रत्येक ऋतुचे वेळेस न देणाऱ्या बापास भ्रूणहत्या लागते. तेव्हां तीन वर्षे बापाला दोष नाहीं किंवा प्रत्येक ऋतूस दोष आहे? या विरोधाचा परिहार विज्ञानेश्वरानें विषयभेदानें केला आहे, तो फार सयुक्तिक आहे. 'सति गुणवद्वरे तद्द्रष्टव्यम्' असा शेरा त्याणें मारला आहे; ह्मणजे जर गुणवान् वर असून बाप देत नाहीं तर त्यास दोष आहे; आणि वास्तविकरीत्या

जर बाप मुलगी देण्यास तयार आहे व योग्य काळीं वराच्या शोधांत आहे आणि इतक्यांत जर मुलीस ऋतु आला तर बापास दोष काय ह्मणून असावा? मिळत असून दान न करील तर दोष आहे हें ठीक आहे. पण समजा कीं मुलगी कुरूप किंवा दरिद्री असल्यामुळें कोणी करीतच नाहीं तर ऋतु प्राप्त झाला असतां बापाला दोष देणें कितपत न्याय्य आहे? सारांश, गुणवान् मुलगा मिळत असून मुलीला नाहाण आलें व मुलीचें दान बाप करीत नाहीं तर त्यास दोष आहे; गुणवान् मुलगा मिळाला नसेल किंवा मिळून तो मुलगी करीत नसेल तर बापास दोष नाहीं अशी व्यवस्था विज्ञानेश्वरानें लाविली आहे. पण या व्यवस्थेस आधार काय? व तीन वर्षेपर्यंत बापास दोष नाहीं यास वचन कोणतें? या प्रश्नासंबंधानें मला बौधायनांत फार उत्तम वचनें सांपडलीं आहेत. जे लोक मुलीस ऋतु प्राप्त होईल व आपल्यास दोष लागेल अशी भीति बाळगतात त्यांणीं या वचनांचा अवश्य विचार करावा. ऋतुप्राप्तीपासून तीन वर्षानंतर बापास मुलगी न दिल्याचा दोष आहे असें यांत स्पष्ट सांगितलें आहे, इतकेंच नाहीं, तर मनु व याज्ञवल्क्य यांचा जो विरोध आला त्याची व्यवस्था कण्ठरवानें यांत केली आहे.

दद्याद्गुणवते कन्यां नग्निकां ब्रह्मचारिणे ।
अपि वा गुणहीनाय नोपरुंध्याद्रजस्वलाम् ॥

या प्रसिद्ध बौधायनवचनानंतरच हे तीन श्लोक दिले आहेत.

त्रीणि वर्षाण्यृतुमतीं यः कन्यां न प्रयच्छति ।
स तुल्यं भ्रुणहत्यायै दोषमृच्छत्यसंशयम् ॥
न याचते चेदेवं स्याद्याचते चेत्पृथक् पृथक् ।
एकैकस्मिन्नृतौ दोषं पातकं मनुरब्रवीत् ॥
त्रीणि वर्षाण्यृतुमती कांक्षेत पितृशासनम् ।
ततश्चतुर्थे वर्षे तु विन्देत सदृशं पतिम् ॥
अविद्यमाने सदृशे गुणहीनमपि श्रयेत् ।

**अर्थ**—तीन वर्षेंपावेतों ऋतु प्राप्त झालेली मुलगी जो देत नाहीं तो भ्रूणहत्येतुल्य पातकातें पावतो. पण ही मुदत जर कोणी मुलगी मागणारा नसेल तर समजावी. जर मागणारा असेल तर प्रत्येक ऋतूला पृथक् भ्रणहत्येचें पातक आहे असें मनूनें सांगितलें आहे तीन वर्षें मुलीनें बापाच्या आज्ञेची वाट पहावी व चवथ्या वर्षी सदृश वर स्वत: करावा, न मिळेल तर गुणहीन वर सुद्धां करावा. ' लग्नासंबंधानें आपल्यांत दोन्ही प्रकारचे सांप्रदाय पूर्वी होते व हल्लींही आहेत; ह्मणजे मुलानें कन्या मागण्यास जावें किंवा बापानें स्वत: वराचा शोध करून त्यास कन्या अर्पण करावी. जर कन्या मागणारा आला असून त्यास ऋतुमती कन्या बाप न देईल तर त्यास प्रत्येक ऋतूचे समयीं भ्रूणहत्येचें पातक आहे. पण कन्या मागणारा जर कोणी नाहीं तर नवरा शोधून काढण्यास अवधि पाहिजे. ही अडचण जाणून तीन वर्षांची मुदत शास्त्रानें पित्यास ऋतुप्राप्तीनंतर दिली आहे.

बौधायनाचीं वचनें स्पष्ट आहेत व न्याय्य आहेत इतकेंच नव्हे तर इतर स्मृतींवरूनही त्यांस बळकटी येते. ऋतु-प्राप्तीनंतर तीन वर्षेपर्यंत बापास दान देण्याचा अधिकार आहे व त्या अधिकाराची वाट मुलीनें पाहिलीच पाहिजे असें पुष्कळ स्मृत्या सांगतात. पण बापास दोष तीन वर्षांनंतर किंवा आंतच याविषयीं निर्णय जसा बौधायनानें केला आहे तसाच वसिष्ठानेंही केला आहे. 'ऋतुमत्यां हि तिष्ठंत्यां दोषः पितरमृच्छति,' याप्ूर्वी मुलीनें तीन वर्षे वाट पहावी असें सांगितलें तेव्हां बापास दोष तीन वर्षांच्या आंत किंवा नंतर याचा निकाल पुढच्याच श्लोकांत वसिष्ठांनीं केला आहे.

**यावच्च कन्यामृतवः स्पृशन्ति ।**
**तुल्यैः सकामामभियाच्यमानाम् ॥**
**भ्रूणानि तावन्ति हतानि ताभ्यां ।**
**मातापितृभ्यामिति धर्मवादः ॥**

'सकामामभियाच्यमानां' या पदावरून मुलगी लग्न करण्यास तयार असून व तिला मागणारे असून मुलगी अविवाहित राहील तर जितके ऋतु येतील तितक्या भ्रूणहत्येचें पातक बापास आहे. पण कोणी याचमान नाहीं तर पति शोधून काढण्यास तीन वर्षांची अवधि बापास आहे, व नंतर ऋतुमती मुलगी अविवाहित राहिल्याचा त्यास दोष आहे. ही व्यवस्था बौधायनाप्रमाणेंच आहे.

आतां बौधायन व वसिष्ट यांनीं जी एक अडचणीची व्यवस्था केली तीच इतर अडचणींची समजली जावी.

बापाला दोष केव्हां व किती यासंबंधानें जसा स्मृतिस्मृतींत विरोध आहे, तसेंच मुलीस व नवऱ्यास दोष आहे कीं नाहीं, याजविषयीं आहे, व मुलीनें तीन वर्षें वाट पहावी किंवा तीन ऋतु याजविषयीं आहे. या दोन विरोधांची व्यवस्था बौधायनमताप्रमाणेंच लावली पाहिजे.

ऋतुत्रयमुपास्यैव कन्या कुर्यात् स्वयंवरम् ।
ऋतुत्रये व्यतीते तु प्रभवत्यात्मनः सदा ॥

असें विष्णुस्मृतींत स्पष्ट आहे व अशींच इतर कांहीं वचनें आहेत. आतां मुलीनें तीन वर्षें किंवा तीन महिने वाट पहावी याजबद्दल शंका उत्पन्न झाली तेव्हां याचमान असून बाप न देईल तर तीन महिन्यानंतरच मुलीनें स्वतः वर करावा. याचमान नाहीं आणि बाप वर शोधतो आहे तर मुलीनें तीन वर्षें बापाची वाट पाहिली पाहिजे अशी या विरुद्ध वचनांची व्यवस्था लावावी. मुलीला व वराला दोष आहे कीं नाहीं, याजबद्दल विरुद्ध वचनें आहेत तीं अशीं,

मनुः—

अदीयमाना भर्तारमधिगच्छेद्यदि स्वयम् ।
नैनः किंचिदवाप्नोति न च यं साधिगच्छति ॥

(यावरील मेधातिथीची टीका पाहण्यासारखी आहे.)

अर्थ—तीन वर्षांच्या आंत बाप न देईल तेव्हां जर कन्या स्वतः वर करील तर तिला कांहींच पातक नाहीं व जो वर ती करील त्यासही दोष नाहीं. शास्त्राज्ञेप्रमाणें ऋतुमतीनें तीन वर्षें पितृशा-

सनाची आकांक्षा केली यांत तिला दोष कोठून येणार? व ऋतुप्राप्तीपर्यंत तिला स्वताचा अधिकारच नाहीं तर ऋतुमती झाल्याचा दोष तिला कसा लागेल ? ही गोष्ट न्यायरीत्याही सिद्ध आहे; कारण जर बापच दान करीत नाहीं व तिला स्वतःला अधिकार नाहीं तर तिला दोष काय ह्मणून व तिला वृषली संज्ञा कां ? परंतु कांहीं स्मृतींत तिला दोष सांगितला आहे, व तिच्याशीं लग्न करणारालाही सांगितला आहे.

**तृतीया वृषली ज्ञेया कुमारी या रजस्वला ।**
**यस्तां समुद्वहेत्कन्यां ब्राह्मणो मदमोहितः ।**
**असंभाष्यो ह्यपांक्तेयः स विप्रो वृषलीपतिः ।**

इत्यादि वचनें आहेत. मनु सांगतो कीं वराला व मुलीला मुळींच दोष नाहीं; व कांहीं स्मृतिकार मुलीला वृषली व तत्पतीस वृषलीपति हा दोष सांगतात, तेव्हां या विरोधाची व्यवस्था काय ? माझ्या मतें बौधायनमताप्रमाणेंच विषयभेदानें व्यवस्था केली पाहिजे. याचमान असतां बाप न देईल तर तीन महिन्यानंतर मुलीनें स्वयंवर करावें, व याचमान नसेल तर तीन वर्षांनीं स्वयंवर करावें असें असून जर मुलगी स्वयंवर न करील, गुणहीन वराचा देखील आश्रय न करील तर ती वृषली समजावी. खरोखरच, तिची स्वतंत्रता नसून दुसऱ्याच्या आग्रहानें किंवा चुकीनें ती अविवाहित राहिली तर तिचा दोष काय ? अलबत्ता जेव्हां तिचा अधिकार येईल त्या वेळेस ती ऋतुमती असून अविवाहित राहील तर तिला दोष आहे, व ती वृषली

असून तिच्याशीं कोणी लग्न करील तर तो वरही दोषी आहे. अशी स्थिति बहुतकरून जर मुलीचा बाप मुलीचे ठराविक रुपये घेईन असा हट्ट धरून बसेल तर होते. तितके रुपये देणारा जर वर न मिळेल, तर ऋतु प्राप्त होऊनही व दुसरे योग्य वर मिळत असूनही तो तिचें लग्न करीत नाहीं, अशा स्थितींत मुलगीही जर बापाच्या मर्जीनु- रूप चालून तीन महिन्यानंतर स्वत: सदृश वर न करील व तशीच अविवाहित राहून जो ठरलेले रुपये देणारा भेटेल त्याच्याशींच लग्न करील, तर तीस व त्या वरास दोघांसही दोष आहे. वस्तुतः कन्या अविवाहित राहिली यांत बापाचा दोष आहे मुलीचा मुळींच होऊं शकत नाहीं.

एकंदरींत मन्वादिस्मृतींची व संवर्तादिस्मृतींची एकवा- क्यता बौधायन व वसिष्ठ यांच्या स्पष्ट कण्ठरवोक्त वचना- वरून करितां असा सिद्धांत ठरतो कीं, बापाच्या घरीं अविवाहित मुलीस ऋतु आला असतां तीन वर्षांच्या आंत त्याणें वर शोधून तिचें लग्न केल्यास त्यास दोष नाहीं, पण त्यापूर्वी कोणी सदृश वर येऊन मुलगी मागेल व तो तिचें दान न करील तर त्यास प्रत्येक ऋतूस भ्रूणहत्येचें पातक आहे. मुलीनें तीन वर्षानंतर स्वतः लग्न करावें, व याचमान वर असतां बाप देत नाहीं तर तीन महिन्यानंत- रच स्वयंवर करावा. असें जर ती न करील तर ती दोषी ह्मणजे वृषली होईल व तिचा पति वृषलीपति होईल.

येथवर श्रुति व स्मृति यांचा विचार झाला. तिसरें धर्ममूल सदाचार आहे, व तो पुराणानुमेय आहे. आतां श्रुतिसूत्रस्मृतीपुढें पुराण वगैरेची कांहींच मातब्बरी नाहीं हें

प्रथमच ठरलें. तत्रापि श्रुतिसूत्रस्मृतींवरून जो आपण लग्नाचा काळ प्रशस्त ठरविला त्याप्रमाणेंच पुराणांतरीं दाखले सांपडतात किंवा कसें ही जिज्ञासा साहजिक होते, व तीही रास्त आहे; कारण श्रुत्यादिधर्मशास्त्रांवरून अमुकच प्रशस्त काळ आहे असें ठरविणें वादग्रस्त आहे व वचनांचे नानाप्रकारचे अर्थ होणें संभवनीय असल्यामुळें एकादें मत सिद्ध आहे असें ठरविण्यास सदाचाराचीच मदत घ्यावी लागते व आजपर्यंत उत्तमोत्तम लोक काय करीत आले हें पाहणें इष्ट असतें. ऐतिहासिक उदाहरणें मी येथें देत नाहीं, कारण तो विषय पूर्वींच्या लेखांत येऊन गेला, व हा लेख धर्मशास्त्राचा आहे तेव्हां भारत व पुराणें यांवरूनच सदाचार काय दृष्टीस पडतो, हें पाहिलें पाहिजे. प्रथम भारताचा आपण विचार करूं. भारतांत अप्रौढस्त्रीविवाह झाल्याचें कोठेंच उदाहरण सांपडत नाहीं. द्रौपदी लग्नाच्या वेळीं मोठी होती असें अवयववर्णनावरून स्पष्ट दिसतें. कुंतीला तर लग्नापूर्वींच मुलगा झाला होता. आतां भारतांत सर्व क्षत्रियांचींच उदाहरणें आहेत असें नाहीं. कथाप्रसंगानें अनेक ब्राह्मणांचीं उदाहरणें आलीं आहेत. प्रसिद्ध देवयानी शुक्रकन्या ही लग्नाच्या पूर्वी मोठी होती, हें तिच्या गोष्टीवरूनच सिद्ध होतें. कच शुक्रगृहीं राहून तिला प्रसन्न ठेवीत होता, असें भारतांत सांगितलें आहे.

**स शीलयन् देवयानीं कन्यां संप्राप्तयौवनाम्**
**पुष्पैः फलैः प्रेषणैश्च तोषयामास भारत ।**

यांत सम्प्राप्तयौवनाम् हें पद लक्षांत ठेविलें पाहिजे. तसेंच

स वै दीर्घतमा नाम शापादृषिरजायत ।
जात्यंधो वेदवित्प्राज्ञः पत्नीं लेभे स विद्यया ।
तरुणीं रूपसंपन्नां प्रद्वेषीं नाम ब्राह्मणीम् ।

यांत प्रद्वेषी नामक तरुण पत्नी मिळाली असें वर्णिलें आहे. याशिवाय एका ब्राह्मणीनें अगदीं वृद्धपणीं विवाह केल्याची गोष्ट भारतांत प्रसिद्ध आहे.

आतां कांहीं पुराणांतील गोष्टी व वचनें देतों. या वचनांचा अर्थ उत्तान असल्यामुळें तो निराळा देण्याचें प्रयोजन नाहीं.

स्कंदपुराण ब्रह्मोत्तरखंड अ० १

मथुरायां यदुश्रेष्ठोः दाशार्ह इति विश्रुतः ।
बभूव राजा मतिमान् महोत्साहो महाबलः ।
स काशिराजतनयामुपयेमे वराननाम् ।
कांतां कलावतीं नाम रूपशीलगुणान्विताम् ।
कृतोद्वाहः स राजेन्द्रः संप्राप्य निजमंदिरम् ।
रात्रौ तां शयनारूढः संगमाय समाव्हयत् ।

स्कंदपु० ब्रह्मो० अ० ३.

आसीदियं पूर्वभवे काचिद्ब्राह्मणकन्यका ।
तां सर्वलक्षणोपेतां रतेर्मूर्तिमिवापराम् ॥
वर्धमानां पितुर्गेहे वीक्ष्यासन् विस्मिता जनाः ।
दिने दिने वर्धमाना बंधुभिर्लालिता भृशम् ॥

सा शनैर्यौवनं भेजे स्मरस्येव महाधनुः ।
पित्रा दत्ता च कस्मैचिद्विधिना द्विजसूनवे ॥
सा भर्तारमनुप्राप्य नवयौवनशालिनी ।
कंचित्कालं शुभाचारा रेमे बंधुभिरावृता ॥

मार्कंडेयपुराण.

तां यौवनवतीं दृष्ट्वा कन्यकां रूपशालिनीम् ।
स मुनिश्चिंतयामास कोऽस्या भर्ता भवेदिति ॥

पद्मपुराण.

पुरास्वांतोद्भवां कन्यां लोकेशश्च महामनाः ।
गौतमाय ददौ धाता लोकपालाग्रतो मुदा ॥
ततस्तु लोकपालानां मन्मथाविष्टचेतसाम् ।
शचीपतेस्तु संमोहो हृदि शल्य इवास्थितः ॥

सूर्यापासून कुंतीला गर्भ राहिला त्याविषयीं.

सा च त्वामुदये दृष्ट्वा साभिलाषा रजस्वला ।
चिंताभिपन्ना तिष्ठन्ती भजिष्यति विभावसो ॥

ककुत्स्थकुलांतील दंड राजाविषयीं.

अथ काले तु कस्मिंश्चिद्राजा भार्गवमाश्रमम्
रमणीयमुपाक्रामच्चैत्रे मासि मनोरमे ।
तत्र भार्गवकन्यां तु रूपेणाप्रतिमां भुवि ॥
सुनासां चारुसर्वांगीं पीनोन्नतपयोधराम् ।
अभिगम्य सुविश्रान्तां कन्यां वचनमब्रवीत् ॥

भूमिखंडांतील प्रसिद्ध दिवोदासाच्या मुलीच्या गोष्टींत **पित्रावलोकिता सा तु रूपतारुण्यमंगला ।** असें आहे.

भूमिखंड.

**कलिंगाख्ये शुभे देशे सुदेवो नाम नामतः ।**
**तस्याहं दयिता नित्यं पितुश्चापि महामतेः ॥**
**रूपयौवनगर्वेण मत्ताहं चारुहासिनी**
**याचिताहं द्विजै सर्वैः सर्वालंकारभूषिता ॥**
**संप्राप्तं यौवनं पूर्ण मयि भावसमन्वितम् ।**

इत्यादि अनेक वचनें सांपडतील. बहुतकरून पुराणांत मुलींचा लवकर आठव्या वर्षी किंवा त्यापूर्वी विवाह झाल्याची गोष्ट सांपडणार नाहीं. सर्वत्र युवतीं, रूपयौवनशालिनीम्, पीनपयोधराम् इत्यादि विशेषणें दिलेलीं आढळतात. व ही गोष्ट क्षत्रियांचीच आहे असें नाहीं, ब्राह्मणकन्यकांचीही तशीच स्थिति आहे. सारांश, प्रौढ यौवनांत आलेल्या स्त्रियांचा विवाह पूर्वी होत असे.

या लेखांत येथवर जें विवेचन झालें त्यावरून सिद्धांत ठरतो तो येणेंप्रमाणें. मुलीचा विवाह आठ वर्षांपासून करणें शक्य आहे. दहाव्या वर्षापासून ऋतुप्राप्तीपर्यंतचा काल प्रशस्त आहे. त्यांतही बारा वर्षांचा किंवा आसन्नार्तवेचा विवाह करणें उत्तम आहे. ऋतुप्राप्तीनंतर तीन वर्षेपर्यंत विवाह करण्याचा बापास अधिकार आहे; ह्मणजे तीन वर्षांच्या आंत कोणी मागणारा नसेल तर त्यास दोष नाहीं.

यापुढें त्यास दोष आहे. सारांश, जसा उपनयनाचा काल आठव्या वर्षी उत्तम परंतु तें तत्पूर्वी पांचव्या वर्षापासून होऊं शकतें व नंतर सोळा वर्षेंपर्यंत " ब्राह्मणस्यानतीतः कालः " केल्यास दोष नाहीं, तसाच विवाहकाल दहापासून ऋतुप्राप्तीपर्यंत प्रशस्त व पूर्वीची मर्यादा आठ व पुढची ऋतुप्राप्तीनंतर तीन वर्षें आहे. साधारणतः सुज्ञ लोक आठव्यापासून दहाव्या वर्षापर्यंत विवाह प्रशस्त समजतात, व दहानंतर ऋतुप्राप्तीपर्यंत दोष नाहीं, परंतु विवाह गौण आहे व ऋतुप्राप्तीनंतर सदैव दोष आहे, व त्यास प्रायश्चित्त आहे, असें मानतात; परंतु ह्या समजुती चुकीच्या आहेत. मी विवाहशास्त्राचें अवलोकन केलें त्यांत ज्या मुख्य गोष्टी माझ्या अवलोकनांत आल्या त्यासंबंधानें लोकप्रचारांत असलेल्या अज्ञ चाली व समजुती शास्त्रांत निराधार आहेत, यांत तिळमात्र संशय नाहीं; व ह्या गोष्टी समंजस हिंदु लोक व धर्मशास्त्राभिमानी शास्त्री कधींही नाकबूल करणार नाहींत, असें मी खात्रीनें सांगूं शकतों. त्या स्पष्टपणें लोकांस कळल्या व साधारण जनसमूहाच्या हृदयांत तितक्या गोष्टी उतरल्या व तितक्यापुरते त्यांनीं आपले चुकीचे समज व अशास्त्र आचरण सोडून दिलें, तर मी या माझ्या उद्योगांत कृतार्थ झालों असें समजेन.

१. हिरण्यकेशी व आपस्तंब शाखेच्या लोकांस ऋतुमती किंवा आसन्नार्तवा मुलीचाच विवाह केला पाहिजे. त्यांच्या सूत्रावरून चातुर्थीकर्म त्यांस केलें पाहिजे व या कर्मास

बारा वर्षांपासून पुढेंच मुलीचा विवाह शक्य आहे, ह्मणजे शरीरमानानें व व्यावहारिक रीत्या योग्य आहे.

२. 'अत ऊर्ध्वं रजस्वला' या श्लोकावरून पारिभाषिक रजस्वलात्व अकराव्या वर्षी उत्पन्न होत नाहीं; व प्रत्यक्ष ऋतुमती नसल्यास अकराव्या बाराव्या वगैरे वर्षी लग्न करण्यांत दोष नाहीं. या उलट समजूत पुष्कळ असमंजस लोकांची आहे पण ती खोटी आहे, व हा शास्त्रार्थ साधारण सर्व लोकांस लागू आहे.

३. ऋतुप्राप्तीनंतर तीन वर्षेपर्यंत याचमान नसल्यास मातापितरांस दोष नाहीं. यासंबंधानें मी दिलेलें बौधायन-वचन विचारार्ह आहे.

४. मुलीचा विवाह ऋतुप्राप्तीनंतर केव्हां तरी केलाच पाहिजे. मात्र प्रायश्चित्त आश्वलायनोक्त आहे तें केलें पाहिजे. पण विधवाविवाहासारखें प्रौढाविवाहांत दुष्टत्व मुळींच नाहीं, ह्मणजे हा विवाह कलिवर्जांत नाहीं किंवा प्रायश्चित्त केलें नसलें तरी पतिपत्नी पंक्तिबाह्य होत नाहींत व यांत जातिभ्रंश मुळींच होत नाहीं.

आतां साधारण लोकसमजाप्रमाणें ऋतुप्राप्तीपर्यंतचा विवाह अदुष्ट आहे असें जरी आपण धेऊन चाललों तरी त्यांतल्या त्यांत मुलीचा विवाह केव्हां करावा याजविषयींही आपण योग्यकाल पाहिला पाहिजे. आठव्या वर्षाचा काळ उत्तम असें गृहीत केलें तरी तो काळ अतिक्रांत झाला असतां किंवा फलोद्देशाची जेथें इच्छा नाहीं, अशा समयीं शास्त्रांत विकल्प

प्राप्त झाला ह्मणजे नवव्या वर्षीं, दाहाव्या वर्षीं, अकराव्या वर्षी किंवा बाराव्या वर्षीं विवाह करावा असा वर्षसंबंधानें विकल्प उत्पन्न झाला. 'गर्भाष्टमेऽष्टमे वाब्दे उपनयनं' जन्मापासून किंवा गर्भापासून आठव्या वर्षीं उपनयन करावें असा विकल्प आला असतां 'स्वस्य च प्रियमात्मनः' आपल्यास इष्ट असेल तेव्हां तें करावें असें चवथें धर्ममूल सिद्ध आहे. हें प्रथमच लिहिलें आहे. त्या धर्ममूलाचा विचार करतां बाराव्या किंवा तेराव्या वर्षीं विवाह करणें प्रशस्त आहे असें सिद्ध होतें. बालविवाहापासून अत्यंत नुकसान आहे याचें विवेचन मागील लेखांत झालेंच आहे. बालविवाहापासून बालवैधव्याचा जबरदस्त डाग या आपल्या हिंदुसमाजाला लागला आहे. ज्या धर्मशील, धर्मप्रिय, दयाळु लोकांस या बालविधवांची कींव येते परंतु विधवाविवाह शास्त्रदुष्ट आहे अशा भीतीनें ज्यांचे प्रेमपाश जखडून गेले आहेत अशा लोकांनीं या शास्त्रार्थाचा अवश्य विचार करावा, व या धर्ममूलाप्रमाणें प्रौढ आसन्नार्तवेचा विवाह करणें प्रशस्त मानावें, हें सर्वथैव त्यांचें कर्तव्य आहे. जरी ऋतुप्राप्तीनंतर मातापितरांस दोष आहे, तरी तो दोष लोकांत मानलेल्या विधवोद्वाहासारखा भयंकर नाहीं; व तीन वर्षेंपर्यंत आपणास मुदत आहे असें जाणून होतां होईल तों मोठ्या मुलीचा विवाह करण्याचा यत्न आपण करावा. असें केल्यानें अनेक प्रकारचीं संकटें टळतील; शक्तीचा ऱ्हास होणार नाहीं; बालविधवारूपी

भयंकर कलंक राहणार नाहीं; व धर्मप्रिय लोकांस विधवा विवाहासारख्या भीतिप्रद प्रसंगाचें कारण राहणार नाहीं. हें माझेंच मत आहे असें नाहीं; परंतु आपल्या प्रसिद्ध भिषग्वर्यांनींही या सर्व गोष्टींचा विचार करून वैद्यशास्त्राची विषयमर्यादा सोडून विवाहवयाविषयीं आज्ञा दिली आहे. " अथ खलु पुमानेकविंशतिवर्षः द्वादशवर्षदेशीयां कन्यां विधिनोद्वहेत् "—वाग्भट. सुश्रुतादि ग्रंथांचेंही हेंच मत आहे.

येथपर्यंत श्रुतिस्मृतिसदाचारस्वहित या धर्ममूलांवरून कोणत्या वयांत मुलीचा विवाह करणें प्रशस्त आहे, या प्रश्नाचा विचार यथामति मी केला. ह्या शास्त्रीय विवेचनांत दोष काढणें परंपराप्रिय शास्त्री यांस कठिण पडेल असें मी ह्मणत नाहीं. हें शास्त्रीय विवेचन पूर्ण आहे व शोधकांस इतर साधकबाधक वचनें व प्रमाणें सांपडणार नाहींत असेंही मी ह्मणत नाहीं; परंतु माझी हिंदुजनसमाजास इतकीच विनंति आहे कीं, त्यांनीं या लेखांतील विवेचनाचा आग्रहरहित बुद्धीनें विचार करावा. कोणी याजवर आक्षेप काढल्यास किंवा नवीन बाधक वचनें काढल्यास त्यांचा परिहार यथामति करण्यास मीं तयार आहे.

---

सदर लेख मार्च स. १८९२ त छापून केसरीबरोबर वाटला गेला.

# विधवापुनर्विवाहनिषेध.

## लेख ५ व ६.

---

### १ शास्त्रार्थ २ इतिहास व गुणदोष.

### ( १ ) शास्त्रार्थ.

प्रथम वरील विषयावर दोन निरनिराळे अंक काढाववाचा विचार होता, तरी ते दोन्ही येथें एकत्र जोडण्याचें योजिलें आहे. याचीं कारणें अशीं आहेत कीं, एक तर विधवाविवाहास काय शास्त्राधार आहे, ह्याविषयीं आज पुष्कळ वर्षे इतक्या विद्वत्तेची चर्चा झाली आहे कीं, विचार करण्यासारखे नवीन मुद्दे थोडेच राहिले आहेत. दुसरें ज्यांनीं ज्यांनीं ह्या विषयाचा प्रांजळ बुद्धीनें शोध करून विचार केला आहे व त्याविषयीं लेख लिहिले आहेत त्यांस असें आढळून आलें आहे कीं, सर्व विधवांचे विवाह व्हावे अशी शास्त्राची परवानगी आहे, ह्या सुधारकांच्या मतास, किंवा स्त्रियांचे हक्क पुरुषांच्या बरोबरीचे असावे ह्या नैसर्गिक न्यायास अमलांत आणण्यास, दुर्दैवानें आधार सांपडत नाहीं व ह्यामुळें त्यांची एक प्रकारची निराशा झालेली दिसते. रा. रा. दाजी आबाजी खरे ह्यांनीं आपल्या पुनरुद्वाह पुस्तकाच्या अखेरीस असेच उद्गार काढले आहेत. तसेंच दिवाण बहादूर रघुनाथराव ह्यांच्या मताचा अखेर परिणाम पाहूं गेल्यास तोही वरील दोन्ही

मतांस अनुकूल होण्यासारखा नाहीं. तिसरें शास्त्रांचा अर्थ जुन्या पद्धतीप्रमाणेंच परंतु हेकटपणाचा व एकपक्षीय न करितां उदार बुद्धीनें करावा व अशा रीतीनें जी सुधारणा शास्त्रसंमत ठरेल तीच लोकांपुढें ठेवावी असा पहिल्यापासून माझा हेतु आहे; तेव्हां विधवाविवाहाच्या सशास्त्रतेबद्दल होईल तितका थोडक्यांत विचार पहिल्यानें करून नंतर त्यांत ज्या गोष्टी विचाराअंतीं ठरतील त्या गोष्टींसंबंधानें ऐतिहासिक रीतीनें व उपयुक्त आणि अनुपयुक्त ह्याही दिशेनें विचार करणें सयुक्तिक पडेल. अशा तीन कारणांकरितां शास्त्रार्थाचा थोडक्यांत प्रथम ऊह करून याच अंकास जोडून ऐतिहासिक व सामाजिक दृष्ट्या विचार केला आहे.

एकाद्या विषयाला शास्त्राधार काय आहे हें पाहाणें झाल्यास वेद ह्मणजे श्रुतीपासून आरंभ करण्याची साधारण रीत आहे, परंतु विधवाविवाहास अनुकूल किंवा प्रतिकूल आधार वेदांतून शोधून काढण्याचा मीं विशेष प्रयत्न केला नाहीं. तथापि मागें पुणें येथें श्रीशंकराचार्यांसमक्ष झालेल्या मोठ्या वादांत खालीं दिलेल्या दोन ऋचा निघाल्या होत्या व दिवाण बहादुर रघुनाथराव यांसही याहून अधिक सांपडल्या नाहींत असें वाटतें:—

उदीर्ष्व नार्यभिजीव लोकं ।
गतासुमेतमुपशेष एहि ॥

हस्तग्राभस्य दिधिषोस्तवेदं ।
पत्युर्जनित्वमभि संबभूव ॥

व

को वां शयुत्रा विधवेव देवरँम् ।
मर्यं न योषा कृणुते सधस्थ आ ॥

हे मंत्र नियोगाला उद्देशून आहेत किंवा कोणत्याही पुनर्विवाहाला उद्देशून आहेत? तसेंच वेदांतल्या एकाद्या ऋचेंत विवाहित विधवेविषयीं उल्लेख सांपडल्यावरून द्विजांच्या विधवांचे विवाह होण्यास कांहीं हरकत नाहीं, असें मानावें कीं नाहीं, असे अवघड प्रश्न येथें उत्पन्न होतात. परंतु या प्रश्नांचा विचार करण्याची आवश्यकता दिसत नाहीं. कारण मनूच्या खालीं दिलेल्या वचनाप्रमाणें वैवाहिक मंत्र कन्येच्या विवाहास मात्र लागतात; प्राप्तमैथुनांच्या विवाहास लागत नाहींत हें निर्विवाद आहे.

---

१ ह्या शब्दाचा अर्थ खालीं दिलेल्या मनूच्या श्लोकांतील त्याच शब्दाशीं लावून पहावा:—

भ्रातुर्मृतस्य भार्यायां योनुरज्येत कामतः ।
धर्मेणापि नियुक्तायां स ज्ञेयो दिधिषूपतिः ॥

ऋग्वेद भाष्य अष्टक ७–६–२७ यांत दिधिषोः याचा अर्थ गर्भस्य निधातुः असा केला आहे. शिवाय अभिसंबभूव हें भूतकाळीं पदही विचारणीय आहे.

* देवरम् म्हणजे दुसरा नवरा किंवा दीर असाही अर्थ होऊं शकतो; व ऋग्वेदभाष्य ७–८–१८ यांत अर्थ भर्तृभ्रातरम् केला आहे.

पाणिग्रहणिका मंत्रा कन्यास्वेव प्रतिष्ठिताः
नाकन्यासु क्वचिन्नृणां लुप्तधर्मक्रिया हि ताः ॥

अर्थः—" वैवाहिक मंत्रांचा संबंध ' कन्या ' ह्मणजे अक्षतयोनि स्त्रियांच्या विवाहाशीं मात्र आहे. परंतु " अकन्या " ह्मणजे प्राप्तमैथुनांच्या विवाहाशीं नाहीं. कारण अकन्या ह्या धर्मसंस्कार व प्रजोत्पादन अशा दोन्हीं कृत्यांस अयोग्य आहेत. "

वरील वचनांत ज्या मंत्रांचा उल्लेख केला आहे, ते, अर्यमणं नु देवं कन्यामग्निमयक्षत इत्यादि आहेत. गृह्यसूत्रांतही विधवाविवाहाविषयीं कोठें उल्लेख नाहीं. याविषयीं मनूचा दुसरा एक आधार असल्यामुळें त्या सूत्रांचा अर्थ आपापल्या मताप्रमाणें करण्याचें प्रयोजन नाहीं.

न विवाहविधावुक्तं विधवावेदनं क्वचित् ।

अर्थ—लग्नसंस्कारांत विधवाविवाहाविषयीं कोठेंच उल्लेख नाहीं. ह्यावरून वेदांत आणि गृह्यसूत्रांत सांगितलेला लग्नविधि प्राप्तमैथुना विधवेच्या विवाहास लागत नाहीं असें स्पष्ट आहे. ह्मणून वर सांगितलेले उदीर्ष्व नार्य इ० मंत्र अक्षतयोनि विधवेस उद्देशून असावे, असेंच गृहीत धरावें लागतें. " अक्षतयोनि विधवांचा मात्र विवाह वेदोक्त संस्कारानें होतो व प्राप्तमैथुना विधवा जरी पुनः पत्नी होण्यास अयोग्य होय व तिचा विवाह वेदोक्त संस्कारानें करितां येत नाहीं तरी गौण पद्धतीप्रमाणें तिचा विवाह करण्यास हरकत नाहीं " असें जें दिवाणबहादुरांचें मत आहे ह्यांतलेंही

तात्पर्य काढिलें असतां त्यांनींही वरील ह्मणणें कबूल केलें आहे, असें ह्मटलें पाहिजे.

वरील विवेचनावरून सहज लक्षांत येईल कीं, विधवा-विवाहाच्या सशास्त्रतेच्या प्रश्नाचे नेहमीं दोन पोटभाग पाडावे लागतात. एक अप्राप्तमैथुना विधवाविवाहाविषयीं शास्त्रार्थ. आणि दुसरा प्राप्तमैथुनाविधवाविवाहाविषयीं शास्त्रार्थ. ह्यांपैकीं पहिल्यांचा ह्मणजे अप्राप्तमैथुनांचा विवाह वेदोक्त संस्कारानें होतो, व प्राप्तमैथुनांचा होत नाहीं असें श्रुतीचें मत दिसतें. ह्याविषयीं मनूचें मुख्य आधारभूत वचन " पाणिग्रहणिका मंत्राः कन्यास्येव प्रतिष्ठिताः " इ० वर दिलेंच आहे; त्यांत वेदानें आणि सूत्रांनीं अप्राप्तमैथु-नांच्या आणि प्राप्तमैथुनांच्या विवाहांत केलेला भिन्नपणा स्पष्ट दाखविला आहे.

विधवाविवाहाविषयीं स्मृतींचें काय ह्मणणें आहे तें पाहूं. स्मृतींचाही अभिप्राय फक्त अप्राप्तमैथुना विधवांचा विवाह वेदोक्त संस्कारानें होऊं शकतो असाच आहे. ह्मणजे स्मृतींचा वरील दिलेल्या श्रुत्यभिप्रायाशीं अक्षरशः मेळ मिळतो. हल्लीं मान्य असलेल्या अठरा स्मृतींपैकीं मनु, याज्ञवल्क्य, वसिष्ठ, शातातप, आणि विष्णु ह्या मुख्य स्मृतींत व नारद वगैरे कांहीं उपस्मृतींत वरील निर्णय स्पष्ट सांगितला आहे.

मनुः—

**सा चेदक्षतयोनिः स्याद्गतप्रत्यागतापि वा ।**
**पौनर्भवेन भर्त्रा सा पुनः संस्कारमर्हति ॥**

अर्थ-ती विधवा अक्षतयोनि असेल तर तिचा पुन्हा संस्कार पुनर्भू नात्यानें दुसऱ्या पतीशीं करावा.

याज्ञवल्क्यः—

**अक्षता च क्षता चैव पुनर्भूः संस्कृता पुनः ।**

अर्थ—अक्षता व क्षता अशा दोन प्रकारच्या ह्मणजे संस्कृता व असंस्कृता अशा दोन पुनर्भू पुनर्विवाहिता स्त्रिया आहेत.

वसिष्ठः—

**पाणिग्राहे मृते बाला केवलं मंत्रसंस्कृता ।**
**सा चेदक्षतयोनिः स्यात् पुनः संस्कारमर्हति ॥**

अर्थ—पाणिग्रहण करणारा पति मेला असतां केवळ मंत्रांनीं संस्कृत झालेली बाला अक्षतयोनि असेल तर पुन्हां संस्कारयुक्त विवाहास योग्य आहे.

शातातपः—

**समुद्धृत्य तु तां कन्यां साचेदक्षतयोनिका ।**
**कुलशीलवते दद्यादिति शातातपोऽब्रवीत् ॥**

अर्थः—ती कन्या ( विधवा झालेली ) पतीच्या घरून आणून ती जर अक्षतयोनी असेल तर कुलवान् व शील-वान् अशा वराला पुनः द्यावी असें शातातपाचें वचन आहे.

विष्णुः—

**अक्षता भूयः संस्कृता पुनर्भूः भूयस्त्वसंस्कृतापि परपूर्वा**

अर्थ—अक्षता असून पुनः संस्कारयुक्त विवाह झालेली पुनर्भू होय. तशीच पुनः संस्कार न झालेली पूर्वी एकवार विवाह झालेली.

ह्यांशिवाय बाकीच्या स्मृती ह्या विषयाविषयीं मुग्ध आहेत. अर्थात्च त्यांवरून वरील निर्णयाच्या उलट आधार निघूं शकत नाहीं. ह्याप्रमाणें वेदांतील वैवाहिक मंत्र आणि विवाहविधि यांचा मनूच्या वचनाप्रमाणें केलेला अर्थ व स्मृत्या यांची एकवाक्यता आहे, आणि अप्राप्तमैथुना विधवांचाच मात्र विवाह वेदोक्त संस्कारानें करितां येतो व प्राप्तमैथुना विधवांचा करितां येत नाहीं, हा वरील निर्णय अबाधित आहे हें उघड दिसतें. इतकेंच नाहीं तर ज्या ज्या अर्वाचीन सुधारकांनीं ह्या विषयाचा शोध केला आहे, त्यांस वरील निर्णय कबूल केल्यावांचून गत्यंतर नाहीं. ह्याला आणखी एक प्रत्यंतर आहे. शूद्रांतही लग्न जसें थाटानें होतें, तसें क्षतयोनि विधवेचे पाट करीत नाहींत, व लग्नाचे संस्कारही पाटांत करावे लागत नाहींत. ही चाल वरील निर्णयाला अनुसरूनच आहे.

आतां अप्राप्तमैथुनाविधवाविवाह वेदोक्तसंस्कारानें झाल्यामुळें व प्राप्तमैथुनांचा तसा न झाल्यामुळें त्यांच्या परस्पर स्थितींत फरक काय होतील ते पाहूं. प्राप्तमैथुना स्त्रीच्या विवाहाला काय दोष देत आहेत, ते मनूच्या वर दिलेल्या श्लोकांतील " लुप्तधर्मक्रिया हि ताः " ह्या चरणांत सांगितले आहेत. ह्याचा अर्थ मेधातिथीनें खालीं दिल्याप्रमाणें केला आहे.

**यासां धर्मे अग्निहोत्रादौ अपत्योत्पादनविधौ च अधिकारो नास्ति अतस्ता न विवाह्याः ।**

अर्थः—त्यांस अग्निहोत्रादि धर्मकृत्यें, अथवा प्रजोत्पादन करण्याचा अधिकार नसल्यामुळें त्या लग्नास अपात्र आहेत. कुल्लूकभट्टाची सदरील वाक्यावरील टीका ह्याहून थोडी निराळी आहे. ती अशीः—

**ताः क्षतयोनयः वैवाहिकमंत्रैः संस्क्रियमाणा अपि यस्मादपगतधर्मविवाहादिशालिन्यो भवंति नासौ धर्म्यो विवाहः ॥***

अर्थः—जरी क्षतयोनि वधूचा वैवाहिक मंत्रांनीं विवाह लाविला असला, तरी तो धर्मानें मान्य केला नसल्यामुळें धर्म्य अथवा सशास्त्र नाहीं.

---

* ह्या टीकेवरून कुल्लूकाचा खरा उद्देश समजणें किंचित् अवघड आहे. ह्याच्यापुढेंच सहोढाची व्याख्या देतांना गर्भिणीचे (अर्थात्च त्या क्षतयोनी असावयाच्या) वगैरे विवाह मनूच्याच ह्मणण्यावरून संस्कारयुक्त होतात, असें सांगून शेवटीं अकन्यांचे विवाह धर्म्य नाहींत असें ह्मटलें आहे.

कुल्लूकाच्या ह्या ह्मणण्यावरून क्षतयोनि स्त्रियांच्या प्रथम विवाहाप्रमाणेंच क्षतयोनि विधवांचाही पुनर्विवाह धर्म्य नाहीं. तत्रापि संस्कारयुक्त होऊं शकणारा आहे असें कोणास वाटेल तर ती चूक आहे. कारण मनूनें अक्षतयोनि विधवांचा विवाह संस्कारयुक्त होतो, असें ह्मटलें आहे, यांतच क्षतयोनि विधवांचा विवाह संस्कारयुक्त होत नाहीं असें स्पष्ट दाखविलें आहे.

वरील कुलूकवचनांत प्रथमारंभीं जरी थोडासा विरोध आहे, तत्रापि क्षतयोनींचा संस्कारयुक्त विवाह झाला तरी त्यास धर्माचरण करण्यांस अधिकार पोंचत नाहीं, यासंबंधानें मेधातिथि आणि कुल्लूक ह्या दोहोंचेंही एकमत आहे. याचा परिणाम क्षतयोनि पुनर्विवाहितांस धर्मपत्नी अथवा पत्नी ही संज्ञा प्राप्त होऊं नये, असा होतो. ' पत्युर्धर्मसंयोगे ' ह्या पाणिनीच्या नियमाप्रमाणें पत्नी ह्या शब्दानें पतिसमवेत धर्माचरण करणारी स्त्री दर्शविली जाते. तात्पर्य, क्षतयोनि पुनर्विवाहितेस धर्माचरण करण्याचा ह्मणजे उदाहरणार्थ अग्निहोत्र, यज्ञ, मुंज, लग्न इत्यादि करण्याचा अधिकार नाहीं.

ह्या निर्णयाचें, शूद्रादि ज्या जातींत पुनर्विवाह होऊं शकतात त्यांच्यांतील चालीवरून पुष्टीकरण होतें. त्यांच्यांत देखील धर्मसंबंधाच्या अथवा दुसऱ्या शुभकृत्यांत सुवासिनीनें ज्या गोष्टी करावयाच्या असतात त्या पुनर्विवाहित विधवेनें ह्मणजे पाटाच्या बायकोनें केल्या तर चालत नाहीं.

दुसरें:—अशा प्रकारची स्त्री प्रजोत्पादनास योग्य नाहीं असें मेधातिथि ह्मणतो. कुल्लूकानें ह्या विषयावर येथें कांहींच ह्मटलें नाहीं. परंतु दुसऱ्या एका ठिकाणीं त्यानें आपलें मत असेंच दर्शाविलें आहे. मनूनें औरस पुत्राची व्याख्या दिली आहे ती येणेंप्रमाणें:—

**स्वक्षेत्रे संस्कृतायां तु स्वयमुत्पादयेद्धि यम् ।**
**तमौरसं विजानीयात्पुत्रं प्रथमकल्पितम् ॥**

ह्या श्लोकावरील टीकेंत कुल्लूक असें ह्मणतो:—

स्वभार्यायां कन्यावस्थायामेव कृतविवाहसंस्कारायां यं स्वयमुत्पादयेत् तं पुत्रमौरसं विद्यात् ।

अर्थः—कन्यावस्थेंत लग्न केलेल्या स्वतःच्या स्त्रीस स्वतःपासून झालेल्या पुत्रास औरसपुत्र ह्मणावें.

सारांश, कुल्लूक व मेधातिथि या दोहोंच्याही मताप्रमाणें क्षतयोनि पुनर्भू प्रजोत्पादनास योग्य नाहीं. ह्मणजे तिच्यापासून औरस संतति होत नाहीं. जी संतति होईल तीस पौनर्भव ह्मणतात. आतां अक्षतयोनि पुनर्विवाहित विधवेचा पुत्र पौनर्भव आहे किंवा औरस आहे, हें येथें स्पष्ट होत नाहीं. तथापि त्यास औरस गणलें पाहिजे, कारण ती स्वक्षेत्र असून संस्कृत आहे. त्यास पौनर्भव जरी ह्मटलें तरी पौनर्भवाचे दोष त्यास नाहींत, हें निःशंक आहे. मनूनें पौनर्भवाची व्याख्या दिल्यानंतर लगेच अक्षतयोनि विधवेचा विवाह वैदिक संस्कारानें होतो असें ह्मटलें आहे, यांतील भावार्थाकडे टीकाकाराचें लक्ष चांगलेंसें पोंचलें नाहीं. बारा प्रकारच्या पुत्राच्या व्याख्या खालीं दिलेल्या अनुक्रमानें मनूंत दिल्या आहेतः—

स्वक्षेत्रे संस्कृतायां तु स्वयमुत्पादयेत्सुतः ।
तमौरसं विजानीयात् पुत्रं प्रथमकल्पितम् ॥१६६॥
या पत्या वा परित्यक्ता विधवा वा स्वयेच्छया ।
उत्पादयेत्पुनर्भूत्वा स पौनर्भव उच्यते ॥ १७५ ॥

**सा चेदक्षतयोनिः स्याद्गतप्रत्यागतापि वा ।**
**पौनर्भवेन भर्त्रा सा पुनः संस्कारमर्हति ॥ १७६ ॥**
—वगैरे.

दुर्दैवानें ह्या श्लोकांवरील मेधातिथीची टीका नाहींशी झाली आहे. १७६ व्या श्लोकांत केलेल्या विषयांतराबद्दल एकट्या राघवानंदानें मात्र 'प्रासंगिकमाह' असें कारण सांगितलें आहे. परंतु माझ्या मतानें १७६ वा श्लोक १७५ व्या श्लोकास अपवादक ह्मणून दिला आहे व अक्षतयोनि विधवेचा विवाह संस्कारयुक्त होतो, असें सांगण्याचें तात्पर्य हेंच दिसतें कीं, अशा पुनर्विहितेचा पुत्र पूर्वीच्या श्लोकाप्रमाणें पौनर्भव नव्हे, असें या श्लोकांत दर्शविलें आहे.

इतक्याच, किंबहुना याहून जास्त महत्त्वाच्या दुसऱ्या एका स्थळीं मनूनें अक्षतयोनि हा शब्द योजिला आहे. सजातीयाची व्याख्या देतांना मनु ह्मणतोः—

**सर्ववर्णेषु तुल्यासु पत्नीष्वक्षतयोनिषु ।**
**आनुलोम्येन संभूता जात्या ज्ञेयास्त एव ते ॥१०॥**

अर्थः—विवाहसमयीं अक्षतयोनि असून ( नवऱ्याशीं ) समान अशा जातीच्या स्त्रियांच्या संततीस त्यांचे सजाति ह्मणावें.

ह्या श्लोकावर दिलेल्या अनेक टीका विचार करण्यासारख्या आहेत. मुख्यत्वें "एतेन पौनर्भवस्य ब्राह्मणत्वादि गौणं" हें वाक्य लक्षांत घेण्यासारखें आहे. मेधातिथीची टीका त्याच्या लेखपद्धतीप्रमाणें फार बारकाईची परंतु समजण्यास अवघड अशी आहे.

विधवाविवाह वैदिक संस्कारयुक्त झाल्यापासून व न झाल्यापासून काय वेगवेगळे परिणाम होतील, हा प्रश्न मोठ्या महत्वाचा असून सुधारक पक्षाच्या किंवा जुन्या मताच्या पंडितांनीं अद्याप त्याची हवी तितकी वाटाघाट केली नाहीं, ही फार खेदाची गोष्ट आहे. तथापि त्यांच्या परिणामांत फरक आहे, ही गोष्ट दोघांही पक्षांस नाकबूल करतां यावयाची नाहीं; व मेधातिथि आणि कुलूक ह्यांच्या वचनांचा यथाशक्ति जो अर्थ मी केला आहे त्यावरून तो फरक स्पष्ट होतो. ह्मणजे क्षतयोनि विधवांचा विवाह झाला तरी त्या धर्माचरण व प्रजोत्पादन करण्यास योग्य नाहींत, ती स्त्री धर्मपत्नी होऊं शकत नाहीं, तिची संतती औरस नव्हे व त्या संततीची जात आईबापांच्या जातीइतकी शुद्ध नाहीं हा मुख्य फरक आहे, व याचाच अनुवाद बौधायनानें केला आहे.

"तां गृहीत्वा न प्रजां न धर्मं विंदेत"

अर्थ–पुनर्भूशीं लग्न केलें असतां त्यास योग्य संतति व धर्मश्रेय हीं दोन्हीही प्राप्त होणार नाहींत.

आतां दुसऱ्या पक्षीं अक्षतयोनि विधवांचा विवाह वेदोक्त संस्कारानें होत असल्यामुळें त्यापासून धर्मश्रेय आणि अनिंद्य प्रजा हीं दोन्हीही प्राप्त होतात, असें स्पष्ट आहे. परंतु हा सिद्धांत जुन्या मताचे आग्रही लोक कबूल करीत नाहींत. त्यांच्या मतास प्रथम दर्शनीं अनुकूल दिसणारे शब्द आहेत हें खरें आहे. पुणें येथें मागें झालेल्या मोठ्या वादांत फक्त अक्षतयोनि विधवासंबंधीं निराळा प्रश्न निघून

वाटाघाट व्हावयास पाहिजे होती ती दुर्दैवानें झाली नाहीं. तरी तेथेंही तो प्रश्न प्रसंगोपात्त निघाला होता व " पौनर्भवेन भर्त्रा सा पुनः संस्कारमर्हति " ह्यांतील पौनर्भवेन ह्या शब्दावर विशेष जोर दिला गेला होता. ह्या वाक्याचा अर्थ–अक्षतयोनि विधवांचा विवाह पौनर्भवाशीं संस्कारयुक्त होतो व पौनर्भव ह्मणजे संस्काररहित लग्न झालेल्या पुनर्विवाहितेचा पुत्र असा करण्याविषयीं जुन्या मताच्या लोकांचा आग्रह होता. परंतु पौनर्भव ह्या शब्दाचा अर्थ सदरील जुन्या मताप्रमाणें करणारा टीकाकार नंदन हा एकटाच आहे. शिवाय असा अर्थ केला असतां अक्षतयोनि विधवांस संस्कारयुक्त लग्न करण्याविषयीं जी परवानगी दिली आहे, ती देण्यांत कांहींच तात्पर्य राहत नाहीं, ह्मणजे ती दिली आणि न दिली सारखीच होते. माझें मत असें आहे कीं, पौनर्भव ह्या शब्दाचा प्रथमदर्शनीं जो अर्थ दिसतो, त्याहून खरा अर्थ निराळा आहे. शातातप आणि वशिष्ट ह्यांनीं अक्षतविधवाविवाहास परवानगी दिली आहे, त्यांत हा शब्द योजिलेला नाहीं, इतकेंच नाहीं, परंतु शातातपाचे शब्द तर " पौनर्भवेन," ह्या शब्दाच्या बाह्यात्कारीं दिसणाऱ्या अर्थाच्या अगदीं उलट आहेत.

**कुलशीलवते दद्यादिति शातातपोऽब्रवीत् ।**

अर्थ–अशी अक्षता कुलशीलवानास द्यावी. पौनर्भवास द्यावी असेंच ह्मटलें तर पौनर्भव कुलवान् नव्हे* तेव्हां

---

*कुविवाहैः क्रियालोपैर्वेदानध्ययनेन च ।
कुलान्यकुलतां यान्ति ब्राह्मणातिक्रमेण च ॥

एकवाक्यतेकरितां पौनर्भव ह्या मनूच्या शब्दाचा निराळा अर्थ केल्यांवाचून गत्यंतर नाहीं. विधवा क्षतयोनि असो कीं अक्षता असो, पुनर्विवाहानंतर तिला पुनर्भू असें स्मृतींनीं ह्मटलें आहे. उदाहरण

याज्ञवल्क्यः—

**अक्षता च क्षता चैव पुनर्भूः संस्कृता पुनः ॥**

मंनूनें पौनर्भव शब्दानें तेंच व्यक्त केलें आहे, असें मला वाटतें. पुनर्भूसंबधी "पौनर्भवः" तेन भर्त्रा असा अर्थ केल्यास एकवाक्यता चांगली होईल. सर्वज्ञनारायणही ह्या अर्थास अनुकूल आहे.—

**पौनर्भवेन यं गत्वा विश्रान्ता तेन एतेन या क्षतयोनिः पुनर्भूर्न संस्कारार्हेत्युक्तम् । पुनर्भूत्वं तु उभयथापि—**

**अर्थ—**"पौनर्भवेन ह्मणजे ज्याचा तिनें (विधवेनें) आश्रय केला तो. क्षतयोनि अथवा अकन्या ह्या संस्कारास पात्र नाहींत असें यावरून दर्शविलें आहे. तथापि पुनर्भू ही संज्ञा क्षतयोनि व अक्षतयोनि ह्या दोन्ही प्रकारच्या विधवांस प्राप्त होते." कुल्लूक, रामचंद्र, आणि राघवानंद हे ह्याविषयीं कांहींच लिहीत नाहींत, व मेधातिथीची टीका नष्ट झाली आहे किंवा दुसऱ्या कारणांनीं आढळत नाहीं, ही खेदाची गोष्ट वर नमूद झालीच आहे. असो.

सर्वज्ञनारायणानें सुचविल्याप्रमाणें पौनर्भव ह्याचा अर्थ पुनर्भूसंबंधी असा गृहीत घेतला असतां एक पक्षीं पौनर्भवेन

भर्त्रा ह्मणणारा मनु आणी कुलशीलवानास अक्षता विधवा द्यावी असें ह्मणणारा शातातप ह्यांची एकवाक्यता होते. तसेंच अक्षतयोनीसही पुनर्भू ह्मणणारे याज्ञवल्क्य आणि विष्णु ह्यांची व मनूची दुसरे पक्षीं एकवाक्यता होते. अक्षतयोनि विधवेस जरी पुनर्भू ह्मटलें आहे, तरी तिची स्थिति वेदोक्त संस्कारानें लग्न होण्यास अपात्र अशा खऱ्या पुनर्भूहून निराळी आहे. तसेंच 'अक्षतायां क्षतायां वा जातः पौनर्भवः स्मृतः' या वाक्यावरून अक्षतेच्या पुत्राला जरी पौनर्भव ह्मटलें तरी त्याची स्थिति खऱ्या पौनर्भवाहून निराळी आहे, असें याज्ञवल्क्य आणि विष्णु ह्यांनीं पुनर्भूच्या अक्षता आणि क्षता अशा केलेल्या दोन वर्गावरून स्पष्ट दिसतें, कारण असा फरक नसेल तर दोन वर्ग पाडण्यांत हेतु कांहींच उरत नाहीं. ह्यावरून असें स्पष्ट दिसतें कीं, अक्षता विधवा ही नांवाची मात्र पुनर्भू आहे. नारदानें असेंच ह्मटलें आहेः—

**कन्यैवाक्षतयोनिर्या पाणिग्रहणदूषिता ।**
**पुनर्भूः प्रथमा नाम पुनः संस्कारकर्मणा ।।**

**अर्थः**—जी खरोखर कन्या ह्मणजे अक्षता असून एकदा विवाह झाल्यामुळें मात्र दूषित झाली आहे तिला, तिचा पुनर्विवाह झाला इतक्या कारणाकरितां प्रथम पुनर्भू ह्मणावें. अर्थातच ह्या नामधारी पुनर्भूच्या पुत्रास पौनर्भव जरी संज्ञा आली, तरी त्याचे ठिकाणीं पौनर्भवाचे दोष नाहींत. त्यास औरस मानिलें पाहिजे, खऱ्या औरसाची व्याख्या अशा पुत्रास पूर्णपणें लागू होते व खऱ्या पौनर्भवाचे व्याख्येस असे

पुत्र अपवादक आहेत, वगैरे दुसऱ्या तऱ्हेनें हाच मुद्दा सिद्ध करणारीं प्रमाणें पूर्वीं दिलींच आहेत.

आतां बौधायनाचें एक लांबलचक वाक्य अक्षताविवाहाच्या विरुद्ध दिसतें त्याचा विचार करूं.

**वाचादत्ता, मनोदत्ता, अग्निं परिगता, सप्तमपदं नीता, भुक्ता, गृहीतगर्भा, प्रसूता चेति सप्तविधा पुनर्भूः तां गृहीत्वा न प्रजां न धर्मं विंदेत ।**

ह्या बौधायनाच्या वचनाला कांहींच मर्यादा नाहीं, असें धरून जर चाललें तर वाचादत्ता, मनोदत्ता, अग्निपरिगता या तिघांचें दुसऱ्याशीं लग्न होऊं शकत नाहीं, असें ठरतें, आणि व्यवहारांत तर ह्याच्या विरुद्ध प्रकार आपण पाहतों आणि तो सशास्त्र मानितों. त्यास बौधायनवाक्याची हरकत कधींच कोणी घेत नाहींत! तसेच संस्कारमयूखांतही त्याच्या उलट ह्मटलें आहेः सप्तपद्याः प्राङ्मरणे न वैधव्यम् । सारांश, बौधायनाची, आणि दत्तामपि हरेत्पूर्वं श्रेयांश्चद्वर आव्रजेत् । (याज्ञवल्क्य.) तेषां निष्ठा तु विज्ञेया विद्वाद्भिः सप्तमे पदे। (मनु) इत्यादि वचनांवरून वाचादत्ता, मनोदत्ता, अग्निपरिगता ह्यांचीं लग्नें सशास्त्र ह्मणणाऱ्या अनेक स्मृतिकारांची एकवाक्यता करण्याकरितां बौधायनवाक्यास मर्यादा करणें अवश्य आहे. आतां इतर स्मृतिकारांचे स्पष्ट आधार असल्यामुळें वाचादत्ता, मनोदत्ता, अग्निपरिगता ह्या तिहींच्या पुनर्विवाहास जर बौधायनाचा नियम आड येत नाहीं, तर सप्तप-

दंनीयता ह्या चौथ्या वर्गांतील स्त्री अक्षता असल्यास तिच्या विवाहाच्या आड त्यानें काय ह्मणून यावें ? कारण जरी ती सप्तमपदंनीता असली तरी तिचें अक्षतात्व कायम आहे व “ सा चेदक्षतयोनिः स्यात्पुनः संस्कारमर्हति ” ह्या मनूच्या वचनावरून तिचा विवाह पूर्णपणें धर्म्य मानण्यास स्पष्ट आधार आहे. बौधायनाची इतर स्मृतिकारांशीं एकवाक्यता करण्याकरितां त्याचें वचन मुख्यतः क्षतयोनि, भुक्ता वगैरेस मात्र उद्देशून आहे; बाकीच्या संबंधें केवळ गौणत्वप्रदर्शक आहे अशी मर्यादा केल्यास चालेल. ह्या मर्यादेचें गमक खुद्द त्याच्याच ग्रंथावरूनही दिसतें. कारण अक्षता विधवांचे विवाह पूर्ण संस्कारानें होतात असें त्यानें स्वतःच सांगितलें आहे.

**सा चेदक्षतयोनिः स्याद्गतप्रत्यागता सती ।**
**पौनर्भवेन विधिना पुनः संस्कारमर्हति * ॥**

वृत्तिकारांनीं बौधायनाच्या वाक्यास उद्देशून एक उत्कृष्ट लेख लिहिला आहे, त्याचा उतारा घेण्यासारखा आहे:—

**वाचादत्ता, मनोदत्ता, एकेन सह अग्निं परिगता इति त्रिविधाः पुनर्भ्वः संस्कारयोग्या भवंति । ताः परं धर्मपत्न्य एव स्युः । तासां पुत्रा औरसाः एव । तासां पुनर्भूत्वं चौपचारिकम् आपदि ग्राह्यं दुष्यं न भवति ।**

---

* ह्मणजे पौनर्भवेन भर्त्रा विधिना संस्कारमर्हति । कारण पौनर्भवविधि निराळा नाहींच.

अर्थ—ज्या मुलीचें वाग्दान झालें आहे, किंवा जी मनानें अर्पण केली आहे, जिनें विवाहहोमाग्नीस प्रदक्षिणा घातली आहे, अशा ह्या तीन प्रकारच्या पुनर्भू पुनः संस्का- रयुक्त विवाहास पात्र आहेत. अर्थात्च त्या धर्मपत्नी होतात; त्यांची संतति औरस आहे; त्यांस पुनर्भू ही संज्ञा केवळ उपचाराची आहे. त्यांचें पुनर्भत्वदुष्य नाहीं, आपत्तींत ग्राह्य आहे.

जर ह्या तीन प्रकारच्या पुनर्भू संस्कारयोग्य असल्यामुळें नांवानें मात्र पुनर्भू आहेत, तर ' सप्तमंपदंनीता ' ही चौथी पुनर्भू देखील अक्षता असून " संस्कारयोग्य " असल्यामुळें नांवाची मात्र पुनर्भू, परंतु धर्मपत्नी होते व तिची संतति औरस होय असें माझें ह्मणणें आहे. सारांश, ज्या ज्या युक्तींनें व वचनव्यवस्थेनें वर सांगितलेल्या सात पुनर्भूपैकीं पहिल्या तिहींस बौधायनाचे तडाक्यांतून आपण वांचवितों, त्याच युक्तीनें व वचनव्यवस्थेनें अक्षता सप्तमपदं नीता विधवा ही चौथी पुनर्भूही बौधायनाचे यादींतून सुटेल, व क्षतयोनि विधवांच्या असंस्कृत विवाहांत जे दोष उत्पन्न होतात, ते दोष तिच्या पुनर्विवाहांत उत्पन्न होत नाहींत हें ठरणार आहे. असंस्कृतविधवाविवाहांत कोणते दोष उत्पन्न होतात ते वरील वृत्तिकारांच्या वचनांत उत्तम रीतीनें गोवले आहेत, व त्यांचें स्पष्टीकरण या पूर्वीं सविस्तर झालेंच आहे.

अक्षतयोनि विधवांची स्थिति इतर विधवांचे स्थितीहून भिन्न आहे, ह्याचें इतकें लांबलचक विवेचन देण्याचें कारण,

ह्या प्रश्नाची अद्याप पूर्ण रीतीनें वाटाघाट झालेली नाहीं हें होय. पुण्याच्या मोठ्या वादांत देखील एकंदर विधवाविवाहाचे ऐवजीं अक्षतयोनि विधवाविवाहाचा छोटा प्रश्न पुढें आणण्यासारखा असून आणिला गेला नाहीं, याचें सखेदाश्चर्य वाटतें. कारण पाहिजे त्या वयाच्या विधवेचा पुनर्विवाह करावा, हा सुधारकांचा पक्ष धर्मशास्त्ररीत्या दुर्बल असल्यामुळें ज्याप्रमाणें हार जाण्यासारखा होता, त्याप्रमाणेंच अक्षता विधवांच्या विवाहानें त्यांस किंवा त्यांचे संततीस कांहीं कमीपणा येत नाहीं, हेंही जुन्या मताच्या लोकांस कबूल करणें भाग पाडितां आलें असतें. किंबहुना अलीकडील निबंधकारांपूर्वी मी ह्मणतों असेंच लोकांचें मत असे, व त्यांच्या चालीही त्यास अनुसरून होत्या यांत संशय नाहीं. हिरण्यकेशी आणि दुसऱ्या यजुःशाखीय लोकांत लग्नसोहळ्यांत वरास चतुर्थीकर्म ह्मणजे चवथ्या दिवशीं वधूशीं गमन करावें लागत असे. हें कर्म करण्याचें कारण हिरण्यकेशी सूत्राचा टीकाकार हरदत्त ह्यानें ह्याप्रमाणें सांगितलें आहेः—

> क्षतयोनिर्ह्यन्ततस्वीकृता भवति। अक्षतयोन्यः पत्युर्मरणोत्तरकाले पुनः संस्कृत्य परिणेतव्या इति स्मरणात् ॥

अर्थ—"चतुर्थीकर्म अशासाठीं करावयाचें कीं तें झालें ह्मणजे नवऱ्यानें ती वधू पूर्णपणें स्वीकारिली असें होतें; ( नाहीं तर ) अक्षता स्त्रीचा पतिमरणोत्तर संस्कारयुक्त विवाह व्हावा, असा स्मृत्युक्त नियम आहे."

यापेक्षां अधिक स्पष्ट वचन काय पाहिजे? हें वचन स्मृतींच्या खऱ्या अभिप्रायाचें अनुवादक आहे. खरी शास्त्राज्ञा न्याययुक्त व दयायुक्त असावी, असें जर आहे, तर वरील वचन खऱ्या शास्त्राज्ञेचेंच दर्शक आहे, यांत संशय नाहीं. असो.

आतां सुधारकांच्या मताचा आधारस्तंभ आणि पुण्याच्या शास्त्रीय वादाचें मूळ अशा खालीं दिलेल्या प्रख्यात श्लोकाचा आपण विचार करूं.

नष्टे मृते प्रव्राजिते क्लीबे च पतिते पतौ ।
पंचस्वापत्सु नारीणां पतिरन्यो विधीयते ॥

हा श्लोक हल्लीं मनूंत सांपडत नाहीं, तरी निबंधकारांनीं तो मनूचा ह्मणून पठण केलेला आहे. तसेंच पाराशर आणि नारद स्मृतींतही तो सांपडतो, व नारदस्मृति मनूचें संक्षिप्त रूप आहे, असें नारदानेंच ह्मटलें आहे. ह्या श्लोकास फारसें महत्व द्यावें असें मला वाटत नाहीं. ही पुनर्विवाह करण्याविषयींची सामान्य परवानगी आहे, असें जरी आपण मानिलें तरी संस्कारयुक्त विवाह करण्याचा हक्क अक्षतयोनि विधवांखेरीज इतर विधवांस शास्त्रांत नसल्यामुळें समाजदृष्ट्या ह्या परवानगीचा कांहीं उपयोग नाहीं; व क्षतयोनि विधवांचा विवाह संस्कारयुक्त होऊं शकत नाहीं ही गोष्ट कबूल झाली ह्मणजे धर्माचरणासंबंधानें हा विवाह अशास्त्र ठरतो; निदान जुन्या मताच्या लोकांची तरी तशी खात्री होते. तथापि ह्या लेखाची पूर्णता व्हावी ह्मणून अनेक विद्वानांनीं त्यावर केलेल्या कोट्यांविषयीं थोडेंसें लिहिलें पाहिजे.

ह्या श्लोकाचा प्रथम दर्शनीं जो अर्थ दिसतो, तो खरा नव्हे, असें मि० खरे ह्यांनींही कबूल केलें आहे. खुद्द मनूंतील* आणि नारदांतील+ कांहीं श्लोकांवरून वरील श्लोकाचा भासमान अर्थ खरा नाहीं हें मत गृहीत धरावें लागतें. शिवाय त्या अर्थाच्या उलट असे इतर स्मृतींत पुष्कळ श्लोक आहेत. या विरोधाचे परिहारार्थ मेधातितीपासून अनेकांनीं ह्या श्लोकाचे अनेक अर्थ सुचविले आहेत, परंतु त्या प्रत्येकांत कांहींना कांहीं दोष आहेतच. कित्येकांचे मतें ह्या श्लोकानें दिलेली परवानगी नियोगास उद्देशून आहे. परंतु पाराशर आणि नारद स्मृतींतील ह्याचा पूर्वापर संदर्भ ह्या कल्पनेशीं जुळत नाहीं. दुसऱ्या कित्येकांचे मतें " पति " ह्याचा अर्थ पालक असा आहे. कारण पति ह्मणजे नवरा असा अर्थ घेतल्यास त्याचें पतौ हें रूप व्याकरणरीत्या चुकीचें होणार, तें पालक असा अर्थ घेतल्यास बरोबर होईल. परंतु ह्याही अर्थांत स्वारस्य नाहीं; कारण नवरा क्लीब असला अथवा विधवेस पुत्र किंवा दीर असला तर दुसरा पालक पाहण्याची तिला जरूर

---

* मनु:—न विवाहविधावुक्तं विधवावेदनं क्वचित्
पाणिग्रहाणिका मंत्राः कन्यास्वेव प्रतिष्ठिताः ॥ नाकन्यास ।
न द्वितीयश्च साध्वीनां क्वचिद्भर्तोपदिश्यते ।
यस्या म्रियेत कन्याया वाचा सत्ये कृते पतिः ।
सा चेदक्षतयोनिः स्यात्पुनः संस्कारमर्हति ।

+नारद:—उद्वाहितापि सा कन्या न चेत्संप्राप्तमैथुना ।
पुनः संस्कारमर्हेत यथा कन्या तथैव सा ।

नाहीं. शिवाय " पिता रक्षति कौमारे " इ० श्लोकाप्रमाणें दुसरा कोणी पालक नसल्यास राजा पालक होतो, ह्यामुळें पालक नाहीं अशी वेळच संभवत नाहीं माधव ह्मणतो कीं हा श्लोक इतर युगांस लागू होता, कलियुगास नाहीं. पण पराशर स्मृति मुळींच कलियुगास उद्देशून आहे. तेव्हां पूर्वीच्या युगास लागू असून कलियुगास लागू नसलेलें वचन त्यांत देण्यांत स्वारस्य काय ? कित्येकांचे मतानें त्यांतील अपतौ असें पद तोडून त्याचा अर्थ वाग्दत्ता पति, असा करावा. परंतु, वाग्दान झाल्यावर कोणतेंही वैगुण्य उत्पन्न झालें तरी ती कन्या दुसऱ्यास देतां येते, असें वर दाखविलेंच आहे. मग ह्या पांच गोष्टी झाल्यास मात्र वाग्दत्ता कन्या दुसऱ्यास द्यावी असें सांगण्यांत मतलब दिसत नाहीं. शिवाय " श्रेयांश्चेद्वर आव्रजेत् " हें याच्या अगदीं उलट आहे. मि. खरे यांनीं हा श्लोक अखेरीस अक्षतयोनींस मात्र लागू केला आहे, व ही मर्यादा सयुक्तिक व न्याय्य दिसते; परंतु ह्या अर्थानें, नवरा जीवंत असून जर प्रव्रजित अथवा क्लीब होईल तर त्याच्या अक्षता स्त्रीनें संस्कारयुक्त पुनर्विवाह करावा कीं काय ही शंका येते. जर करावा असें ह्मटलें तर, निदान हल्लींची रीति अशी नाहीं व त्यास एकाद्या ग्रंथाचा किंवा वचनाचा आधारही नाहीं.

मला वाटतें शास्त्रकारांनीं पुनर्विवाहाचे दोन प्रकार मानिले आहेत. एक धार्मिक ह्मणजे संस्कारयुक्त आणि दुसरा केवळ व्यवहारोपयुक्त. ज्या क्षतयोनि विधवांस धर्माचरण करून आपलें आयुष्य काढण्या इतका मनोनिग्रह

नाहीं, व संस्काररहित केलेल्या विवाहाचे परिणाम भोगण्यास ज्या तयार आहेत त्यांस मनु, पराशर आणि नारद ह्यांनीं या श्लोकानें एक हीन प्रकारचा विवाह करण्याची परवानगी दिलेली दिसते * उघडपणें दुष्कर्मे करून आयुष्य घालविण्यापेक्षां हा विवाह चांगलाच आहे. शिवाय पुष्कळ प्रकारांनीं ह्याची व्यवहारोपयुक्तता दिसून येते. अशा स्त्रीनें कोणा पुरुषाशीं संबंध नवरा या नात्यानें ठेविला तर तिजवर दोन नवरे केल्याचा अथवा व्यभिचार केल्याचा आरोप यावयाचा तो ह्या विवाहानें येऊं शकत नाहीं. तसेंच अशा लग्नास शास्त्राचा कांहींच आधार नसता तर तें रद्द ठरवून क्लीब नवऱ्याचे कबज्यांत राहण्याची पाळी कित्येकींस आली असती; तसेंच नष्ट झालेल्या नवऱ्यास नियमित काळानंतर देखील बायको ताब्यांत मागतां येत नाहीं, इत्यादि गोष्टी साहजिक ठरतात. नारदांतील वचनसंदर्भावरून मला असें वाटतें कीं अशाच विवाहास त्यानें स्पष्टपणें अनुमोदन दिलें आहे. 'नष्टे मृते ' इत्यादि श्लोक दिल्यानंतर, नष्ट झालेल्या पतीची वाट ब्राह्मणीनें किती मुदतपर्यंत पहावी. इत्यादि त्यानें सांगितलें आहे. " पतौ " ह्या रूपावरूनही अशा अर्थास बळकटी येते. तत्वबोधिनीनें " पतौ" यांतील पतिशब्दाचा अर्थ " पतिरिति आख्यातः पतिः " असा केला आहे. ह्मणजे ज्याला नवरा असें पूर्णपणें,

---

* या श्लोकाचा दुसरा एक सयुक्तिक अर्थ होण्यासारखा आहे त्याचा ऊह शेवटल्या लेखांत केला जाईल.

ह्मणजे धर्म व व्यवहार ह्या दोहोंच्या दृष्टीनें मानितां येत नाहीं, परंतु एकाच ह्मणजे व्यवहारदृष्टया ज्याला पति असें मानिलें आहे असा, एकाच दृष्टीनें मानिलेला नवरा जर नष्ट होईल, मरेल, क्लीब असेल, किंवा संन्यास किंवा प्रव्रज्या ग्रहण करील तर त्याच्या स्त्रीनें त्याच्यासारखा ह्मणजे व्यवहारदृष्टया मानिलेला दुसरा पति करावा. परंतु याहून भिन्न प्रकारच्या आपत्तींत–उदाहरणार्थ नवरा जर आजारी पडला किंवा तिला वाईट रीतीनें वागवूं लागला किंवा त्यानें दुसरें लग्न केलें, किंवा अशाच दुसऱ्या नापसंत गोष्टी करूं लागला तर स्त्रियांस व्यावहारिक पुनर्विवाह करण्याची पराशर व नारद ह्यांची परवानगी नाहीं.

सारांश, कलिवर्ज्य नियम होईपर्यंत शास्त्रमत काय होतें त्याचा गोषवारा येणेंप्रमाणें:—

अक्षतयोनि विधवांस वेदोक्त संस्कारानें विवाह करतां येत असे. तिला जरी पुनर्भू ह्मणत व त्यामुळें पुनर्भू नसणाऱ्या स्त्रियांपेक्षां तिचा मान कमी असे, तरी तिला धर्मपत्नी समजून तिच्या संततीस औरस मानीत. क्षतयोनि विधवांस धर्माचरणानें राहण्याइतका मनोनिग्रह नसल्यास त्यांस वर सांगितलेला व्यवहारोपयुक्त विवाह करण्याची परवानगी असे. एका पक्षीं ती धर्मपत्नी नसे; तिला पतीबरोबर धर्माचरण करण्याचा अधिकार नसे; तिच्या संततीस पौनर्भव ही संज्ञा असून त्यांचा हक्क, औरस ह्मणजे योग्य प्रकारानें झालेल्या लग्नसंततीचे हक्काहून कमी असे; शिवाय त्यांस हीनजाति समजत, ह्मणजे आईबापांच्या

जातींइतकी त्यांची जात शुद्ध मानली जात नसे; तरी दुसऱ्या पक्षीं क्षतयोनि स्त्रीनें "नष्टे मृते इ०" श्लोकांत सांगितलेल्या आपत्तींत पुनर्विवाह केल्यास तो कायदेशीर समजत, ह्यामुळें दुसरा नवरा करण्याच्या अथवा त्याच्याशीं व्यभिचार केल्याच्या अपराधास ती पात्र नसे; तसेंच पहिल्या नवऱ्यास अथवा त्याच्या आप्तांस तिला ताब्यांत घेण्याची फिर्याद करतां येत नसे; तिची संतति दासीपुत्र ह्मणजे व्यभिचारोत्पन्न समजत नसत, इतकेंच नाहीं, तर नवऱ्यास औरस संतति नसल्यास त्याचा दाय घेण्याचा हक्क ह्या पौनर्भवास असे.

वरील दिलेल्या शास्त्रनिर्णयावरून क्षतयोनिविधवाविवाह धर्मदृष्ट्या निंद्य मानिला जातो, हें तर उघड आहे, ह्मणून निदान द्विजस्त्रियांनीं तरी तो न करितां, आपलें आयुष्य धर्माचरणानें ब्रह्मचर्यांत घालवावें हें इष्ट दिसतें. शिवाय अशा प्रकारच्या विवाहापासून झालेली संतति शुद्ध मानीत नाहींत.

**अनिन्दितैः स्त्रीविवाहैरनिंद्या भवति प्रजा ।**
**निन्दितैर्निंदिता नृणां तस्मान्निंद्यान्विवर्जयेत् ।** मनु.

पण अक्षतयोनिपुनर्विवाहाची गोष्ट याहून उलट आहे. अशा विधवांचा विवाह खात्रीनें निंद्य नाहीं. त्यांचे विवाह संस्कारयुक्त होण्याची परवानगी असून ते इष्ट मानिले जात, असें हरदत्ताच्या "परिणेतव्या" ह्या शब्दावरून स्पष्ट झालेंच आहे. आतां शेवटीं कलिवर्ज्याचा विचार केला म्हणजे झालें. ह्यासंबंधीं अनेक श्लोक आहेत. हीं

कलिवर्ज्य प्रकरणें एकत्र जमवून पुष्कळ निबंधकारांनीं त्यांची वाटाघाट केली आहे व इतर ग्रंथांतही त्यांजविषयीं उल्लेख आहेत. अक्षतयोनिविधवाविवाहाचा निषेध खालीं दिलेल्या कलिवर्ज्य श्लोकानें केला आहे, असें मला वाटतें.

हेमाद्रौ माधवीये –**विधवायां प्रजोत्पत्तौ देवरस्य नियोजनम् । बालिकाक्षतयोन्याश्च वरेणान्येन संस्कृतिः॥**

हेमाद्रिः–**दत्तायाश्चैव कन्यायाः पुनर्दानं परस्य च ।**

क्रतुः–**देवरेण सुतोत्पत्तिर्दत्ता कन्या न दीयते ।**

आदित्यपुराण–**ऊढायाः पुनरुद्वाहं ज्येष्ठांशं गोवधं तथा । कलौ पंच न कुर्वीत भ्रातृजायां कमण्डलुम् ॥**

ह्याप्रमाणें हे सर्व श्लोक अक्षतयोनिपुनरुद्वाहाचे विरुद्ध आहेत मि० खरे ह्यांनीं यांतील पहिला श्लोक चुकीनें बालायाः क्षतयोन्यास्तु असा पठण केला आहे. परंतु क्षतयोनींचा दुसऱ्या नवऱ्याशीं संस्कृत विवाह होतच नसल्यामुळें मि० खरे ह्यांच्या मताप्रमाणें पाठ मानल्यास श्लोक अर्थरहित होतो; आणि "तु" ह्याचाही उपयोग नाहींसा होतो. तसेंच दुसऱ्या श्लोकांतील "कन्या" शब्दाचा अर्थही अक्षतयोनि असाच आहे. स्मृतींत कन्येचा अर्थ बहुतकरून पुरुषांशीं संबंध न झालेली मुलगी असा असतो. ऊढा हा शब्द सामान्य आहे व त्याच्या योगानें अक्षतयोनि व क्षतयोनि या दोन्ही प्रकारच्या विधवांच्या विवाहाचा निषेध केला आहे असा अर्थ संभवतो. परंतु एकवाक्यते-

करितां ह्याही शब्दाचा अर्थ इतर श्लोकांतील शब्दांप्रमाणेंच मीं घेतला आहे.

मागील युगांत निंद्य मानिलेल्या क्षतयोनिविवाहाचा ह्या युगांत निषेध झाला, ह्यांत विशेष तें काय, अशी मि० खरे ह्यांस जी अडचण वाटत होती, ती याप्रमाणें नाहींशी होते आणि शास्त्रानें खरोखर इष्ट मानिलेले अक्षतयोनिपुनर्विवाह कलिवर्ज्यांनीं बंद केले असें दिसून येते. धर्माचरण करण्यास अयोग्य, परंतु 'नष्टे मृते' इत्यादि वरील प्रख्यात श्लोकानें अनुमत झालेला व्यावहारिक पुनर्विवाह, दुसऱ्या एका कलिवर्ज्य श्लोकानें बंद केलेला दिसतो, तो असाः—

**दत्तौरसेतरणां च पुत्रत्वेन परिग्रहः ।**

व्यावहारिक विवाहापासून झालेल्या संततीस पौनर्भव ही संज्ञा असून तीस कायदेशीर समजत; आणि बापास औरस संतति नसल्यास त्याच्या मिळकतीवर ह्यांचा वारसा असे; परंतु वरील वाक्यानें पौनर्भवांस इतउत्तर पुत्रांत गणूं नये असें ठरविलें. कलियुगांत विधवाविवाह अशास्त्र असून त्यांची संतति दासीपुत्राप्रमाणें आहे, असें जें कोलब्रूक वगैरेंचें मत होतें, तें सदरील दिलेल्या निषेधक श्लोकावरूनच झालें असावें.

कलिवर्ज्य प्रकरणांनीं निषेध केलेला असा हा अक्षतयोनिपुनरुद्वाह धर्मनिष्ठ लोकांच्या मतें सशास्त्र ठरविणें असेल तर समाजाच्या धर्मगुरूंनीं किंवा समाजाग्रणींनीं त्याची परवानगी देणें हा एकच मार्ग दिसतो. कलिवर्ज्य हे एका प्रकारच्या चालीनें गृहीत केलेले मानवी नियम

आहेत; ते श्रुतिस्मृतींप्रमाणें ईश्वरप्रणीत नसल्यामुळें अविभेद्य अथवा न बदलण्यासारखे आहेत असें नाहीं. श्रुतिस्मृतींसारख्या अपौरुष ग्रंथांनीं अक्षतयोनिविधवाविवाह संस्कारयुक्त होण्याची परवानगी दिली असून ती कलियुगाच्या आरंभीं समाजाग्रणींनीं खरी, तरी पण मनुष्यांनींच, बंद केली आहे. कारण,

एतानि लोकगुप्त्यर्थं कलेरादौ महर्षिभिः ।
निवार्तितानि कर्माणि व्यवस्थापूर्वकं बुधैः ॥

अशी कलिवर्ज्यांची उत्पत्ति सांगितली आहे. आतां हे कलिवर्ज्य नियम करण्याचा उद्देश लोकगुप्ति ह्मणजे लोकसंरक्षण व्हावें हा असून तें जर होत नाहीं ( याचा विचार पुढील लेखांत केला आहे ) तर श्रीशंकराचार्य आणि दुसऱ्या विद्वानांस ह्या निषेधाचा निषेध करून ईश्वरप्रणीत असा पूर्वीचा नियम अंमलांत आणण्यास काय हरकत आहे ? अग्निहोत्र आणि संन्यास हीं देखील कलिवर्ज्य असून जशीं सुरू केलीं गेलीं आहेत, तसेच अक्षतयोनिपुनर्विवाह वैदिक धर्म चालत असेपर्यंत रूढ करावयास हरकत नाहीं.

कलिवर्ज्यांच्या योगानें अक्षतयोनिविधवांचा संस्कारयुक्त विवाह होण्याची जशी बंदी झाली, तशीच क्षतयोनि विधवांचे व्यावहारिक विवाह अथवा पाट होण्याची ही बंदी झाली होती; परंतु व्यवहाराधिकृतांनीं विधवाविवाहाच्या कायद्यानें क्षतयोनि विधवांविषयीं दयाभूत होऊन त्यांची लग्नें आणि त्यांची संतति व्यवहारदृष्ट्या कायदेशीर आहे

असें ठरविलें आहे. त्याप्रमाणेंच धर्माधिकृतांनीं अक्षतयोनि विधवांवर दया करून त्यांचे विवाह धर्म्य ठरविणें फार अगत्याचें आहे. परंतु कलिवर्ज्य प्रकरणें रद्द होऊन तशी परवानगी मिळेपर्यंत अक्षतयोनि विधवांचे देखील विवाह शास्त्रबाह्य व अधर्म्य आहेत असेंच म्हटलें पाहिजे. क्षतयोनींचे विवाह धर्मकृत्यांच्या संबंधानें सर्व युगांत श्रुतिस्मृतींनीं निरुपयुक्त गणिले आहेत, ही गोष्ट धर्मशास्त्रवचनांवरून दुर्दैवानें कबूल करावी लागते, त्यास नाइलाज आहे.

---

## ( २ ) इतिहास व गुणदोष.

### इतिहास.

कोणत्याही सामाजिक संस्थेचा इतिहास जात्याच मनोरंजक असला पाहिजे, त्याप्रमाणें विधवोद्वाहाचे निषेधाचाही इतिहास मनोरंजक आहे. याशिवाय हा इतिहास अनेक तऱ्हेनें उपयुक्तही आहे. प्रथम गोष्ट अशी कीं, विधवाविवांहाविषयींच्या शास्त्रार्थाचें मागील भागांत जें विवेचन केलें आहे, त्याची सत्यासत्यता ऐतिहासिक रीत्याही पाहतां येईल. तसेंच धार्मिकबुद्धिव्यतिरिक्त इतर दृष्टीनें धर्मशास्त्रग्रंथांचा विचार केला असतां एकाद्या ग्रंथांत एखादें वचन मागून घातलें असावें, असें ऐतिहासिक अनुमानानें बरेंच खात्रीनें सांगतां येतें. तेव्हां अशा वचनांचा समावेश या शास्त्रार्थांत कितपत आहे हें पाहतां येईल. दुसरें—कित्येक लोक पुरातन चालीस सोडून जात नाहींत; व अशी पुराणधर्मभक्ति असणें हें समाजस्थैर्याचें साधन आहे, इतकेंच नव्हे,

तर एक प्रकारचा स्वजात्यभिमानही त्यांत व्यक्त होतो. तेव्हां अशा लोकांकरितांही विधवोद्वाहनिषेधाचा खरोखर इतिहास कसा आहे, हें पाहणें उपयुक्त आहे. तिसरें—प्रसिद्ध तत्ववेत्ता कॉम्ट याच्या पॉझिटिव्ह फिलॉसफीचें तत्व व एकाद्या समाजसंस्थेचें ऐतिहासिक परीक्षण पुष्कळ मिळतें आहे. कारण पुढें काय केलें पाहिजे व काय होणें शक्य आहे हें जाणण्यास आजपर्यंतचा आपला इतिहास कसा आहे, हें समजणें आवश्यक आहे. आजपर्यंत लोकांचे मनास व प्रगतीस काय खिळून गेलें आहे हें पाहिल्यानें आजपर्यंतच्या कल्पनांस एकदम धक्का न देतां कोणती सुधारणा करणें शक्य आहे, हें समजण्यास ठीक पडतें. चवथें—प्राचीन काळापासून चालत आलेले सांप्रदाय उत्पन्न होण्याचें व प्रचारांत येण्याचें कारण त्या चालींपासून समाजास फायदाच झाला असावा हें आहे. विवाहनिर्बंधादिचालींचें बीज त्यांच्या उपयुक्ततेंतच आहे. एकाद्या मतप्राबल्यामुळें प्रचलित झालेल्या चालींशिवाय बहुतेक चाली अशाच कारणांनीं रूढ झाल्या आहेत. सारांश, इतिहास ह्मणजे निरनिराळ्या चालींच्या उपयुक्ततेसंबंधानें प्रत्यक्ष घेतलेले अनुभवच होत. असो. याप्रमाणें अनेक तऱ्हेनें विधवाविवाहनिषेधाचा इतिहास समजून घेण्यासारखा आहे.

क्षतयोनिविवाह जरी शास्त्रसंमत नाहीं, तरी बालविधवांचे पुनर्विवाह शास्त्रदुष्ट नसून त्यांस किंवा त्यांचे प्रजेस धर्मदृष्ट्या न्यूनत्व नाहीं, हा जो सिद्धांत मागील भागांत

शास्त्रीयरीत्यां स्थापित झाला, त्याचेंच दृढीकरण विधवोद्वाह निषेधाच्या इतिहासावरून होतें.

पतिसंभोग झाल्यानंतर विधवा झालेल्या स्त्रीचा पुनर्विवाह करूं नये ही बंदी हिंदुस्थानांत फार प्राचीन काळापासून आहे, असें वाटतें. हिंदुस्थानच्या प्राचीन इतिहासाचीं साधनें फार दुर्मिळ आहेत, ही गोष्ट खरी आहे; तथापि या विषयासंबंधानें एक दोन आधार असे सांपडतात कीं, त्यांवरून ह्याविषयीं ऐतिहासिक सिद्धांत निश्चित करतां येतो; व ते आधार परकीय लोकांच्या लेखांत असल्यामुळें त्यांच्या खरेपणाबद्दल कोणत्याही प्रकारची शंका उत्पन्न होत नाहीं. प्रख्यात चिनी प्रवासी हुएनसंग इसवी सनाच्या सातव्या शतकांत हिंदुस्थान पाहण्यास आला व येथें २९ वर्षें राहिला होता. तो असें लिहितो:—"हिंदुलोकांत स्त्रियांचें लग्न एकदांच होतें, पुनः होत नाहीं." ह्यावरून ही चाल हुएनसंग हिंदुस्थानांत येण्यापूर्वी पुष्कळ वर्षांपासून चालू असली पाहिजे. दुसरें—बौद्धधर्म सुरू होऊन त्याची भरभराट होईपर्यंतच्या शेंकडों वर्षांत ही चाल, ह्मणजे हा निषेध, अमलांत होता असें त्या धर्मांतील ग्रंथांवरून दिसतें. हे ग्रंथ मीं जितके वाचिले आहेत, तितक्यांत तरी निदान पुनर्विवाहित विधवा हा शब्द किंवा तिला उद्देशून एखादा लेख मला आढळला नाहीं. आतां बौद्ध लेखांत पुनर्विवाहितेच्या उल्लेखाचा अभाव असणें हा जरी प्रत्यक्ष पुरावा नाहीं, तरी तो पुष्कळ महत्वाचा आहे. व हुएनसंगनें विधवाविवाहनिषेधाचा जो प्रत्यक्ष उल्लेख केला आहे, त्याचा ह्याशीं मेळ घालितां

ही चाल निदान दोन हजार वर्षांपूर्वींची आहे असें सिद्ध होतें. वरील सिद्धांताविरुद्ध पुष्कळ विद्वानांचीं मतें दृष्टीस पडतात, परंतु तीं चांगलीं साधार आहेत असें वाटत नाहीं. बालविवाह आणि असंमत वैधव्य हीं एकाच कारणांनीं व बहुतेक एकाच काळीं हिंदु समाजांत शिरलीं असावीं, असें कित्येकांचें मत आहे. परंतु या मतास इतिहासावरून पुरावा मिळत नाहीं. बालविवाह फार अलीकडे ह्मणजे हुएनसंगच्या हिंदुस्थानांतील सफरीनंतर पुष्कळ वर्षांनीं सुरू झाले, व असमंत वैधव्य अथवा क्षतयोनिपुनर्विवाह-निषेध फार दिवसांपूर्वीपासून ह्मणजे हुएनसंगाच्या सफरीपूर्वींच पूर्ण अंमलांत होता, असें हिंदुस्थानच्या इतिहासावरून स्पष्ट दिसून येतें. बालविवाहाची पद्धत जुनी नसल्याविषयीं ह्या मालेच्या तिसऱ्या अंकांत अनेक कारणें दाखविलीं आहेत. तो अंक प्रसिद्ध झाल्यानंतर ह्या गर्ह्य चालीच्या प्राचीनत्वाविषयीं जे अनेक वादविवाद झाले त्यांत या मताविरुद्ध दोन मुद्दे नवीन काढलेले आढळतात. पहिला मुद्दा असाः—गोभिल गृह्यसूत्रांत "नग्निका तु श्रेष्ठा" असें लिहिलें आहे, ह्यावरून बालविवाहाचा सांप्रदाय सूत्रकालाच्या अखेरीस सुरू झाला असावा, असें विरुद्ध पक्षाचें मत आहे. परंतु सदरील सूत्राचा असा अर्थ करणें चुकीचें आहे. गोभिल सूत्रांत लग्नसंबंधाचा जो भाग अथवा प्रपाठक आहे, त्यांत मुलीचें वय अमुक असावें अशी मर्यादा सांगितलेली नाहीं. वरील 'नग्निका तु श्रेष्ठा' हें वाक्य त्या भागांत नसून ज्या भागांत ब्रह्मचारी विद्यार्थ्यांचीं कर्तव्यें सांगितलीं आहेत, त्यांत घातलें आहे. ह्याच्यापुढें "अथाप्र-

वनम्" ह्मणजे ह्यानंतर त्यानें स्नान करावें, हें सूत्र आहे. टीकाकारानें "अथ" ह्याचा अर्थ "अथेति वाग्दानानन्तरम् ह्मणजे वाग्दान केल्यानंतर, असा केला आहे. तेव्हां 'नग्निका तु श्रेष्ठा' या वचनाचें खरें रहस्य असें आहे कीं, जो गुरूच्या घरीं विद्याभ्यास करीत आहे अशा विद्यार्थ्यास कन्येचें वाग्दान केल्यास कन्या अनागतार्तवा असल्यास बरें असा ह्या सूत्राचा भावार्थ आहे व ही गोष्ट फारच स्वाभाविक दिसते. कारण कन्येस योग्य असा नवरा मुलगा पाहून ठेवण्याची वहिवाट आपण अद्यापिही पाहतों, तेव्हां अशा सगाईच्या किंवा वाग्दानाच्या वेळीं मुलगी नग्निका असली तर चांगलें जसें जें वरील सूत्रानें सुचविलें आहे तें योग्यच आहे; किंबहुना त्या समयीं ती ऋतु प्राप्त न झालेली ह्मणजे नग्निका असलीच पाहिजे असा कडक नियम नाहीं, तर ऋतुप्राप्ताही चालेल असें होतें, ह्याच गोष्टीवरून बालविवाह व्हावे असा गृह्यसूत्रांचा मुळींच उद्देश नाहीं, ह्या मतास मोठी बळकटी येते.

दुसरा मुद्दा:—माझ्या मतावर आणखी असा आक्षेप आहे कीं मी ह्मणतों त्याप्रमाणें बौद्ध धर्म नष्ट होते वेळीं बालविवाह प्रचारांत आले असें ह्मणावें तर बौद्ध ग्रंथांत बालविवाहाचा उल्लेख केला आहे कीं नाहीं हें दाखवावयास पाहिजे होतें. बालविवाह व असंमत वैधव्य या दोहोंबदलही कांहीं आधार सांपडल्यास पहावा ह्या हेतूनें बौद्ध धर्माचीं व त्यांतल्या दंतकथांचीं कांहीं मुख्य मुख्य पुस्तकें मीं वाचून पाहिलीं. त्यांत बालविवाहाबद्दल कांहीं आढळत नाहीं, इतकेंच नाहीं, तर स्त्रियांचीं लग्नें नेहमीं त्या वयांत आल्यावर होत

असत असें सर्वत्र आढळतें. खालीं दिलेल्या मनोरंजक उताऱ्यावरून हें चांगलें प्रत्ययास येतें:—

विनय भाग १ ला.— " जो मनुष्य विधवांत आणि उपवर झालेल्या मुलींत नित्य मिसळतो त्यास भिक्षूची दीक्षा मिळणार नाहीं. " ह्यावरून त्या काळीं विधवांस पुनर्विवाह करितां येत नसे व मुलींचीं लग्नें उशीरां होत असत, अशीं दोन्ही अनुमानें होतात. तसेंच बुद्धाला बायको करावयाची होती तिजविषयीं, ती सुंदर आणि तरुण अशी पाहिजे, मग ती ब्राह्मणी असो किंवा क्षत्रिय असो, असें त्यानें ह्मटलें आहे ( ललितविस्तार. ) ह्यावरून ब्राह्मणांच्याही मुलींचीं लग्नें त्यांच्या तारुण्यांत होत, असें अनुमान सयुक्तिक वाटतें. बौद्ध लोकांच्या दंतकथांत वर्णिलेल्या सर्व स्त्रियांचीं लग्नें उशीरां झालेलीं आहेत. उत्पलवर्णेच्या गोष्टीवरून तर ह्याचा पुरा निर्णय होतो. ती ब्राह्मणाची मुलगी असून रूपानें फार सुंदर होती; तिच्या बापानें तिला तिच्या सोळाव्या वर्षीं राजास अर्पण केलें. सारांश, बौद्ध धर्मांतील गोष्टींत आणि दंतकथांत तसेंच पुराणांत बालविवाहाचा एकही दाखला नाहीं.

याप्रमाणें बालविवाह व्हावा असा गृह्यसूत्राचा उद्देश नाहीं, तसेंच बौद्ध ग्रंथांत त्याचा कोठें उल्लेख नाहीं; आणि हुएनसंगच्या लेखांतही त्याजबद्दल कांहीं दाखला नाहीं; ह्यावरून बौद्धधर्माचा पाडाव होऊन हिंदुधर्मांत व चालींत जेव्हां अलीकडे फेरफार झाले तेव्हांपासून तो प्रचारांत आला हें खास ठरतें. आतां क्षतयोनिविधवाविवाहनिषेधाची

हकीकत ह्यांच्या अगदीं उलट आहे. असा निषेध असल्या-बद्दल हुएनसंगचा स्पष्ट लेख आहे; बौद्धग्रंथ निदान मीं जितके वाचिले आहेत त्यांत पुनर्विवाहित विधवेचें वर्णन कोठें आढळत नाहीं. क्षतयोनि विधवांच्या विवाहास गृह्य-सूत्रांत कांहीं एक आधार नाहीं. सारांश, बालविवाह हे अगदीं अर्वाचीन आहेत आणि ह्याच्या उलट, क्षतयोनिवि-धवाविवाहनिषेध निदान गृह्यसूत्रांइतका तरी प्राचीन आहे, असें वाटतें.

विधवाविवाहाच्या संबंधाच्या शास्त्रवचनांची जी चर्चा ठिकठिकाणीं होते, त्याचें अपुरें तात्पर्य समजल्यामुळेंही या चालीच्या काळासंबंधानें कित्येकांचीं चुकीचीं मतें झालेलीं आढळतात. एके ठिकाणीं असें लिहिलें आहे कीं, विधवाविवाहनिषेध कलियुगांत वर्ज्य मानिलया कृत्यांपैकीं एक आहे, असें जुन्या मताच्या पुढाऱ्यांनीं कबूल केलें आहे. याचा भावार्थ, पूर्वीच्या युगांत विधवाविवाह शास्त्रसंमत असून तो रूढींत असे व कलियुगांत मात्र बंद झाला, असें दाखविण्याचा दिसतो. मि. खरे ह्यांचें मतही असेंच असल्याचें दिसतें. तथापि वर लिहिल्याप्रमाणें गर्भित अर्थ अथवा अनुमान काढणें चुकीचें आहे; कारण या अनुमानाचा पाया शुद्ध नाहीं. विधवाविवाहाच्या चळवळीचा मूळ उत्पादक पंडित ईश्वरचंद्र विद्यासागर हा देखील सदरील अर्थास प्रतिकूल आहे. हंटरसाहेबांनीं आपल्या " हिंदू बालविधवा " ह्या पुस्तकांत ईश्वरचंद्राच्या मताविषयीं असें लिहिलें आहे:—" पूर्वीच्या युगांत पुनर्विवाहितेपासून झालेल्या पुत्रास दासीपुत्राहून कांहीं कमी इतकी हीनता असे, ही गोष्ट ह्या

बंगाली पंडितानें कबूल केली आहे. " ज्या अर्थी पुनर्विवाहित विधवेस व तिच्या संततीस कलीच्या मागील युगांत नीच मानीत असत, त्या अर्थी विधवाविवाहनिषेध पूर्वीच्याच युगांत ह्मणजे आपल्या देशाच्या इतिहासांतील पूर्ण भरभराटीच्या काळांत प्रचलित होता, असें वरील लेखावरून ओघास येतें.

हा विषय अधिक स्पष्ट करण्याकरितां त्या संबंधानें धर्मशास्त्राचे नियम कसकसे बदलत गेले, हें धर्मशास्त्रवचनांचा ऐतिहासिक दृष्ट्या विचार करून दाखविणें जरूर आहे. अशा प्रकारचा विचार करणें हें सूत्रें, स्मृति, वगैरे ग्रंथ सारखेच पुरातन व पवित्र आहेत असें मानणाऱ्या जुन्या मताच्या लोकांस धर्मबाह्य वाटेल, आणि खरोखर ह्याच कारणाकरितां मागील अंकांत बालविवाहासंबंधानें असा इतिहास देण्याचें मीं टाळलें होतें. तथापि येथें तशी टाळाटाळ केली असतां धर्मशास्त्रग्रंथांचा इतिहासाशीं मेळ घालूं पाहणाऱ्या लोकांची गैरसमजूत व भलत्या कल्पना होण्याचा संभव असल्यामुळें त्या नाहींशा होणें अवश्य आहे. शिवाय आपण परकीय मनुष्य आहों असें कल्पून त्रयस्थ बुद्धीनें ह्या विषयाचा विचार व वाद करण्यास कांहीं हरकत आहे, असें मला वाटत नाहीं.

हिंदुस्थानच्या प्राचीन काळच्या धर्माच्या इतिहासाचे (हा इतिहास राजकीय इतिहासाशीं बहुतेक मिळता आहे) तीन भाग पाडितां येतील. पहिल्या भागाला आर्यकाल असें ह्मणूं; त्यांत फार प्राचीन काळापासून अशोक राजा-

पर्यंतचा काळ येतो. ह्या भागाची अखेर ही होय. दुसऱ्या भागांत अशोकाच्या कारकिदापासून तों चीनचा प्रवासी ह्युएनसंग ह्याच्या इकडील सफरीपर्यंतचा काळ येतो. ह्या भागाच्या अखेरीस बौद्ध धर्माला उतरती कळा लागली; ह्यास आर्यबौद्धकाळ ह्मटलें तरी चालेल, कारण त्या वेळीं हे दोन्ही धर्म एकाच ठिकाणीं व सारख्या मानानें उत्कर्ष पावले असून त्यांत परस्पर वैरभाव नसे. तिसऱ्या भागाला ७ व्या शतकापासून सुरवात होते व तो मुसलमानी राज्य स्थापित होईपर्यंत येऊन पोहोंचतो. ह्या भागाला हिंदु काळ असें ह्मणावें. ह्याचें कारण हल्लीं जो हिंदु धर्म आपण पाळितों, तो त्या वेळीं बनला. या काळाच्या सुरवातीपासून बौद्ध धर्माचें अस्तित्व असह्य वाटूं लागलें व शेवटीं त्याचा पाडाव होऊन तो हिंदुस्थानांतून नाहींसा झाला.

ह्या तीन्ही काळांत हिंदु लोकांची सामाजिक व धार्मिक स्थिति अगदीं निराळी होती. यामुळें हिंदुस्थानांतील पवित्र अथवा ऐहिक पुस्तकांत कालनिर्देश केला नसल्यामुळें तीं अमुक वर्षांपूर्वी झालीं असें जरी निश्चयानें ठरवितां येत नाहीं, तरी युरोपियन विद्वानांच्या मताप्रमाणें तीं वरील तिहींपैकीं कोणत्या तरी एका काळांत झालीं असलीं पाहिजेत असें ठोकळ मानानें ठरवितां येतें. वेद अथवा मंत्र हे ह्यांपैकीं पहिल्या काळांत झाले हें निर्विवाद आहे. तसेंच सूत्रें आणि तत्संबंधीय दुसरे ग्रंथ हेही पहिल्या काळांतच झाले, असें प्राच्य इतिहासज्ञांचें मत आहे, व ते या काळास सूत्र—काळ असेंही ह्मणतात. याच काळांत महा-

भारत झालें, त्यांत वेळोवेळीं फेरफार केले गेले आहेत, तरी तें सर्व निःशंक पहिल्या काळांतलें आहे. स्मृतींपैकीं मनुस्मृति ( अथवा तदाधारभूत मानवसूत्र ) मात्र पहिल्या काळांत झाली असावी असें युरोपियन विद्वानांचें मत पडतें. अखेरीस, बौद्धधर्माच्या आरंभीं झालेल्या विनयादि कांहीं पवित्र ग्रंथांत ह्या काळांत शेवटीं समाज स्थिति कशी होती याचें वर्णन आहे.

मनूशिवाय बाकीच्या सर्व सतरा स्मृति आणि सारीं पुराणें दुसऱ्या काळांतलीं आहेत. मोठमोठे विख्यात कवि ह्या काळांत झाले, व बौद्धधर्मांतील मागाहून झालेल्या कांहीं ग्रंथांचा काळ हाच आहे असा अदमास आहे. आद्य ज्योतिषी व वैद्यक ग्रंथकार ह्यांचा उदय ह्या काळांत झाला. सारांश, रोम येथील अर्वाचीन सुधारणेच्या प्रारंभास जसा ऑगस्टाइन काळ ह्मणतात तसा हिंदुस्थानांतील भाषाज्ञान व शास्त्रज्ञान यांच्या अभ्युदयाचा काल हा दुसरा भाग होय.

तिसरा काळ श्रीशंकराचार्यांनीं आपल्या बुद्धिप्रभावानें दीप्त केला आहे; तथापि परधर्माचा पाडाव करून आपली मजबुती वाढविणाऱ्या धर्मांत जे प्रकार आढळतात, तसे ह्या काळांत आर्य धर्मांत उपस्थित झाले. उपस्मृती, उपपुराणें, आणि प्राचीन स्मृतींच्या नवीन आवृत्ती हीं सर्व ह्या काळांत तयार झालीं असावीं. निबंधकारांनीं ह्मणजे टीकाकारांनीं आपल्या विद्वत्तेच्या जोरानें, विजय पावलेल्या हिंदुधर्मास बरीच मदत केली. मेधातिथि कदाचित् ह्या काळांतला नसावा. तो सर्व टीकाकारांत जुना असून दुसऱ्या काळाच्या

उत्तरार्धांत बहुतकरून झाला असावा, असें अनुमान आहे; पण कुल्लूक, विज्ञानेश्वर, हेमाद्रि, माधव वगैरे बाकीचे सर्व निबंधकार तिसऱ्या काळांतच उदयास आले. दुसऱ्या प्रतीचे शब्दप्रासांत गुंग झालेले कवि याच काळांत झाले. ग्रहज्योतिषी, फलज्योतिषी, रासायनिक इत्यादिकांनीं शास्त्रें गूढ करून ठेविलीं. तरी त्यांनीं पूर्वी उपलब्ध असलेल्या शास्त्रांचें दृढीकरण केलें.

ह्या तिसऱ्या काळाचें विशेष ध्यानांत ठेवण्यासारखें स्वरूप ह्मणजे त्यांतील कलिवर्ज्य प्रकरणें होत. बौद्धधर्म फार दिवसांचा जुना होऊन त्यानें अर्धा देश व्यापिला असल्यामुळें त्याचा मोड करणें हिंदुधर्मास फार कठिण पडलें, ह्मणून सामदामाच्या न्यायानें हिंदुधर्माच्या पुढाऱ्यांस कांहीं सवलती द्याव्या लागल्या. तसेंच स्वतःची मजबुती करण्याकरितां कांहीं कडक नियम नवीन योजावे लागले. जे जे नवीन नियम पूर्वीच्या चालींविरुद्ध होते, व ज्यांस प्राचीन पवित्र ग्रंथांत कोठेंही आधार नव्हता, त्यांस कलिवर्ज्य प्रकरणें या नांवानें नवीन अमलांत आणलें. सारांश कलिवर्ज्य प्रकरणें ह्मणजे हिंदुधर्माच्या पुढाऱ्यांनीं लोकगुह्यर्थ अथवा बौद्धधर्मापासून लोकसंरक्षण व्हावें एतदर्थ केलेले नवीन नियम होत, व ही गोष्ट निबंधकारांसही पर्यायानें कबूल आहे असें ह्मटलें तरी चालेल.

येणेप्रमाणें मुसलमानी राज्य होण्यापूर्वी आर्यलोकांची सामाजिक आणि धार्मिक सुधारणा कसकशी होऊन उन्नतीस आली, व तिचा ऱ्हास कसा होऊं लागला, ह्याचें दिग्दर्शन आधुनिक विचार करणारांच्या मतें ह्या वर

दिलेल्या ऐतिहासिक मतावरून होतें. ह्या प्रत्येक काळाची स्थिती दाखविण्यास ह्याशिवाय दुसरेही बाह्य आधार आहेत. अॅरायन नामक अॅलेक्झांडर बादशहाचा इतिहासकार व चंद्रगुप्ताच्या दरबाराचा ग्रीक वकील मेगॅस्थिनीज, ह्यांच्या मनोरंजक ग्रंथांत, पहिल्या काळाच्या अखेरीस आर्य लोकांची सामाजिक स्थिति कशी होती, ह्याचें दिग्दर्शन आहे. ह्युएनसंगाच्या प्रवासाच्या हकीकतींत दुसऱ्या काळांतील स्थितीची अशीच माहिती मिळते. आणि अल्बिरूनि व दुसऱ्या आरबी प्रवाशांच्या ग्रंथांवरून तिसऱ्या काळांत हिंदुधर्माचें रूपांतर झालें तेव्हांची लोकस्थिति आढळून येत्ये.

आतां विधवाविवाहनिषेधाची ह्या काळांत कसकशी स्थिति होती हें पाहूं. येथें एक मुद्याची गोष्ट ही सांगितली पाहिजे कीं, अनार्य लोकांत विधवाविवाह करण्याची चाल अव्वलपासून अखेरपर्यंत ह्मणजे वरील तिन्ही काळांत असे. आर्य लोकांचें दळणवळण नेहमीं अनार्य लोकांशीं पडूं लागल्यामुळें त्यांच्या अनुकरणानें आर्य लोकांतही क्वचित् विधवाविवाह होत असले पाहिजेत. ह्याप्रमाणें हिंदुस्थानांत वसाहत करणाऱ्या आर्यांत पुनर्विवाह अगदींच होत नव्हते, असें नाहीं. यामुळें विधवाविवाहनिषेधाचा प्रश्न, अशा विवाहाचा प्राचीन आर्यांनीं कोठें उल्लेख केला आहे कीं काय ह्यावर केवळ अवलंबून न राहतां त्यास ते प्रशस्त मानीत किंवा अप्रशस्त मानीत, तसेंच पुनर्विवाहितेस व तिच्या संततीस ते हीन समजत असत किंवा नसत, ह्या गोष्टींच्या निर्णयावर अवलंबून राहतो.

आर्य काळांतील ह्मणजे प्रथम काळांतील सामाजिक स्थितीची साक्ष देणारे धर्मग्रंथ पूर्वी दर्शविल्याप्रमाणें वेद, सूत्रें, मनुस्मृति व महाभारत हे होत. प्रथमतः वेदाचें मत पाहूं:—वेदसमुद्राचें अवगाहन करून त्यांतून या विषयासंबंधानें दाखले काढण्याचें काम फार कठिण व मेहनतीचें आहे. "हस्तग्राभस्य दिधिषोस्तवेदं" व "को वां शयुत्रा विधवेव देवरम्" ह्या ऋचा पुनर्विवाहास आधारभूत आहेत असें सुधारक ह्मणतात. परंतु या ऋचांचा अर्थ वादग्रस्त आहे, मनुस्मृतीतील 'पाणिग्रहणिका मंत्राः कन्यास्वेव प्रतिष्ठिताः' या श्लोकार्धांत सांगितल्याप्रमाणें "अर्यमणं नु देवं कन्या अग्निम् अयक्षत" इत्यादि विवाहमंत्र कन्या ह्मणजे अक्षतयोनि स्त्रियांस लागू आहेत, यावरून अक्षतयोनिपुनर्विवाहास अडचण नसून क्षतयोनिपुनर्विवाह प्रशस्त नाहीं, असें मानण्याकडे वेदाचा कल दिसतो. याशिवाय अविधवा स्त्रियांची प्रशंसा वेदांत दोनचार ठिकाणीं आढळते. "इमा नारीरविधवाः सुपत्नीः" "पुनः पत्नीमग्निरदादायुषा वर्चसा सह। दीर्घायुरस्त्रायः पतिर्जीवाति शरदः शतम्॥" इत्यादि ऋचांवरून अविधवा स्त्रिया धर्मसंस्कारास प्रशस्त व स्त्रियांस पतीचें दीर्घायु असणें हें अत्यंत इष्ट आहे, असें वैदिक काळांतील लोकमत दिसतें. प्रथमतः वेद ह्मटले ह्मणजे एक सागर आहे, व त्यांतही बहुतेक स्तुतिप्रधान मंत्र असल्यामुळें विधिवाक्यें रत्नाप्रमाणें दुर्मिळ आहेत. एवढ्याचकरितां आचार्यांनीं सूत्रें लिहिलीं. या सूत्रांचा विचार करितांही अक्षतयोनिपुनर्विवाह प्रशस्त असून क्षतयोनिपुनर्विवाह अप्रशस्त आहे असें दिसतें. मनूनें

" न विवाहविधावुक्तं विधवावेदनं कचित् " असें ह्मटलें आहे. सूत्रांत स्त्रियांनीं पुनर्विवाह करावा असें कोठें लिहिलें नाहीं. तत्रापि हेंही ह्मणतां येईल कीं पुनर्विवाह करूं नये, असेंही कोठें लिहिलें नाही. परंतु " बुद्धिमते कन्यां प्रयच्छेत " अशी आश्वलायनादि सर्व आचार्यांचीं सूत्रें आहेत. त्यांत कन्या शब्दाचा अर्थ अक्षता असा घेतल्यास क्षतयोनिपुनर्विवाह अप्रशस्त आहे असें सूत्राचें मत दिसतें. तसेंच यजुःशाखीय सूत्रांत चतुर्थीकर्म करण्याविषयीं आज्ञा आहे, त्याचें तात्पर्य हेंच आहे कीं संभोगानें स्त्री अत्यन्तस्वीकृत होते. असंभुक्त स्त्री असेल तर तिचा पुनर्विवाह होऊं शकतो, असें हरदत्तानें लिहिलें आहे. तेव्हां चतुर्थीकर्माचेंही तात्पर्य मनांत आणतां क्षतयोनिपुनरुद्वाह सूत्रदृष्ट्या प्रशस्त नव्हता, असें वाटतें.

मनुस्मृतीचें मत यासंबंधानें सूत्राहूनही स्पष्ट आहे. अक्षतयोनिपुनर्विवाह मात्र संस्कारयुक्त होऊं शकतो, याबद्दल मनूचें स्पष्ट वचन आहे. तसेंच क्षतयोनिविधवाविवाह त्यास अगदीं असंमत आहे, हें खालील वचनावरून व्यक्त होतें.

**न विवाहविधावुक्तं विधवावेदनं कचित् ॥**
**न द्वितीयश्च साध्वीनां कचिद्भर्तोपदिश्यते ॥**
**आसीतामरणात्क्षान्ता नियता ब्रह्मचारिणी ॥ इ.**

आर्यकाळांत क्षतयोनिपुनरुद्वाह अप्रशस्त मानीत असत याचें दुसरें प्रमाण मनूनें पौनर्भवास ह्मणजे पुनर्विवाहिता संततीस औरसाहून कनिष्ठ मानलें आहे हें होय. अशा प्रकारचा फरक पुनर्विवाहिता पुत्रांत व औरस पुत्रांत

हिंदुस्थानांतील आर्यलोकांखेरीज इतर कोणत्याही पृथ्वीवरच्या लोकांत मानिला असल्याचें दृष्टोत्पत्तीस येत नाहीं. आतां मनूनें पौनर्भवास द्वादश पुत्रांत गणिलें आहे, यावरून पुनर्विवाह मनूचे वेळीं जरी कमी दर्जाचे मानले जात असत, तरी कांहीं प्रसंगीं ते होत असत, व केवळ रंडीबाजीप्रमाणें गणिले जात नसत हेंही स्पष्ट आहे. 'न द्वितीयश्च साध्वीनां क्वचित् भर्तोपदिश्यते ।' यांतील साध्वीपद मार्मिक आहे. ज्या स्त्रिया साध्वीपदास योग्य नाहींत, ह्मणजे ज्यांस मनोनिग्रह नाहीं अशांस विशेष प्रसंगीं एका प्रकारचा असंस्कृत भर्ता करण्याची परवानगी मनूचे वेळीं होती असें दिसते. ह्मणूनच 'नष्टे मृते प्रव्रजिते' हा श्लोक मनूंत हल्लीं दिसत नाहीं, तरी निबंधकारांनीं मनूचा ह्मणून पठित केला आहे. तो मनूंत वास्तविक असावा असें वाटतें. सारांश, आर्यकाळांत अक्षतयोनिपुनर्विवाह संस्कारयुक्त होत असे. परंतु क्षतयोनिपुनर्विवाह अप्रशस्त व हीन मानला जाई. तथापि विशेष प्रसंगीं अनार्य लोकांच्या अनुकरणानें क्षतयोनिपुनर्विवाह करण्याची ज्या स्त्रिया असाध्वी असतील त्यांस परवानगी असे.

महाभारतावरूनही वरील ऐतिहासिक अनुमान दृढ होतें. औतथ्याच्या गोष्टीचें तात्पर्य हेंच आहे कीं, जेव्हां आर्यलोकांची रानटी स्थिति जाऊन त्यांस लग्ननिर्बंधाच्या शिथिलतेची लज्जा वाटूं लागली, तेव्हां त्यांनीं असा नियम केला कीं, स्त्रियांस यावज्जीव एकच पति असावा.

अद्यप्रभृति मर्यादा मया लोके प्रतिष्ठिता ।

एक एव पतिर्नार्या यावज्जीवपरायणम् ।
मृते जीवति वा तस्मिन्नापरं प्राप्नुयान्नरम् ॥

याप्रमाणें सूत्रें, मनुस्मृति, व महाभारत यांचा अभिप्राय पाहतां आर्यकाळांत ह्मणजे दोन हजार वर्षांपूर्वी क्षतयोनिपुनरुद्वाह लोकसंमत नव्हता व यामुळें आर्य लोकांत प्रायशः होत नसे, असें सिद्ध होतें. या ऐतिहासिक अनुमानाचें प्रत्यंतर बौद्ध ग्रंथावरून मिळतें ह्यांत पुनर्विवाहित स्त्रीचा उल्लेख कोठें आलेला दिसत नाहीं. याशिवाय आणखी एका तऱ्हेनें परकीय लोकांच्या इतिहासावरून या अनुमानास फार बळकट प्रत्यंतर मिळतें. जर्मन लोकांतही दोन हजार वर्षांपूर्वी पुनर्विवाहाची चाल बंद होती, असें गिबननें लिहिलें आहे. गिबननें ट्यासिटसचा आधार दिला आहे, तो प्रत्यक्ष काढून पाहतां ह्या संबंधाचे ट्यासिटसचे प्रशंसायुक्त शब्द येथें समग्र उतरून घेण्यासारखे आहेत.

" ह्या लोकांत आणखी एक विशेष उदाहरण घेण्यासारखी अशी चाल आहे कीं, त्यांच्यांत फक्त कन्यांचा ( व्हर्जिन्सचा–अक्षतांचा ) विवाह होऊं शकतो, व तो एकदा झाला ह्मणजे पत्नीत्वांतील त्यांच्या सर्व आशा व इच्छा ह्यांचा कळस झाला. तसेंच तरुणांचीं लग्नें बरींच उशीरां होतात यामुळें त्यांचें प्रथम वय कोणत्याही तऱ्हेनें शक्तिक्षीण न होतां उत्तम तऱ्हेनें जातें. कन्यांचेंही लग्न लौकर करून टाकतात असें नाहीं. त्यांची वाढ पुरुषाप्रमाणें अनियंत्रित पूर्ण होऊं देतात. यामुळें स्त्रीपुरुषांचा

समागम यथायोग्य वेळीं एकमेकांशीं तुलित असा होतो व यामुळेंच त्यांची प्रजा मातापितरांप्रमाणें सदृढ व तेजस्वी निपजते. " हें वर्णन वाचून आर्यकालीन भरतखंडांतील आर्य व त्यांचे भविष्या पुराव्यावरून मानलेले जर्मन बंधू हे एकच असावे, असें कोणास वाटणार नाहीं? दोन हजार वर्षांपूर्वी या दोन्हीं आर्यशाखांत बालविवाह नव्हते व क्षता-योनिपुनर्विवाह अप्रशस्त मानीत याजबद्दल कोणास शंका राहील काय?

कांही लोक सती, बालविवाह, विधवाविवाहनिषेध व हिंदु समजांतील दुष्ट भासणाऱ्या इतर सर्व चाली सिथियन किंवा मुसलमान लोकांनीं स्वाऱ्या करून येथें वसाहती केल्या त्यामुळें एकाच सुमारास प्रचारांत आल्या अशी अटकळ करितात. परंतु सिथियन लोकांच्या कोणत्याही जातींत असा निषेध असलेला आढळत नाहीं; व त्या लोकांची नीतिमत्ता शिथिल, व स्वभाव जात्या रानटी असल्यामुळें त्यांच्या सहवासानें हिंदुलोकांत अशी चाल पडण्याचा संभव मुळींच दिसत नाहीं; कदाचित् ह्याच्या उलट होण्याचा मात्र पुष्कळ संभव होता. पुनर्विवाहनिषे-धाचें बीज लग्न हा एक धर्मसंस्कार आहे अशी लोकांची दृढ कल्पना, व स्त्री शुद्ध असावी ही इच्छा, यांतच आहे. ह्या गोष्टीची कल्पना हिंदुस्थानांत आलेल्या सिथियन लोकांच्या डोळ्यांत तर खचित नसावी.

आर्य लोकांच्या जर्मन व हिंदु ह्या दोनच शाखांत सदरील निषेध असल्याचें इतिहासांत आढळतें. तसेंच ही

चाल सदरील दोन्ही आर्यशाखांत फार प्राचीन काळीं ह्मणजे निदान ॲलेक्झांडरचे स्वारीपूर्वींच अंमलांत होती ह्याचीही शंका नाहीं. आतां सिथियन लोक ॲलेक्झांडरचे स्वारीनंतर हिंदुस्थानांत आले, तेव्हां अर्थातच सिथियन लोकांपासून ही चाल आर्य लोकांत प्रथम येणें हे ऐतिहासिक दृष्टीनेंही सिद्ध नाहीं. एकंदरीनें ही चाल आर्य लोकांची स्वतःची असून ती त्यांनीं आपल्या मूलस्थानांहून येतांना बरोबरच आणली असावी, असें दिसतें; आणि ह्मणूनच आर्यलोकांच्या दुसऱ्या एका मोठ्या शाखेंत त्याच काळाच्या सुमारास ती रूढ असलेली आपणांस आढळते.

येथील आर्यलोकांत परपूर्वा स्त्रीशीं लग्न न करण्याची चिकित्सा किती वाढली होती, ह्याचें महाभारतांतील भीष्म आणि अंबा यांची गोष्ट हें प्रसिद्ध उदाहरण आहे. तसेंच अलीकडच्या इतिहासांतील प्रतिभीष्मच अशा चोंड राजानें अशा स्त्रीशीं विवाह करण्याचें नाकारिलें, ही गोष्ट हिंदुस्थानच्या अर्वाचीन इतिहासांतील आहे. रजपूत लोकांत मुलगी मागून जावयाची ह्मणजे तिच्या बापानें इच्छित जांवयाकडे नारळ पाठवावा अशी चाल आहे, तसा नारळ चोंड याजकडे एकानें पाठविला होता. दुर्दैवानें चोंड शिकारीस गेल्यामुळें दरबारांत हजर नव्हता, तेव्हां नारळ आणणारानें चुकीनें तो चोंडचा वृद्ध पिता, उदेपूरचा लखराणा, ह्याजपुढें ठेविला. चोंड शिकारीहून परत आल्यानंतर नारळाविषयींची हकीकत त्याच्या बापानें त्यास सांगितली. नारळ त्याच्यापुढें जरी चुकीनें ठेवण्यांत आला होता, तरी त्यामुळें

ती कन्या बापास देऊं केल्यासारखी झाली; सबब चोंड ह्यानें तिशीं लग्न करण्याचें नाकारिलें. अखेरीस त्या मुलीशीं चोंडाच्या बापानें लग्न लाविलें, व त्यासाठीं तिच्या संततीस राज्य मिळावें, मी त्यावर वारसा सांगणार नाहीं, असा चोंडाला करार करावा लागला. त्या उदार रजपुतानें ही आपली भीष्मप्रतिज्ञा मोठ्या धर्मानें पाळिली, आणि त्याजबद्दल त्याचे वंशज चंदावत यांस उदेपूरचे घराण्यांतून अद्यापिही मोठा मान मिळतो.

आर्यकालांत क्षतयोनिपुनर्विवाह प्रशस्त मानीत नव्हते, असें मानिलें तर भारतांत वर्णन केल्याप्रमाणें दमयंतीनें दुसरा स्वयंवर करण्याचें कसें योजिलें होतें, हा एक बिकट प्रश्न उद्भवतो. महाभारताच्या नवीन आवृत्ती रचिल्या गेल्या, त्यांत हें चरित्र मागाहून लिहिलें असावें, अशी कल्पना करावी तर तशी गोष्ट संभवत नाहीं. कारण, मागाहूनच्या काळांत विधवाविवाहनिषेधाची प्रवृत्ति उत्तरोत्तर बळावतच चालली होती. बरें, दमयंतीच्या उदाहरणावरून आर्यकाळांत पुनर्विवाह प्रशस्त मानीत होते असें ह्मणावें तर त्याच निषेध ख्रिस्तीशकाच्या पूर्वी शेंकडों वर्षे जर्मन लोकांत होता, व आर्यकाळांत मनुस्मृतींत लिहिल्याप्रमाणें पुनर्विवाहितेच्या पुत्रास कनिष्ठ समजत, या गोष्टीची काय वाट लावावी ?. हें असें प्रथमदर्शनीं गूढ दिसणारें कोडें थोडक्यांत सुटलें. आर्यलोकांत विधवाविवाह मुळींच होत नसत असें नाहीं; अनार्य लोकांत ते करण्याची चाल तर सर्वत्र असे; व नातीची व प्रतिष्ठेची परवा न करणाऱ्या

केत्येक असाध्वी आर्यस्त्रियाही कधीं कधीं पुनर्विवाह करीत
असें वर सांगितलेंच आहे. अशा विवाहानें त्यांस हीनत्व
रत असे, ही गोष्ट त्यांच्या संततीस दिलेलें पौनर्भव हें नांव
। त्यांची औरस पुत्राहून कमी प्रकारची गणना, ह्यांवरूनच
उघड होते. " नष्टे मृते ' इ० श्लोक मनूचा आहे असें
आपण ठरविलें आहे, व तो कृतयुगांत ह्मणजे अर्वाचीन
गाप्रमाणें आर्यकाळांतही लागू होता. ह्या श्लोकाच्या
आधारानें कधीं कधीं एक गौण पद्धतीचा अथवा व्यावहा-
रिक विवाह होऊं शकत असे, परंतु तो संस्कारयुक्त करितां
ित नसे, इत्यादि विवेचन पूर्वीच्या भागांत झालेंच आहे.
ारांश आर्यलोकांस आर्य काळांत पुनर्विवाह करितां येत
असत; परंतु ते करणाऱ्या स्त्रियांस व त्यांच्या संततीस
ीनत्व येत असल्याकारणानें ते फारच क्वचित् होत असत.
मयंतीचा हेतु अशाच प्रकारचा अप्रशस्त विवाह कर-
याचा होता, असें महाभारतांतील वचनांवरूनच दिसतें.
ळराजा तिला जेव्हां भेटला, तेव्हां त्याचे निर्भत्सनायुक्त
ाहिले शब्द असे होते:—

दूताश्चरंति पृथिवीं कृत्स्नां नृपतिशासनात् ।
भैमी किल स्म भर्तारं द्वितीयं वरयिष्यति ।
स्वैरवृत्ता यथाकाममनुरूपमिवात्मनः ॥

स्वैरवृत्ता या शब्दावरून दमयंती मनोनिग्रह नष्ट झाल्या-
मुळें साध्वीधर्माचें उल्लंघन करूं पाहत आहे असें दाख-
वलें आहे वास्तविक स्त्रियांचा धर्म ह्मणजे त्यांनीं अशा
समयीं आत्मसंयमन करून यावज्जीव ब्रह्मचर्य पाळावें, असा

रवृत्ता या शब्दाचा हेतु दिसतो. महाभारतांत आणखी का गोष्टींत विधवाविवाहाचा उल्लेख आहे ती अशी:—

उलूपी ही नागकन्या होती. ती अनपत्या असल्यामुळें तेनें अर्जुनाशीं विवाह केला. अनपत्या असें ह्मटलें आहे, ग्रावरून असें अनुमान निघतें कीं, तिला अपत्य असतें तर तेनें हा विवाह केला नसता. ती अक्षता होती कीं क्षता ोती हें त्या गोष्टीवरून स्पष्ट समजत नाहीं. कसेंही असलें तरी ती आर्य स्त्री नव्हती व अर्थात् द्विजांचे विवाह-नेयम तिला लागू नव्हते.

आतां दुसऱ्या काळांत ह्मणजे आर्यबौद्धकाळांत विधवा-विवाहनिषेधाची काय वाट झाली ती पाहूं. ह्या काळांत-ील शास्त्र आणि आचार हीं बहुतेक आर्यकाळांतल्या-माणेंच राहिलीं. अक्षतयोनि विधवांचा संस्कारयुक्त विवाह रण्याचा हक्क पुष्कळ स्मृतींनीं कायम ठेविला आहे. मात्र क प्रकारचा हीनपणा पदरांत घेऊन कां होईना, पण वहारोपयुक्त विवाह करण्याची जी मोकळीक क्षतयोनि धवांस होती, तिजबद्दल लोकमत जास्त वाईट होऊं ागलें. ह्याचें कारण असें वाटतें कीं, ह्या वेळीं बौद्धधर्म ोरावून हिंदुधर्माच्या बरोबरीनें वाढला होता व त्यांत जातिभेद मुळींच मानीत नसत. ह्यापासून आपल्या धर्मास अपाय होऊं नये ह्मणून आपल्यांतील जातिभेद व इतर धर्मबंधनें जास्त मजबूत करण्याकरितां आर्यशास्त्रकार कडक नियम योजूं लागले. ब्राह्मणाचा पौनर्भव मुलगा असला, ह्मणजे तो हीनजाति खरा, तरी ब्राह्मणांतच गणला जात

असे; व असल्यांची संख्या पुष्कळशी वाढली ह्मणजे जातींत जात उत्पन्न व्हावयाची; ही गोष्ट शास्त्रकारांस पसंत पडेना. अशाच कारणावरून असल्या विवाहांचा मूळ आधार " नष्टे मृते इत्यादि " हा श्लोक पराशरा शिवाय करून इतर सर्व स्मृतींतून घेतला नसावा अशी कल्पना संभवते मनुस्मृतींतही तो सांपडत नाहीं ह्याचे कारण हेंच असावें.

बालविवाह पूर्वी नसल्यामुळें अक्षता विधवाही अर्थात् कचित् होत असत. लग्न झाल्याबरोबर जर कांहीं अपघातानें अथवा सांथीच्या रोगानें एकाएकीं नवरा मेला, तरच बहुतकरून हें दुर्दैव ओढवत असे, व असल्या कचित होणाऱ्या अक्षतयोनींचा विवाह संस्कारयुक्त होण्यासारखा असल्यामुळें त्याचा निषेध करणें वरील शास्त्रकारांस महत्वाचें वाटलें नसावें. साधारणपणें, लोकांची धर्मश्रद्धा जसजशी वाढते तसतशी विधवाविवाहाची आस्त नावड उत्पन्न होते. खिस्ती धर्माच्या प्रारंभीं त्या लोकांत देखील वैराग्याची इच्छा वाढली, व लग्नाचा तिरस्कार वाटूं लागला; ज्यांस नैसगिक इच्छा आवरण्याइतका मनो निग्रह नाहीं त्यांस एकवार लग्न करण्याची परवानगी आहे, असें ख्रिश्चियन फादर्स ( आद्याचार्य ) मानीत. ह्याच नियमाप्रमाणें गौतम, बौधायन व दुसऱ्या कांहीं स्मृतिकारांनीं विधवापुनर्विवाह अशास्त्र ठरविले. त्यांचीं ह्याविषयींचीं वचनें पूर्वी दिलींच आहेत. अक्षतविधवांस ही क्षतांप्रमाणेंच मानण्याकडे थोडथोडी प्रवृत्ति होऊं लागली. या खडतर व्रताचे पुरस्कर्ते याज्ञवल्क्य समजले पाहिजेत.

अक्षता च क्षताचैव पुनर्भूः संस्कृता पुनः ।
अक्षतायां क्षतायां वा जातः पौनर्भवः स्मृतः ॥

इत्यादि वचनांवरून क्षतांस व अक्षतांस सरसकट एकाच माळेंत गोंवण्याचा त्यांचा कल दिसतो. तरी एकंदरीनें पाहतां मुख्य मुख्य स्मृतिकारांनीं अक्षतयोतिपुनर्विवाहाच्या नियमांत फरक केला नाहीं. मात्र शास्त्रसंमत अक्षतयोनि-पुनरुद्वाह व तसाच व्यवहारसंमत क्षतयोनिपुनरुद्वाह अप्रशस्त मानण्याकडे समाजाचा कल होऊं लागला असें दिसतें.

पुराणांत अक्षतयोनिविवाहाचें बहुतेक कोठें उदाहरण नाहीं, व बालविवाहाचा प्रचार कमी असल्यामुळें त्यांत उदाहरण नसणें साहजिक आहे. पद्मपुराणांत मात्र एक उदाहरण आहे. तसेंच क्षतयोनिविधवाविवाहाविषयींही पुराणांत कोठें उल्लेख आढळत नाहीं. पद्मपुराणांत जी गोष्ट आहे तिजवरून वर सांगितल्याप्रमाणें सप्तपदीनंतर विधवा झालेलीचा पुनर्विवाह करूं नये, अशी लोकांची प्रवृत्ति झालेली दिसते. पद्मपुराणांतील दिव्यादेवीची गोष्ट सुधारक पक्षाचे लोक आपल्या मतास मोठा आधार समजतात. परंतु खरी गोष्ट तशी नाहीं. दिव्यादेवीस पुष्कळ नवरे झाले खरे; परंतु त्यांतील प्रत्येक सप्तपदी संस्कार होण्यापूर्वी, निदान उपभोगापूर्वी, मरण पावला होता. अर्थातच त्या लग्नांनीं तिचें अक्षतात्व भंग झालें नव्हतें. सुधारणाविरुद्ध पक्षाचें ह्मणणें असें आहे कीं पूर्वीच्या लग्नांत सप्तपदी झाली नसल्यामुळें तिचे पुनः पुनः विवाह करतां आले, नाहींतर

आले नसते. दिव्यादेवीचें लग्न पूर्ण झालें नव्हतें, निदान ती अक्षता होती, असें खालील श्लोकावरून स्पष्ट दिसतें.

**तस्या विवाहकालस्य संप्राप्ते संगमे नृप ।**
**मृतोसौ चित्रसेनस्तु कालधर्मेण वै किल ॥**

याप्रमाणें दुसऱ्या काळांतील ह्मणजे ख्रिस्ती शकापूर्वींच्या दोनशें वर्षांपासून ख्रिस्ती शकाच्यानंतर सातशें वर्षेपर्यंतच्या काळांतील समाजस्थितीचे दर्शक धर्मग्रंथ स्मृती व पुराणें यांवरून या काळांत क्षतयोनिपुनर्विवाहनिषेध जारी होता असें दिसतें; व ह्याच कारणानें " हिंदुस्थानांत स्त्रियांचा विवाह एकदा होतो पुनः होत नाहीं " असें ह्युएनसंगनें लिहिलें आहे.

ह्यानंतर तिसऱ्या काळांत फेरफार कसे झाले हें पाहिलें पाहिजे. ह्या काळांत प्रथमपासून बौद्ध धर्माची आणि हिंदु धर्माची झटापट लागली. आर्यलोक धर्ममतांत फार हटवादी झाले. त्यांस बौद्ध धर्माचें अस्तित्व सहन होईना. शेवटीं कांहीं सामदाम करून व कोठें कोठें जुलूमही करून त्यांनीं बौद्ध धर्माचा उच्छेद केला. जातिनिर्बंध फार कडक झाला व नवीन धर्मव्यवस्थापक व उपस्मृतिकार उत्पन्न झाले. मागील काळांतही अक्षतयोनि विधवांस क्षतयोनि विधवांप्रमाणें मानूं लागलेच होते, तें आतां पक्कें होऊन अक्षता विधवांचे विवाह अजीबात बंद केले गेले; शिवाय क्षतयोनि विधवांस असलेली व्यवहारोपयुक्त विवाह करण्याची मोकळीकही नाहींशी झाली. येणेंप्रमाणें पौनर्भव ही एक मधली जात वाढणार होती, तिची वाट लागली व जातीचें शुद्धत्व

कायम ठेविलें गेलें.* हे नवीन दोन नियम, अक्षता विधवांचा विवाह संस्कारयुक्त व्हावा व क्षतांचा व्यावहारिक विवाह व्हावा असें कबूल करणाऱ्या धर्मशास्त्रवचनांच्या धडधडीत विरुद्ध होते तेव्हां ही अडचण, हे नवीन नियम कलिवर्ज्य प्रकरणें आहेत असें ठरवून दूर केली. हीं नवीन कलिवर्ज्य वचनें येणेंप्रमाणें:—

बालिकाक्षतयोन्याश्च वरेणान्येन संस्कृतिः ।
दत्तौरसेतराणां तु पुत्रत्वेन परिग्रहः ॥

पहिल्यानें अक्षतयोनीचे संस्कारयुक्त पुनर्विवाह बंद केले व दुसऱ्यानें क्षतयोनींची पौनर्भव संतति मुळींच पुत्रत्वांतून उठवली ह्मणजे ती दास्युत्पन्न आहे असें ठरविलें. तात्पर्य, सर्वच विधवाविवाह बंद केले गेले; मग ते अक्षतयोनींचे असून संस्कारयुक्त होण्यासारखे असोत किंवा क्षतयोनींचे असून फक्त व्यवहारोपयुक्त असोत. कलिवर्ज्य प्रकरणें लिहितांना कांहीं उपस्मृतींनींही सर्व विधवाविवाहांचा निषेध केला आहे. याप्रमाणें आश्वलायन आणि बाभ्रव्य स्मृतींनीं तो स्पष्ट लिहिला आहे; कांहीं उपपुराणेंही इतक्या पल्ल्यास पोहोंचलीं आहेत कीं अक्षता विधवांचे संस्कारयुक्त विवाह पूर्वी होऊं शकत, ही गोष्टही त्यांत नाकबूल केली आहे.

---

* ही त्या वेळच्या हिंदु लोकांची जातीची शुद्धता राखण्याची प्रबल इच्छा आणखी एका कलिवर्ज्यावरून स्पष्ट होते.

कन्यानामसवर्णानां विवाहश्च द्विजातिभिः ॥

मृते भर्त्तरि या कन्या केवलं हस्तदूषिता ।
सा चेदक्षतयोनिः स्यात्पुनःसंस्कारमर्हति ॥
इत्येवं केचिदिच्छन्ति न तन्मम मतं द्विजाः ।
सप्तमे हि पदे वृत्ते नान्यमर्हति सा पतिम् ॥

विष्णुधर्मोत्तरपुराण.

तात्पर्य, हिंदुस्थानच्या प्राचीन इतिहासाच्या तिसऱ्या काळांत अथवा हिंदु काळांत, क्षतयोनि व अक्षतयोनि या दोन्ही प्रकारच्या विधवांचे विवाह नवीन नियमांनीं बंद केले.

या भागांत एथवर केलेल्या विवेचनाचा एकंद्रर गोषवारा असा आहे:– आर्य काळांत ह्मणजे इसवी सना-पूर्वी २०० वर्षापर्यंत अक्षत विधवांस संस्कारयुक्त विवाह करण्याची परवानगी असे. परंतु क्षतांस तशी नव्हती. त्यांचे व्यावहारिक पुनर्विवाह होत असत, परंतु त्यापासून त्यांस व त्यांच्या संततीस नीचपणा येत असल्यामुळें क्षतयोनि विधवाविवाह बहुतेक आचरित नव्हते. इसवी सनापूर्वी २०० वर्षांपासून तों ईसवी सन ६०० पर्यंत विधवांची स्थिति बहुतेक होती तशीच राहिली; परंतु शास्त्र-कारांचा कल क्षता व अक्षता विधवांस सारख्याच मानण्या-कडे व विधवाविवाहापासून येणारें हीनत्व अधिक करून दाखविण्याकडे वाहूं लागला. ईसवी सन ६०० पासून तों ईसवी सन १२०० पर्यंत असहिष्णु झालेल्या हिंदु लोकांनीं जाति फार शुद्ध राखण्याच्या भरीस पडून सर्व विधवांचे विवाह बंद व्हावे, असे नियम केले व त्यांस कलिवर्ज्य नियम असें नांव देऊन ते अमलांत आणिले. या अलीक-

डील झालेले विज्ञानेश्वर, माधव इत्यादि टीकाकार व निबंधकार ह्यांच्या वेळीं हिंदुस्थानांतील आर्यांत विधवाविवाह अजीबात बंद झाले होते, ह्यामुळें पुणें येथील शास्त्रीय वादाचें मूळ बीज जो 'नष्टे मृते' इत्यादि श्लोक त्याच्या खऱ्या अर्थाची कल्पना सुद्धां नाहींशी होऊन त्या श्लोकाची कशी तरी गति लावण्याकडे त्यांना आपलें युक्तिसामर्थ्य खर्च करावें लागलें.

ह्या जगद्विख्यात श्लोकाचे अद्यापिही नानाप्रकारचे अर्थ व त्यांवर नानाप्रकारच्या कल्पना चालल्या आहेत, हेंही येथें सांगितलें पाहिजे. मागील युगांत क्षतयोनि विधवेच्या संततीस हीनत्व येत असे, हें पंडित ईश्वरचंद्र विद्यासागर ह्यांस कबूल आहे. परंतु ही हीनता कलियुगांत येऊं शकत नाहीं, असें ते ह्मणतात. ह्यास आधार त्यांनीं वरील श्लोकावरूनच काढिला आहे. तो असा कीं, हा श्लोक पाराशर स्मृतींत असून ती स्मृति कलियुगास विशेषेंकरून लागू आहे. ह्यावरून पाराशरानें पुनर्विवाह कलियुगांत सशास्त्र आहे असें ठरवून त्याजबरोबर येणारें न्यूनत्व गर्भित अर्थानें कलियुगांत घालविलें आहे! परंतु मि. खरे ह्यांनीं दाखविल्याप्रमाणें हा श्लोक मनुस्मृतींतही आहे. ह्मणून त्यांत सांगितलेला नियम कलियुगाप्रमाणेंच इतर युगांसही लागलाच पाहिजे. एकंदरीनें त्या श्लोकाचा अर्थ कलियुगासच विशेष अनुकूल असा समजतां येत नाहीं. मि. खरे ह्यांनीं ह्या श्लोकाचा कसा अर्थ केला आहे, हें मागें सांगितलें आहे. व तेथेंच मी आपलें स्वतःचें मतही दिलेंच

आहे कीं, सदरील श्लोकावरून विधवांस व्यवहारोपयुक्त विवाह करण्याची परवानगी दिलेली असावी. माझ्या मताचा वर दिलेल्या ऐतिहासिक निर्णयाशीं व विशेषेंकरून दमयंतीच्या गोष्टीशीं चांगला मेळ बसतो, याहूनही चांगली व्यवस्था या श्लोकाचीं होण्यासारखी आहे, त्याचा उल्लेख पुढील लेखांत योग्य प्रसंगीं केला जाईल.

---

## असंमत वैधव्याचे गुणदोष.

आर्येतिहासाच्या उत्तम काळांत क्षतयोनि विधवेचा पुनर्विवाह अप्रशस्त मानला जात असे. तसेंच धर्मशास्त्रानेंही असले विवाह पूर्व युगांत व कलियुगांतही सारखेंच अप्रशस्त मानले आहेत, ह्यावरून असंमत वैधव्याच्या चालीपासून कांहीं तरी हितकर परिणाम होत असावे असें कित्येकांस वाटणें साहजिक आहे. आणि खरोखर या निंद्य चालीपासून हल्लीं ज्या अनेक विपत्ति प्राप्त होतात, त्या पूर्वीही उत्पन्न होत असून त्यांचा कोणीही विचार केला नसेल व त्यांच्या निवारणार्थ कांहीं प्रयत्न केला नसेल, तर ज्या हिंदुस्थानांतील आर्यांची परोपकारबुद्धि जगांतील सर्व दयामूल धर्मांचें आदिबीज होऊन बसली आहे, ज्या आर्यांची दुसऱ्यास दुःख देण्याविषयींची पराङ्मुखता इतक्या शिखरास जाऊन पोहोंचली कीं, कोणत्याही जिवंत प्राण्याची हत्या करणें पाप मानलें जात आहे, त्या आर्यांच्या शुभ्र कीर्तीला हा विलक्षण कलंकच आहे, असें ह्मणावें लागेल. परंतु वरील ऐतिहासिक माहितीवरून आपणांस

असें दिसून येतें कीं, आर्यांच्या भरभराटीच्या दिवसांत असं-
मत वैधव्याचें स्वरूप हल्लीं इतकें दुष्ट आणि जुलमी झालेलें
नव्हतें. कारण तेव्हां बालविवाह प्रचलित नसल्यामुळें अक्ष-
तयोनि विधवा फारच क्वचित होत असत व झाल्या तरी
त्याचीं लग्नें संस्कारयुक्त होण्याची परवानगी असल्या कार-
णानें जबरदस्तीनें आमरणान्त अविषह्य दुःख भोगण्याची
पाळी त्यांजवर मुळींच येत नसे. परकीय लोकांची व
आमचीं स्वतःचींही अंतःकरणें ज्यांकडे पाहून द्रवून जातात,
अशा दुर्दैवाच्या केवळ पुतळ्या बनून राहिलेल्या बालविध-
वांची संख्या बालविवाहाच्या प्रसारामुळें हल्लीं वाढली आहे.
हा प्रकार अलीकडे ह्मणजे ईसवी सन ७०० पासूनच
झाला असें इतिहासावरून स्पष्ट दिसतें. पुनर्विवाह करण्या-
च्या परवानगीची जर अत्यंत जरूरी असेल, तर ती ह्या
बिचाऱ्याकरितां तरी अगदीं अवश्य आहे. अक्षतयोनि विध-
वांस पूर्वीं पुनर्विवाहाची परवानगी असे परंतु मागें सांगितल्या-
प्रमाणें अनेक कारणांनीं ती बंद करण्याचें लोकांच्या मनांत
हिंदु काळांत येऊं लागलें व त्याचप्रमाणें आमच्या सातव्या
व आठव्या शतकांतील पूर्वजांनीं अक्षता विधवांचा हा पूर्वी-
पासून चालत आलेला हक्क बुडवून टाकिला. बालविवाह
याच सुमारास प्रचलित झाल्यामुळें ह्याचा परिणाम असा
झाला कीं, तेव्हांपासून बालविधवा ह्मणजे हिंदु समाजांतील
एक मोठा हतभाग्य वर्गच होऊन गेला आहे; जरी त्या
बिचाऱ्यांच्या विपत्तीला आह्मी स्वतःच कारण झालों आहों,
जरी ती विपत्ति पाहून आमचीं अंतःकरणें द्रवतात व आ-
ह्मांस तिची लज्जा वाटते, तरी तिच्या निवारणाविषयीं आह्मीं

स्वतःच घालून दिलेल्या मानवी नियमांमुळें हतवीर्य होऊन बसलों आहों. या बालविधवांची स्थिति प्रौढ विधवेहून पुष्कळ तऱ्हेनें इतकी भिन्न आहे, कीं प्रौढ विधवांच्या विवाहनिषेधापासून फारसे तोटे न होतां उलट थोडेसे फायदेही होण्याचा संभव असेल, परंतु बालविधवांच्या पुनर्विवाहनिषेधापासून उत्पन्न होणारी विपत्ति आणि दुःखें भयंकर असून त्यापासून हित ह्मटलें तर कवडीचेंहि नाहीं. कदाचित् हित असेल तर, धर्माची आज्ञा विनतक्रार पाळण्याच्या श्रेयांत जें असेल तेवढेंच आहे. परंतु अशा जबरदस्त मनोनिग्रहांचीं माणसें केवळ अपवादक समजलीं पाहिजेत. असंमत वैधव्याविरुद्ध आजपर्यंत ज्या ज्या चर्चा झाल्या आहेत किंवा होऊं शकतात, त्या सर्व बालविधवेच्या दुःखस्थितीला विशेष अंशीं लागू आहेत, प्रौढ विधवांच्या स्थितीकडे त्यांचा इतका रोख नाहीं, असें ह्मटलें तरी चालेल. मोठमोठे विचारशील लोकही बालविधवा व प्रौढ विधवा ह्यांच्या स्थितींत फार फरक आहे ही गोष्ट कबूल करतात. सर विल्यम् हंटरसाहेबांनीं आपल्या पुस्तकास हिंदु विधवा हें साधारण नांव देण्याच्या ऐवजीं हिंदु बालविधवा असें नांव दिलें आहे. व यावरूनच त्यांनीं बालविधवेच्या व प्रौढ विधवेच्या स्थितींतील फरक उघड करून दाखविला आहे. सर्व मनुष्य प्राण्यास एकच न्याय लागला पाहिजे, असें ह्मणणाऱ्या कित्येक सुधारकांच्या लक्षांत हा फरक येत नसेल, तरी तो करणें जरूर आहे, व ह्या अंकाच्या मागील दोन प्रकरणांतही जसा तो फरक केला आहे, त्याप्रमाणेंच येथेंही तो केला पाहिजे. या

भागांतील विवेचनांत पुनर्विवाहनिषेधापासून बालविधवांवर काय परिणाम घडतो व प्रौढ विधवांच्या स्थितीवर तो कां घडत नाहीं हें दाखविण्याचा मुख्यतः यत्न केला आहे.

असंमत वैधव्याच्या चालीपासून व्यभिचारवृद्धि हा एक मोठा दुष्परिणाम होतो असें समजतात. ह्या संबंधानें कित्येकांनीं फारच अतिशयोक्ति केलेली आढळते; व कित्येकांनीं हा लज्जास्पद आरोप छपविण्याकरितां त्याचें स्वरूप फार कमी करून दाखविलें आहे मि० अशबरनरसारखे लोक हे पहिल्या वर्गांतले होत. ह्या गृहस्थानें एके ठिकाणीं तर असें ह्मटलें आहे कीं, "हिंदुस्थानांतील वैधव्य ह्मणजे सभ्यपणाची छिनाली आहे." आत्मसंयमन करण्याच्या कामांत सर्व पृथ्वीतलावरही ज्याहून अधिक वर्णनीय स्त्रिया सांपडणार नाहींत, अशा बिचाऱ्या हिंदु अनाथ विधवांवर असा आरोप करणें ह्मणजे महत्पापच होय. बरें, ह्याच्या उलट जे लोक जुनीं मतें चांगलीं असें पूर्ण वेड डोक्यांत भरल्यामुळें चालू्लेल्या स्थितीकडे डोळेझांक करितात ते लोक ह्या चालीपासून कांहींएक वाईट परिणाम होत नाहींत असें ह्मणतात. ह्मणजे अनिवार्य मनोविकारांचें आकलन सहज होऊं शकतें, असेंच ' महदपि परदुःखं शीतलं सम्यगाहुः ' ह्या न्यायानें ह्मणतात, दुसरें काय ? ह्या दोन्ही पक्षांत जें जमीनअस्मानाचें अंतर पडलेलें दिसतें, ह्याचें कारण विधवांचे स्वाभाविक जे दोन भाग पडतात ते न पाडितां जीं विधानें त्या दोहोंपैकीं फक्त एकास लागण्यासारखीं आहेत, तीं दोहोंसही सारखींच लागू करणें हें आहे,

असें वाटतें. ह्या गोष्टींचा जे शांतपणें विचार करतील त्यांस मध्यम प्रमाणानें असें आढळून येईल कीं, दुर्दैवानें ज्यांस पतिसंभोगानंतर कांहीं काळानें वैधव्य आलें आहे अशा विधवा बेअब्रूनें वागणाऱ्या क्वचित्‌च आढळतील. तसेंच दुसऱ्या पक्षीं अर्वाचीन हिंदु धर्मानें घालून दिलेल्या नियमाप्रमाणें बाल्यापासून आमरणांत ब्रह्मचर्य पाळण्याचें सृष्टिविरुद्ध व्रत बिचाऱ्या दुर्दैवी बालविधवांपैकीं एखादी-च्याच हातून तडीस जात असेल, असेंही कबूल केलें पाहिजे.

ह्या विषयाचा यापेक्षां स्पष्ट रीतीनें ऊह करणें फार दुर्घट आहे. एक तर त्यांत रसिकता मुळींच नाहीं, शिवाय अमुक एक प्रत्यंतरावरून तो खरा किंवा खोटा करून दाखवितां येईल, असें खात्रीलायक सांगतां येणार नाहीं. अमुक लोकांत इतका व्यभिचार होतो असें अनुमान का-ढितां येण्यासारखी कोणत्याही समाजासंबंधानें माहिती मिळत नाहीं. बरें, बेकायदेशीर रीतीनें उत्पन्न झालेल्या मुलांच्या संख्येवरून हा अदमास काढूं म्हटलें तर तशी संख्या टिपून ठेवितां येईल व कोठें कोठें टिपलेलीही आढळेल हें खरें, परंतु त्यावरून अर्धवटच अदमास होऊं शकेल. कारण त्यांत विवाहित स्त्रियांची व्यभिचारजन्य संतति निराळी गणली जात नाहीं व मनुष्यमात्रावर मनो-विकारांचा जो स्वाभाविक पगडा आहे, त्यामुळें सार्वत्रिक होणारे असे चोरटे व्यवहार ज्यांत नाहींत असा कोणताही समाज नाहीं. खुद्द हिंदुस्थानाकडे पाहिलें असतां तेथें बालविवाहाची चाल असल्यामुळें व्यभिचार होण्याचा संभव

नाहीं. ह्मणून अनौरस संतति जी होते ती बहुधा विधवां-पासून झालेली आहे, असें मानलें तरी अशा जन्माची नोंद होण्यापूर्वीच बहुतकरून अब्रूकरितां छपवाछपवी होऊन जाते. तात्पर्य, ह्या विषयाविषयीं प्रत्येकास जो अदमास करतां येईल त्या अदमासावरून आपलें मत ठरविण्यावांचून दुसरा मार्ग नाहीं; व अशा रीतीनें ठरविलेलें प्रत्येकाचें मत थोड्याबहुत फरकानें भिन्न असावयाचेंच. असें जरी आहे तरी असंमत वैधव्यापासून व्यभिचार फार होतो असा या चालीवर मोठा जबरदस्त आरोप आहे, त्या अर्थी ह्या विषयाचा विचार केल्यावांचून गत्यंतर नाहीं. विधवाविवाहाच्या कायद्याचा ऊह झाला तेव्हां या मुद्याविषयींही असेंच ह्मटलें गेलें: "हा मुद्दा (ह्मणजे व्यभिचार) अगदींच बाजूला ठेवणें अशक्य आहे, कारण ह्या कायद्याचा आधारस्तंभ ह्मणजे तोच मुद्दा होय."

ज्यांना आपण प्रौढविधवा ह्मटलें आहे अशा विधवांपासून व्यभिचार फारच थोडा होत असेल असें मला निःशंक वाटतें. निदान विवाहित सपतीक स्त्रियांकडून होणाऱ्या अनीतीपेक्षां ह्यांच्याकडून होणारी अनीति खचितच जास्त नाहीं. ह्या बिचाऱ्या निष्कारण निंदेस पात्र झालेल्या विधवांची अशी सन्माननीय वर्तणूक राहण्याचीं तीन मोठीं कारणें आहेत. प्रथम लोकनिंदेचें भय आणि लोकांकडून चांगलें ह्मणवून घेण्याची इच्छा, ह्या दोन मनोविकारांनीं प्रौढविधवांचें पाऊल गैरमार्गांत पडण्यास मोठाच प्रतिबंध होतो. बहुतकरून मनुष्याचें आचरण समाजाच्या मतावर

अवलंबून असतें. हिंदु समाजामध्यें तर असल्या गोष्टी केवळ लोकमत जसें अनुकूल अथवा प्रतिकूल असेल त्याप्रमाणें चालतात. दुसरें, त्यांस धर्माचें भयही कमी असतें असें नाहीं. हिंदुधर्मशास्त्रानें विधवांस जरी उग्र ब्रह्मचर्य व दुसरीं अशींच कडक व्रतें पाळण्यास आज्ञापिलें आहे, तरी तसें आह्मीं काय ह्मणून वागावें, अशी कांक्षा एकीच्याही मनांत कधीं येत नाहीं आणि युरोपांत जशा नन्स ह्मणजे जोगिणी असतात, तशाच ह्याही आपलें आयुष्य आनंदानें वैराग्यांत घालवितात ( आतां ह्यापुढें धर्मश्रद्धा नाहींशी करून टाकणाऱ्या कारणांच्या सपाट्यांत विधवांच्या मनांतून धर्मभीति नाहींशी होण्याचा संभव आहे, ही गोष्ट निराळी. ) तसेंच सीता, सावित्री इत्यादि अनेक सुस्त्रियांची पातिव्रत्याविषयीं व एका पतीवरील पूर्ण निष्ठेविषयीं जीं अद्वितीय चरित्रें पुराणांत वर्णन केलीं आहेत, तीं चरित्रें नेहमीं श्रवण करणाऱ्या हिंदु स्त्रियांच्या मनाचा ओघ अशा पतिव्रतांचें अनुकरण करण्याकडे साहजिक असतो, तेव्हां यामुळेंही प्रौढ विधवांचें आचरण शुद्ध राहतें. तिसरें वयस्क विधवांस मुलांची व इतर नातलगांची संगोपनादि व्यवस्था पहावयाची असल्यामुळें त्यांच्यांत ममताळूपणा फार उत्पन्न होतो व जन्मभर श्रम करून व स्वहितास विसरून त्या दुसऱ्यांच्या उपयोगीं पडतात. मनुष्याच्या सुखाकरितांच ईश्वरानें स्त्रियांच्या मनाची कांहीं विशेष प्रकारची रचना केली आहे. सर्व जगांतील मनुष्यांची बाल्यावस्थेंत व दुखण्यांत शुश्रूषा नीट होण्यास मुख्यत्वेंकरून साधनीभूत असा स्त्रियांच्या अंगचा ममताळूपणा परमेश्वरानें

त्यांचे ठिकाणीं ठेवला आहे. हिंदु समाजांतील प्रौढ विधवांचें आयुष्य बहुतकरून उपयुक्तपणांत व दुसऱ्याचें सुख साधण्यांत व आपत्ति दूर करण्यांत जातें. कुटुंबांत बहुशः निरपेक्ष मदतगार व अल्पसंतुष्ट अशा पुढारणी त्याच असतात आणि स्वार्थावर मुळींच दृष्टि न देतां बिनतक्रार कुटुंबसुखाकरितां त्या अविश्रांत मेहनत करितात. क्याथोलिक धर्मांत नन्स ह्मणजे जोगिणी असतात, त्या परोपकार करण्याविषयीं शपथ आपखुशीनें घेतात. परंतु त्यांच्या आयुष्यक्रमांत अनेक अटी ठरविलेल्या असल्यामुळें त्यांची उपयुक्तता मर्यादित होते. त्यांहूनही अधिक हिंदु प्रौढ विधवेचा समजास उपयोग होतो. अशा वरील तीन कारणांनीं प्रौढ हिंदु विधवांचें आयुष्य बहुतकरून सदाचरणांत आणि परोपकारांत जातें. आतां त्यांत अपवाद नसतील असें नाहीं. परंतु असे अपवाद प्रौढ विधवांतच आहेत असें नाहीं. विवाहित किंवा अविवाहित सपतिक किंवा अपतिक कोणत्याही स्थितींत असल्या अपवादक स्त्रिया असल्या तरी त्यांची वर्तणूक एकच रहावयाची. अशांची संख्या विवाहित स्त्रियांपेक्षां विधवांत अधिक असेल असें मानण्यास कांहीं कारण दिसत नाहीं. पण बालविधवेची स्थिति प्रौढ विधवांच्या स्थितीच्या अगदीं उलट आहे. तिला मुलांचें संगोपन करावयाचें आहे, हें ह्मणणेंच संभवत नाहीं. बरें नातलगांची किंवा दुसऱ्या मित्रवर्गीयांची कांहीं व्यवस्था तिजवर सोंपली तर तिचें वय लहान असल्यामुळें ती तिच्यानें चांगली व्हावयाची नाहीं, व तिला त्याची हौसही नसते. ज्याच्या मृत्यूनें तिला आजन्म कष्टदशा प्राप्त झाली

त्याचें तिला कांहींच ज्ञान अथवा स्मरण नसतें; तेव्हां त्याच्या प्रीतीमुळें ती जन्मभर बांधलेली राहील हेंही असंभाव्य आहे. सीता, सावित्री वगैरे अलौकिक स्त्रियांची अद्वितीय चरित्रें देखील तिला केवळ भिंतीवर काढलेल्या चित्रांप्रमाणें निर्जीव वाटतात. कारण पतिप्रेमाचा तिला मुळींच अनुभव नाहीं. जनांत छीथू होण्याचें भय किंवा जनाचें बरें ह्मणून घेण्याची इच्छा ह्या दोनच गोष्टी काय त्या तिच्या दुर्वर्तनास आड येणार. परंतु प्रबळ होणाऱ्या नैसर्गिक कामेच्छेच्या झपाट्यापुढें अशा गोष्टींचा टिकाव कसा लागावा ? यामुळेंच ज्यांचा मनोनिग्रह लोकोत्तर आहे, अशा विलक्षण थोड्याशा साध्वींशिवाय बाकीच्यांचें पाऊल गैर मार्गांत पडतें यांत आश्चर्य कोणतें ? प्रत्येकाच्या आयुष्यांत एकदा तरी अशी वेळ येते कीं त्या वेळीं विषयवासना अत्यंत प्रबल होऊन त्याच्या डोळ्यांत एक प्रकारचें वेड भरतें. व जळीं, स्थळीं, काष्टीं, पाषाणीं त्यास विषयाशिवाय दुसरें दिसत नाहीं प्रत्येकास ह्या गोष्टीचा अनुभव आहेच. त्यावरून बालविधवेची, आपल्या सोबतिणी विवाहित स्थितींतील सुख मजेनें अनुभवीत आहेत असें पाहून एखादे वेळेस काय अवस्था होत असेल, ह्याची कल्पना सहज करितां येईल. तिचा मनोनिग्रह जर अद्वितीय असला तर गोष्ट निराळी. परंतु बहुतकरून कामदेवाच्या पहिल्या झपाट्यानेंच ती अविचाररूपी पूराच्या स्वाधीन होते; तो जबरदस्त पूर लोकापवाद, इष्टमित्रांची मर्यादा, व फजिती व उपहास ह्यानें तोंडास काळोखी येण्याचें भय, इत्यादि आड येणाऱ्या पर्वतांस न जुमानतां, त्यांस फोडून निघतो व त्या बिचारीस

दुर्वर्तनाच्या समुद्रास नेऊन मिळवितो. अशा भयंकर स्थितींतूनही कित्येक मनोनिग्रही हिंदु स्त्रिया किनाऱ्यास लागतात व पुन: त्या वाटेला कधींही न जातां व्रतस्थ राहून परोपकारांत आपलें आयुष्य घालवितात. ह्याबद्दल त्यांची जितकी धन्यता मानावी तितकी थोडीच. परंतु पुष्कळांची स्थिति ह्याच्या उलट होते. त्या ह्या लज्जासमुद्राच्या पृष्ठावर तरून त्यांतून पार पडण्याऐवजीं त्याच्या तळाच्या चिखलांत रुततात व त्यामुळें आपणा स्वत:स, आपल्या आप्तमित्रांस आणि आपल्या जातींस निंदेस पात्र करून खालीं पहावयास लावितात. इतकें जरी झालें, तरी त्या वास्तविक दयेसच पात्र आहेत. कारण ज्या कारणांनीं त्यांची अशी शोचनीय अवस्था होते तीं घडवून आणण्यांत त्यांचा काडीमात्र, दोष नसतो. ह्यासंबंधानें आणखी एक वाईट गोष्ट आहे, ती छपवून ठेवणें न्यायाचें होणार नाहीं. तरुण विधवांस दुर्वर्तनास प्रवृत्त करण्याच्या कामांत कित्येक पुरुष झटत असतात ! त्यांचाच ह्या कामांत मोठा दोष आहे. व्यभिचारांत बहुतकरून पुरुषाचें आचरण विशेष दोषास्पद असतें. कारण स्त्रियांचा स्वभाव साहजिक लाजाळू असल्यामुळें त्या आपण होऊन ह्या कामांत पुढाकार घेत नाहींत. दुष्ट दुर्वर्तनी लोकांच्या कारस्थानानें त्या बिचाऱ्या मोहपाशांत गुंतून जातात; यांत त्यांचा दोष कमीच आहे. असो; बालविधवांस समाजांत अविवाहित राहूं देऊन त्यांजकडून वशिष्टविश्वामित्रादिकांसही असाध्य असें ब्रह्मचर्य सखलें जाईल, अशी कल्पना करणें शुद्ध वेडेपण आहे. असे प्रबळ पाश असतांही त्यांतून कित्येक तरुण विधवा सुटून

जाऊन आपलें आयुष्य स्तुत्य रीतीनें घालवितात, हेंच खरो-खर फार आश्चर्य वाटण्याजोगें आहे. वराहमिहिरानें पुरुषा-पेक्षां या विषयांत स्त्रियांची प्रसंशा केली आहे.

तत्राशक्त्या निवर्तंते नरा धैर्येण योषितः ॥

" स्त्रियांचें आचरण पुरुषांपेक्षां फार स्तुत्य आहे. पुरुष शक्तिहीन झाल्यामुळें कामनिवृत्त होतात, पण स्त्रिया केवळ धैर्यानें कामास जिंकितात." वरील विवेचनावरून हें स्पष्ट ध्यानांत येईल कीं, अनीतीचा प्रकार बालविधवांच्या ठिकाणीं जितका दृष्टीस पडतो, तितका प्रौढविधवांत दिसत नाहीं. याजमुळें ज्या ज्या मनुष्यानें हिंदु समाजाची बार-काईनें चौकशी केली आहे, तो या भयंकर दुर्वर्तनाचा दोष एकट्या असंमत वैधव्याच्या चालीवरच ठेवीत नाहीं, तर बालविवाह व असंमत वैधव्य ह्या दोन्ही चालींवर ठेवीत आहे. कारण ह्या दोहों चालींच्या संयुक्त परिणामानें बाल-विधवांचा दुर्दैवी वर्ग उत्पन्न झाला आहे. हिंदु विधवावि-वाहाच्या कायद्याच्या उत्पादकानें वार्डसाहेबांच्या मताचा जो उतारा घेतला आहे, त्यांत हेंच थोडेंसें अतिशयोक्तीनें ह्मटलें आहे. " बालविवाहामुळें असाच एक आणखी भयं-कर परिणाम उत्पन्न होतो. बहुतेक मुली लग्नानंतर दोन तीन वर्षे बापाच्या घरींच असतात. त्यांतल्या कित्येक, पतिसमागमसुखाचा अनुभव एक दिवसही घेतल्याशिवाय विधवा होतात." नागपूरच्या एका ब्राह्मणाचें असेंच मत आहे, त्याच्या एक उतारा तेथेंच दिला आहे व त्याचाही भावार्थ असाच आहे. " ह्या विधवांच्या आणि विशेषेंकरून

बालविधवांच्या पुनर्विवाहाची बंदी ठेवणें अदूरदर्शित्वाचें आणि वेडेपणाचें आहे. कारण त्यापासून ह्या विधवा फार व्यभिचारी आणि दुर्गुणी होतात. "

नैसर्गिक वासनांच्या शक्तीस वश होऊन बालविधवा दुर्वर्तनास प्रवृत्त होतात, यापासून दुसरा एक इतका वाईट परिणाम होतो कीं, भूतदया आणि सदसद्विवेकबुद्धि त्यांजकडे पाहून लाजतात. ह्या विधवा पुष्कळदा गर्भिणी होतात, व ती गोष्ट फुटली असतां त्यांजवर व त्यांच्या दुर्दैवी कुटुंबावर लौकिकांत जी काळोखी येणार ती न यावी ह्मणून त्याजकडून भ्रूणहत्या व बालहत्या करण्यांत येतात. कधीं कधीं ह्या प्रयत्नांत त्या बिचाऱ्या स्वतःही जिवास मुकतात. इतक्यांतूनही कदाचित् हें कृत्य उघडकीस आलें, तर त्या पोरीची आणि तिच्या नातलगांची जी दुर्दशा होते, ती भाषेनें पूर्ण वर्णन करणें अशक्य आहे. पोलिसांनीं किंवा कुत्सित सूड उगविणारांनीं आजपर्यंत असले जे अनेक गुन्हे पकडिले आहेत, त्यांवरून ते किती वारंवार होतात, याचा चांगला अदमास होईल. त्या बिचाऱ्यांची भरकोर्टांत बेअब्रू होऊन शिक्षा तर होतेच, पण इतक्यानेंच त्यांची दुर्दशा संपत नाहीं. अशा शिक्षेनंतर त्यांस मृत्यु किंवा जन्मभर लोकांची निंदा यांतील एक पत्करावें लागतें.

प्रौढ विधवांकडून बालहत्या झाल्याच्या गोष्टी फारच क्वचित् होतात. तत्रापि विजयालक्ष्मीचा मुकदमा या संबंधानें प्रसिद्ध आहे. ती तरुण होती तरी बालविधवा नव्हती. तिच्या खटल्यावरून त्या वेळीं लोकांत फार दया

उत्पन्न झाली होती, तत्रापि वास्तविक पाहतां बालविधवे-
इतकी ती दयेस व क्षमेस पात्र नव्हती. तिचें अपील
ऐकणारे विद्वान जज्ज मि० जस्टिस वेस्ट, ज्यांच्यासारखा
विद्वान, शांत आणि न्यायी न्यायाधीश मिळणें फार दुर्लभ,
त्यांनीं देखील त्या खटल्याच्या फैसल्यांत नमूद केलें आहे
कीं, सरकारानें मेहर नजर करून माफ करण्यासारखा ह्या
बाईचा गुन्हा नाहीं. कारण विजयालक्ष्मीस नवरा हयात
असतांच एक मुलगी झाली होती, आणि त्यावरून पति-
सुखाचा अनुभव तिला नव्हता असें नाहीं. तिच्या
पुष्कळ कैवाऱ्यांस हें मत पसंत पडलें नाहीं. त्यांचें
ह्मणणें असें होतें कीं कामविकार जिंकण्यास अल्प काळा
पर्यंत भोगलेलें पतिसुख पुरेसें होत नाहीं. ह्या खटल्याचा
थोडक्यांतच कां होईना, येथें उल्लेख करण्याचें कारण,
विधवेनें हिंदुधर्मशास्त्रांत सांगितल्याप्रमाणें ब्रह्मचर्य पाळावें,
तें न पाळल्यास ती दोषास पात्र आहे, असें केव्हां ह्मणतां
येईल ह्मणजे कोणत्या स्थितींत तिनें व्यभिचार केला
असतां तो केवळ आपल्या बदफैली स्वभावामुळें केला, असें
समजून तिला दयेस अपात्र ठरवावी, ह्याविषयीं वर लिहि-
ल्याप्रमाणें मतभेद उत्पन्न झाला आहे. ह्या संबंधानें
दोन गोष्टी तर उघडच आहेत. मनोविकारांच्या तडा-
क्यांत सांपडून बालविधवेचें पाऊल कुमार्गांत पडल्यास
त्याबद्दल तिला क्षमा करणें अगदीं अवश्य आहे. त्याच-
प्रमाणें ज्या विधवेस विवाहित आयुष्याचें सुख पुष्कळ प्राप्त
झालें आहे, ह्मणजे उदाहरणार्थ जिला मुलेंबाळें झालीं आ-
हेत, तिनें ब्रह्मचर्यानें आणि विरक्ततेनें राहणें हें शक्य आहे

व तसें राहण्यांस तिला विशेष अडचणीही यावयाच्या ना- नाहींत. आतां ह्या दोहोंच्या मधल्या स्थितींत असणाऱ्या ह्मणजे ज्यांनीं किंचित् पतिसुख अनुभविलें आहे अशा विजयालक्ष्मीसारख्या तरुण विधवांविषयीं मात्र मतभेद व्हाव- याचा संभव आहे. अशा बाबतींत कांहीं तरी एक निश्चित मर्यादा ठरविणें हेंच अत्यंत सोईचें व न्यायाचें आहे, असें कोणीही कायद्याचीं तत्वें जाणणारा कबूल करील. हेंच मनांत आणून अक्षतयोनित्वाची शास्त्रानें मर्यादा केली आहे व तीच जस्टिस वेस्ट यांणींही घेतली आहे. माझ्या मतें जस्टिस वेस्ट यांचें मत व्यवहारदृष्ट्या आणि न्यायदृष्ट्या विशेष ग्राह्य वाटतें. असें न केलें तर किती दिवस पतिस- हवास झाला असतां तो पुरेसा ह्मणावयाचा; एक महिना समजावा किंवा एक वर्ष समजावें कीं दोन हा प्रश्न सोड- वावा लागेल व तो सर्वसंमत रीतीनें सोडविणें अशक्य आहे.

क्षतयोनि विधवांनीं ब्रह्मचर्यानें आणि विरक्तपणानें रहावें हा स्मृत्युक्त नियम मनुष्याच्या नैसर्गिक स्वभावाशीं अगदीं विरुद्ध आहे असें नाहीं, तो सिद्धीस नेणें असाध्य नाहीं, उलट त्यापासून स्त्रियांची उपकारबुद्धि व उप- युक्तता वाढते, इत्यादि गोष्टी वरील विवेचनावरून कबूल कराव्या लागतील. पण प्राचीन कालीं रूढ असलेल्या अक्षतयोनि पुनर्विवाहाचा निषेध करणारा नवीन कलि- वर्ज्य नियम अमानुष आहे; तो पाळण्यापेक्षां मोडण्या- कडे आचरणाची अधिक प्रवृत्ति आहे; बहुतेक बालविध- वांच्या दुर्वर्तनाचा आणि नाशाचा तो पाया आहे; व शिवाय प्रत्यक्ष हिंदुधर्मानें महा घोर मानलेली भ्रूणहत्या आणि बाल-

हत्या हीं पापें त्याच्याच योगानें घडत आहेत, यांत तिळप्राय संशय नाहीं. तात्पर्य लोकगुप्तीकरितां केलेला हा कलिवर्ज्य नियम लोकनाशास मात्र मदत करीत आहे. कलियुगांत व्यभिचार फार होणार असें वाटून तसें होऊं नये ह्मणून हा नियम केला असेल, तर उलटें कलियुगाचें भाकीत ह्या नियमामुळेंच पुष्कळ अंशीं खरें झालें आहे, असें ह्मणावें लागतें. बरें लोकगुप्ति ह्याचा अर्थ जातीचें शुद्धत्व राखणें असा असेल असें ह्मणावें, तर तेंही साधतें आहे असें वाटत नाहीं. लोकगुप्ति शब्दाचा आणखीही एक अर्थ होऊं शकतो, त्याचा विचार आपण पुढें करूं.

असंमत वैधव्याच्या चालीवर दुसरा आरोप असा आहे कीं, त्यामुळें विधवांची फार गांजणूक होते व त्यांचा नेहमीं तिरस्कार व अपमान होत असतो. हा आरोप प्रौढ विधवांच्या संबंधानें पाहिला असतां फारसा खरा आहे, असें ह्मणतां येत नाहीं, पण बालविधवांच्या संबंधानें तो अक्षरशः खरा आहे. दिवाणबहादुर रघुनाथरावांनीं यासंबंधानें बाल-विधवेच्या दुःखद स्थितीचें हृदयद्रावक पण खरें चित्र वठ-विलें आहे:—

"आपल्यास वैधव्य प्राप्त झालें आहे ह्या गोष्टीची त्या बिचारीस प्रथम कल्पना देखील नसते. ती नेहमींप्रमाणें आपल्या विवाहित सोबतिणींबरोबर खेळावयास जाते. कोठें कांहीं वाजत गाजत चाललें तर ती लहान पोरींबरोबर धांवत धांवत जाते. पण बालविधवेचा अपशकून फार वाईट मानला जातो, ह्मणून त्या बिचाऱ्या निरपराध मुलीस ओढून

नेतात व तीं रडूं लागली तर तिला विचारीस रट्टे खावे लागतात. यावरही "सटवे, मागच्या जन्मीं काय पातक केलेंस त्याचें फळ आतां भोगते आहेस; आपलें तोंड काळें करायचें टाकून बाहेर कोठें मिरवायला चाललीस?" वगैरे एक का दोन नानाप्रकारचें शब्दांचा तिजवर वर्षाव होतो याचा अर्थ प्रथम तिला पुरता कळत नाहीं, पण जसजसा तो कळूं लागतो, तसतसें तिला अधिकाधिक दुःख होऊं लागतें. तिचा अपशकून अधिकच मानूं लागतात. तिच्यामागें उपास, नक्तें, व्रतें लागतात व शेवटीं तिचें केशवपन करून टाकतात." याप्रमाणें बालविधवेची गांजणूक व निंदा होते. व तिचें अल्प वय असल्यामुळें ही तिची स्थिति तिला अधिकच दुःसह होते. तिला वारंवार लावून बोललेले शब्द तिच्या कोंवळ्या मनाला बाणासारखें टोंचतात. तिला डागडागिन्यांची व मिरविण्याची साहजिक हौस असल्यामुळें मंगलकार्यांतून तिची धिंड बाहेर घालवितात, हें तिला असह्य वाटतें. उपास व दुसरीं कडक व्रतें तिच्याकडून करवितात, तीं तिला फारच जड जातात, कारण एक तर तिची कोंवळी भूक तिला मारवत नाहीं व दुसरें, ज्या धर्मनिष्ठेच्या योगानें शारीरिक व्यथा तुच्छ वाटतात, ती तिला अद्याप प्राप्त झालेली नसते. सारांश, विधवांना जो आयुष्यमार्ग घालून ठेविला आहे तो बहुतेक बालविधवांस त्यांचे मनोविकार व शरीरशक्ति शिथिल होईपर्यंत अत्यंत असह्य होतो.

प्रौढ विधवांची गोष्ट तशी नाहीं, हें कबूल करणें भाग आहे. त्यांना कुटुंबांत कोणीही टोंचून बोलत नाहींत.

आईच्या किंवा बहिणीच्या अथवा भावजयांच्या नात्यानें बहुतकरून त्याच कुटुंबांत मुख्य असतात. त्यांचीं स्वतःचीं मुलें असल्यास तीं त्यांजवर अत्यंत प्रीति करितात आणि इतरांकडूनही त्यांना मान मिळतो. घरांत शुभ अशुभ कांहींही कार्य करावयाचें असलें, तरी त्यांत त्यांची सल्लामसलत घेतल्याशिवाय चालत नाहीं. आणि कोणत्याही समारंभांत त्या जात नाहींत व त्या स्वतः नटतही नाहींत, तरी त्यांच्या जवळ असण्यापासून कोणीही अपशकुन मानीत नाहीं, व बहुतेक प्रसंगीं तर त्या हरएक प्रकारची मदत देण्यास जवळ असाव्याच लागतात. महाराणी विक्टोरियाविषयीं एके ठिकाणीं प्रशंसादर्शक असें लिहिलें आहे कीं, "ती मोठी धैर्यवान् विधवा आहे, कारण तिला विधवा होऊन इतकीं वर्षे लोटलीं, तरी तिनें डामडौल आणि चैन सोडली ती सोडली; राणी ह्या नात्यानें मात्र तिला कधीं कधीं डामडौल करावा लागतो, ती गोष्ट स्वतंत्र." पाश्चिमात्य देशांतील एकंदर स्त्रियांची स्थिति पाहतां ह्या मनोनिग्रहाची खरोखरच प्रशंसा करावी तितकी थोडी. हिंदुस्थानांत असा आयुष्यक्रम आपखुशीनें स्वीकारणाऱ्या बहुतेक प्रौढ विधवा आहेत. आपल्या मुलांबाळांकरितां किंवा दुसऱ्याकरितां सर्व समारंभांची व उत्सवांची तयारी त्यांसच करावी लागते, तरी त्या स्वतः सर्व चैनींपासून दूर राहतात, आणि आपल्या इष्टांचा सुखसोहळा दृष्टीनें पाहण्यांतच सुख मानितात. प्रौढ विधवा जे उपासतापास करितात, ते त्या आपल्या खुशीनेंच करितात व त्यांस त्या वयांत त्यांचें कांहीं जड वाटत नाहीं, इतकेंच नाहीं, अशा व्रतांपासून उलट

त्यांच्या आरोग्यांत आणि आयुष्यांत भर पडते, व त्या पुष्कळ वर्षे वाचतात ही गोष्ट प्रसिद्धच आहे. आतां त्यांतल्या कित्येक अतिशय धर्मवेडानें आपले फार हाल करून घेत असल्यास, गोष्ट निराळी, पण साधारण रीत्या त्यांचा जो भक्तिमार्गाचा आयुष्यक्रम आहे तो त्यांनीं सोडावा, असें कोणासही वाटणार नाहीं. तात्पर्य, प्रौढ विधवांस कोणीही कठोर शब्द बोलत नाहीं, त्यांस कोणीही जाचणूक करीत नाहीं. परंतु याउलट, त्यांस नेहमीं मान मिळतो; बहुतकरून त्या कुटुंबातल्या अग्रणी असतात व विरक्तपणानें व धर्माज्ञेप्रमाणें वागण्याविषयीं त्यांची स्वतःचीच इच्छा असून ती तडीस नेण्याची हिंमतही त्यांच्या आंगांत असते; बरें, त्यापासून त्यांस कांहीं तोटा होतो, असेंही नाहीं, उलट त्यांचें आरोग्य कायम राहून त्या पुष्कळ वर्षे जगतात.

असंमत वैधव्याच्या चालीवरील बऱ्याच महत्वाचा असा तिसरा व शेवटला आरोप हा आहे कीं, विधवांस वैधव्य भोगावयास लावणें हें जुलुमाचें आहे, त्यांच्या खुशीवर अवलंबून नाहीं; व हा नियम अन्यायाचा व पक्षपाताचा आहे. स्त्रियांस पुनर्विवाहाची मोकळीक असती, तर त्या आपखुशीनें अशा राहिल्या असत्या काय ? पुरुषांस मात्र पाहिजेत तितके विवाह करितां यावे, आणि स्त्रिया बिचाऱ्या दुर्बळ ह्मणून त्यांस जन्मभर असंमत वैधव्य भोगण्यास लावावें असें कां ? एक हिंदु स्त्री ह्मणतेः– " आपण अशी कल्पना करूं कीं, कोणा पुरुषाची बायको मेली असतां त्यानें जन्मभर ब्रह्मचर्य स्वीकारावें, वाईटसाईट खावें, जाडें भरडें वस्त्र दुःखप्रदर्शनार्थ वापरीत जावें, आणि सदोदित देह जाळणारीं व्रतें

आचरीत असावें, असा जर नियम मन्वादिकांनीं केला असता, तर, पुरुषांनीं तो मानला असता काय? छे छे, त्यांनीं लागलीच चवताळून असल्या प्रकारचें जोखड त्यांजवर ठेवणारा मनु व तद्वर्गीय रानटी आहेत असें ठरविलें असतें व त्याचे कायदे कधींच झुगारून दिले असते, ह्यांत मला काडीमात्र शंका वाटत नाहीं." सुधारक पक्षाची मूळ ओरड अशाच प्रकारची आहे. "ते आपल्या देशभगिनींचें व मुलीबाळींचें दुःखविमोचन हिंदुशास्त्राचा युक्तिवादानें नवीन अर्थ करून साधण्यास इच्छीत नाहींत, तर लोकांच्या न्यायदृष्टीस व दयाबुद्धीला पाझर पाडून त्याजकडून करवूं पाहतात."

हा अन्यायित्वाचा आरोप अक्षतयोनि विधवांसंबंधानें आणि क्षतयोनिविधवांसंबंधानेंही खरा आहे, ह्यांत संशय नाहीं. पुनर्विवाहाची परवानगी असती तर एखादा अपवाद शिवाय करून सर्व अक्षतयोनि विधवांनीं पुनर्विवाह केले असते, हेंच संभवनीय दिसतें. आतां पुष्कळ प्रौढ विधवा आणि विशेषेंकरून ज्या पोक्त आणि मुलेंबाळें झालेल्या आहेत, त्यांस अशी परवानगी दिली, तरी देखील त्या पुनर्विवाह करणार नाहींत असें जरी आहे, तरी वैधव्यव्रत हें असंमतच आहे. ह्मणजे तें कडक व्रत पाळावें अथवा न पाळावें हें त्यांच्या खुशीवर अवलंबून नाहीं, ही एका प्रकारची जबरदस्ती आहे. तसेंच स्त्रीपुरुषांचा स्वभाव बहुतेक सारखाच असल्यामुळें असें तापसी आयुष्य कित्येकांस कदाचित् प्रिय नसेल, हें कोणीही कबूल करील. तात्पर्य,

हा आरोप थोड्याबहुत प्रमाणानें दोन्ही प्रकारच्या विधवां-संबंधानें खरा आहे, असें कबूल करावें लागतें.

परंतु उलट पक्षाचें याजवर उत्तर असें आहे कीं, एवढ्यानेंच ह्या प्रश्नाचा उलगडा होतो असें नाहीं, दुसऱ्या बाजूनेंही त्याचा विचार केला पाहिजे. समाजाचे नियम सर्वस्वी निःपक्षपाताच्या आणि न्यायाच्या तत्वावर झालेले नाहींत व कधींही व्हावयाचे नाहींत, हें पक्कें ध्यानांत ठेविलें पाहिजे. फ्रान्स देशांतील वरील तत्वांच्या कट्टया अभिमान्यांनीं फ्रेंच समाजरचना त्या तत्वावर उभी करण्याकरितां केलेला प्रयत्न कसा फसला, व ते कसे तोंडघशी पडले हें सर्वांस माहित आहेच. तसेंच मनुष्य प्राणी तेवढे सर्व सारखे व समानहक्काचे असावे असें मानणाऱ्या ह्युमानिस्ट लोकांचें ह्मणणें आहे कीं, मालमत्तेविषयींचे सर्व कायदे नाहींतसे केले पाहिजेत. ते असें ह्मणतात कीं, जो आपल्या श्रमानें मालमत्ता मिळवितो, त्यानें ती उपभोगावी हा नियम न्याय्य आहे; परंतु श्रीमंताचा मुलगा कांहीं एक श्रम न करितां श्रीमंत काय ह्मणून व्हावा? श्रीमंत किंवा मोठ्या घराण्यांत जन्म होणें हा फक्त काकतालीय योग आहे. श्रीमत लोकांचीं पुष्कळ मुलें अशीं निपजतात कीं, त्यांस दारिद्र्यावस्था असणें हेंच योग्य. व त्याप्रमाणें तीं भिकेसही मिळतात; तसेंच कित्येक गरिबांचीं मुलें श्रीमंतीच्या लायकीचीं असतात. थोर पुरुषांचीं कित्येक पोरें हलकट निपजतात व हलकटांचीं कित्येक मुलें थोर व उदार असतात. परंतु असा पात्रापात्र विचार न करितां बापाची संपत्ति आणि पदवी मुलास प्राप्त व्हावी, असा कायदा केला

आहे तो ह्या उग्रनीतितत्वांप्रमाणें अन्यायाचा ठरला पाहिजे. योग्य न्याय ह्मटला ह्मणजे एकादा मनुष्य मेला असतां त्याची सर्व मालमत्ता राष्ट्रास जावी व नंतर कोणाचें कुळ कसें आहे इकडे बिलकूल लक्ष न देतां जे मनुष्य त्या राष्ट्रांत योग्य ठरतील त्या सर्वांत ती सारखी वांटून द्यावी. हें तर असूं द्या. राजाचा मुलगाही राजा व्हावा हें कां? केवळ राजकुलांत जन्म झाल्यामुळें राजे झालेले पुष्कळ पुरुष जुलमी आणि दुर्व्यसनी निघाले आहेत; ते इतके कीं, स्वतःलाही काळोखी लावून घेऊन हजारों लोकांवर जुल्म करून त्यांचा त्यांनीं नाश केला आहे. तेव्हां राज्यपद राष्ट्रांतील अतिशय सद्गुणी, बुद्धिवान् व कर्तबगार मनुष्यास वास्तविक मिळावें, तसें कां होत नाहीं? सर्व मनुष्य प्राणि तेवढे सारखेच मानिले असतां असे पुष्कळ प्रश्न उद्भवतील. व त्यांची निःपक्षपाताच्या न्यायानें सुयुक्तिक उत्तरें देणें मुष्किलीचें आहे.

परंतु मनुष्यामनुष्यांत फरक केल्यानें त्यापासून समाजाला किती उपयोग होतो हें पाहिलें ह्मणजे ह्या अन्यायाची आवश्यकता आहे असें कळतें. श्रीमंत बापाची मालमत्ता त्याच्या मुलास मिळूं नये असा जर कायदा केला, तर संपात्ति मिळविण्याची हौस कोणासही राहणार नाहीं. कारण मुलाविषयीं बापाच्या अंतःकरणांत स्वाभाविक प्रेम असल्यामुळें त्याचें कल्याण होण्याची आशा आहे तोंपर्यंतच तो पैसा मिळविण्याचा खटाटोप करील. संपत्ति नसणारे पुष्कळ लोक उदासीनतेनें आयुष्य घालवितात, असें आपल्या हमेश दृष्टीस पडतें. शिवाय असा नियम केला

असतां मनुष्याचा उधळेपणा व चैनबाजीही फार वाढेल. कारण आपल्या आयुष्यापर्यंत संपत्ति उपभोगास मिळून नंतर राष्ट्रास जावयाची असल्यामुळें तो होईल तितकी चैन व खर्च करून सरकारांत जावयाचा पैसा होईल तितका कमी करील. ह्या सर्व अडचणी सोसून संपत्ति सारखी वांटून देण्याची पद्धति ठेविलीच तर त्यापासून नेहमीं तंटे व लढाया उत्पन्न होतील. पूर्वापार हक्क आणि पदव्या यांच्या संबंधानें लढाया खात्रीनेंच होतील. सरदारी वगैरे मोठे हुद्दे जर वंशपरंपरा न चालतां राजानें योग्य मनुष्यास द्यावे असें केलें, तर त्यांवर फार उड्या पडून ते प्राप्त होण्याकरितां लोक अनीतीचें अवलंबन फार करूं लागतील; शिवाय तंटे व रक्तपात होतील ते वेगळेच. तात्पर्य, सर्व मनुष्यांस सारखेंच वागवावें हा नियम पाहिला असतां समाजांतील पुष्कळच गोष्टी अन्यायाच्या ठरतील. परंतु त्यांपासून होणारे परिणाम पुष्कळ तऱ्हेनें चांगले असल्यामुळें, त्याच न्यायाच्या आहेत असें ह्मणावें लागतें. या कारणाकरितां, विधवाविवाहनिषेध अन्यायाचा आहे, कारण पुरुषांप्रमाणें स्त्रियाही मनुष्यच आहेत, ह्मणून विधवा तरुण अथवा ह्मातारी असली तरी तिची इच्छा असल्यास पुनर्विवाह करण्याविषयीं तिला मोकळीक असणें वाजवी आहे, असें उपनीतीच्या तत्वांच्या आधारें प्रतिपादन करणें नीट नाहीं. तर त्या चालीपासून एकंदर समाजाचें काय हित अथवा अहित आहे, याचा शोध करणें जरूर आहे. ह्मणजे केवळ निःपक्षपाताच्या तत्त्वावर आपलें मत ठरवून

चालावयाचें नाहीं; निःपक्षपात आणि उपयुक्तता ह्या दोन्हीं-चाही विचार करून तें ठरवावें लागेल.

आतां एकंदर समाजाच्या हिताहिताचा विचार केला असतां प्रौढविधवांच्या पुनर्विवाहाचा निषेध असल्यापासून विशेष अहित आहे, असें नाहीं व कांहीं फायदेही आहेत असें पुष्कळ ठिकाणीं प्रतिपादन केलेलें आढळतें त्याचा विचार केला पाहिजे. स्त्रियांचा स्वभाव जात्या कनवाळू आहे व कुटुंबांत आणि समाजांतही त्याचा उपयोग होण्यासारखीच त्यांची मनोरचना परमेश्वरानें केली आहे हें मागें सांगितलेंच आहे. पुरुषांचा स्वभाव तसा नसतो. त्यांची दृष्टि नेहमीं निव्वळ फायद्याकडे असते. प्रौढ विधवांच्या आंगीं ब्रह्मचर्यादि व्रताचरणानें परोपकारबुद्धि व दयालुत्व जास्त येतें आणि त्या स्वतः जरी दुःखी असतात तरी इतरांचे हाल कमी करण्यास झटतात. अशी गोष्ट पुरुषांची होऊं शकत नाहीं. पुरुष जेव्हां जेव्हां ब्रह्मचर्य स्वीकारितात तेव्हां कांहीं अपवादक उदाहरणें खेरीज करून ते कोणत्याही उपयोगास येत नाहींत, उलट ते इतरांस भारभूत होतात. प्रौढ विधवांस जर पुनर्विवाहाची परवानगी दिली, तर त्यांची उपयुक्तता सर्व नाहींशी होऊन त्यांची वृत्ति चंचल आणि चैनी मात्र होईल; आणि इतकें होऊन प्रौढ विधवांपैकीं बहुतेकींचीं लग्नें होण्यास मोठी पंचाईत पडून त्यांस अविवाहित राहणें भाग येईल. इतर देशांकडे पाहिलें तरी फारच थोड्या प्रौढ विधवांचे पुनर्विवाह होऊं शकतात असें आढळतें, व त्याही श्रीमंत असतील तरच कोणी तरी त्यांस वरतो. वयस्क पण श्रीमंत

विधवांच्या लग्नांचे धिंडवडे पाश्चात्य देशांत कसे होतात तें प्रसिद्धच आहे. त्यांना मनाजोगा नवरा मिळत नाहीं, ह्मणून कोणी तरी तरुण पण गरीबसा नोकर चाकर असेल त्याशींच बहुतकरून त्यांस लग्न लावावें लागतें. अर्थात् तो तिच्या पैशापुरता नवरा असतो; खुद्द तिची तो मुळींच पर्वा करीत नाहीं. विधुरांची अवस्थाही विधवांसारखीच असते. त्यांच्यांत फक्त तरुणांचीं व श्रीमंतांचीं मात्र लग्नें होतात. तात्पर्य, प्रौढ विधवांपैकीं बहुतेकींस जर अविवाहित राहणें भाग आहे, तर त्या सर्वांनींच अविवाहित राहून होईल तितकें समाजाच्या उपयोगीं पडावें व परोपकारी व्हावें हें समाजाला फार हिताचें आहे. नाहीं तर दुसरें लग्न करण्याच्या उत्कट इच्छेमुळें पुरुषांस मोहित करण्याकडे त्या सर्वांचेंच आयुष्य फुकट जाणार; व शेवटीं फळप्राप्ति पाहिली तर थोडक्यांनाच. वृद्ध विधवांची संपत्ति तरुण पुरुषांस भुलवून आपल्या मोहजाळ्यांत गुंतवण्याकडे जी खर्ची पडते, त्यापेक्षां पुष्कळ चांगल्या कृत्यांकडे तिचा व्यय करतां येण्यासारखा आहे.

पण वरील ह्मणण्यापैकीं एकही गोष्ट अक्षतयोनि विधवांस लागू पडत नाहीं. त्यांपैकीं बहुतेकींचीं लग्नें होण्यास मुळींच हरकत येणार नाहीं. नाइलाजामुळें कदाचित् शेंकडा एखादीसच अविवाहित राहावें लागेल. प्रौढ विधवांप्रमाणें त्यांजपासून समाजास उपयोग होईल असें ह्मणावें, तर तेंही होणें अशक्य. कारण त्यांचे मनोविकार प्रबळ असल्यामुळें व वय लहान असल्यामुळें सोशिकपणाची व परोपकाराचीं

कर्लें त्यांचेकडून होऊं शकत नाहींत. याशिवाय चारचौघांत जाण्याची लाज वाटून त्या एकांतांत काळ काढितात, व लोकही त्यांचा तिटकाराच करितात. एकंदरीनें पाहतां ह्या बिचाऱ्या तरुण पोरींस व्रतस्थ रहावयास लावण्यानें व ब्रह्म चर्य त्यांजवर लादल्यानें कोणत्याही प्रकारचा समाजाचा फायदा नाहीं.

सृष्टिनियमाप्रमाणें लहान मुलांचें संगोपन करण्याचें काम स्त्रियांकडे आहे, पुरुषांकडे नाहीं. तीं चांगलीं वयांत येऊन आपलें संरक्षण आपण करितीलशीं होईपर्यंत स्त्रियांस त्यांची काळजी घ्यावी लागते. आतां एकाद्या मुलें असलेल्या विधवेनें जर पुनर्विवाह केला तर ती बिचारीं सावत्र बापाच्या हातीं जावयाचीं, व असल्या बापाचें प्रेम त्यांजर किती असणार, हें सांगावयास नकोच. डिकिन्सनें अशा एका मुलाच्या स्थितीचें हृदयद्रावक हुबेहुब वर्णन एका कादंबरींत केलें आहे. प्रत्येक जण बाह्यात्कारीं त्यास खुषी राखण्याकरितां व त्याची हौस पुरविण्याकरितां होईल तितकें करून झटत आहे, असें दिसतें, तरी खरोखर पाहिलें असतां त्याला रोजच्या रोज मार मिळावयाचा, जाचणुक व्हावयाची, आणि खाण्याचे हाल असावयाचे. परक्या घरीं मुलें गेलीं ह्मणजे त्यांची अशी स्थिति हटकून होते. त्यांच्या मालमत्तेचीही कोणी का-ळजी घेत नाहीं. येऊन जाऊन आईची ममता तेवढी असणार, पण तीही तिला नवीन घरची संतति झाली ह्मणजे कमी होते. याप्रमाणें मुलांची अनास्था होण्याचा

संभव आहे. तसेंच प्रौढ विधवांस पुनर्विवाहाची मोकळीक दिल्यास आपली कुटुंबव्यवस्था आणि दायविभाग ह्यांत मोठा फरक आणि घोंटाळा होऊन जाईल, असेंही जुन्या मतांच्या लोकांचें ह्मणणें आहे.

पण हेही परिणाम अक्षतयोनि विधवाविवाहापासून होणार नाहींत यांत संशय नाहीं. तिचें नवऱ्याच्या कुटुंबांत राहणें दुःखद असतें व बापाच्या कुटुंबांतही त्यासारखेंच असतें. तिनें पुनर्विवाह केला असतां कोणतीच भानगड व्हावयाचा संभव नाहीं, व तिच्या पोरांचीही गैरसोय व्हावयाची नसते. कदाचित् तिनें दत्तक घेतला असेल तर त्यासही तिजजवळ राहण्यापेक्षां आपल्या खऱ्या आईबापांजवळ राहणें अधिक सुखकर वाटतें. तिचा पुनर्विवाह होऊं दिला तर दोन्ही घराण्यांत तिची जी विनाकारण पीडा असते, ती नाहींशी होईल, कोणत्याही मुलाची अनास्था होणार नाहीं व कोणतीही कुटुंबव्यवस्था किंवा दायविभागक्रम बिघडणार नाहीं.

विवाहित आयुष्यक्रमाची शांतता आणि स्त्रीपुरुषांचें ऐक्य ह्या गोष्टी हिंदु कुटुंबांत विशेष असतात अशी सर्वत्र ख्याति आहे. हा परिणाम विधवांस लग्न करण्याची बंदी आहे व तसेंच स्त्रीपुरुषांस काडी मोडून देण्याचीही मनाई आहे, ह्यामुळें अप्रत्यक्ष रीतीनें घडून येतो असें आपणांस कबूल केलें पाहिजे. पूर्वी रोमन लोकांत पाहिजे तेव्हां नवरा किंवा बायको सोडून देण्याची मोकळीक असल्यामुळें स्त्रीपुरुषांत जो ब्रह्मघोटाळा होता व एकमेकांविषयीं जी शिकस्त बेपरवाई असे ती, खिस्ती धर्मानें ही मोकळीक कांहीं

विशेष प्रसंगींच आहे असें ठरविल्यामुळें नाहींशी झाली. हिंदु लोकांत तर काडी मोडण्याचा स्त्रीपुरुषांस मुळींच हक्क नाहीं आणि पुनर्विवाह करण्याचीही मोकळीक नाहीं, ह्यामुळें हिंदु स्त्रिया, नवऱ्याची कोणतीही स्थिति असो, तींत सुख मानून राहण्यास व नवराबायकोच्या स्वभावांत मेळ नसल्या-मुळें जीं भांडणें व तंटे पुष्कळ ठिकाणीं होतात त्यांत आपण नमतें घेण्यास उत्सुक असतात. पुरुषांवर देखील जर अशा अटी घातल्या तर तेही हल्लींपेक्षां बायकांची काळजी जास्त घेऊं लागतील ह्यांत संशय नाहीं. कोणत्याही कारणानें काडी मोडून बायकोचा संबंध तोडतां येत नाहीं हा एक पुरुषाच्या लहरीस थोडासा प्रतिबंधच आहे; कारण एक बायको असल्यास दुसरी सहसा त्यास मिळत नाहीं. आतां दुसरा प्रतिबंध जरी एकट्या स्त्रियांसच लागू आहे, तरी तेवढ्यापासून बरेच फायदे आहेत. स्त्री ही संसाराची मुख्य मेढ आहे, तिचें ह्या प्रतिबंधामुळें संसारांत चांगलें लक्ष लागतें, ती कधीं कंटाळत नाहीं व नवऱ्याचें वाईट व्हावें असें कधींही इच्छित नाहीं.

परंतु हेंही ह्मणणें बालविधवांस लागू पडत नाहीं. लोक-गुप्ति ह्या शब्दाचा अर्थ कित्येक लोकांच्या मताप्रमाणें, वर वर्णिलेली कुटुंबांतील शांतता व ऐक्य असा असेल व ती साध्य करण्यासाठींच जर अक्षताविधवाविवाहनिषेध कलि-वर्ज्य प्रकरणांनीं योजिला असेल, तर तो निरर्थक आहे असें वाटतें. कारण बिचारी बालविधवा कधींच नवऱ्याचे सहवा-सांत राहिलेली नसते, तसेंच नवऱ्याची स्थिति वाईट अस-

त्यामुळें अथवा त्याच्या व हिच्या स्वभावाचा बेबनाव असल्यामुळें ज्या अडचणी यावयाच्या, त्यांचा तिला कधींच अनुभव आलेला नसतो. तात्पर्य, तिला नवऱ्याच्या स्वभावाचा त्रास वाटावा किंवा त्याच्याबरोबर आयुष्य कंठण्याची पाळी नकोशी वाटावी, अशा स्थितींत ती येण्यापूर्वीच तो मरून गेलेला असतो; जणूं काय तिचें लग्नच झालें नाहीं, अशा स्थितींत ती असते. तिला जर पूर्वीच्या युगांतील नियमाप्रमाणें पुनर्विवाहाची मोकळीक दिली तर कांहीं अनिष्ट परिणाम होतील असा संभव दिसत नाहीं.

जगांतील इतर बायकांपेक्षां हिंदु स्त्रियांची नवऱ्यावर अधिक प्रीति असते कीं काय हें सांगवत नाहीं. परंतु दुर्दैवानें प्राप्त झालेल्या स्थितीस त्या कंटाळत नाहींत व दुर्दैवाच्या तडाक्यांत देखील समाधान मानितात, हे हिंदु स्त्रियांचे अद्वितीय गुण आहेत. कांहींकांच्या मतें हे चांगले परिणाम बालविवाहापासून उत्पन्न होतात, असें आहे. परंतु ही कल्पना चुकीची आहे हें मी तिसऱ्या अंकांत दाखविलेंच आहे. कारण कांहीं जातींत मुलींचे विवाह प्रौढ वयांत करण्याची चाल आहे तरी त्यांतील स्त्रियाही इतर हिंदु स्त्रियांइतक्याच सुखी व समाधानी असतात. ह्यावरून वर सांगितल्याप्रमाणें पुनर्विवाहाचा निषेध व लग्न रद्द करण्याची मनाई ह्याच दोन चालींचा हा परिणाम आहे, असें मला वाटतें. ह्याच संबंधानें पुनर्विवाहाच्या निषेधाविषयींचे टॅसिटसचे शब्द येथें उतरून घेण्यासारखे आहेतः—" जसे शरीर व जीव आपल्यास एकेकच अस-

तात तसा त्या (जर्मन स्त्रिया) एकच नवरा करितात. त्याच्या पलीकडे त्यांचे विचार व इच्छा कधीं जातच नाहींत. व त्याजवर त्या नवरा ह्मणूनच प्रीति करितात असें नाहीं, तर विवाहसुखाचा काय तो मूर्तिमंत पुतळा तोच असें त्या मानितात." जिला नवऱ्याची प्रीति ह्मणजे काय हें मुळींच माहित नाहीं, अशा बालविधवेला हें ह्मणणेंही लागू पडत नाहीं हें सविस्तर सांगणें नको.

विधवाविवाहनिषेध लोकसंख्येची फाजील वृद्धि न होऊं देण्याचें एक साधन आहे असा एक अखेरचा मुद्दा कांहीं लोक प्रतिपादन करितात. इंग्लंडांत व दुसऱ्या कित्येक देशांत पुष्कळ पुरुषांस लग्न करण्याचें सामर्थ्य नसल्यामुळें अविवाहित किंवा विधुर रहावें लागतें; कारण त्यांच्या रीतीप्रमाणें विवाहित स्थिति मोठ्या खर्चाची बाब आहे. अर्थात्च कित्येक स्त्रियांवरही अविवाहित अवस्थेंत किंवा विधवापणांतच जन्मभर राहण्याचा प्रसंग येतो. ह्यामुळें लोकसंख्येची फाजील वाढ व्हावयाची बंद पडते. हिंदुस्थानांत विवाहित स्थितीला जी ऐपत लागते तीच अगोदर अगदीं कमी आहे. ह्मणजे साधारण गरीब स्थितींतलाही मनुष्य लग्न करून कुटुंबनिर्वाह करूं शकतो. तशांत जर प्रौढ विधवांस पुनर्विवाहाची मोकळीक दिली, तर लग्न करूं इच्छिणाऱ्या स्त्रियांची संख्या आहे त्याहून जास्त होऊन लग्न करूं इच्छिणाऱ्या पुरुषांच्या ऐपतीची मर्यादा हल्लींहून कमी होईल. तेव्हां पुनर्विवाहाच्या मोकळिकीनें लोकसंख्या तर वाढेलच, शिवाय हल्लीं ऐपत नसल्यामुळें

किंवा दुसऱ्या कांहीं व्यंगांमुळें जे लोक अविवाहित राहतात, ते देखील लग्नें करूं लागतील व शेवटीं दारिद्य आणि दुर्बलता ह्यांनाही भरती येईल. मग लोकसंख्या कशी कमी करावी हा नवीनच प्रश्न हिंदुस्थानास पडणार, व हल्लीं आयतें अंमलांत असलेलें विधवाविवाहनिषेधाचें साधन आहे त्याहून अधिक सोईचें कांहीं नवीन साधन निघूं शकेल असा संभव दिसत नाहीं. हें ह्मणणें देखील अक्षतयोनि विधवाविवाहास लागू पडत नाहीं. त्यांच्या पुनर्विवाहास मोकळीक दिली असतां विवाहेच्छु स्त्रियांची संख्या वाढेल हें खरें आहे. परंतु बालविधवांची संख्या एकंदर विधवांच्या मानानें थोडीच असल्यामुळें हल्लींच्या स्थितींत फारसा बदल होणार नाहीं. शिवाय त्या विवाह करण्यास सर्वांशीं योग्य अशा अवस्थेंत असल्यामुळें चांगले लोक त्यांशीं लग्न करण्यास तयार होतील यामुळें लग्न करणारांत ऐपतीचें जें प्रमाण आहे तेहीं कमी होईल असें वाटत नाहीं.

ह्याप्रमाणें विधवाविवाहनिषेधापासून समाजास कांहीं प्रकारचे फायदे होऊं शकतात असें जरी मानलें तरी एवढ्यावरून ह्या निषेधापासून कांहीं दुष्परिणाम होत नाहींत असें मात्र नाहीं. ज्या लोकसमाजांत कोणत्याही वर्गास त्याची खुषी नसून एकाद्या गोष्टीची बंदी जुलमानें करण्यांत येते, त्या लोकसमाजाचे नैतिक उन्नतींत व विचारोन्नतींत कांहीं तरी उणीव राहणारच यांत संशय नाहीं. तथापि त्यांतल्या त्यांत प्रौढ विधवांस पुनर्विवाहाचा निषेध असल्यापासून फारशा यातना होत

नाहींत असें ह्मणण्यास हरकत नाहीं व अशा व्यवस्थेपासून हिंदु समाजांत कांहीं फायदेशीर परिणाम होत असतील. परंतु बालविधवाविवाहनिषेधापासून मात्र कोणत्याही प्रकारानें फायदा होत नाहीं यांत संशय नाहीं व त्यामुळें त्यांची निष्कारण व अन्यायानें गांजणूक होत आहे, असेंच ह्मणावें लागतें.

ह्याशिवाय आणखीही एक दोन लहान मुद्दे कधीं कधीं पुढें आणिलेले आढळतात, ते असे:—जर प्रौढ विधवांस पुनर्विवाहाची मोकळीक मिळाली तर त्या अर्थातच स्वतः करितां नवरे शोधण्यास लागतील. त्या प्रौढ असतात, त्यांचें आईबाप बहुतकरून जिवंत नसतात, कित्येकींची स्थितीही चांगली संपन्न असते त्यामुळें नवरा पाहून काढ-ण्याचें काम त्या इतरांवर सोंपविणार नाहींत. तेव्हां लग्न जमविण्याच्या हल्लींच्या ज्या तऱ्हा आहेत त्यांहून कांहीं चम-त्कारिक पद्धती पडूं लागतील. त्यापासून थोडेंबहुत दुर्वर्तन उत्पन्न होण्याचा संभव असून, हिंदु समाजास ज्यांचा संस्कार नाहीं, असे नवीनच परिणाम होऊं लागतील. सदरील हरकत देखील अक्षताविधवाविवाहास येऊं शकत नाहींत. कारण बालविधवा अर्थात्च वयानें लहान अस-तात; त्यांचे आईबाप जिवंत नसल्यास कोणी तरी त्यांस पालक असतो. तेव्हां जणूं त्यांचें पहिलें लग्न झालेंच नाहीं अशी त्यांची स्थिति पुनर्विवाहसमयींही असणार; व त्या वेळीं वडील माणसांच्या सांगण्याबाहेर त्या वागतील असाही संभव नसतो.

दुसरें:–कित्येकांना असें वाटतें कीं, विधवेचा विवाह झाल्यानें तिच्या कुटुंबास लौकिकांत हलकेपणा येतो. जी पूर्वीं एका पतीची स्त्री होती तिचा दुसऱ्यानें संभोग घ्यावा हें प्रथम पतीस व त्याच्या कुटुंबास कमीपणा आणणारें आहे, अशी कांहीं लोकांची समजूत असते. हिंदु शास्त्रांत बहुतकरून अनन्यपूर्विका कन्या लग्नास योग्य मानिली आहे. तसेंच पवित्रसंस्कारयुक्त विवाह एका पुरुषांशीं होऊन त्याची ती सर्वांशीं झाल्यावर पुन्हां दुसऱ्यांशीं लग्न लावणें हें कित्येक स्त्रियांसही असेंच धर्मबाह्य वाटतें. ह्यामुळें दुसऱ्याचा संबंध नाकारणें ह्यांत त्यांना एक प्रकारचें भूषणच वाटतें. राजे लोकांच्या विधवांस इतरांची बायको होण्यांत अपमान वाटतो. फार कशाला, पाश्चात्य देशांतही, गतभर्तृका राणीनें पुनर्विवाह केल्याचें उदाहरण सहसा सांपडत नाहीं. रजपुतांची अशी कल्पना आहे कीं प्रत्येक रजपूत राजा आहे. हिंदु लोकांत ब्राह्मणाची बायको देखील आपल्या यजमानास राजा समजते. ह्यामुळें कांहीं कांहीं रजपूत व ब्राह्मण पुरुष व स्त्रिया या दोहोंसही दुसरें लग्न करणें अपमानास्पद वाटतें. ही समजूत इतकी वाढलेली आहे कीं, उत्तर हिंदुस्थानांतील कांहीं मुसलमान लोकांतही ती शिरलेली आढळते. व त्यामुळें त्यांच्यांतही विधवाविवाहाची चाल बंद झाली आहे. ह्यावर असें ह्मणणें आहे कीं, हें मानापमानाचें प्रकरणही बालविधवाविवाहाच्या आड येत नाहीं. कारण या मानापमानाचें बीज उपभोगांत आहे. प्रौढ विधवेप्रमाणें बालविधवा नवऱ्याच्या प्रत्यक्ष ताब्यांत आली आहे, असें

कधींच झालेलें नसतें. व अपरिचित अनोळखी अशा आपल्या गत पतीच्या संबंधानें प्रौढ विधवेप्रमाणें तिच्या मनांत वर लिहिलेले तरंग येण्याचा कांहींच संभव नाहीं. विज्ञानेश्वरानें अनन्यपूर्विका' या पदाचा अर्थ 'दानेन, उपभोगेन वा पुरुषान्तरपरिगृहीता' असा केला आहे, तथापि ज्यांचा चिकित्सकपणा शिखरास पोंचलेला आहे असे भीष्माचार्य इत्यादिक लोक खेरीज करून दुसऱ्यास नुसती दान केली आहे ह्मणून एखादी स्त्री स्वीकारूं नये अशी पुष्कळांची समजूत नसेल; जिचा उपभोग दुसऱ्यानें घेतला आहे तिचा स्त्रीकार करणें पुष्कळांस पसंत नसल्यास तें संभवनीय आहे. सारांश, फक्त दानानें अनन्यपूर्विका होते हा अर्थ विज्ञानेश्वरानें अयोग्य लिहिला आहे. कारण शास्त्राधार आणि रूढि दोन्हीही त्याच्या विरुद्ध आहेत. कारण दोहींनें वाग्दत्तांस आणि मनोदत्तांस पुनः लग्न करण्याची उघडपणें मोकळीक दिली आहे. असो, एकंदरीनें बालविधवाविवाहाविरुद्ध अशा प्रकारच्या समजुतीची ही कांक्षा निघूं शकत नाहीं.

या भागांतील एकंदर विवेचनाचा सारांश थोडक्यांत येणेंप्रमाणें आहे:—

बालविधवांस जन्मभर वैधव्यांतच राहण्याची सक्ति असल्यानें फार अनाचार होतो, व कित्येक भ्रूणहत्या आणि बालहत्या होतात; तसेंच अप्रौढ विधवांस फार जाचणूक होते. त्यांस हा प्रतिबंध अन्यायानें आणि त्यांच्या इच्छेविरुद्ध होतो. त्यापासून जर समाजास कांहीं फायदा असता तर तोही कबूल केला असता, पण तसा फायदा बालविधवांच्या

असंमत व्रताचरणापासून मुळींच नाहीं. प्रौढ विधवांस हा प्रतिबंध असल्यामुळें त्या जशा मनोनिग्रही व परोपकारी बनून समाजाचें हित करितात तशा बालविधवा करूं शकत नाहींत. तसेंच त्यांच्या पुनर्विवाहामुळें पहिल्या नवऱ्याच्या पोराबाळांचे हाल होतील असेंही संभवत नाहीं. त्यांच्या विवाहानें दायविभागांत घोटाळा होण्याचा संभव नाहीं. त्यांच्या विवाहाच्या निषेधापासून कुटुंबाचें स्वास्थ्य व ऐक्य वाढण्यास किंवा विवाहित स्त्रियांचा स्वभाव सुखी व समाधानी होण्यास कांहीं एक मदत होणार नाहीं. माल्थ्यूशियन सिद्धांताची लोकसंख्येच्या वाढीसंबंधानें जीं तत्वें आहेत त्यांस किंवा शक्त व योग्य असतील त्यांनींच सृष्टीचा उपभोग घ्यावा ह्या स्पेन्सरच्या तत्वास विरुद्ध असा कोणताही परिणाम बालविधवाविवाहानें घडणार नाहीं. त्याच्या योगानें लग्नाच्या 'वूइंग' इत्यादि नवीन तऱ्हा उत्पन्न होण्याचें भय नाहीं व असलेली लग्नपद्धतिही बिघडणार नाहीं. याशिवाय मानापमानाचें प्रस्थ बालविधवाविवाहाच्या आड येणार नाहीं. सारांश, लोकगुप्तीकरितां कलिवर्ज्यांनीं हा जो नवीन अक्षतयोनिपुनरुद्वाहनिषेध केला आहे त्यापासून जर काडीमात्र फायदा नाहीं व लोकगुप्ति मुळींच होत नाहीं, तर तो रद्द करून टाकण्याविषयीं धर्माधिकाऱ्यांकडे विनंति केली असतां ती कां मान्य होऊं नये याचें कारण एकही दृष्टोत्पत्तीस येत नाहीं.

---

# प्रस्तुत कोणती सुधारणा शक्य आहे व ती कशी अमलांत आणावी?

आपल्या सामाजिक ह्मणजे वैवाहिक सुधारणेचें गूढ सोडवूं लागलें असतां जे कित्येक कठिण प्रश्न पुढें येतात त्यांचें निराकारण येथपर्यंतच्या लेखांत झालें. प्रथमतः पहिल्या लेखांत सामाजिक सुधारणेचे प्रयत्न कसे सिद्धीस जातात, या विषयाचें सविस्तर विवेचन केलें. त्यावरून असें सिद्ध होतें कीं, इच्छित सुधारणा अमलांत आणण्याचे कामीं प्रथम स्त्रियांच्या मनांत तदनुकूल मत उत्पन्न केलें पाहिजे. तसेंच मध्यम जनसमूहाची मदत घेणें अवश्य आहे. सुधारणेचा मार्ग बहुजनमतानें मान्य होऊन कांहीं लोक त्याप्रमाणें आचरण करूं लागले, अशी स्थिति झाली, ह्मणजे त्या सुधारणेस कायद्याची संमति घेतली पाहिजे. कारण तिला चिरस्थायित्व व कायदेशीरपणाचें स्वरूप आणणें जरूर आहे. आतां अशी सुधारणा हिंदुधर्मशास्त्रास संमत असली पाहिजे, हें निराळें सांगणें नको. कारण शास्त्रविरुद्ध कोणतीही सुधारणा एकंदर लोकांस पसंत पडेल अशी आशा नाहीं. याशिवाय कोणतीही सामाजिक सुधारणा उतावळीची व एकदम यक्षिणीची कांडी फिरविल्याप्रमाणें नसावी. व पूर्वीच्या स्थितींत जें गौणत्व व नुकसान होतें त्याहून अधिक नुकसान नवीन सुधारलेल्या स्थितींत होणार नाहीं याचाही विचार झाला पाहिजे.

२. मनुष्यजातींत लग्नाची चाल कशी उत्पन्न झाली व त्याचें स्वरूप कसकसें बदलत गेलें, याचें सविस्तर विवेचन दुसऱ्या लेखांत केलें आहे. लग्नाची चाल मिळकतीच्या कल्पनेपासून निघाली नाहीं, तर निरनिराळ्या समाजाच्या नेहमीं लढाईकडे असणाऱ्या प्रवृत्तीमुळें, समाजांत एकी वाढून प्रजा वाढल्यामुळें समाजाची शक्तिही वाढते हें मनुष्याच्या अनुभवास आल्यामुळें लग्नें प्रचारांत आलीं असावीं. परंतु ह्या लढाईच्या प्रवृत्तीमुळें स्त्रियांस जबरदस्तीनें पकडून आणून त्यांच्याशीं लग्नें लावण्याची चाल प्रथमतः सुरू झाली. नंतर जसजसे समाजांत शांतता व उद्योग वाढूं लागले, तसतसी विवाहपद्धतिही बदलत जाऊन, प्रथमतः युद्धकौशल्यानें स्वयंवरांत स्त्रियांस जिंकणें, नंतर द्रव्य देऊन त्यांस विकत घेणें व शेवटीं बापानें आंदण अथवा दक्षिणा देऊन कन्यादान करणें हे प्रघात पडले. पुढें धर्मबंधनें दृढ झालीं, तेव्हां विवाहबंधनेंही कडक होत गेलीं. हल्लींच्या करारप्रधान काळांत विवाह एका प्रकारचा करार होऊं पहात आहे. आतां प्रत्येक समाजांत वर लिहिल्याप्रमाणें सर्व प्रकार अनुक्रमानें होत गेले असें नाहीं. रोमन लोकांत वर लिहिलेली जबरीची अथवा राक्षसविवाहपद्धति उत्पन्न होऊन तिचें पर्यवसान एकदम अखेरच्या करारपद्धतींत झालें. परंतु यामुळें रोमन लोकांत अनीतीचा प्रसार फार झाल्यामुळें खिस्ती धर्माचा प्रसार लवकर होऊन विवाह हा पवित्र धर्मविधि झाला, ही गोष्ट इतिहासप्रसिद्ध आहेच.

५. लग्नाचें वय कमी करून टाकणारा हा दुष्ट नियम धर्मबंधनाच्या दार्ढ्यामुळें उत्पन्न झाला असावा, हें अनुमान दुसऱ्या लेखांत वर्णिलेल्या विवाहपद्धतीच्या उत्क्रमणाच्या दिशेवरून निघतें. बौद्धधर्मांत अविवाहित स्त्रियांस गोसावणी होण्याची परवानगी असे. अशा बायकांस भिक्षुकिणी ह्मणत. उत्तरोत्तर ह्मणजे इ. स. आठव्या शतकाच्या सुमारास ह्या भिक्षुकिणींचें वर्तन अनीतींचें व बदफैली होत जाऊन बौद्ध धर्माच्या नाशास कारणीभूत झालें. तेव्हां हिंदु पुढाऱ्यांनीं स्त्रिया तारुण्यांत येऊन स्वतंत्र होण्याचे पूर्वींच त्यांचा विवाह करण्याची पद्धति पाडली, आणि कोणत्याही स्त्रीस अविवाहित राहून भिक्षुकिणी होतां येऊं नये ह्मणून प्रत्येक स्त्रीचें लग्न झालेंच पाहिजे, त्याशिवाय तिला मोक्षप्राप्ति नाहीं असें ठरवून लग्न ह्मणजे स्त्रियांचें मौंजीबंधन असें कायम केलें.

६. याच लेखांत बालविवाहापासून काय काय दुष्परिणाम होतात हें दाखविलें आहे. बालविवाह हें एक सर्व राष्ट्राच्या हानीचें बीज आहे; किंबहुना ज्या दोन चार कारणांनीं हिंदुस्थानास हें शोचनीय दौर्बल्य प्राप्त झालें आहे, त्यांपैकींच हें एक मुख्य कारण आहे. ह्या बालविवाहाच्या चालीमुळें लोकांस शारीरिक दौर्बल्य येऊन आमचें स्वातंत्र्य नष्ट झालें व दिल्लीस गुलामघराणें स्थापित होऊन आमच्या गुलामगिरीस आरंभ झाला. आमच्या दुर्बळ झालेल्या हिंदूंस मुसलमानांनीं सहज पादाक्रांत केलें व नानातऱ्हेचे राजकीय व धर्मसंबंधाचे जुलूम करून लोकांस दे माय धरणी ठाय

केलें, शेवटीं धर्मच्छल असह्य होऊन हिंदु लोकांनीं पुनः स्वतंत्र होण्याचा यत्न केला. इतक्या अवधींत मुसलमानांतही बालविवाह कुसंगतीनें शिरल्यामुळें व त्यांस चैनबाजीची चटक लागल्यामुळें तेही आकाबाईच्या फेऱ्यांत सांपडले. यामुळें हिंदु लोकांच्या उद्योगास कांहीं अंशीं यश प्राप्त झालें न झालें इतक्यांत या शक्तिहीन हिंदुस्थानच्या लोकांची इंग्लिशांशीं गांठ पडून पुन्हां हिंदुस्थान देश इंग्लंडानें पादाक्रांत केला. परंतु एवढी गोष्ट सुखाची आहे कीं, आमचे हल्लींचे राजे मुसलमानांहून अधिक दयाळू व सुधारलेले असल्यामुळें आमच्या धर्माची व आमची त्यांच्या राज्यांत सुस्थिति आहे.

ह्या बालविवाहपद्धतीचे दुसरेही वाईट परिणाम या लेखांत दाखविले आहेत. हिंदु स्त्रियांचें शिक्षण पुढें सरसावत नाहीं, याचें मुख्य कारण बालविवाह. कारण मुलींचीं अल्प वयांत लग्नें झाल्यामुळें लग्नानंतर त्यांची शाळा स्वाभाविकच अंतरते. दुसरें अल्प वयांत लग्नें झाल्यामुळें प्रीतिव्यवहारही पोरपणांत होऊं लागतात, तेव्हां लौकर बाळंतपणाचें दुःख येऊन पडल्यामुळें स्त्रिया अशक्त होतात. तशांत ज्यांची बिजवर नवऱ्यांशीं गांठ पडते त्यांची दुर्दशा पाहावयास नको. अल्प वयांतच प्रसूतिक्रम मागें लागल्यामुळें त्या लवकर मृत्युमुखीं पडतात. तसेंच पुरुषावर कुटुंब व मुलें यांचें ओझें लवकर पडल्यामुळें ते बहुधा भीरु व महत्त्वाकांक्षारहित होतात. अखेरचा वाईट परिणाम बालविवाह व असंमत वैधव्य या दोन दुष्ट रीतींच्या मिलाफानें उत्पन्न झाला आहे. व त्या मिश्रणास बळी पडून

जन्मभर केवळ दुःख भोगण्याकरितांच देह धारण करणारा असा एक दुर्दैवी वर्ग आपल्या समाजांत उत्पन्न झाला आहे. व त्यानें हिंदु समाजास एक मोठा कलंक लाविला आहे. हा वर्ग बालविधवांचा होय हें वेगळें सांगणें नको. लहानपणापासून ब्रह्मचर्याचें कडकडीत व्रत त्यांजवर सक्तीनें लादिलें जातें, परंतु तीव्र कामवेदनांनीं परवश झालेल्या कित्येक कुलीन स्त्रियांस कोर्टाची पायरी चढावी लागते, कित्येकांस अब्रूकरितां आत्महत्या करावी लागते, किंवा दुसऱ्या कित्येक कुलभ्रष्ट व जातिभ्रष्ट होऊन शोचनीय स्त्रियांच्या वर्गांत जाऊन मिळतात, यांत आश्चर्य कोणतें? प्रबल मनोविकारांच्या भरतीला ऐन उमेदींत आंवरून धरण्याची अमानुष शक्ति बिचाऱ्या कित्येक बालविधवांच्या ठिकाणीं नसल्यास त्यांचा कांहीं अपराध आहे काय? सारांश, बालविवाह हें एक राष्ट्रीय नष्टचर्य असून त्यापासून हिंदु लोकांच्या शारीरिक व नैतिक अवनतीला भरतें आलें आहे, हें या लेखांत दाखविलें आहे.

चवथ्या लेखांत बालविवाह शास्त्रसंमत आहेत किंवा कसें, ह्याचा निर्णय केला आहे. हा प्रश्न धर्मसंबंधाचा सबब जास्त महत्वाचा असून त्याचें विवेचन शास्त्रीय पद्धतीनेंच केलें आहे. वेद, स्मृति व पुराणें या तिहींनीं बालविवाहास संमति दिलेली नाहीं, हें या लेखांत सप्रमाण दाखविलें आहे. एकंदर स्मृतींची एकवाक्यता केली असतां खालील चार नियम निघतात:—

( १ ) आठव्या वर्षापूर्वी मुलीचें लग्न करणें धर्मगर्हित ह्मणजे शास्त्रदृष्ट्या दुष्ट आहे. ( २ ) मुलीच्या लग्नाचा

प्रशस्त काल दहाव्या वर्षापासून ऋतु प्राप्त होईपर्यंत आहे; त्यांतल्या त्यांत जेव्हां मुलगी आसन्नार्तवा ह्मणजे ऋतुमती होण्याचा संभव असेल, तेव्हां विवाहास विशेष प्रशस्त होय. ( ३ ) मुलीस अनुरूप वर मिळत नसल्यास ऋतुप्राप्तीनंतर तीन वर्षेपर्यंत व मिळत असल्यास तीन महिनेपर्यंत पित्यास तिचें लग्न करण्याचा अधिकार आहे. ( ४ ) तीन वर्षांत अगर तीन महिन्यांत वर लिहिल्याप्रमाणें आईबाप लग्न न करतील तर मुलीनें स्वतःच वरयोजना करून आपलें लग्न करावें; अशा प्रकारें तिनें लग्न केलें असतां तिचे आईबाप मात्र दोषी होतात, परंतु तिला अगर तिच्या पतीला मुळींच दोष लागत नाहीं. परंतु याप्रमाणें ती लग्न न करील तर तीही दोषी होईल.

हे नियम ज्या प्रमाणांवरून काढले त्यांची पुनरुक्ति केल्यास हा लेख फार लांबेल. तरी एक महत्वाचा मुद्दा सांगितल्यावांचून रहावत नाहीं. अष्टवर्षा भवेद्गौरी नववर्षा तु रोहिणी । दशवर्षा भवेत्कन्या अत ऊर्ध्वं रजस्वला ॥ हा श्लोक लोककल्पनेला बालविवाहाचा आधारस्तंभ दिसतो. पण त्याचा खरा अर्थ बालविवाहास अनुकूल नाहीं, असें या लेखांत स्पष्ट दाखविलें आहे. 'अत ऊर्ध्वं रजस्वला' याचा अर्थ लोक असा समजतात कीं, मुलीला दहाव्या वर्षानंतर रजस्वला मानली पाहिजे, ह्मणून अकराव्या किंवा बाराव्या वर्षी जरी तिला प्रत्यक्ष रजोदर्शन झालें नाहीं, तरी तिचें लग्न दोषार्ह आहे. परंतु हें ह्मणणें गैर आहे, असें खुद्द निबंधकारांच्या वचनांवरून सिद्ध होतें. नीलकंठ ह्मणतोः—

" ऋतु प्राप्त न झालेल्या अकरा अथवा बारा वर्षांच्या मुलीचें लग्न दोषार्ह आहे अशी कल्पना ह्या वचनावरून होऊं देतां कामा नये, कारण असें मानलें तर मनूच्या वचनाची व वरील वचनाची एकवाक्यता होणार नाहीं. मनूनें बारा वर्षांच्या मुलीचा विवाह प्रशस्त धरला आहे. " अतो मनुः संगच्छते त्रिशद्वर्षो वहेत्कन्यां हृद्यां द्वादशवार्षिकीम् "—आचारमयूख.

" अष्टवर्षा भवेद्गौरी " या श्लोकावरून दुसरी एक साधारण अशी समजूत झाली आहे कीं, या श्लोकानें मुलीच्या लग्नास आठवें वर्ष प्रशस्त ठरतें. परंतु याच्या अगदीं उलट अर्थ या श्लोकाचा आहे. गौरी, रोहिणी, कन्या या निरनिराळीं वयें दाखविणाऱ्या संज्ञा निरनिराळ्या वयांत लग्न केल्यानें काय फलप्राप्ति होते हें दाखविण्याकरितां केल्या आहेत. व तीं फळें 'गौरीं ददन्नाकपृष्ठं वैकुठं रोहिणीं ददत् । कन्यां ददद्ब्रह्मलोकं रौरवं तु रजस्वलाम् ॥' या श्लोकांत दिलीं आहेत. ह्या श्लोकावरून असें स्पष्ट होतें कीं, मुलीचें लग्न दहावे वर्षी व त्यानंतर करण्यांत जास्त पुण्य आहे. वरील तिन्ही लोकांत ब्रह्मलोक श्रेष्ठ आहे व त्याची प्राप्ति कन्येच्या ह्मणजे दाहा वर्षांपासून रजस्वला होईपर्यंत मुलीच्या दानानें होते. तात्पर्य, जसजशी मुलगी अधिक वयाची होते, तसतसें तिच्या दानाचें फलही अधिक आहे व हेंच निबंधकारांचें मत आहे ही गोष्ट ' उत्तरोत्तरं फलविशेषं दर्शयति ' या अवतरणावरून सिद्ध होते. ह्याप्रमाणें ' अष्टवर्षा भवेद्गौरी ' या श्लोकाचा अर्थ बालविवाहास प्रतिकूल असतां लोकांस बालविवाहाची सवय झाल्यामुळें

त्या श्लोकाचा भलताच अर्थ समजून तोच श्लोक बालविवाहाचा पाया मानतात व आठवें वर्ष लग्नाला उत्तम ठरवितात.

पांचव्या लेखांत बालविधवाविवाह शास्त्रसंमत आहे किंवा कसें ह्या प्रश्नाचा विचार केला आहे. सामान्य विधवाविवाह कलियुगांत उक्त आहे कीं काय याचा निर्णय पुण्याच्या जंगी वादविवादांत झालाच आहे, हें खरें, तत्रापि बालविधवाविवाह हा विषय अपवादक असून त्याचा निर्णय अद्याप झालेला नाहीं, असें मला वाटतें. शास्त्रवचनांचा अर्थ योग्य रीतीनें केला असतां असें दिसून येतें कीं, बालविधवाविवाहास कोणत्याही युगांत हरकत नव्हती; कलियुगांत देखील जनमेजयसत्रापर्यंत अशीच स्थिति होती. त्यानंतर कलिवर्ज्य प्रकरणें उपस्थित झालीं तेव्हांपासून मात्र बालविधवाविवाह अशास्त्र ठरविले गेले. कलिवर्ज्यांचे नियम मनुष्यकृत आहेत, सबब ते रद्द करण्याचा अधिकार मनुष्यास पोंचतो. तथापि, कलिवर्ज्य नियम रद्द केल्यावांचून बालविधवाविवाह सशास्त्र होऊं शकत नाहीं, ही गोष्ट आपणांस कबूल केली पाहिजे. ही कलिवर्ज्यांची अडचण दूर करण्याचा उत्तम उपाय म्हटला ह्मणजे श्रीशंकराचार्य व दुसरे धर्मगुरु यांजला विनंति करून त्यांजकडून परवानगी घेणें हा होय.

सहावा लेख पांचव्या लेखाबरोबरच प्रसिद्ध झाला. त्यांतील सार येणेंप्रमाणें आहे. इतिहासावरून पाहतां वयस्क विधवांचे विवाह प्राचीन काळापासून हिंदुस्थानांत अप्रशस्त समजले जात होते, तथापि एका प्रकारचा गौण

विवाह करण्याची त्यांस मोकळीक असे असें दिसतें. असा गौण पुनर्विवाह करणाऱ्या स्त्रिया धार्मिक कृत्यें करण्यास अनधिकारी होत व त्यांची संततिही अनधिकारी व हीन जातीची समजली जात असे. तथापि व्यवहारांत त्यांची योग्यता पत्नीप्रमाणें असे, राखेप्रमाणें त्यांना मोजीत नसत, व त्यांची संतति कायदेशीर व औरस पुत्र नसल्यास पूर्ण वारसाची अधिकारी समजली जात होती. परंतु याउलट बालविधवांचे पुनर्विवाह वैदिक व संस्कारयुक्त होत असून त्यांस अथवा त्यांच्या संततीस कोणत्याही प्रकारचा हीनपणा येत नव्हता. ही स्थिति कलिवर्ज्य प्रकरणें उत्पन्न झाल्यापासून ह्मणजे इ. स. ७०० पासून १२०० चे दरम्यान बदलली व बालविधवांचा शास्त्रोक्त विवाह व प्रौढ विधवांचे व्यवहारोपयुक्त विवाह सरसकट बंद केले गेले. कलिवर्ज्य नियमांचा ऐतिहासिक विचार केला असतां, हिंदुस्थानांत बौद्ध धर्माचा उच्छेद त्या वेळीं हिंदुधर्माधिकृतांनीं ज्या सवलती परधर्मीयांस आपल्यांत आणण्याकरितां दिल्या, अथवा पूर्वीच्या वहिवाटीविरुद्ध आपल्यांत जीं नवीन बंधनें अमलांत आणलीं, त्याच्या सिद्धतेकरितां नवीन घातलेले नियम कलिवर्ज्य प्रकरणें आहेत असें दिसतें. हे नियम समाजांतील सुज्ञ व थोर पुढाऱ्यांनीं लोकगुप्ति अथवा लोकसंरक्षणाकरितां नवीन घातले असें स्पष्ट वचन आहे.

बालविधवाविवाह बंद केल्यानें कलिवर्ज्य नियम घालणाऱ्यांचा लोकगुप्तीचा हेतु मुळींच साधिला जात नाहीं,

हीही गोष्ट *सहाव्या लेखांत सिद्ध केली आहे. गतयुगांत बालविवाह नव्हते ह्मणून बालविधवाही क्वचित्च होत असत व त्यांचेही विवाह संस्कारयुक्त होत असल्यामुळें कोणतीही हरकत उत्पन्न होत नव्हती. परंतु हा कलिवर्ज्य नियम सुरू होण्याच्या सुमारास बालविवाह रूढ झाले, यामुळें बालविधवांची संख्या वाढली व त्यांवर ह्या कलिवर्ज्यानें आमरणांत ब्रह्मचर्य लादलें गेलें. एवढ्या मोठ्या वर्गास पुनर्विवाहाची बंदी झाल्यामुळें अनीतीचे व्यवहार चालून भ्रूणहत्या, बालहत्या इत्यादि घोर पातकें वाढलीं आहेत. याशिवाय बालविधवांस असा जुलमी संन्यास दिल्यानें समाजास कांहीं उपयोग होत असेल तर तसेंही नाहीं. कारण अशा अल्प वयांत कामक्रोध जिंकून परोपकारबुद्धीस जागृत ठेवून अश्रांत त्रास सोसण्याची व मनाचें आकलन करण्याची शक्ति त्यांस कोठून येणार? बरें जातीची शुद्धता व कुटुंबांतील एकी कायम राखण्याचे कामीं या नियमाचा कांहीं उपयोग असेल तर तसेंही संभवत नाहीं. सारांश, लोकगुप्तीचा हेतु बालविधवाविवाह बंद करण्यांत साधला जात नाहीं असें वाटतें. व श्रीशंकराचार्य व समाजाग्रणींनीं हा निष्फळ नियम रद्द कां करूं नये याचें सबळ कारण दिसत नाहीं.

याप्रमाणें मागील लेखांत सामाजिक सुधारणेसंबंधानें पुढें येणाऱ्या मुख्य मुख्य प्रश्नांचा उलगडा झाला. आतां कोणती सुधारणा शक्य व इष्ट आहे या प्रश्नाचा निकाल लावणें सुलभ आहे. बालविवाहाची चाल अत्यंत घातक आहे, तिचे दुष्परिणाम सर्व हिंदु समाजाला भोगावे लागत

आहेत हें निर्विवाद आहे. तसेंच तिच्या मदतीनें असंमत वैधव्याचा अति निंद्य भाग बालवैधव्य वाढत जाऊन आपली भयंकर नैतिक हानिही होत आहे. तेव्हां ही शारीरिक व नैतिक हानि बंद करण्यास प्रथम बालविवाह बंद केले पाहिजेत. याशिवाय बालविवाहाची सुधारणा अंमलांत आणणेंही सुलभ आहे. कारण प्रौढ विवाहास शास्त्राची हरकत नसून लोकमतही त्याविरुद्ध नाहीं व कित्येक ब्राह्मण व क्षत्रिय जातींत ते हल्लींही रूढ आहेत.

असंमत वैधव्याची गोष्ट याच्या उलट आहे. कारण प्रौढ विधवांस सक्तीनें ब्रह्मचर्यानें रहावयास लावणें अहित-कारक व अयोग्य आहे हें खरें, तथापि हें अनहित दुसऱ्या प्रतीचें आहे. त्याची गणना राष्ट्रीय अनहितांत नसून व्यक्तिविषयक अनहितांत होईल. एकंदर हिंदु विधवांच्या मानानें पाहतां ज्यांस पुनर्विवाहाची परवानगी नाहीं, अशा विधवांची संख्या एक दशांशाहून कमी आहे, त्यांतही प्रौढविधवा कमी. दुसरें ह्या प्रतिबंधापासून त्यांस शारीरिक दुर्बलता येण्याचा किंवा पुढच्या पिढीस नुकसान पोंच-ण्याचा कांहींच संभव नाहीं. शिवाय प्रौढविधवाविवाह अंमलांत येण्यास शास्त्राची मोठी हरकत आहे. श्रीशंकरा-चार्य कोणताही कलिवर्ज्य नियम रद्द करतील अशी विशेष आशा नाहीं. तसेंच सामान्य विधवापुनर्विवाहास हिंदु-स्थानच्या सर्व भागांतील लोकांची प्रतिकूलता दिसते. मुंबई, मद्रास, बंगाल, येथील कांहीं सुशिक्षित हिंदूंनीं या कार्यार्थ जिवापाड मेहनत घेतल्यामुळें कांहीं पुनर्विवाहाचीं उदाहरणें झाल्याचें दृष्टीस पडतें. परंतु तींही लोकसं-

स्येच्या मानानें थोडीं आहेत. वायव्येकडील प्रांत, पंजाब, मध्यहिंदुस्थान, राजपुताना, येथील ब्राह्मणांत शिक्षणाची गोडी कमी असल्यामुळें ते पूर्वापार समजुतींचे कट्टे अभिमानी आहेत. त्यांस प्रौढविधवाविवाह मान्य होण्यास कित्येक वर्षे पाहिजेत. रजपूज लोकांचा मोठा भरणा वरील प्रांतांत व गुजराथेंत आहे. त्यांस तर प्रौढविधवाविवाह कधींच मान्य होणार नाहींत. सारांश, उत्तरभाग व पश्चिमभाग विशेषतः हिंदूंचें मुख्य आर्यावर्त व ब्राह्मणी धर्माचें आदिपीठ या ठिकाणच्या लोकांचें विधवाविवाहाविरुद्ध इतकें ठाम मत आहे कीं, तिकडे ह्या सुधारणेस होणाऱ्या हरकतींची आपणांस कल्पनाही नाहीं. वायव्यप्रांतांतील लाला बैजनाथ ह्मणतात, “ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, कास्यस्थ, आणि संपत्तीच्या जोरावर पुढें सरसावलेले सर्व लोक ह्यांचें मत विधवाविवाहास अद्याप पूर्ण प्रतिकूल आहे. सबब सुधारणा करण्याचा फक्त एक उपाय मात्र शक्य आहे. तो बालविवाह बंद करणें हा होय.” ही स्थिति त्या प्रांतांतल्या लोकाची झाली. पण बंगाल्यांत व दक्षिणेंतही लोकांची हरकत कमी आहे, असें मला वाटत नाहीं. वैश्य लोकही ह्या सुधारणेस विरुद्ध आहेत. त्यांच्यांत अनेक जाति आहेत पण पुनर्विवाह एकांतही रूढ नाहीं. हे लोक बहुधा व्यापारधंद्यांत मग्न असतात, त्यांस इंग्रजी शिक्षण नसतें, त्यामुळें सुधारणेचें महत्व त्यांच्या मनांत बिंबण्याचा मार्ग थोडा आहे. जैन लोकही बहुतकरून व्यापारी आहेत. त्यांच्यांत पुनर्विवाहाची चाल नाहीं व त्यांचें मत प्रतिकूल दिसतें. शीख लोकांत इंग्रजी शिक्षणाचा प्रसार कमी आहे,

व त्यांनाही हा विवाह नापसंत वाटतो. सारांश, ब्राह्मण, रजपूत, वैश्य, जैन, शीख वगैरे सर्व प्रमुख जातींच्या लोकांचा ग्रह विरुद्ध असतां सामान्य विधवाविवाह रूढ करण्याचा प्रयत्न करणें निष्फळ आहे. ह्याच कारणाकरितां राजपुतान्यांतील वाल्टरकृत सामाजिक सुधारणासभेनें आपल्या सुधारणेच्या यादींतून विधवापुनर्विवाह गाळला आहे.

सामाजिक सुधारणेच्या एकंदर चळवळीविषयीं लोकांच्या मनांत अप्रीति व निंद्यभाव उत्पन्न होण्याचें कारण प्रौढविधवाविवाह आरंभापासून प्रतिपादन करूं लागणें हें होय, असें मला वाटतें. आधींच लोकमत प्रतिकूल, तशांत दोन वेळां शास्त्रीय वाद होऊन त्या प्रश्नाचा विरुद्ध निकाल झाला आहे, तेव्हां त्याविषयीं अधिक आग्रह धरल्यास अधिक विरोध उत्पन्न होणें साहजिक आहे. अर्थात् ज्या मार्गास अडचणी कमी, त्या मार्गानें जावें ह्या माजी नामदार तेलंग यांच्या योग्य उपदेशास अनुसरून उद्योगक्रम ठेविला असतां, यश येण्याची उमेद आहे. बालविवाहापासून राष्ट्रीय हानि होत आहे. आणि बालविधवांचा दुर्दैवी वर्ग उत्पन्न होण्यास बालविवाहच मूळ कारण आहे. तेव्हां या मूळावर घाव घातला असतां आपला दुहेरी कार्यभाग साधेल. बालविवाह सुधारणेस सद्यःस्थितीची व इतर गोष्टींचीही अनुकूलता आहे. दहाव्या वर्षानंतर मुलींचें लग्न करणारे हल्लीं लोक पुष्कळ आढळतात. लोकमत प्रौढविवाहाविरुद्ध फारसें नाहीं, रजपुतांत व उत्तर हिंदुस्थानांतील कित्येक ब्राह्मण जातींत प्रौढविवाह पाहिल्यापासून चालत

आले आहेत. कलिवर्ज्य नियमांत त्याविरुद्ध कांहीं सांपडावयाचें नाहीं व शास्त्रमत त्यांस अनुकूल आहे.

वरील सर्व कारणांवरून हिंदु समाजाच्या प्रस्तुत स्थितींत बालविवाहसुधारणा जशी अत्यंत जरूरीची व सुसाध्य आहे, तशी विधवाविवाहाची नाहीं. याकरितां जर आपण एक जुटीनें व परिश्रम घेऊन एकादा सयुक्तिक उपाय योजून बालविवाह बंद केले, तर आपल्या स्त्रियांची उन्नति व हिंदुस्थानचा उत्कर्ष साधण्याचा आपला हेतु कांहीं अंशीं सिद्धीस जाईल. आतां बालविवाह बंद करून प्रौढविवाह सुरू करण्याचा सुयुक्तिक उपाय कोणता हें ठरविण्यापूर्वी प्रौढविवाह ह्मणजे काय, ह्याचा अर्थ निश्चित केला पाहिजे. तसेंच प्रौढविवाह रूढ झाल्यापासून काहीं अनहित होईल किंवा काय, व होत असल्यास बालविवाहापासून होणाऱ्या अनर्थापेक्षां प्रौढविवाहापासून होणारी हानि कमी आहे, किंवा नाहीं, याचा विचार झाला पाहिजे.

आर्य किंवा आंग्ल, प्राचीन किंवा अर्वाचीन कोणतेंही वैद्यक घ्या. त्या सर्वांचें एकच मत आहे कीं, संतति सशक्त व निरोगी व्हावी व स्त्रीपुरुषांची शरीरसंपदा कायम राहून तीं दीर्घायुषी व्हावीं अशी इच्छा असेल तर पुरुषाचें वय निदान पंचवीस वर्षांचें व स्त्रीचें सोळा वर्षांचें झाल्यावांचून त्यांचा समागम होणें इष्ट नाहीं. चरकांत स्पष्ट असें ह्मटलें आहे कीं, यापूर्वी गर्भधारणा झाली, तर तो गर्भ कुक्षींतच मरण पावेल. स्पेन्सरच्या यापूर्वी दिलेल्या उताऱ्यांतही ह्याच तत्वाची प्रशंसा केली आहे. डाक्टर देशमुख यांणीं याच

विषयावर दिलेल्या आपल्या व्याख्यानांत असें स्पष्ट दाखविलें आहे कीं, पुरुषाची वाढ त्याचे २७ वे वर्षी आणि स्त्रीची तिचे २० वर्षी पूर्ण होते. पाश्चात्य देशांत स्त्रीपुरुषांचीं लग्नें ह्याच वयांत बहुधा होतात. त्यांची संतति किती सशक्त व निकोप असते, हें सर्वांच्या पाहण्यांत आहेच. त्यांना लग्न झाल्यापासून बहुधा एक वर्षाच्या आंत अपत्य होतें. तें मांसल व मजबूत असून त्याच्या तोंडावर लाली चमकत असते. आपल्या हिंदुस्थानांतील बालविवाहित दंपत्यास गर्भाधानानंतर बहुधां ३।४ वर्षेपर्यंत मूल होतच नाहीं. व नंतर जीं होतात तींही रोडकीं, अशक्त, पिकुटलेलीं. असलीं हीं आमचीं मुलें आणि त्यांच्याच बरोबरीचीं पाश्चात्य दंपत्यापासून झालेलीं त्यांचीं भावंडें यांची कोणीही तुलना करील, तर त्यास दोहोंच्या शरीरसंपत्तींतील व चळवळींतील अंतर पाहून आश्चर्य वाटल्यावांचून राहणार नाहीं. आपल्या व इंग्रजांच्या मुलांच्या शरीरसामर्थ्यांत जो हा फरक दृष्टीस पडतो, तोच जाडया प्रमाणानें हिंदु व इंग्रज मनुष्यांत व हिंदुस्थान व इंग्लंडच्या कर्तृत्वशक्तींत वसत आहे, हें निर्विवाद आहे. व हा जबरदस्त फरक पडण्याचें मुख्य कारण उभयांच्या लग्नपद्धतींत असणारा फरक हेंच आहे हें कधींही नाकबूल करतां येणार नाहीं.

वरील गोष्टीचा विचार करितां आपल्यांत लग्नाच्या वयाची मर्यादा पुरुषांची २५ व स्त्रियांची १६ वर्षें होईपर्यंत निदान वाढविली पाहिजे हें निर्विवाद आहे. आपण आपल्या आर्य पूर्वजांचें अनुकरण करून त्यांच्या पुरातन चाली पुनः सुरू करण्याचें मनांत आणल्यास अनायासें

आपणांतील लग्नें पुरुषांच्या २४ ते ३० व स्त्रियांच्या १२ ते १६ वर्षांच्या वयांत होऊं लागतील.* प्राचीन जर्मन लोकांची स्थिति पहा. त्यांच्यांत विधवाविवाहाची बंदी असे. परंतु त्याच्या बरोबरच बालविवाहाची बंदी असल्यामुळें बाल-विधवांची किंवा अपक्व समागमापासून झालेल्या क्षुद्र अर्भकांची त्यांस कल्पनाही नसे. त्यांचे विवाह स्त्रीपुरुषांची पूर्ण वाढ होऊन तीं प्रजोत्पादनास योग्य झाल्यावरच होत असत. याविषयींचे ट्यासिटसचे प्रशंसायुक्त शब्द येथें उतरून घेण्यासारखे आहेत:—" तरुण पुरुष पुष्कळ मोठे होत तोंपर्यंत त्यांस स्त्रीसमागमाचा अनुभव नसतो. यामुळें वाढीच्या काळांत त्यांचा जोम कधींच खचत नाहीं. ते आपल्या कुमारिकांनाही लवकर लग्नबंधनांत जखडून टाकीत नाहींत. लग्नापूर्वी त्यांचीही पूर्ण वाढ होणें व त्यांस प्रौढता येणें अवश्य आहे असें मानिलें जातें. सारांश, दोन्ही स्त्रीपुरुषें विवाहसमयीं एकमेकाच्या तोलाचीं समसमान व शक्तिमान् असतात व त्यामुळें त्यांचें अवसान व तेज त्यांच्या संततीसही प्राप्त होतें."

असे प्रशंसनीय परिणाम आपणांत प्रत्यक्ष घडवून आणण्यास प्रौढविवाह आपणांत जारीनें झाले पाहिजेत; ह्मणजे ऋतुप्राप्तीनंतर तीन वर्षांच्या आंत स्त्रीचा विवाह,

---

* त्रिंशद्वर्षो वहेत्कन्यां हृद्यां द्वादशवार्षिकीम् ।
अष्टवर्षोऽष्टवर्षां वा धर्मे सीदति सत्वरः ॥ मनुः
त्रिंशद्वर्षो वहेत्कन्यां हृद्यां षोडशवार्षिकीम् । भारत.

२९ वर्षांवरच्या पुरुषांशीं ह्मणजे ज्या वेळेस तो आपलें हिताहित समजून कांहीं तरी उद्योगधंदा करून आपलें पोट भरण्यास समर्थ होतो त्या वेळेस व्हावा, ही सुधारणा अमलांत आली पाहिजे. व हीच खरी व उत्तम सुधारणा होय. एवढी मोठी सुधारणा आज एकदम अमलांत येणें अशक्य आहे, तथापि केव्हां तरी या स्थितीस ती नेऊन पोंचविण्याचा संकल्प विसरतां कामा नये आणि या मर्यादेस ती पोंचल्यावांचून आपल्या लोकांचें खरें हित कधींही साध्य होणार नाहीं. कारण या सुधारणेनें बालविवाहापासून होणारे सर्व अनिष्ट परिणाम टळतील, इतकेंच नव्हे, तर बालवैधव्याचा हिंदुस्थानांत मागमूसही राहणार नाहीं. हल्लीं रजपुतांत व कांहीं इतर जातींत अशीं लग्नें होतात. मग इतर जातींस तोच नियम लागू करण्यास वास्तविक कांहीं प्रत्यवाय आहे, असें दिसत नाहीं.

पण अशी सुधारणा अमलांत येणें प्रथम दर्शनीं वाटतें त्याहून फारच दूरापास्त आहे. इतर जातींत असे प्रौढविवाह लोकप्रिय होण्याचा आज मुळींच संभव नाहीं. आतां कोठें कोठें लग्नाच्या मुली १२।१३ वर्षांच्या मोठ्या झालेल्या आपल्या नजरेस येतात. परंतु हीं उदाहरणें अपवादक होत. इकडे वरिष्ठ जातींत मुलींचीं लग्नें आठपासून दहा वर्षेपर्यंत करण्याची साधारण रीत आहे. आणि कनिष्ठ जातींत तर याही अगोदर लग्नें होतात. कित्येक प्रांतांत मुलींचीं लग्नें इतकीं कमालीचीं लवकर होतात कीं, हिंदुस्थानच्या गेल्या खानेसुमारींत एक दिवसाच्या वयापासून तों ४ वर्षांच्या वयापर्यंत १०१६५

विधवा आढळल्या ! काय दुष्टाचार हा ! वेडसर आईबाप मुली उपजण्याच्या अगोदरच त्यांचा साखरपुडा करून ठेवितात. उपजल्यापूर्वीच लग्न लावणें शक्य असतें, तर तसेंही करण्यास त्यांनीं मागें पाहिलें नसतें आणि मग जन्मतःच विधवा झालेल्या मुलीचा चमत्कार पाहणें आपल्या नशिबीं आलें असतें. याप्रमाणें हिंदुस्थानांत बालविवाहाचा भयंकर सपाटा सुरू आहे. अशा स्थितींत वर वर्णन केल्या प्रकारचे प्रौढविवाह सर्वसाधारणपणें केव्हां तरी मान्य होतील, अशी आशा करण्यास मुळींच आधार दिसत नाहीं. तेव्हां बालविवाहामुळें होणारे बालसंभोग तरी बंद पडावे, अशी कांहीं योजना आपणास केली पाहिजे. अल्प वयांत लग्न झाल्यावर मुलगी सासरीं राहते त्यामुळें तिची स्वाभाविक वाढ पुरी होऊन ऋतु येण्याच्या योग्य काळापूर्वीच तिला रजोदर्शन होण्याचा संभव असतो. कारण सासऱ्या जरी कांहीं वावगी गोष्ट घडली नाहीं, तरी तेथील तिच्या एकंदर स्थितीचा परिणाम तिच्या मनावर घडून तिच्या मनोवृत्ति चंचल होतात व मनोवृत्तींचा परिणाम शरीरावर होतो व तिला लवकरच ऋतु प्राप्त होतो. याशिवाय ऋतुप्राप्तीपूर्वी संभोग होण्याचें भय असतेंच. सारांश, बालविवाहामुळें बालसंभोग घडतात. याचें कारण मुलीस लग्न झाल्यापासून सासऱ्या राहावें लागतें हें होय. बंगाल्यांत व इतर कांहीं ठिकाणच्या जातींत बालसंभोगाची चाल तर अगदीं प्रचारांतली झालेली दिसते. ह्या गोष्टीच्या निवारणाचा मुख्य उपाय म्हटला म्हणजे ऋतुप्राप्तीपर्यंत मुलीस नवऱ्याच्या घरीं न

पाठविणें हाच होय. या उपायानें मुलीस मनोविकारांच्या प्राबल्यानें अकालीं ऋतु प्राप्त होण्याचा संभव राहणार नाहीं. त्या माहेरघरीं राहिल्यानें त्यांची वाढ चांगली होऊन शरीरप्रकृति बळकट व निरोगी राहील. आणि अकालीं ह्मणजे ऋतुप्राप्तीपूर्वी संभोग होण्याचें भय मुळींच रहाणार नाहीं.

ह्या सूचनेप्रमाणें बालविवाहाच्या चालींत फरक न पडतां बालसंभोग मात्र बंद पडतील हें खरें, पण दु-सरी एक अडचण बाकी राहते, तिचें निवारण करणें कठिण आहे. मुलीचा नवरा ऋतुप्राप्तीपूर्वी मरण पावला तर ती विधवा होणार आणि या बालवैध-व्याचें दुःखविमोचन होण्यास बालविधवाविवाहाची मोकळीक पाहिजे, ह्मणजे, या मोकळिकीस आड येणार कलिवर्ज्य नियम रद्द झाला पाहिजे. पण तो रद्द होण्याविषयीं आपली कितीही उत्कंठा असली तरी तसें घडण्याची आशा दिसत नाहीं. असें हें बिकट कोडें सोडविण्याकरितां विचारी व धर्मास धरून चालणारे सुधारक दोन उपाय सुचवितात. पहिला संभोग झाल्यावांचून लग्नविधि पूर्ण व बंधनकारक झाला आहे असें समजूं नये. दुसरा—सप्तपदीशिवाय बाकीचा लग्नविधि हल्लींप्रमाणें उरकून घेऊन सप्तपदीचा विधि ऋतु-प्राप्तीनंतर करावा, व तेव्हांच शास्त्राप्रमाणें लग्न पूर्ण होईल. या दोन सूचनांचा विचार आपल्यास सविस्तर केला पाहिजे.

प्रथमसूचनेच्या पुष्टीकरणार्थ शास्त्राचा आधार असा दाखविला जातो कीं, बायको नवऱ्याशीं सगोत्र होण्यास

संभोग अवश्य आहे, आणि सगोत्रता झाल्याशिवाय लग्न पुरें होऊं शकत नाहीं. वरील मतास आपस्तंब, हिरण्यकेशी वगैरे यजुःशाखीय सूत्रकारांचे वचनांवरून कांहीं अंशीं बळकटी येते. व यजुःशाखेंत चतुर्थी कर्म ह्मणजे संभोग-विधि करावा लागतो, याचेंही हेंच तात्पर्य दिसतें.

चतुर्थीकर्ममंत्रेण त्वङ्मांसहृदयेंद्रियैः ।
पत्या संयुज्यते नारी तद्गोत्रा सा भवेदिति ॥ १ ॥

असें वचन स्पष्ट आहे. पण आश्वलायनादि सूत्रकारांचें मत असें नाहीं, आणि

स्वगोत्राद्भ्रश्यते नारी विवाहात्सप्तमे पदे ।-हारीत.
पाणिग्रहणिका मंत्रा पितृगोत्रापहारकाः ।-बृहस्पति.

अशींही वचनें आहेत. पूर्वीच्या लेखांत लिहिल्याप्रमाणें संभोग झाल्याशिवाय पत्नी अत्यंत स्वीकृत होत नाहीं, असें हरदत्तानें लिहिलें आहे, तें वरील मतास अनुकूल आहे. परंतु सगोत्रतेसंबंधानें मतवैचित्र्य दिसतें. त्यांतही आश्वला-यनाचें मत व्यवहारोपयुक्त दिसतें. वधू पतिगृहीं रहात असल्यास संभोग झाला आहे किंवा नाहीं हें ठरविणें कठिण पडेल. पित्याच्या गृहीं राहत असल्यास कांहीं विशेष अडचण पडणार नाहीं, हें खरें. तत्रापि केवळ सगोत्रता न झाल्यास दुसरा विवाह करावा, असें शास्त्रीलोक कबूल करतील असें दिसत नाहीं. कारण सप्तपदी ही विवाहाची मर्यादा आहे आणि सप्तपदी झाल्यानंतर कलींत कन्येचें पुनः लग्न करूं नये, ही कलिवर्ज्याची अडचण बाकी राह-णार आहे.

दुसरी सूचना ऋतुप्राप्तीपर्यंत सप्तपदी करूं नये, ही होय. यांतही ऋतुप्राप्तीपर्यंत वधूस पतिगृहीं पाठवूं नये, हा नियम गृहीत केलेला दिसतो. कारण असें न झाल्यास ही सूचना निष्फळ होईल इतकेंच नाहीं, तर उलटी अपायकारक होईल. ह्मणजे वधूस सप्तपदीपूर्वींच पतिगृहीं राहूं दिल्यास लग्न पूर्ण होण्याच्या अगोदरच समागम घडण्याचा संभव आहे, याकरितां हा नियम वरील सूचनेंत अंतर्भूत आहे, असें मानलेंच पाहिजे. एवढें गृहीत धरलें तर ही सूचना उत्तम होईल यांत संशय नाहीं. व वरील सुधारणा अमलांत आली असतां बालविधवाविवाहनिषेधक कलिवर्ज्याची अडचण न राहतां तो रद्द करण्याचें कांहींच प्रयोजन राहणार नाहीं. व बालविवाहापासून होणारे दुष्ट परिणामही पुष्कळ अंशीं टळतील. आतां येथें अशी शंका उत्पन्न होईल कीं, सप्तपदीपर्यंत विधि प्रथम उरकून घेतल्यापासून लोकांचें समाधान होणार नाहीं, आणि अशा विधीला वाग्दानापेक्षां कांहीं जास्त महत्व दिलें जाईल असें वाटत नाहीं. मग हल्लीं सगाई पूर्वी करून घेण्याचा प्रघात आहे त्यापेक्षां यांत अधिक काय फायदा झाला? या प्रश्नाचा पूर्ण विचार केला असतां ही शंका योग्य दिसत नाहीं. सप्तपदीपर्यंत विवाहविधि करून घेतल्यास वाग्दानापेक्षां अधिक निर्बंध उत्पन्न होईल, असें मानण्यास चांगला आधार आहे, असें पुढील विवेचनावरून दिसेल.

प्रथमतः विवाहविधींत काय काय महत्वाचे विधि करावे लागतात, हें पाहूं. प्रथमतः सीमांतपूजन व वाग्दान, नंतर वरणविधि अथवा अंतःपट व अग्निर्दान. पुढें पाणि-

ग्रहण व लज्जाहोम व सप्तपदी. हे विधि पहिल्या दिवशीं करावे लागतात. त्याच दिवशीं अगर चवथे दिवशीं अखेरचा विधि ऐरिणीदान व वरात हे होत. दरम्यान किंवा नंतर गृहप्रवेशविधि करितात. चतुर्थी कर्मावांचून जरी लग्न पूर्ण होत नाहीं असें यजुःशाखीयांचें मत आहे, तरी तो विधि लग्नाचे वेळीं सांप्रत होत नाहीं. आतां प्रत्येक विधीचें स्वरूप सांगितलें पाहिजे. सीमांत पूजन हें नवरा वधूच्या गांवीं येईल तेव्हां सीमेवर त्याचें पूजन करणें आहे. वाग्दान ह्मणजे, वधूच्या घरीं वराकडील मंडळी येऊन त्यास पिता आपली मुलगी अमुक वरास मीं देतों, असें त्रिवार वचन देतो व त्याबरोबर कांहीं पोशाख, दागिने वगैरे वराकडून वधूस देण्याची चाल आहे. नंतर वरणविधि. मोठ्या थाटानें मिरवत मिरवत वाजंत्री वगैरे मंगलवाद्यें वाजविणाऱ्यांसमवेत घोड्यावर बसून स्त्रिया माँगलिक गीतें ह्मणत आहेत अशा तऱ्हेनें वधूच्या घरीं वर येतो. तेथें मंडळी ज्योतिषांनीं सांगितलेल्या वेळेची वाट पाहत असतात. तोंपर्यंत वधू आणि वर यांस उभीं करून दरम्यान अंतःपट धरितात आणि उपाध्ये व भिक्षुक मंगलाष्टकें ह्मणतात. सुमुहूर्ताची वेळ आल्याबरोबर अंतःपट काढून वधूवरांस एकमेकांच्या गळ्यांत माळा घालावयास सांगतात. बोलाविलेली मंडळी टाळ्या वाजवितात व एकदम वाद्यघोष सुरू होतो. लग्नाच्या प्रसिद्धीसंबंधानें इतका विधि अवश्य व पुरे आहे. सभेंतील लोकांस पानसुपारी व ब्राह्मणांस दक्षिणा झाल्यावर मंडळी निघून जाते. नंतर वधूचा बाप कन्यादानविधीनें ती वरास अर्पण करितो. हेंही दान इतर दानांप्र-

माणें वराच्या हातावर उदक सोडून करावयाचें असतें आणि दानसांगतासिद्ध्यर्थ वरास दक्षिणा द्यावी लागते. याचें नांव अग्निदान. नंतर पाणिग्रहण. वधूचा हात आपल्या हातांत घेऊन उपाध्यायाच्या सांगण्याप्रमाणें वधूच्या बापासमक्ष वर प्रतिज्ञावचनें करितो. त्यांचा अर्थ नीट समजून घेऊन त्याप्रमाणें आचरण राहिल्यास विवाहित आयुष्यांत कधींही दुःख वाटणार नाहीं. असो. येथें वधूच्या बापाचें कर्तव्य संपतें आणि वधू, वर आणि उपाध्याय हीं जाग्यावर राहतात. श्रुतीचा असा आशय आहे कीं, लग्न झाल्याबरोबर प्रत्येक विवाहित जोडप्यानें होमाग्नि प्रदीप्त करावा आणि अग्निहोत्र जन्मभर राखावें. त्याप्रमाणें उपाध्याय वधूवरांकडून स्मार्ताग्नि सिद्ध करवून त्यांत प्रथम होम ह्मणजे लाजाहोम करवितो. त्यानंतर वधुवरें एकमेकांचा हात धरून उपाध्यायानें एकेक वैदिक मंत्र ह्मटल्यावर एक एक अशीं सात पावलें चालतात यास सप्तपदी ह्मणतात व ही झाली ह्मणजे लग्न फिरूं शकत नाहीं, अशी धर्मशास्त्राची मर्यादा आहे. नंतर वधूसह वर आपल्या घरीं मोठ्या थाटानें मिरवत परत जातो त्यास वरात ह्मणतात. तेव्हां प्रथम वधूपित्यास ऐरिणीदान ह्मणजे दीपदान करावें लागतें. वरास शेवटली मेजवानी ह्मणजे मांडवपरतनी दिली ह्मणजे लग्न संपलें. हें वर्णन दक्षिणी ब्राह्मणांतील विवाहपद्धतीचें आहे. तें इतकें तपशीलवार सांगण्याचें कारण इतकेंच कीं, ह्यांतील कोणते संस्कार प्रथम करावे व कोणते ऋतुप्राप्तीनंतर करावे हें समजण्यास ठीक पडेल. अन्य जातींत

विवाहविधि इतका जरी लांबट नसला तरी अंतर्पाट व सप्तपदी सर्व जातींत अवश्य होतात असें वाटतें.

कित्येकांचें असें मत आहे कीं, हल्लींच्या लग्नाच्या वेळीं फक्त वाग्दान करून ठेवावें. परंतु असें करण्यानें कार्यभाग होऊं शकत नाहीं. पुष्कळ जातींत हल्लींही वाग्दान अगोदर करून ठेवण्याची वहिवाट आहे, व आपणांसही तसें करतां येईल; पण वाग्दान ह्मणजे केवळ लग्नविषयींचा तोंडी करार आहे. तो एका पक्षानें मोडण्याचें मनांत आणिलें तर तो अमलांत आणण्याची सक्ति कायद्यानें होऊं शकत नाहीं. आणि आपल्या धर्मशास्त्रांतच या गोष्टीचा निर्णय लाविला आहे. बापानें योग्य कारणास्तव किंवा दुसरें कारण नसूनही विशेष अनुरूप दुसरा पति मिळत असेल तर त्यास वाचादत्त मुलगी द्यावी, असें शास्त्र सांगतें. सारांश, वाग्दानाचा कांहीं उपयोग आहे, असें वाटत नाहीं. वाग्दानानंतर नवऱ्यानें पुष्कळ वर्षेंपर्यंत मोठ्या आशेनें वाट पहावी आणि लग्नाची वेळ जवळ आली ह्मणजे वधूपक्षानें मुलगी चटकन दुसऱ्यास देऊन टाकावी, व त्यामुळें पूर्व पतीनें क्रोधांध होऊन मारामारी व दुसरे मोठे अपराध करावे, अशीं कित्येक उदाहरणें मीं पाहिलीं आहेत. बरें लवकर वाग्दान करण्यांत फायदा इतकाच कीं, मुलीला चांगलें कुलीन ठिकाण मिळण्यास हरकत पडूं नये. पण वरपक्ष जुन्या मताचा असल्यास अपुऱ्या व पोकळ वाग्दानानें त्याचें समाधान होणार नाहीं. आणि वरपक्ष जर नवीन मताचा असेल तर प्रौढपणीं वाग्दान व विवाह करण्यास त्यास हरकत वाटणार नाहीं.

आतां पूर्वी सांगितल्याप्रमाणें प्रस्तुत लग्नविधीचे दोन भाग करून पहिल्या भागांत विवाहहोमापर्यंत कर्म करून सप्तपदी दुसऱ्या भागांत ऋतुप्राप्तीनंतर करावी, ही युक्ति शक्य व सुयुक्तिक दिसते, असे विभाग करण्याची चाल हल्लीं कोणत्याही जातींत नाहीं, हें खरें; तथापि सप्तपदी विवाहहोमानंतर लागलीच केली पाहिजे. असें शास्त्रांत कोठेंच सांगितलेलें नाहीं. उलट विवाहहोमापर्यंत ज्यांचा विवाहविधि झालेला आहे, अशा वधूंचा स्वतंत्र उल्लेख शास्त्रांत आढळतो. याजवरून विवाहहोमापर्यंत विधि करण्याची परवानगी आहे, असें स्पष्ट दिसतें. सहाव्या लेखांत बौधायनाचा उतारा घेतला आहे, त्यांत पुनर्भूचे वाचादत्ता, मनोदत्ता, अग्नि परिगता, सप्तमपदं नीता, भुक्ता, गृहीतगर्भा, प्रसूता, असे सहा प्रकार सांगितले आहेत. जर विवाहहोमापर्यंत लग्नाचा विवि करून सप्तपदी तहकूब ठेवणें शास्त्रविहित नसतें, जर विवाहहोमापर्यंत लग्नाचा विधि झालेल्या व सप्तपदीपर्यंत सर्व विधि झालेल्या वधूच्या स्थितींत अथवा वाग्दत्ता वधूच्या स्थितींत कांहींच फरक नसेल, तर अग्नि परिगता ही भिन्न संज्ञा निष्कारण व निरर्थक घातली आहे, असें ह्मणावें लागेल! तात्पर्य, विवाहहोमानंतर सप्तपदी लागलीच केली पाहिजे, अशी शास्त्राची अट दिसत नाहीं. व ती ऋतुप्राप्तीपर्यंत तहकूब ठेवल्यानें मोठा फायदा असा आहे कीं, दरम्यान मुलीस दुर्दैवानें वैधव्य आलें, तर मुलीचें दुसऱ्या पतीशीं सशास्त्र लग्न करतां येईल. आणि वर सांगितलेलें कलिवर्ज्य रद्द करवून घेण्याचा असाध्य प्रयत्न करण्याची जरूरी रहाणार नाहीं. याशिवाय वरणविधि व अंतर्पाट

हें लोकप्रसिद्धीचें फार उत्तम साधन आहे व त्यांत वधूवर समक्ष आणून परस्परांस प्रतिज्ञापूर्वक आणभाक देऊन त्यांच्या मनावर लग्नसंबंधाचा ठसा उमटविणारे अद्भिर्दान आणि विवाहहोम हे विधि लागोपाठ व्हावे हें इष्ट आहे. त्यामुळें ज्यांत वधूवरांची समक्ष भेट होत नाहीं, अशा वाग्दानापेक्षां वधूवरांच्या हृदयांत अधिक निश्चितता व परस्परांविषयीं प्रेम उत्पन्न होईल, यांत संशय नाहीं.

बौधायनानें अग्नि परिगता ही निराळी कोटि केली आहे. अद्भिर्दत्ता किंवा वृता अशी निराळी केली नाहीं, यावरून अग्नि परिगता वधूची योग्यता व अधिकार वाग्दत्तेहून किंवा सप्तमपदंनीतेहून निराळे आहेत हें स्पष्ट होतें. तिचा अधिकार वाग्दत्तेहून अधिक व सप्तमपदंनीतेहून कमी असला पाहिजे हें उघड आहे. निबंधग्रंथांत याजविषयीं कोठें निराळा उल्लेख नाहीं. तथापि तिचा दर्जा ठरविण्याचा एक सुयुक्तिक मार्ग असा दिसतो कीं, 'नष्टे मृते प्रव्रजिते' हा श्लोक अग्नि परिगता वधूला लावावा. आजपर्यंत कित्येक टीकाकारांस व निबंधकारांस ज्या श्लोकानें घोटाळ्यांत घातलें आहे, तसेंच पुण्याच्या प्रसिद्ध वादांत ज्या श्लोकाबद्दल सुधारलेल्या व जुन्या मतांच्या पंडितांत भानगड पडली होती त्या वादग्रस्त श्लोकाची व्यवस्था सुयुक्तिक व निर्विवाद रीतीनें करण्याचा हाच एक रस्ता आहे, असें मला वाटतें. पुण्याच्या वादांत सुधारकपक्षीय पंडितांचें ह्मणणें असें होतें कीं, वरील श्लोक पूर्ण विवाहित अथवा सप्तमपदं नीता वधूस लागू आहे. ह्मणजे पूर्ण विवाहित स्त्रीनें पति नष्ट,

मृत, प्रव्रजित, क्लीब, अथवा पतित झाला असतां द्वितीय पति करावा, असा या श्लोकाचा अर्थ आहे. पण असा अर्थ करण्यास ढळढळीत अडचण अशी होती कीं, पति मृत झाला असतां स्त्रियांस पुनर्विवाह करण्याची मनाई आहे असें खुद्द मनूचें दुसरें वचन आहे:—" न विवाहविधावुक्तं विधवावेदनं क्वचित् " " न द्वितीयश्च साध्वीनां क्वचिद्भर्तोपदिश्यते. " तसेंच अशा स्त्रीचा पति जिवंत असून क्लीब, पतित, प्रव्रजित झाला, तरी एका काळीं दोन पति करण्याची मनाई शास्त्रांत आहे. तिसरा आक्षेप असा कीं, पतौ हें रूप पूर्ण विवाहित भर्ता या अर्थी व्याकरणशुद्ध नाहीं. आतां दुसऱ्या बाजूचे जुन्या मताचे पंडित असें प्रतिपादन करीत होते कीं, हा श्लोक केवळ वाग्दत्ता मुलीस लागू आहे, ह्मणजे ज्या मुलीचें वाग्दान झालें आहे, ती श्लोकांत सांगितलेल्या पांच आपत्तींत अन्य पति करूं शकते; पण याही प्रतिपादनांत असा दोष आहे कीं, वाग्दता मुलीस सदरहू पांच प्रसंगांशिवाय अन्य कारणांनींही दुसऱ्या पतीस देण्यास शास्त्रानें, रूढीनें व कायद्यानें परवानगी दिली आहे. याज्ञवल्क्य तर " श्रेयांश्चेद्वर आव्रजेत् " अधिक श्रेष्ठ वर मिळाला, तरी दुसऱ्यास द्यावी असें ह्मणतो. खुद्द वाग्दानविधींतच ' दशदोषविवर्जिते ' असें स्पष्ट ह्मणतात. याशिवाय गर्भित शर्ती अनेक आहेतच. येणेंप्रमाणें दोन्ही पक्षांनीं केलेला अर्थ विवादयुक्त व गडबडीचा दिसतो. असा हा वादग्रस्त श्लोक सप्तमपदं नीता व वाग्दत्ता यांच्या दरम्यानच्या अग्निं परिगता वधूस ह्मणजे जिचा विवाहहोमापर्यंत विवाहविधि झाला आहे, अशा मुलीस लागू केल्यानें

अर्थाची संगति उत्तम जुळते व बौधायनानें वाग्दत्ता, अग्निं परिगता, सप्तमपदं नीता हे निराळे केलेले वर्ग सार्थ ठरतात आणि अग्नि परिगतेची स्थिति वाग्दत्तेहून अधिक दर्ज्याची व सप्तमपदं नीतेहून कमी दर्ज्याची अशी कायम ठरते. श्लोकांत सांगितलेल्या पांच प्रसंगीं मात्र तिला दुसरा पति करण्याची परवानगी आहे; वाग्दत्तेप्रमाणें क्षुल्लक कारणासाठीं लग्नाचा करार मोडण्याची तिला अथवा तिच्या पालकांस सवड नाही आणि दुसऱ्या पक्षीं सप्तमपंद नीतेप्रमाणें पुनर्विवाहाची तिला अजीबात मनाई नसून श्लोकांत सांगितलेल्या पांच प्रसंगीं तिला पुनर्विवाह करण्याचा अधिकार सांपडेल. याप्रमाणें विवाहहोमापर्यंत विवाहविधि करून ठेविल्याचा प्रघात पडला असतां वधूचे स्थितींत महत्वाचा फरक पडेल. आणि लग्न सोहळ्याचा मोठ्या खर्चाचा व भपक्याचा भाग होऊन गेल्यामुळें लग्नाविषयीं लोकांत प्रसिद्धि होऊन जनांच्या व आईबापांच्या दृष्टीनें वधूवरांत लग्नबंधन पुष्कळ उत्पन्न झालेलें वाटेल. तसेंच बालविवाह एकदम बंद केले असतां लोकमतास धक्का बसणार आहे, तो न बसतां त्यापासून होणारे अनिष्ट परिणाम टळतील.

वरील विवेचन " नष्टे मृते प्रव्रजिते " या श्लोकाच्या अर्थाला धरून चाललें आहे. पण या विषयांत या वाद-ग्रस्त श्लोकाची मदत घेतली नाहीं, तरी सुद्धां वर निर्दिष्ट केलेली विवाहहोमापर्यंत प्रथम विवाहविधि करून घेण्याची सुधारणा इष्ट व फायदेशीर आहे. कारण

' सप्तपद्याः प्राग्मरणे न वैधव्यं ' असें धर्मशास्त्राचें स्पष्ट वचन आहे. यामुळें सप्तपदी होण्यापूर्वी जर नवरा दुर्दैवानें मेला, तर शास्त्रानें तिच्या पुनर्विवाहास हरकत नाहीं. तेव्हां मुख्यतः बालविधवाविवाहाची कलिवर्ज्यामुळें जी अडचण येऊन पडली आहे, ती मुळींच राहत नाहीं, मात्र वाग्दानापेक्षां विवाहहोमापर्यंत विवाहविधि केल्यांत कांहीं विशेष असला पाहिजे. तो नसेल अथवा मानला गेला नाहीं तर क्षुल्लक सबबीवरूनही विवाहहोमापर्यंत झालेलीं लग्नें फिसकटतील, समारंभास केलेला खर्चवेंच व खटाटोप फुकट जाईल, आणि हा सुधारणेचा प्रयत्न निष्फळ होईल.

अग्नि परिगता वधूची स्थिति वाग्दत्ता मुलीपेक्षां अधिक दर्ज्याची आहे, हें कायद्यानें दोन तऱ्हेनें दर्शविवतां येईल, व कायद्याची अशी अनुकूळता नसेल, तर वरील सुधारणेंत कांहींच तात्पर्य राहणार नाहीं. प्रथम पति किंवा वधू जिवंत असून कांहीं क्षुल्लक कारणाकरितां वधू अथवा वर सप्तपदीचा विधि करण्यास नाकारील, तर त्यांजकडून तो सक्तीनें घडवून आणण्याची मदत कायद्यानें मिळाली पाहिजे. अशा प्रकारची दाद देवविण्यास कायद्याचे तत्त्वाची हरकत दिसत नाहीं. करारशास्त्राचा एक सामान्य नियम असा आहे कीं, लग्न करण्याचा करार प्रत्यक्ष अमलांत आणण्याची सक्ती कोर्टानें करूं नये. परंतु वरील प्रकारांत सक्तीची दाद देण्यास ह्या तत्त्वाची हरकत येऊं शकत नाहीं. कारण ह्या ठिकाणीं लग्नाचा केवळ करार

नसून, त्या कराराप्रमाणें दोन्ही पक्षांचें पुष्कळ अंशीं आचरणही घडून आलेलें असणार ह्मणजे कराराची बफादारी अंशत: झालीच असणार. तेव्हां अशा स्थितींत करार पुरा करण्यास कोर्टास कोणत्याच कायद्याची अडचण नाहीं. बरें कोर्टाचे हुकुमाचे अम्मलबजावणीचे कामीं कधीं कधीं अडचण पडते. उदाहरणार्थ विवाहाचे हक्क मिळण्याचे दाव्यांत स्त्रीपुरुषांस एकत्र राहून पतिपत्नीव्यवहार करण्याचें भाग पडणें अशक्य असतें, ह्मणून कोर्टाच्या ठरावाची अवज्ञा करणारास कैदेची शिक्षा कायद्यांत सांगितली आहे. पण अशा शिक्षेनें इच्छित गोष्ट सिद्ध न होतां कोर्टाचा हुकुमनामा निष्फळ होतो. अशा प्रकारची अडचणही सदरहु सप्तपदी अमलांत आणण्याच्या ठरावास येण्यासारखी नाहीं. कारण पांच पंच व उपाध्यायास बोलावून त्यांचे समक्ष वधूवरांस सात पावलें चालविण्याचें काम कायद्याचे अधिकाऱ्यांस सहज करितां येईल. दुसरी कायद्याची मदत याहून महत्वाची आहे व ती मिळाली असतां वरील प्रकारचे मुकदमे उत्पन्न होण्याचा संभव अगदींच कमी आहे. सप्तपदी होण्याचे पूर्वी वधूपक्षीयांनीं मुलीचें लग्न जर दुसऱ्या ठिकाणीं चोरून केलें आणि वराशीं सप्तपदीही केली, तर मोठी अडचण येणार आहे. किंवा भांडण करून प्रथम वरास सोडून वधूपक्ष मुलीस दुसऱ्यास देऊं लागला, तर काय करावें ? मला वाटतें, या अडचणीचा प्रतीकार फार सोपा व सरळ आहे. प्रथम वर मृत नसतां ( किंवा नष्टे मृते हा श्लोक अग्निपरिगतेस लाविला तर श्लोकांत सांगितलेल्या पांच आपत्ति नसतां )

वधूपक्षीय लोक जर मुलीस दुसऱ्यास देतील, तर अशा प्रकारचें दुसरें लग्न कायद्यानें रद्द समजून तें करणारास व करविणारास दुबार लग्न केल्याच्या गुन्ह्यास पात्र ठरवावें. कारण प्रथम वराशीं जरी सप्तपदी झाली नाहीं, तत्रापि सप्तपदीपर्यंत विवाहविधि झाल्यामुळें त्या विधिस लग्नाची योग्यता आली आहे असें मानिलें पाहिजे व त्यानंतर उक्त कारणाशिवाय दुसऱ्याशीं लग्न लावणें गुन्हा समजलें पाहिजे. अशा प्रकारची कायद्याची मदत मिळाल्यास कधींच तंटे बखेडे उत्पन्न होण्याचा संभव नाहीं. ही कायद्याची मदत देण्यास सरकारास कोणत्याच प्रकारची हरकत असूं नये. लोकांस जे लग्नाचे नियम पसंत असतील ते कायद्यानें ठरवून देण्यास सरकारास हरकत घेण्याचें कारण नाहीं.

लोकमताच्या व शास्त्राच्या सद्यःस्थितींत आपल्या सवडीप्रमाणें मुलीचें लग्न विवाहहोमापर्यंत करणें, ऋतुप्राप्तीपर्यंत तिला माहेरीं ठेऊन ऋतुप्राप्तीनंतर सप्तपदी करून तिला नवऱ्याच्या घरीं पाठविणें, ही सुधारणा अत्यंत फायदेशीर व बिनहरकतीची दिसते. कारण या व्यवस्थेनें बालविवाहाचे दुष्परिणाम टळून बालविधवांमुळें हिंदुसमाजावर आलेली काळोखीही नाहींशी होईल. मात्र लोकमतानें व कायद्यानें अग्नि परिगता वधूचे अधिकार वर लिहिल्याप्रमाणें वाग्दत्ता वधूपेक्षां अधिक मानिले गेले पाहिजेत. पण लोकमतानें किंवा कायद्यानें सप्तपदीपर्यंत केलेल्या विवाहविधीस वाग्दानापेक्षां कांहीं जास्त महत्व देण्यांत येईल, अशी अशा दिसत नाहीं. या गोष्टीचा विचार केला ह्मणजे उपयुक्ततेच्या बाजूनें

जरी वरील सूचनेपेक्षां पुढील मार्ग निकृष्ट आहे, तरी लोकांच्या परिचयांतील असल्या कारणानें तो सुसाध्य आहे. तो हा कीं, मुलीचें लग्न बारा वर्षांनंतर करावें व तीस ऋतुप्राप्तिपर्यंत नवऱ्याच्या घरीं पाठवूं नये. आतां कदाचित् ऋतुप्राप्तीपूर्वी दुर्दैवानें नवरा मेला आणि मुलीस वैधव्य आलें तर कलिवर्ज्याची अडचण आहे हें खरें. सुदैवानें या कलिवर्ज्याच्या नियमास रद्द करण्याच्या खटपटीस यश आलें तर बरेंच आहे. न आलें तरी निदान बारा वर्षांपर्यंत लग्न लांबविल्यानें बारा वर्षांच्या आंत विधवा होणाऱ्या हजारों मुलींस बालवैधव्याच्या तडाख्यांतून वांचविण्याचें यश आपणांस येईल, हें १८९१ च्या खानेसुमारीच्या माहितीवरून चांगलें व्यक्त होईल. या खानेसुमारींत हिंदु विधवांची संख्या वयाच्या मानानें येणेंप्रमाणें दिली आहे:—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १३८७८ | विधवा | ० | वयापासून | ४ | वर्षांपावेतों. |
| ६४०४० | ,, | ५ | ,, | ९ | ,, |
| ८७२६६ | ,, | १० | ,, | १२ | ,, |
| १६५१८४ | विधवा | ० | वयापासून | १२ | वर्षांपावेतों. |

यांपैकीं अनुमानानें सोळा हजार विधवा ब्राह्मण, रजपूत, वैश्य, जैन वगैरे पुनर्विवाह न करणाऱ्या जातींच्या मानिल्या, तर निदान तेवढ्यांस तरी ह्या भयंकर प्रसंगांतून ह्या नियमामुळें वांचवितां येईल. ऋतुप्राप्तीपर्यंत विवाह बंद ठेवण्याचें मत समाजास मान्य होण्यासारखें नाहीं, तरी १२ वर्षांची इयत्ता ठेविल्यास जड जाणार नाहीं. व ऋतु-

प्राप्तीपर्यंत लग्नानंतर मुलीस सासरीं न पाठविल्यापासून दोन हेतु साधतील. एक तर बालसंभोग बंद होऊन तदंगभूत होणारी अनेक प्रकारची हानि दूर होईल. आणि दुसरें अक्षतयोनि पुनर्विवाह मान्य झाला, तर ही वहिवाट ठेवल्यापासून साहजिक फायदा होणार आहे. कारण ऋतुप्राप्तीपूर्वी मुलगी सासरीं गेली असल्यास संभोग घडण्याचा संभव असून तसा प्रकार झाला आहे किंवा नाहीं याविषयीं संशय घेण्यास जागा राहील. आणि असा संशय निवृत करण्याचा प्रशस्त मार्ग कोणताच नाहीं. डाक्तराच्या परिक्षेपासून हा संशय दूर होण्यासारखा आहे. पण हा मार्ग लोकमान्य नसून सर्वच ठिकाणीं डाक्तर मिळण्यासारखे नाहींत. त्यांत डाक्तरिणीची तर आपल्यांत अगदीं उणीव आहे. अशा स्थितींत मुलीस पितृगृहीं ठेवणें फार उपयोगी पडेल. सारांश, वरील सुधारणा बिनहरकतीची व लवकर मान्य होण्यासारखी आहे. अशा प्रकारची चाल रूढ असल्याचेंही एक उदाहरण माझे नजरेस आलें आहे. ग्वाल्हेर संस्थानच्या ईसागढ प्रांतांतील रघुवंशी ठाकूर नांवाच्या जातींत अशी चाल आहे कीं, लग्न झाल्यावर मुलगी बापाच्या घरीं राहते, तिला ऋतु प्राप्त झाला ह्मणजे नवरा मोठ्या थाटानें तिच्या घरीं जाऊन तिला आपल्या घरीं घेऊन येतो. या समारंभास गोणा ह्मणतात. पण तिचा पति जर मृत झाला, तर त्या मुलीचा गोणाविधि दुसरा नवरा मुलगा करूं शकतो व अशा स्त्रीस त्याची चौकाची बायको म्हणतात. तिची योग्यता जरी प्रथम विवाहिते-

सारखी नाहीं, तत्रापि तिचे व तिच्या संततीचें हक्क पूर्ण विवाहितेप्रमाणेंच असतात. असो.

येथपर्यंत सुधारणेच्या मुख्य तीन मार्गांचें परीक्षण झालें. पहिला व उत्तम मार्ग असा कीं, ऋतुप्राप्तीनंतर तीन वर्षांच्या आंत मुलीचा विवाह करावा. ह्याच्या खालो-खाल दुसरा मार्ग ह्मटला तर मुलीचा विवाह आठव्या वर्षांनंतर सप्तपदीपर्यंत करून सप्तपदी ऋतुप्राप्तीनंतर क-रावी. आणि तिसरा सर्वांत कनिष्ट परंतु हल्लीं सुसाध्य मार्ग हा कीं, मुलीचें लग्न बारा वर्षांनंतर करून ऋतुप्राप्तीपर्यंत तिला माहेरीं ठेवावी. अक्षतयोनिपुनर्विवाहाची परवानगी मिळाल्यास दुर्दैवानें अशा मुलीस वैधव्य आलें तर तिचा पुनर्विवाह करावा. हे तिन्ही मार्ग शास्त्रास अनुसरून आहेत व त्याजपासून बालविवाहाचे व बालवैधव्याचे दुष्प-रिणाम कमी अधिक प्रमाणानें नाहींसे होतील. आतां विचार करण्याची एवढीच गोष्ट बाकी राहिली कीं, वरील सुधा-रणेपासून कांहीं निराळे दुष्परिणाम उत्पन्न होतील किंवा काय व होत असल्यास निवारण होणाऱ्या हानीपेक्षां त्याज-पासून होणारी हानि अधिक किंवा कमी आहे ?

वरील सुधारणा अमलांत आल्यास प्रथम व मोठा दुष्प-रिणाम हा होईल कीं, विवाहपूर्व अनीतीचें प्रमाण हल्लीं-पेक्षां फार वाढण्याचा संभव आहे, असा कित्येकांचा आक्षेप आहे. त्यांचें मत असें आहे कीं, मुलींस ऋतुप्राप्तीपर्यंत अविवाहित ठेविल्यास किंवा माहेरीं राहूं दिल्यास पुष्कळ मुलींचा कल दुराचरणाकडे स्वतः होईल, किंवा लुच्चे

लोकांच्या फुसलावणीस त्या बळी पडतील. निःपक्षपातानें विचार केला असतां हा आक्षेप अगदीं निराधार आहे, असें नाहीं. ज्या ज्या देशांत प्रौढविवाहाची पद्धति आहे, तेथें वरील अनीतीचा प्रकार कांहीं प्रमाणानें आढळून येतो, व त्याचा उघड पुरावा अविवाहित स्त्रियांची अपत्य-संख्या हा होय. असला प्रकार व असलीं बिनवारशीं पोरें आपल्या देशांत हल्लीं आढळत नाहींत हें खरें; परंतु मुली चांगल्या प्रौढ व कामवश होईपर्यंत अविवाहित राहिल्या किंवा सतत माहेरीं ठेऊन घेतल्या, तर इच्छातृप्तीचें प्रशस्त व योग्य साधन न मिळाल्यामुळें कांहींकांचें पाऊल या देशांतही वाकड्या मार्गांत पडण्याचा संभव आहे, असें इतर देशांच्या अनुभवावरून वाटतें.

पण ही हरकत फारशी मोठी नसून ती पुढें आणणा-रांनीं तिचा फाजील बाऊ करून दाखविला आहे, असें ह्मटल्यावांचून राहवत नाहीं. उलट हल्लींची लग्नपद्धति बदलल्यानें ही भीति प्रस्तुत स्थितींतल्या कल्पनेवरून जितकी वाटते त्यापेक्षां पुष्कळ कमी पडेल असें वाटतें. असल्या बाबतींत मुलींविषयीं जितकी सावधगिरी ठेविली पाहिजे, तितकी हल्लीं आईबाप ठेवीत नाहींत. कारण चालू वहिवाटीप्रमाणें लग्न होऊन मुलगी सासऱ्या जाऊं लागली ह्मणजे तेथें तिजवर घरकामाचा भर पडून तिला कडक सासुरवासांत दिवस काढावे लागतात. त्यामुळें माहेरीं आल्यावर आईबाप बहुतकरून मुलींस लाडानें वागवितात. माहेरपण ह्मणजे विश्रांतीची किंवा सुटीची वेळ आहे, अशा

समजुतीनें तिला पाहिजे तशी स्वच्छंद वागण्याची मुभा असते. सासऱ्या होणाऱ्या सासुरवासाकडे नजर देऊन तिचे सर्व हट्ट आईबापं पुरवितात. असल्या मनसोक्त वर्तनामुळें हमेशा माहेरीं राहणाऱ्या कित्येक मुली बिघडण्याचा संभव आहे. परंतु नवीन लग्नाची पद्धति पूर्ण अमलांत आल्यावर प्रत्येक कुटुंबांत लहानसहान सुना नाहींशा होऊन त्यांच्या ऐवजीं लेकी राहतील व घरांतील बरेंच काम त्यांजवर साहजिक येऊन पडेल. आणि मग हल्लींप्रमाणें निवळ खेळण्यांत व खिदळण्यांत माहेरपण जातें तसें न जातां त्यांचा वेळ कामकाजांत जाईल.

तथापि ह्या सुधारणेच्या नियमाबरोबर मुलींविषयीं विशेष खबरदारी घेण्याची सूचना आईबापांस केली असतां अप्रासंगिक होणार नाहीं. १२ वर्षांच्या मुलींवर हल्लींपेक्षां अधिक बारकाईची नजर आईबापांनीं ठेविली पाहिजे. पाश्चिमात्य देशांत सुद्धां या वयाच्या मुलींवर त्यांच्या आईबापांची अथवा पालकांची सक्त नजर असते व त्यांच्या समाजरीतिही ह्याच धोरणास अनुकूल असतात. मोठ्या मुलींना तरुण मुलांबरोबर मोकळेपणानें मिसळूं देत नाहींत, बरोबर कोणी वडील बायका असल्याशिवाय त्यांस दुसऱ्याच्या घरीं पाठवित नाहींत. नाटकें पाहणें, कादंबऱ्या वाचणें इत्यादि गोष्टींची त्यांस मोकळीक नसते. अशाच व्यवस्था आपल्यांतही ठेवितां येतील व ठेविल्या पाहिजेत. यावरून मुलींना कैद्याप्रमाणें वागविण्याची शिफारस आहे, असें मात्र समजूं नये. परंतु हल्लीं जी पद्धति हल्लींच्या स्थितींत चालू आहे,

त्याहून विशेष काळजी प्रौढविवाह अमलांत आल्यावर आई बापांनीं घेणें जरूर आहे, हेंच सांगण्याचें तात्पर्य आहे. कारण सद्वर्तनी बायको असणें हें नवऱ्यास रूपवती बायको असण्यापेक्षां अधिक प्रिय असतें. वरील सूचनेप्रमाणें व इतर शक्य मार्गानें खबरदारी घेतली असतां अविवाहित अथवा माहेरीं राहणाऱ्या मुलीचें वर्तन चांगलें राहून वरील आक्षेपाचें बहुतेक निरसन होईल.

प्रौढविवाहापासून अनीतिप्रसाराचा जितका परिणाम होण्याची भीती जुन्या मताच्या लोकांस वाटते, तितका उत्पन्न होण्याचा संभव नाहीं, याचें आणखी एक कारण आहे. पाश्चात्य देशांप्रमाणें आपणांत 'लव्हमेकिंग' अथवा प्रीतिसंपादनार्थ उमेदवारी करण्याची चाल नाहीं. व ती चाल नवीन अमलांत आणण्याचीही आवश्यकता दिसत नाहीं. धर्मशास्त्राप्रमाणें ऋतुप्राप्तीनंतर तीन वर्षेंपावेतों मुलीचें कन्यादान करण्यास बापांस हक्क आहे. तो हक्क त्यांनीं चालवीत जाऊन वरयोजना करावी. ही वरयोजना मुलींच्या खुशीवर ठेवूं नये. तीन वर्षांनंतर स्वतःचें लग्न करण्याचा हक्क मुलीस पोंचतो हें खरें. पण त्या वेळेस ती बहुतकरून सज्ञान व पक्क बुद्धीची असते, त्यामुळें स्वतःचें नफानुकसान तिला समजतें व तिजकडून चूक होण्याची भीति रहात नाहीं. पण असा प्रसंग क्वचित्च येणार, तेव्हां तेवढ्या-करितांच आपल्यांत 'लव्ह मेकिंगची' चाल सुरू होण्याचा संभव नाहीं. अशा स्थितींत हिंदुस्थानांत विवाहपूर्व अनीतीचें प्रमाण वाढेल हें ह्मणणें अतिशयोक्तीचें दिसतें.

आतां ही विवाहपूर्व अनीति अगदीं थोड्या प्रमाणानें हिंदुस्थानांत होईल असा जरी अजमास आहे, तरी ती मुळींच होणार नाहीं, असें ह्मणतां येत नाहीं, हें कबूल केलें पाहिजे. तेव्हां ही हानि बालविवाहापासून व बालवैधव्यापासून होणाऱ्या अनीतीहून अधिक आहे किंवा कमी आहे याचा विचार करणें अवश्य आहे. मला वाटतें प्रौढविवहापासून नाइलाजानें होणारी अनीति बालविवाहाच्या व बालवैधव्याच्या दुःखापुढें अगदींच क्षुल्लक आहे, याजविषयीं कोणाहीं समंजस मनुष्याचा मतभेद होणार नाहीं. कारण बालविवाहामुळें एकंदर राष्ट्रास शारीरिक दौर्बल्य आलें आहे आणि बालवैधव्यापासून होणाऱ्या अपरिहार्य अनीतीचें प्रमाण किती आहे, हें विस्तारानें सांगणें जरूर नाहीं. या देशांत बालविधवांपासून होणाऱ्या अनौरस संततीची व बालहत्यांची संख्या ( उघडकीस आलेली व छपवून ठेविलेली ) युरोपांतील प्रौढविवाहपद्धतीमुळें अस्तित्वांत आलेल्या विवाहपूर्व अनौरस संततीच्या संख्येपेक्षां कमी असेल असें मला वाटत नाहीं, किंबहुना अधिक असणें साहजिक आहे. कारण अविवाहित प्रौढ मुलींस आपलें लग्न होऊन आपल्यास योग्य प्रकारचें वैवाहिक सुख मिळेल अशी खात्री असते, यामुळें त्यांचें पाऊल दुर्वर्तनाकडे कमी ओढेल. पण सन्मान्य सौख्याचा मार्ग ज्यांचा अगदींच खुंटला आहे अशा हताश बालविधवांस आपल्या मनास आवरून धरण्यास कोणतें साधन आहे बरें? कोणतीही मानवी संस्था निर्दोष असूं शकत नाहीं, ह्या नियमाप्रमाणें कोणत्याही लग्नपद्धतींत दोष असणारच. परंतु त्यांतल्या

त्यांत निवड करून दोषांचें प्रमाण कमी असलेली पद्धति आपणांस पसंत केली पाहिजे. अशा. निवडणुकींत प्रौढविवाहाची पद्धति विशेष हितकर वाटते. प्रौढविवाहापासून उत्पन्न होणाऱ्या थोड्याशा अनीतीस भिऊन बालविवाहास आपण चिकटून बसलों व बालविधवांचें दुःख सहन करण्यास प्रवृत्त झालों तर, गैरसमजुतीनें कां होईना, एक मोठी ढोबळ चूक आपल्या हातून होईल असेंच म्हटलें पाहिजे व अशी चूक होणें हें आपल्या राष्ट्राचें दुर्दैवच समजलें पाहिजे. इतकेंच नव्हे, मला तर असें वाटतें कीं, एका बाजूस प्रौढविवाहापासून होणारी थोडीशी अनीति व दुसरे बाजूस फक्त " हळू हळू मंद विषाराप्रमाणें निश्चित रीतीनें सर्व राष्ट्रास दुर्बळ करणारे " बालविवाहच तुलनेस असेल तरी सुद्धां प्रौढविवाहाचाच पक्ष वजनदार समजून आपल्यास या दुष्ट बालविवाहाच्या चालीस अर्धचंद्र देणें श्रेयस्कर आहे. असो.

प्रौढविवाहाची चाल अमलांत आली असतां हल्लींपेक्षा विशेष खबरदारी घेतली पाहिजे हें वर निर्दिष्ट झालेंच आहे यासंबंधानें कांहीं नियम सुचविले आहेत, त्यांशिवाय आणांखीही कांहीं नियम आहेत त्यांचा चांगला उपयोग होण्यासारखा असून ते मनूच्या काळांत अंमलांत होते. तो काळ आर्य लोकांच्या पूर्ण भरभराटीचा होता व त्या काळांत हिंदुस्थानांत प्रौढविवाहच रूढ होते. त्या वेळच्या स्थितीस अनुसरून मनूनें जे नियम ठरविले आहेत व त्यांच्या उल्लंघनास ज्या शिक्षा सांगितल्या आहेत, त्यांचें खरें रहस्य

आह्मां बालविवाहपद्धतींत मुरलेल्या, हल्लींच्या हिंदूंस समजणेंही कठीण पडेल. सहाव्या लेखांत वर्णन केल्याप्रमाणें हिंदुस्थानांतील प्राचीन आर्य विशेष चिकित्सक असून त्यांच्यांतही अनुपभुक्ता स्त्रीशीं विवाह करणें प्रशस्त मानिलें जात असे. तथापि त्यांच्या जर्मन भाऊबंदांप्रमाणें अर्भकांचीं लग्नें लावणें त्यांस पसंत नव्हतें. यामुळें विवाहकालापर्यंत प्रौढ होणाऱ्या मुलींच्या कौमार्यरक्षणाकरितां मनूनें कडक नियम सांगितले आहे.

> योऽकामां दूषयेत्कन्यां स सद्यो वधमर्हति ।
> सकामां दूषयंस्तुल्यो न वधं प्राप्नुयान्नरः ॥
> द्विशतं तु दमं दाप्यः प्रसंगविनिवृत्तये ।

प्रौढ ह्मणजे १२ वर्षांहून जास्त वयाच्या मुलीशीं तिच्या अनुमतानें जरी संभोग केला तरी त्यास शिक्षा आहे असें अलीकडे इंग्लदांत कायद्यानें ठरविलें आहे. त्याच नमुन्याचा हा मनूचा नियम आहे व त्याचें पुनरुज्जीवन केलें असतां ऋतुपूर्व अनीतिसंभोग कमी होतील. व अविवाहित प्रौढ मुलींच्या शरीरांस व नीतीस अपाय घडणार नाहीं. प्रौढविवाह जेथें अमलांत आहेत, तेथें अशा प्रकारचे नियम भाग करणें पडतें आणि तसें झालें ह्मणजे अनीति उत्पन्न होण्याचें भय अगदींच कमी होईल यांत संशय नाहीं.

प्रौढविवाहावर दुसरा असा आक्षेप आहे कीं, हिंदुस्थानच्या हवेला उशिरां लग्न करणें हितावह होत नाहीं. इतर देशांच्या मानानें येथील हवेंत मनुष्यास प्रौढपणा लौकर येतो, असें कित्येकांचें ह्मणणें आहे. आतां हें ह्मणणें

खरें मानिलें तरी वर जे सुधारणेचे ३ मार्ग सुचविले आहेत त्यांत लग्नाची मर्यादा वयावर नसून, ऋतुप्राप्तीवरच अवलंबून ठेविली असल्यामुळें ह्या आक्षेपांचा अर्धा अधिक निकाल येथेंच लागतो. तथापि, स्त्रियांप्रमाणें पुरुषाला प्रौढत्व आल्याची विशेष खूण नसते आणि त्यांच्या लग्नाची ह्मणजे स्त्रीसमागमाची मर्यादा हल्लीं १८ पासून २० पर्यंत आहे ती २५ झाल्यास त्यांस फार जड जाईल व दुष्ट संवयी लागून रोगही जडतील. तसेंच उशिरां ह्मणजे ऋतुप्राप्तीनंतर ३ वर्षांच्या आंत लग्न करण्याच्या नियमापासून मुलींचीं देखील प्रकृति बिघडेल अशी पुष्कळांची समजूत आहे. व या गोष्टीस प्रत्यक्ष अनुभवाचा पुरावा असा दाखविला जातो कीं, लवकर लग्नें न झाल्यामुळें कित्येक मुलांस वाईट नाद लागले आहेत व कित्येक क्षयी झाले आहेत. तसेंच पारशी लोकांतही प्रौढविवाह नवीन सुरू झाल्यामुळें फार दिवस मुली अविवाहित राहतात आणि अशा मुलींपैकीं पुष्कळांस हिस्टिरिया ( कुक्षिवाताचा ) रोग होतो. तात्पर्य, प्रौढविवाहापासून हिंदुस्थानांत फायदा नसून उलट नुकसान मात्र होईल असें त्यांचें ह्मणणें आहे.

ह्या आक्षेपाचें निराकरण मागील लेखांतून पुष्कळ ठिकाणीं झालें आहे. २५ व्या वर्षापर्यंत अविवाहित राहणें हिंदुस्थानांतील पुरुषांस अशक्य असतें, तर खुद्द मनूनें पुरुषाचा प्रशस्त विवाहकाल २४ पासून ३० पर्यंत सांगितला असता काय? व तेही विवाह ह्मणजे स्त्रीसमागम नव्हे! मनूच्यावेळीं हिंदुस्थानची हवा निराळी होती काय? व त्या

वेळेस प्रौढविवाह हितावह असून आतांच हवेची बाधा त्यांस कां होऊं लागावी ? पुरुषाची वाढ २८ व्या वर्षाच्या सुमारास पूर्ण होते. ती वाढ जशी निष्प्रतिबंधपणानें पूर्ण होऊं द्यावी, तसतसें तारुण्य व उतार वय हींही दीर्घ होतात. जे ३० वे वर्षाच्या सुमारास लग्नें करितात, त्यांची शक्ति ६० व्या वर्षापर्यंत चांगली टिकून ९० व्या वर्षापर्यंत ते जगतात. अशीं उदाहरणें याच हिंदुस्थानांत आणि ह्याच हवेंत थोड्या वर्षांपूर्वी कमी झालीं आहेत असें नाहीं. परंतु अलीकडे पुरुषाची वाढ फार तर २० वर्षें होते न होते तोंच प्रजोत्पादन त्याच्या मागें लागतें यामुळें ४० व्या वर्षी त्यास उतारपण येऊन ६० वें वर्ष बहुधा त्याच्या दृष्टीस पडत नाहीं. सारांश, हवामानाची सबब बालविवाहाच्या तर्फे सांगणें पोकळ व निराधार दिसतें. ह्याच तोडीची दुसरी एक समजूत अशी आहे कीं, स्त्रीसमागम ही एक शारीरिक आवश्यकता आहे, सबब नियमित वयांत स्त्रीसमागम असणें जरूरीचें आहे. ही समजूत खोडण्यास शेंकडों ब्रह्मचारी आहेत त्यांजकडे बोट दाखविलें म्हणजे पुरें आहे. त्यांची प्रकृति विषयसुखाभावानें कधींही बिघडत नाहीं किंबहुना याच कारणानें इतरांहून ते जास्त जोमदार व तेजस्वी असतात. ब्रह्मचर्य हें मनुष्यास बळ, तेज, आरोग्य इत्यादि देणारें आहे. आणि आमच्या तरुणांनीं तें पुष्कळ काळपर्यंत कडकडीत रीतीनें पाळल्यास त्यांचें स्वतःचें व पुढील पिढीचें अत्यंत कल्याण झाल्यावांचून रहाणार नाहीं. या करितां अन्नोदकाप्रमाणें मैथुन हेंही एक शारीरिक अव-

श्यकतेपैकीं आहे ही कल्पना तरुण मंडळीच्या डोक्यांतून जितकी लवकर निघून जाईल, तितकें हितावह आहे.

वास्तविक पाहतां मैथुनेच्छा उत्पन्न होण्याचें कारण मनाचा निदिध्यास हेंच आहे. जोंपर्यंत मनावर आपलें पूर्ण आकलन आहे तोंपर्यंत, जशी एखाद्या सुंदर बगीच्यांत राहण्याची इच्छा आपणास नैसर्गिक उत्पन्न होत नाहीं, तशी मैथुनाचीही इच्छा नैसर्गिक उत्पन्न होत नाहीं. आतां मन ताब्यांत ठेवणें हें महादुर्घट आहे आणि अशक्त किंवा अशुद्ध मनाच्या मनुष्यास ब्रह्मचर्यापेक्षां विवाह करणें प्रशस्त पडेल. अलीकडे ज्या दोन चार मुलांवर प्रौढ विवाहाचा प्रयोग करण्यांत आला असून ते कुमार्गास लागून बिघडले व प्रौढविवाहपद्धति हानिकारक आहे असें वाटूं लागलें, त्यांच्या सोबत्यांची व स्नेह्यांची व एकंदर समाजाची स्थिति त्यांच्या डोळ्यांसमोर असल्यामुळें त्यांचे मनोविकार दूषित झाले आणि यामुळेंच हा परिणाम झाला असें ह्मटलें पाहिजे. परंतु असें मन बिघडविणारी समाजस्थिति बदलून जिकडे तिकडे प्रौढविवाह रूढ झाले ह्मणजे असा परिणाम होणार नाहीं; व विषयध्यासानें वेडावून शरीरानें जर्जर झालेले तरुण क्वचित्च दृष्टीस पडतील. आतां ही सुधारणा पूर्ण अमलांत येईपर्यंत दरम्यानच्या काळांत कांहींकांस जड जाऊन नुकसान होईल, पण शेवटीं समाजस्थिति निर्दोष होईल यांत संशय नाहीं.

मुलांचीं मनें न बिघडतां प्रौढविवाह सुलभ रीतीनें अमलांत यावे या हेतूनें मुलांचा वर्तनक्रमही अशा प्रका-

रानें दुरुस्त केला पाहिजे कीं, त्यांचें चित्त सदोदित कांहीं तरी उद्योगांत गुंतलेलें राहील, आणि आयुष्याचीं पहिलीं २५ वर्षे मनाला त्रास झाल्यावांचून ब्रह्मचर्यात ते सहज घालवूं शकतील. प्रथम विवाहित व अविवाहित पुरुषांचें विशेष संघट्टन न होईल असा बंदोबस्त ठेविला पाहिजे. तसेंच प्रौढ मुलांस शारीरिक शक्तीच्या खेळांची व त्यांत निपुणता मिळविण्याची आवड उत्पन्न केली पाहिजे. डाक्तर देशमुख यांनीं वर्णन केल्याप्रमाणें ब्रह्मचर्याचरणाचे श्रेयस्कर परिणाम तरुण मंडळीच्या मनांत चांगले बिंबवले पाहिजेत. या व दुसऱ्या अनेक मार्गांनीं मुलांचें मन २५ वर्षेपावेतों निर्मल ठेवितां येईल. ब्रह्मचर्य राखण्याच्या कामांत आपण आपल्या पूर्वजांचा कित्ता विसरून कुमार्गास लागल्यामुळें त्यांच्यासमोर शरीरसामर्थ्यानें आपण अगदीं खुजांप्रमाणें दिसत आहों. अजूनही वर वर्णन केल्याप्रमाणें समाजाची प्रवृत्ति होऊन प्रौढविवाह रूढ झाले, तर चांगले दिवस आपल्यास खचित दिसतील. आणि विरुद्ध पक्षास आज जें भय वाटत आहे कीं, इसाबनीतींतील लाकडाचा राजा टाकून करढोक राजा मागिल्याप्रमाणें बालविवाह रूढ करण्याचा परिणाम होईल, तें भय निराधार आहे असें ठरेल.

येथें या लेखांतील किंबहुना ह्या लेखमालेंतील मुख्य विषयाचें प्रतिपादन समाप्त झालें व त्यांत माझ्या मताप्रमाणें सद्य:स्थितींत विवाहसुधारणेचे जे तीन मार्ग उत्तम, मध्यम व कनिष्ठ पण सध्यां सुलभ आहेत, ते दर्शवून त्यांतील गुणदोषांचेंही परीक्षण झालें. आतां प्रकरण पुरें करण्या-

पूर्वी वरीलपैकीं कोणतीही सुधारणा सिद्धीस नेण्याकरितां काय काय उपाय केले पाहिजेत याविषयीं थोडेंसें सांगितलें पाहिजे. या उपायांचा विचार करतांना ज्या गोष्टी एकदेशीय, अप्रत्यक्ष अथवा शास्त्रविरुद्ध किंवा समाजास अमान्य होण्यासारख्या असतील त्यांचा विचार न करितां फक्त महत्वाच्या गोष्टींचा विचार केला आहे.

प्रथम सर्व हिंदुस्थानाकरितां एक बालविवाहसुधारणापरिषद् स्थापन करावी. या सभेनें प्रथम बहुतेक लोकमान्य झालेली तिसरी सूचना ह्मणजे मुलींचें लग्न बाराव्या वर्षी अगर त्यानंतर करून ऋतुप्राप्तीपर्यंत त्यांस माहेरीं ठेवण्याची सुधारणा किंवा जी सुधारणा इष्ट व पसंत वाटेल ती हातांत घ्यावी. सामाजिक परिषदेनें हा विषय हातीं घेतलाच आहे, परंतु त्याजविषयीं विशेष प्रयत्न केला पाहिजे. तो असा कीं, सभेंतील प्रत्येक सभासदानें हातीं घेतलेली सुधारणा सिद्धीस नेण्याकरितां ठरविलेल्या नियमाप्रमाणें आपण स्वतः वागावयाची खबरदारी घेतली पाहिजे. असें करण्यापासून त्यांस कोणतेंही नुकसान पोंचण्याचा संभव नाहीं. कारण वरील सुधारणा शास्त्रबाह्य नसल्यामुळें तसें वागणारास बहिष्कार किंवा अपंक्तपणा वगैरे लोकछल होण्याचा संभव नाहीं. किंबहुना हल्लीं शेंकडों गरीबगुरीब लोकांच्या अडचणीमुळें राहिलेल्या मुलींचीं लग्नें उशिरां होण्याचा प्रघात पडलाच आहे. व उशिरां लग्नें करण्यांबद्दल जुन्या मताचे व नवीन मताचे सर्वांचें एकमत आहे. असें झालें असतां

मुलींच्या लग्नाची इयता एकदम सर्व हिंदुस्थानभर वाढेल आणि हजारों मुलींस बालवैधव्यांतून वांचविण्याचें पुण्य पदरीं पडेल.

तथापि बालविवाहसुधारणापरिषदेनें वरील प्रकारची व्यवस्था केल्यानेंच कार्यभाग सिद्धीस जाणार नाहीं. कारण खालच्या पायरीच्या लोकांत बालविवाहाची चाल जारी आहे व ते लोकसंख्येच्या व संघशक्तीच्या मानानें अधिक असून त्यांचा स्वभाव धर्मभोळा असतो, सबब त्यांचें मन वळवून त्यांच्या हृदयांत अनुकूळता उत्पन्न होण्याकरितां देशी भाषेंत लिहिलेलीं पत्रकें, पुस्तकें, वगैरे त्या लोकांस वाटलीं पाहिजेत. तसेंच सामाजिक सुधारणेचा उपदेश करून बालविवाहापासून होणारी हानि समजावून देण्याक-रितां सभेनें नेमिलेले किंवा स्वतःसिद्ध झालेले उपदेशक ठिकठिकाणीं फिरले पाहिजेत. याप्रमाणें जनसमूहाची संमति-मिळविली असतां अतिशय फायदा होईल. कारण त्यांच्या मदतीवांचून व अनुमतावांचून कोणतीही सुधारणा सिद्धीस जाणार नाहीं.

आपल्या देशभगिनींची मदत सुधारणेच्या कामीं घेतली असतां फारच चांगलें यश येईल. पहिल्या लेखांत सांगि-तल्याप्रमाणें सामाजिक आणि धार्मिक विषयांत प्रत्येक देशांतील स्त्रियांचें प्राबल्य इतकें विलक्षण असतें कीं, त्यांच्या विरुद्ध पक्षाला जरी जुन्या चालीचे अभिमानी धर्म-गुरु असले, तरी त्यांस त्या आपलें अनुकरण करण्यास

भाग पडतात. आतां आपल्या स्त्रियांस वर निर्दिष्ट केलेल्या सुधारणेस अनुकूल करून घेण्यास प्रथम त्यांस सुशिक्षित केलें पाहिजे. स्त्रीशिक्षणचा हल्लींच्या विषयाशीं निकट संबंध असल्यामुळें आणि आपल्या देशभगिनींची खरोखर उन्नति होण्याचा तोच मुख्य उपाय असल्यामुळें त्या विषयावर मी एक स्वतंत्र लेख लिहिणार आहें व त्या लेखानें प्रस्तुत लेखमाला पुरी करण्याचा माझा हेतु आहे. असो. स्त्रीशिक्षण जेव्हां पुष्कळ पसरेल तेव्हां आपल्या स्थितीबद्दल स्त्रियांनां स्वत:ला चांगला विचार करतां येईल. परंतु स्त्रीशिक्षण इतकें पसरण्यास अद्यापि कित्येक वर्षें लागतील. आणि केवळ स्त्रीशिक्षणाच्या प्रसारानें प्रस्तुत योजिलेली सुधारणा सिद्धीस जाईल असें नाहीं; याकरितां प्रस्तुत विषय स्त्रियांस समजावून त्यांचें मत अनुकूल करून घेण्याचे व त्यांस कळवळा आणण्याचे स्वतंत्र उपाय केले पाहिजेत. हे उपाय कोणते याजबद्दल थोडक्यांत खालीं वर्णन दिलें आहे.

हिंदु स्त्रीसमाजाच्या ललामभूत अशा ज्या थोड्या विदुषी आपल्यांत आहेत त्यांणीं स्त्रीसमूहास प्रसंगानुसार उपदेश करण्याचा पत्कर घेतला पाहिजे. स्त्रियांस उपदेश करून त्यांचें मन वळवून घेण्याचें काम जर स्त्रियाच उपदेशक असल्या तर चांगलें होईल. तशांतून आपल्या देशांतील स्त्रिया परकीयांच्या नजरेस पडत नाहींत व पुरुषांच्या समाजांत मिसळत नाहींत यामुळें त्यांच्या विचारांवर इष्छित परिणाम घडवून आणण्यास दुसरा मार्ग नाहीं.

अशा मोठ्या स्त्रीसमाजास उपदेश करण्याचें काम एवढ्या थोड्याशा स्त्रियांचे हातून होणार नाहीं. ह्मणून त्यांना जागोजागच्या अधिकारी अथवा वजनदार गृहस्थांच्या सुशिक्षित अथवा साधारण शिक्षण मिळालेल्या स्त्रियांनीं मदत केली पाहिजे. या उपदेशिकांनीं योग्य संधि सांधून मुलीचें लग्न उशिरां करण्याची व मुलीस ऋतुप्राप्तीपर्यंत माहेरीं राहून घेण्याची किती आवश्यकता आहे हें आपल्या श्रोतृजनांच्या मनांत चांगलें ठसविलें पाहिजे. त्यापासून बालवैधव्याची आणि अकालिक संभोगाची भीति नाहींशी होईल. मोकळ्या अंतःकरणानें पितृगृहीं मुली राहिल्यानें त्याची वाढ चांगली होईल. आणि अल्प वयांत सासूच्या जाचामुळें मुलींचे हाल होतात तसे होणार नाहींत. इत्यादि गोष्टींनीं आयांचें मन वळविण्यास सुलभ पडेल; कारण अल्प वयांत मुलींची ताटातूट होऊन खुद्द आया दुःखित होऊन बसतात. तेव्हां त्यांचें मन वळविण्यास फारसा उशीर लागेल असें वाटत नाहीं.

प्रौढविवाहास उत्तेजन येण्याकरितां अविवाहित मुलींनां शाळेंत कांहीं विशेष बक्षिसें ठेवित जावीं. अशा प्रकारच्या देणग्यांकरितां सुधारणापरिषदेनें पैसा जमवावा आणि जेव्हां जेव्हां मुलींच्या शाळेंत सभासद जातील, तेव्हां तेव्हां त्यांणीं १० वर्षांवरील अविवाहित मुलींस बक्षिसें द्यावीं. असें करीत गेलें असतां स्त्रीसमाजाच्या मनांत बराच फरक पडेल आणि प्रौढविवाहाचें जें मोठें भय वाटतें तें नाहींसें होऊन त्याची आवड वाटूं लागेल. असो; या विषयाचा आणखी विचार

केला तर दुसरे कांहीं उपाय सांपडतील यांत संशय नाहीं. तथापि जे सुचले ते तेथें नमूद केले आहेत. पूर्वी नामदार तेलंग यांचें व माझें या विषयासंबंधानें भाषण झाल्या वेळीं स्त्रियांच्या मनांत कळवळा उत्पन्न करून त्यांचें साहाय्य या कामास कसें मिळवितां येईल, असा प्रश्न त्यांनीं मला विचारल्यावरून त्यांस हे विचार मी एकदा कळविले होते, व त्यांस ते पसंत पडले होते.

अखेरची विचारणीय गोष्ट उरली ती अशी कीं, वरील सूचनांप्रमाणें सामाजिक सुधारणा अमलांत येण्यास सरकारची मदत कोणत्या प्रकारानें घेतली पाहिजे. सरकारच्या हातांत शेंकडों बाबी आहेत ह्यामुळें सामाजिक सुधारणेच्या उत्तेजनार्थ अप्रत्यक्ष व लहानसहान उपाय सरकारास पाहिजे तेवढे कारितां येतील. तथापि असल्या क्षुल्लक बाबी सांगण्याचें प्रयोजन नाहीं. व परकीय सरकारानें कोणत्याही सामाजिक सुधारणेचे कामीं अप्रत्यक्ष रीतीनें लहानसहान गोष्टींत मदत देणें प्रशस्त आहे कीं नाहीं, याची शंकाच आहे. करितां जे दोन उपाय सरकारानें करणें अत्यंत हिताचें व जरूरीचें आहे असें मला वाटतें, त्यांचा ऊहापोह येथें केला आहे.

बालविवाह कमी करण्याकरितां म्हैसूरचे माजी लोकप्रिय महाराज व बडोद्याचे सरकार यांनीं उदार अंतःकरणानें सुयुक्तिक कायद्याचे उपाय योजून इतरांस उत्कृष्ट उदाहरण दाखवून दिलें आहे. त्यावरून प्रजाजनांच्या कल्याणाची त्यांना कितपत कळकळ आहे, हें व्यक्त होतें. एतद्देशीय

राजेरजवाड्यांनीं अशा सामाजिक सुधारणेची सुरवात करणें हें फार हितावह आहे, कारण ते प्रजाजनांच्या जातीचे असल्यामुळें परकीय इंग्रज सरकारच्या उदार कृत्यांचा अर्थ जसा लोकांस विपरीत भासण्याचा संभव असतो, तसा त्यांच्या कृत्यांचा होऊं शकणार नाहीं. ह्मणूनच देशी संस्थानांतील अनुभव पाहिल्यावांचून इंग्रज सरकार या बाबतींत हात घालीत नाहीं. आणि लोकांकडून सुधारणेच्या कायद्याविषयीं अर्ज आल्यावांचून केवळ अधिकाराच्या जोरावर सरकारानें त्यांत हात घालूं नये असें माझें मत आहे. ह्याकरितां प्रथम लोकमत अनुकूळ करून घेतलें पाहिजे. बहुलोकमतानें सुधारणेच्या कायद्याचा अर्ज करून तो ठरवून घेणें हें कर्तव्य सुधारणेच्छु पुढाऱ्यांचें आहे.

बडोदें संस्थानांत सुधारणेच्या कायद्याचा जो मसुदा निघाला आहे, त्याविषयीं माझा असा अभिप्राय आहे कीं, त्याचा पाया कच्चा असून त्याला असावी तितकी शिक्षा (सँक्शन) नाहीं. जो कायदा इष्ट गोष्ट करण्याविषयीं केवळ शिफारस करतो, किंवा अप्रत्यक्ष उत्तेजन देतो, ज्या कायद्यांतून सुटून जाण्यास शेंकडों फटी असतात, तो कायदा तात्पुर्ताच उपयोगीं होईल यांत संशय नाहीं. लोकमतानें जितकी सुधारणा मान्य असेल त्याच्याही आंत सरकारानें संतुष्ट असावें हें चांगलें. परंतु कायदा करतांना तो बरोबर अमलांत येईल अशा रीतीनें मजबूत केला पाहिजे.*

---

* हल्लीं बडोदें येथें कायदा पसार झाला आहे.

बालविवाहाची पद्धति कमी करण्याकरितां आपल्या हिंदु प्रजेच्या बहुमतानें विनंतीअर्ज सरकारास केल्यास इंग्रज सरकारानें ह्या प्रकरणीं कसा कायदा करावा व त्याची अमलबजावणी कोणत्या प्रकारानें व्हावी, ह्याविषयीं येथें आपण विचार करूं. प्रत्येक देशांत, समाजांत आणि धर्मांत मुलीचें लग्नाचें वय कमींत कमी अमुक असावें, याविषयीं कायद्यानें इयत्ता ठरविली आहे. मात्र हें वय चोंहोंकडे एकच ठरलें आहे असें नाहीं. इंग्लंडांत व दुसऱ्या कित्येक देशांत १२ वर्षांची मर्यादा आहे. फ्रान्सांत १६ ची आहे. अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांपैकीं कांहींत हें वयप्रमाण इतकें कमी आहे कीं, तें १० च्या वर्षावर ठेपलें आहे. प्राचीन लोकांपैकीं रोमन लोकांत मुलीच्या लग्नांची वयोमर्यादा १२ होती. मुसलमान लोकांत १२ वर्षांच्या आंत आईबापाखेरीज इतरांनीं मुलीचें लग्न केलें असल्यास मुलगी वयांत आल्यावर तें तिला रद्द करतां येतें. अशा प्रकारची वयोमर्यादा हिंदु लोकांत असणें अत्यंत जरूरीचें आहे, इतकेंच नाहीं, तर तशी नसल्या कारणानें आपलें पुष्कळ नुकसान झालें आहे. अशी मर्यादा पूर्वी आपणांत नव्हती असेंही नाहीं. इ. स. आठव्या शतकाच्या सुमारास जेव्हां बालविवाह आपणांत शिरूं लागले, तेव्हां वयाच्या इयत्तेंत कांहीं कमीपणा केला गेला असेल, यामुळें ती उपलब्ध असलेल्या सर्व देशांतील इयत्तांपेक्षां फार खालची आहे. पण तेवढी जरी आपल्यांत अमलांत असती, तरी आपणांस फायदा झाला असता. परंतु अलीकडे व्यवहारांत ती लोकांनीं अजीबात गुंडाळून ठेविल्यामुळें आपलें नुकसान

होत आहे. महाभारतांतील शांतिपर्वांत युधिष्ठिरास भीष्मांनी लग्नाचा विषय सांगितला आहे, त्यांपैकीं ह्मणून पाठित केलेला खालीं लिहिलेला श्लोक निबंधकार देतात; त्यावरून कोणत्याही जातींत त्या काळीं या वयापूर्वी लग्नें होत नसत, असें दिसतें:—

**सप्तसंवत्सरादूर्ध्वं विवाहः सार्ववर्णिकः ।**
**कन्यायाः शस्यते राजन् अन्यथा धर्मगर्हितः ॥**

अर्थ—"हे राजा, कोणत्याही वर्णाच्या मुलीचें लग्न तिच्या सातव्या वर्षानंतर झालें पाहिजे. तसें न झाल्यास तें लग्न धर्मगर्हित समजावें." हिंदुस्थानांतील सर्व जातींस लागू पडेल असा कायदा करण्यास ह्या श्लोकाहून चांगला आधार क्वचितच सांपडेल. ह्यांतील सार्ववर्णिक आणि धर्मगर्हित हे शब्द विशेष महत्वाचे आहेत. श्लोकांतील वयोमर्यादा सार्ववर्णिक शब्दानें सर्व वर्णांस लागू केली आहे. आणि या वयापूर्वी केलेलें लग्न धर्मगर्हित अथवा अशास्त्र आहे असें कंठरवानें सांगितलें आहे. अमुक मर्यादेपूर्वी केलेलें लग्न कोठपर्यंत केव्हां कायदेशीर मानावें, याजविषयीं भानगडीचे आणि डळमळीत नियम करण्याची जरूरी यां श्लोकावरून राहत नाहीं. कारण अशास्त्र अथवा रद्द हें एकच सदर पुरे आहे. निरनिराळ्या सुधारकांचीं मतें याजविषयीं भिन्न आहेत. कांहीं असें ह्मणतात कीं, अशा प्रकारचीं लग्नें मान्य करणें न करणें हें विवाहित व्यक्तींच्या खुषीवर त्यांचा समागम होईपर्यंत ठेवावें. तोंपर्यंत त्यांनीं लग्न रद्द केलें नाहीं, तर तें कायदेशीर आहे असें समजावें. परंतु

अशा प्रकारची फट ठेविल्यानें कायद्याचें महत्व नाहींसें होऊन मोठमोठे तंटे उपस्थित होण्याची भीति आहे. मला वाटतें कीं, आठव्या वर्षापूर्वी केलेलीं लग्नें अशास्त्र व रद्द आहेत, असा सरळ एकच कायदा केला तर हितावह होईल. बडोदें संस्थानच्या कायद्याचे मसुद्यांत गृहीत केलेल्या मर्यादेचें उल्लंघन करणें हा गुन्हा आहे. परंतु अशा सक्तीपासून कांहीं फायदा होणार नाहीं. कारण श्रीमंत लोक सदरहू अपराधाबद्दल दंड भरून खुशाल मर्यादेच्या आंत लग्नें करतील किंवा संस्थानच्या हद्दीबाहेर जाऊन बिर्धास्तपणें अशीं लग्नें लावून कायद्यांतून सुटतील. मला वाटतें कायद्यानें ठरविलेल्या मुदतीच्या आंत झालेलीं लग्नें रद्दबातल ठरविल्यानें दिवाणी हक्कांस जो बाध येणार आहे तो फार मोठा आहे व त्याच्या भीतीनें आठव्या वर्षापूर्वीचीं लग्नें आपोआप बंद पडतील.

सर्व हिंदुस्थानास किंवा विशिष्ट जातींस लागू होणारा आठव्या वर्षाच्या वयाचा कायदा सर्व दृष्टीनें इष्ट व हितावह होईल असें दिसतें. अशा कायद्यानें बालविवाहास मोठाच प्रतिबंध होईल. विवाहाची मर्यादा जरी सारी आठ वर्षांची आहे, तरी संशयास कारण राहूं नये ह्मणून बहुतकरून स्वाभाविकपणें आठांहून पुष्कळ जास्त वयाच्या मुली झाल्यावांचून लोक मुलींची लग्नें करणार नाहींत. दुसरें ह्या मर्यादेपासून बालवैधव्य जरी पुरें नाहींसें होणार नाहीं, तरी निदान आठव्या वर्षापूर्वींच वैधव्यसमुद्रांत पडणाऱ्या पन्नास हजार दुर्दैवी अबला या दुःखांतून मुक्त होतील. तिसरें हा

कायदा हल्लींच्या लोकप्रवृत्तीच्या अथवा लोकमताच्या विरुद्ध नाहीं. उलट हल्लींचा व्यवहार आणि लोकमत या कायद्यास अनुकूलच आहेत. कारण आठ वर्षांहून अधिकवयापर्यंत हल्लीं मुली अविवाहित राहतात व तसें करण्यांत कोणताही दोष नाहीं असें लोक समजतात. तसेंच सदरहू मर्यादा धर्मशास्त्राविरुद्ध नाहीं, इतकेंच नाहीं, तर धर्मशास्त्रानें प्रत्यक्ष पर्णे घालून दिलेली आहे.

शास्त्रीय आधाराविषयीं थोडें जास्त विवेचन केलें पाहिजे. महाभारतांतील एक श्लोक वर दिला आहे, त्याशिवाय दुसरे कित्येक आधार निबंधकारांच्या ग्रंथांत आढळतात.

षडब्दमध्ये नोद्वाह्या कन्या वर्षद्वयं यतः ।
सोमो भुंक्तेऽथ गंधर्वस्ततः पश्चाद्धुताशनः ॥

अर्थ–"मुलीचें लग्न साहा वर्षांच्या आंत करूं नये, कारण पहिलीं दोन वर्षें सोम तिचा उपभोग घेतो. तदनंतर दोन वर्षेंपर्यंत गंधर्व आणि त्याचे मागून दोन वर्षें अग्नि." आतां सातवें वर्ष राहिलें, तें विषम असल्यानें विवाहास प्रतिकूळ मानिलें आहे.

मनूच्या खालीं दिलेल्या श्लोकावरून आठव्या वर्षापूर्वीही लग्न होऊं शकतें, असा आक्षेप निघण्यासारखा आहे:–

उत्कृष्टायाभिरूपाय वराय सदृशाय च ।
अप्राप्तामपि तां तस्मै कन्यां दद्याद्विचक्षणः ॥

"उत्कृष्ट, अभिरूप आणि सदृश असा वर मिळत असेल तर मुलगी अप्राप्ता असली तरी देखील सुज्ञानें

त्याला द्यावी." यांतील अप्राप्ता याचा अर्थ आठवें वर्ष प्राप्त न झालेली असा कुल्लूकाच्या आधारानें करून आठव्या वर्षापूर्वी लग्न करण्याला हा श्लोक आधार आहे असें मानतात परंतु मेधातिथिनें अप्राप्ता याचा अर्थ कामस्पृहामप्राप्ता ह्मणजे जिला कामेच्छा प्राप्त झाली नाहीं, असा केला आहे आणि संशयनिवृत्तीकरितां "षड्वर्षामष्टवर्षां वा न तु अत्यंत-बालिकाम्" असा खुलासाही केला आहे ( यांत षड्वर्षा हे षडब्दमध्ये नोद्वाह्या या श्लोकाविरुद्ध दिसतें ) ह्मणजे अप्राप्ता याचा अर्थ सहा किंवा आठ वर्षांची असा घेतला पाहिजे. परंतु याहूनही लहान वयाची मुलगी नसावी असें मेधातिथि ह्मणतो. याप्रमाणें अप्राप्ता या शब्दाची अडचण दूर होते. पण माझ्या मतें हा श्लोक प्रस्तुतच्या स्थितीस मुळींच लागू नाहीं, हें या श्लोकांतील उत्कृष्ट या पदाकडे लक्ष दिलें असतां ध्यानांत येईल. उत्कृष्ट हा शब्द मनूंत बहुधा उत्कृष्ट वर्णाचा अशा अर्थानें योजिला असतो. उदाहरणार्थ मनु. अ. ३ श्लोक ४४ पहा.

**शरः क्षत्रियया ग्राह्यः प्रतोदो वैश्यकन्यया ।**
**वसनस्य दशा ग्राह्या शूद्रयोत्कृष्टवेदने ॥**

सर्वज्ञनारायणानें उत्कृष्ट याचा अर्थ " उत्कृष्टायाभिरूपाय" या श्लोकांत मी ह्मणतों असा केला आहे. आणि या अर्थाप्रमाणें सदरहू श्लोक फक्त भिन्नवर्ण विवाहास मात्र लागू पडतो. भिन्नवर्ण विवाह हल्लीं नाहींसे होऊन फक्त जातींतल्या जातींत विवाह होतात, तेव्हां अप्राप्ता पदाचा कांहींही अर्थ घेतला तरी तो हल्लीच्या

विवाहास लागू होत नाहीं. लग्नाची कमीत कमी इयत्ता आठव्या वर्षाची आहे, हें बहुतेक सर्व टीकाकारांस मान्य आहे. खुद्द कुंल्लूकानें दक्षाच्या वचनाचा उतारा घेतला आहे, त्यावरूनही ही इयत्ता ठरलेली दिसते.

विवाहयेदष्टवर्षामेवं धर्मो न हीयते ।

आठव्या वर्षाच्या आंतील लग्नें धर्महीन आहेत, असें सांगणारीं अनेक वचनें असतां अप्राप्ता किंवा उत्कृष्ट या संदिग्ध शब्दांवरून तीं वचनें निष्फळ करणें हें योग्य दिसत नाहीं.

आठव्या वर्षापर्यंत मुलीच्या विवाहाची बंदी करणारा शास्त्राधार फार मजबूत आहे, असें मला वाटतें. तो जर शास्त्री मंडळापुढें आणि शंकराचार्यांसमोर व्यवस्थित रीतीनें मांडला, तर पसंत ठरून आठव्या वर्षापूर्वींच विधवा होणाऱ्या बालिकांच्या दुःखपरिहारार्थ त्याचा उपयोग होईल. याकरितां हें काम एखाद्या वजनदार सभेनें हातीं घेऊन शंकराचार्यांकडे अनुमोदनार्थ मंडळी पाठविली पाहिजे. त्यांचें अनुमोदन मिळाल्यावर सरकारास विनंतिअर्ज तयार करून लोकांच्या सह्या मिळविण्याकरितां खटपट केली पाहिजे. व त्याजवर पुरेशा सह्या मिळाल्या ह्मणजे बहुमतानें मनाईचा कायदा करण्याविषयीं सरकारास विनंति करण्यास ठीक पडेल.

बालविवाहनिषेधक कायदा माझ्या मतानें फार लांबलचक नसावा. तसेंच त्याचें उल्लंघन केल्याचा परिणाम वर लिहिल्याप्रमाणें प्रत्यक्ष व दिवाणीतर्फेंचा ठरविला जावा,

ह्मणजे आठव्या वर्षापूर्वी लग्न केलें असतां तें रद्द व बेकायदेशीर समजलें जावें. या कायद्यांत आणखीही एक बंदोबस्त असणें जरूर आहे, वरिष्ठ जातींतल्या मुलीचें वय जन्मपत्रिकेवरून नक्की शाबित करितां येतें. परंतु सदरहू कायदा वरिष्ठ जातींप्रमाणें कनिष्ठ जातींच्या सर्व हिंदु लोकांस लागू करणें आहे व त्या लोकांजवळ असें साधन नसल्यामुळें मुलीचें वय शाबीत करण्याचे कामीं त्यांस मोठी पंचाईत पडेल. तशांतून लग्नानंतर फार वर्षांनीं हा प्रश्न निघाल्यास मग तर कांहींच आधार राहणार नाहीं. हिंदुस्थानांत असावी तशी जन्मनोंद नसते; व सर्वव्यापी जन्मनोंदीची व्यवस्था जारी ठेवण्याचें काम फार खर्चाचें असून प्रस्तुत विद्याप्रसाराच्या मानानें कदाचित जुलुमाचेंही होईल. याकरितां खालीं लिहिलेलें कलम कायद्यांत घालावें असें मला वाटतें:—" जेव्हां जेव्हां मुलींच्या आईबापांस अगर पालकांस तिच्या वयाचा दाखला घेणें जरूर वाटेल, तेव्हां अर्जदाराच्या जातीपैकीं पांच पंचांनीं त्या हद्दीच्या न्यायाधिकाऱ्या (माजिस्ट्रेटा) समक्ष अमुक मुलीचें वय पुरें सात वर्षांचें झालें असल्याबद्दल लिहून दिल्यास, अर्जदारास दाखला दिला जावा. पंचांनीं लिहिलेला मजकूर खोटा नाहीं अशी खात्री माजिस्ट्रेटाची झाल्यास त्याणें आपली सही त्या दाखल्यावर घालावी व तो दाखला अर्जदारास द्यावा.

तो अधिकारी दाखल्यावर आपली सही घालण्यास नाकारील तर नाकरण्याची कारणें त्याजवर लिहिलीं पाहिजेत. त्याणें केलेला निर्णय अखेरचा समजला जाईल. आणि त्यानंतर

अर्जांतील मुलीचें वय पुरें ७ वर्षाचें झालें आहे, अशाबद्दल संशयनिवृत्ति होण्याइतका पुरेसा काळ गेल्यानंतर तिचें लग्न आईबापांनीं करावें.

अधिकारी आपली सही करून दाखला देईल तर त्यांत लिहिलेल्या मुलीचें वय पुरें ७ वर्षाचें आहे, अशाबद्दल तो दाखला निर्विवाद पुरावा समजला जाईल. "

लग्न सात वर्षे पूर्ण होण्यापूर्वी झालें आहे, सबब रद्द आहे असा दावा आणण्यास बारा वर्षांची मुदत लग्नापासून कायम केल्यास हरकत दिसत नाहीं. असो.

बालविवाहसुधारणा सिद्धीस जाण्याकरितां दुसरी कायद्याची मदत जरूर आहे, ह्मणून पूर्वी निर्दिष्ट केलें आहे त्याचा विचार करणें बाकी आहे. विवाहित मुलीस ऋतुप्राप्तीपर्यंत सासरीं पाठवूं नये अशी सूचना पूर्वी केली आहे. तथापि हल्लींच्या व्यवहाररीतीस अनुसरून असलेला कायदा ह्या शिफारसीच्या विरुद्ध आहे. हल्लीं मुलीच्या लग्नानंतर पाहिजे त्या वेळीं तिला आपल्या ताब्यांत घेण्याचा हक्क तिच्या नवऱ्यास किंवा त्याचे आईबापांस आहे. ह्याविषयीं मेन साहेबानें आपल्या हिंदुधर्मशास्त्राच्या पुस्तकांत असें ह्मटलें आहे:—" बायको कितीही ल्हान वयाची असली तरी तिच्या लग्नापासून तिच्या पालकपणाचा हक्क कायद्याप्रमाणें नवऱ्याकडे येतो; व लग्नापासून पाहिजे त्या वेळीं आपल्या घरीं राहाण्यास तिला भाग पाडण्याचा त्यास हक्क आहे असा सामान्य नियम आहे. " ह्या मेनच्या अभिप्रायाप्रमाणें जर एकाद्या बापानें

स्तुत्य हेतूनेंही आपल्या मुलीस ऋतुप्राप्तींपर्यंत सासरीं पाठवि-ण्याचें नाकारिलें, परंतु ही गोष्ट त्यच्याा जांवयास किंवा त्याह्मास आवडली नाहीं, आणि हा मतभेद मुकदमा होण्यापर्यंत येऊन पोंचला, तर ते वरील कायद्याच्या आधारानें मुलीच्या बापाच्या सर्व हेतूंवर सहज पाणी ओतून आपला हट्ट पुरा करूं शकतील. मेन साहेबांनीं लिहिल्याप्रमाणें पाहिजे त्या वयाच्या बायकोचा ताबा घेण्याचा हक्क नवऱ्यास आहे कीं काय, हा प्रश्न वादग्रस्त आहे, तरी शास्त्रवचनांचा योग्य विचार केला असतां विवाहित स्त्रीचे समागमाचा अथवा तिजकडून सेवा घेण्याचा हक्क ऋतुप्राप्तीपर्यंत, निदान सोळा वर्षेपावेतों नवऱ्यास येत नाहीं, असें मला वाटतें.

स्त्रियांवर निरनिराळ्या वयांत कोणाचा ताबा रहावा त्याजविषयीं धर्मशास्त्रानें स्पष्ट नियम ठरविले आहेत. हिंदु धर्मशास्त्राची थोडीबहुत ज्यास माहिती आहे, अशा हिंदु अथवा परकीय मनुष्यास मनूचा खालील प्रसिद्ध श्लोक ठाऊक असेलच:-

पिता रक्षति कौमारे भर्ता रक्षति यौवने ।
पुत्रश्च भर्तरि प्रेते न स्त्री स्वातंत्र्यमर्हति ॥

आतां मेन साहेबांनी अभिप्राय दिला आहे, तो कटिराम विरुद्ध मुसमात गेंदनीं ह्या कलकत्ता हायकोर्टाच्या फैसल्या-च्या आधारानें दिला आहे. परंतु सदरहू ठराव विषयाचा एकंदर विचार होऊन दिला गेला आहे, असें वाटत नाहीं. कारण मनूनें वरील श्लोकांत स्पष्ट असें सांगितलें आहे कीं, नवऱ्यानें बायकोचें संरक्षण तिच्या तारुण्यापासून करावयाचें

आहे. नवऱ्याचें रक्षण लग्नापासून सुरू न होतां तारुण्या- पासून सुरू होतें असें ह्मटलें आहे. आतां बापाचा रक्षणा- धिकार कौमारापर्यंत आहे आणि कौमार याचा अर्थ कुल्लू- कानें अविवाहित काळ असा केला आहे. तेव्हां लग्नानंतर बापाचा हक्क उघडच नाहींसा होतो, असें कित्येक ह्मणतील. परंतु ह्या ठिकाणीं कौमार हा शब्द यौवन शब्दाच्या विरुद्ध अर्थी घातला आहे, सबब त्याचा अर्थ बाल्यदशा असाच घेतला पाहिजे पण इतकी भानगड कशास पाहिजे? मनूचा याच संबंधानें दुसरा एक श्लोक आहेः—

बाल्ये पितुर्वशे तिष्ठेत्पाणिग्राहस्य यौवने ।

या ठिकाणीं बाल्य शब्द स्पष्ट योजिला आहे आणि त्याचा विवाहित किंवा अविवाहित स्थितीशीं कांहींच संबंध नाहीं. स्त्रियांची बाल्यदशा सोळा वर्षेपर्यंत आहे—" बाला स्यात्षोडशाब्दा." तात्पर्य, हिंदु धर्मशास्त्राचा रोंख असा दिसतो कीं, मुलींनीं यौवन प्राप्त होईपर्यंत ह्मणजे ऋतुप्राप्ति- पर्यंत अथवा ऋतु लवकर न येईल तर सोळाव्या वर्षापर्यंत बापाच्या घरीं राहावें. याज्ञवल्क्यस्मृतीचें वचन याच्या उलट आहे हें खरें, आणि कुल्लूकाचा अभिप्राय असाच दिसतो; तथापि मनूची आणि याज्ञवल्क्याची एकवाक्यता केली पाहिजे, ह्मणजे यौवन आणि लग्न, बाल्य आणि अविवाहित- पणा यांची एकवाक्यता केली पाहिजे. वास्तविक पाहतां मनूच्या आणि याज्ञवल्क्याच्या काळांत स्त्रियांची लग्नें यौवनांतच होत असत, ह्यामुळें लग्न असा शब्द साहजिक मनूच्या यौवन शब्दाचे ठिकाणीं याज्ञवल्क्यानें योजिला आहे. पूर्वी हे दोन्ही

शब्द एकाच स्थितीचे दर्शक असल्यामुळें मतभेद वाटला नाहीं. पण हल्लीं बालविवाहपद्धति रूढ असल्यामुळें दोन स्मृतींमध्यें विरोध दिसूं लागला. असा विरोध आला, ह्मणजे एकास मुख्य मानून दुसऱ्यास तदर्थक गौणत्वानें मानण्याचा सांप्रदाय आहे, व मुख्यगौणविचार इतर गोष्टींच्या व स्मृतींच्या आधारें केला जातो. विष्णु आणि वशिष्ठ या स्मृतींत पतीचा ताबा स्त्रीच्या यौवनापासून दिलेला आहे. "बाल्ययौवनवार्धकेपि पितृभर्तृपुत्राधीनता" असें विष्णूचें वचन आहे. मनूचा आणि वशिष्ठाचा श्लोक एकच आहे. तेव्हां मनूच्या वचनास विष्णु आणि वशिष्ठ या स्मृतींचें पाठबळ आहे. दुसरें अर्भकांचीं लग्नें लावण्याची चाल ज्या अनेक जातींत आहे, त्यांपैकीं कित्येकांत ऋतुप्राप्तीपर्यंत मुलीस माहेरीं ठेवून घेण्याची रीत आहे. ही रीत कोणत्या आधारानें झाली आहे, हें आपण पाहूं लागलों असतां, यौवनदशेंत व बाल्यदशेंत निरनिराळे पालक असण्याची पूर्वी खरी शास्त्राज्ञा असावी, याशिवाय दुसरें कारण दिसत नाहीं. यौवन शब्दाला मुख्यत्व देण्यास आणखी ही एक सबळ प्रमाण आहे. ऋतुप्राप्तीपूर्वी स्त्रीसमागम करणें हें शास्त्रदृष्ट्या निषिद्ध आहे. धर्मशास्त्राची दृष्टि फार खोल व उदात्त आहे; अशा अपक्व मैथुनानें बीजनाश होतो व शुक्राच्या व्यर्थीकरणानें पाप लागतें, असें धर्मशास्त्राचें मत आहे. ह्या तत्वाकडे पाहतां नवऱ्यास स्त्रीच्या सहवासाचा हक्क तिच्या ऋतुप्राप्तीपर्यंत नसावा, हें योग्य दिसतें. कारण नवऱ्याच्या ताब्यांत बायको असल्यास त्याजकडून वर लिहिलेलें पापाचरण होण्याचा संभव आहे. सारांश, एकंदर

गोष्टींचा विचार करितां मनूनें योजिलेल्या यौवन शब्दास प्राधान्य देऊन याज्ञवल्क्याच्या शब्दास तदुपलक्षणत्व आहे, असें मानावें हें सुयुक्तिक दिसतें.

बंगाल हायकोर्टाचें वरील फैसल्यांतील मत मुंबई हायकोर्टास मान्य नाहीं, असें दिसतें. अलिकडच्या एका प्रसिद्ध मुकदम्यांत मुंबई हायकोर्टानें आपला अभिप्राय येणेंप्रमाणें दिला आहे:—"ह्या देशांत अति लहानपणीं लग्नें लावण्याची चाल असल्यामुळें अर्भक विवाहितेनें प्रौढ वयापर्यंत माहेरीं राहण्याची वहिवाट आहे, ही गोष्ट कबूल झालेली आहे. आणि या वहिवाटीकडे दृष्टि देऊन स्त्रीला तिचे प्रौढ वयापूर्वीं ( ऋतुप्राप्तीपूर्वीं ) ताब्यांत देण्याविषयीं नवऱ्याची विनंति कोर्ट अमान्य करूं शकेल. तथापि न्या० मित्र व मार्कबी यांच्या कटिराम विरुद्ध मुसमात गेंदनी या मुकदम्यांतील फैसल्याचा विचार करतां वरील नियम निर्विवाद आहे, असें आमच्यानें ह्मणवत नाहीं." असो. जेव्हां हा प्रश्न मुंबई हायकोर्टासमोर प्रत्यक्ष निर्णयाकरितां येईल, त्या वेळीं ह्या प्रश्नाचा सर्व बाजूंनीं पूर्ण विचार होऊन अप्रौढ विवाहितेस माहेराहून काढून आपल्या ताब्यांत घेण्याचा नवऱ्याचा हक्क आहे असें कोर्ट ठरविणार नाहीं असें वाटतें.

या लेखांत येथवर झालेल्या विवेचनाचा गोषवारा येणेंप्रमाणें आहे:—

**प्रथम**—बालविवाहपद्धतीमुळें आपला राष्ट्रीय अपकर्ष होत आहे; या शिवाय असंमत वैधव्याचा जो अति दुष्ट भाग बालवैधव्य तो उत्पन्न होण्यास बालविवाहच कारण आहे. याकरितां प्रथम बालविवाहाची सुधारणा जरूर आहे. ही

सुधारणा शास्त्राच्या आणि लोकमताच्या विरुद्ध नसल्यामुळें विधवापुनर्विवाहसुधारणेपेक्षां घडून येण्यास सुलभ आहे.

**दुसरें**—बालविवाहसुधारणा तीन मार्गांनीं करितां येण्यासारखी आहे. पहिला–मुलींचीं लग्नें ऋतुप्राप्तीनंतर तीन वर्षांच्या आंत करणें. दुसरा–मुलींचीं लग्नें सवडीप्रमाणें विवाहहोमापर्यंत करून ऋतुप्राप्तीनंतर सप्तपदीचा विधि करणें व तोंपर्यंत मुलीस माहेरीं ठेवणें. तिसरा–मुलींचीं लग्नें बारा वर्षांनंतर करून त्यांस माहेरीं ठेवणें.

**तिसरें**—वरील सुधारणेपैकीं कोणत्याही सुधारणेपासून जें अनहित उत्पन्न होण्याचा संभव आहे, त्याची बालविवाहापासून उत्पन्न होणाऱ्या हानीशीं तुलना केली असतां तें अनहित इतकें कमी दिसतें कीं, तें सोसण्यास किंवा पत्करण्यास आपण कबूल असलें पाहिजे. सदरहू सुधारणेपासून होणाऱ्या विवाहपूर्व अनीतीचें प्रमाण फारच थोडें राहील असें वाटतें. विशेषें करून मुलींचे आईबाप अगर पालक त्यांजवर हल्लींपेक्षां अधिक कडक दाब ठेवितील, तेव्हां हें प्रमाण साहजिकच अगदीं कमी होईल. याशिवाय हिंदुस्थानच्या हवामानाला स्त्रीपुरुषसंयोग लवकर होणें इष्ट आहे, असें मानणें चुकीचें आहे. तसेंच प्रौढविवाह सुरू करतांना कांहीं दुष्परिणाम होतील, परंतु ही पद्धति पूर्ण रूढ झाल्यावर त्यांचें समूळ निर्मूलन होईल.

**चवथें**—वरीलपैकीं कोणतीही इष्ट सुधारणा अमलांत आणण्यास एक सभा स्थापन करावी. तिच्या सभासदांनीं ठरलेल्या नियमांप्रमाणें वागावें, व सुधारणेचा उपदेश लोकसमुदायास व स्त्रियांस करवावा. बालविवाहसुधारणेस सर-

कारची व कायद्याची मदत दोन तऱ्हेनें घेण्यासारखी आहे. प्रथम मुलींचें कमींत कमी लग्नाचें वय आठवें वर्ष कायद्यानें ठरवावें, व त्या वयापूर्वीचीं लग्नें रद्द व गैरकायदेशीर समजावीं. दुसरें—ऋतुप्राप्तीपर्यंत विवाहितेस आपल्या घरीं आणण्याचा हक्क नवऱ्यास अगर त्याचे पालकास नाहीं, हें मत कायद्यानें कबूल झालें पाहिजे.

येणेंप्रमाणें वैवाहिक सुधारणे संबंधानें मतें मी समाजापुढें ठेविलीं आहेत. एका पद्धतीनें कित्येक वर्षांपासून चालत आलेल्या रूढीस सोडून देऊन अपरिचित दुसऱ्या रस्त्यानें जाणें समाजास किती धोक्याचें आहे, ही गोष्ट जेव्हां माझ्या पूर्ण नजरेसमोर येते, तेव्हां माझें आजपर्यंत झालेलें विवेचन मोठें साहसाचें आहे असें मला वाटतें. तथापि हातीं घेतलेलें काम शेवटास नेलें पाहिजे या उद्देशानें या लेखांतील विचार सुज्ञ वाचकांपुढें ठेविले आहेत. सुज्ञांस जे शुद्ध, हितकारक व निर्दोष वाटतील ते ग्रहण करून बाकीचे व्यक्त करावे अशी माझी विनंति आहे. लेखनाच्या जोरांत किंवा विषयाच्या भरांत जे ग्राम्य किंवा निंदाबोधक शब्द उपयोगांत आले असतील त्यांजबद्दल वाचकाची माफी मागून हा लेख पुरा करितों.

---

# स्त्रीशिक्षण.

समाजाच्या हल्लींच्या मताकडे पाहिलें तर स्त्रियांस शिक्षण देणें उपयुक्त आहे हें सिद्ध करण्याकरितां निराळा लेख लिहिण्याची अवश्यकता नाहीं. हिंदुस्थानच्या 'डार्क एजिस' ह्मणजे अवनतीच्या काळांत स्त्रीशिक्षण अजीबात बंद पडलें तेव्हांपासून पाश्चात्य शिक्षणाचा प्रसार इंग्रजी अमलांत होऊं लागेपर्यंत स्त्रियांस शिक्षण देण्याचा प्रघात आपल्या लोकांत नव्हता. यामुळें प्रथम स्त्रियांस शिक्षण देणें ह्मणजे एक सुधारलेलें मत आहे असें लोकांना वाटे यांत आश्चर्य नाहीं. परतु प्राचीन समाजस्थितीची माहिती जसजशी विद्येच्या प्रसारामुळें अधिकाधिक होऊं लागली, तसतशी ही लोकमतस्थिति बदलत चालली. हल्लीं स्त्रीशिक्षणासंबंधानें लोकमत प्रतिकूल आहे असें दिसत नाहीं. गार्गी वाचक्नवी इत्यादि स्त्रियांची वेदांत विषयांत पारंगतता, द्रौपदीचीं नीतिविषयक सरस भाषणें, उत्तरेस नृत्य वगैरे कला शिकविण्याकरितां केलेली बृहन्नडेची योजना, त्याचप्रमाणें मालविका मालती इत्यादि नाटकांतून वर्णन केलेल्या सुशिक्षित स्त्रियांचीं उदाहरणें पाहून पूर्वी हिंदुस्थानांत स्त्रियांस फार चांगलें शिक्षण देत असत, हें लोकांस कळून आलें आहे. याशिवाय स्त्रीशिक्षण धर्माची एक बाब नसून त्या विरुद्ध कोणी कलिवर्ज्यवचन ही नाहीं,

स्त्रीशिक्षणास विरुद्ध असे फक्त "स्त्रिया नैसर्गिक दुष्ट आहेत" त्या 'ध' चा 'मा' करतील वगैरे कल्पनातरंग बाकी राहिले, त्यांचाही हल्लीं विशेष पगडा आहे असें वाटत नाहीं. सारांश स्त्रीशिक्षणाला प्रतिकूल कारणें कोणतींच हल्लीं दिसत नाहींत. मग स्त्रीशिक्षणाचें पाऊल जितकें पुढें पडावें तितकें पडत नाहीं, याचें कारण काय?

हा प्रश्न प्रथम दर्शनीं गूढ दिसतो. जसें इंग्रजी शिक्षणाकरितां प्रथम प्रथम उत्तेजन असे तसें हल्लीं स्त्रीशिक्षणाकरितां सरकारांतून व लोकांकडून मिळत आहे, देशहितचिंतक या बाबतींत इतर सुधारणेच्या बाबीपेक्षां अधिक श्रमही करीत आहेत, तथापि सुशिक्षित स्त्रियांची संख्या जितकी असावी तितकी दिसत नाहीं. सन १९०१ ची मनुष्यसंख्यागणती झाली त्यावेळच्या रिपोर्टांत नुसत्या मुंबई इलाख्याचें प्रमाण पाहिलें तर ९७ लक्ष हिंदु स्त्रियांत फक्त ५३ हजार शिकलेल्या दाखविल्या आहेत. नुसतें लिहितां वाचतां येतें अशा स्त्रियांचें प्रमाण जर आपल्यांत फार थोडें आहे तर याहून जास्त चांगल्या शिकलेल्या स्त्रियांची संख्या फारच कमी असली पाहिजे. पारशी स्त्रियांत सुशिक्षित स्त्रियांची संख्या हिंदु लोकांच्या मानानें अधिक आहे, ह्मणजे ३८ हजार स्त्रियांत २० हजार स्त्रिया शिकलेल्या नमूद आहेत. यावरून असें वाटतें कीं, शेंकडों वर्षांपासून खिळलेल्या लोकांच्या समजुती जरी वरपांगीं लोक विरुद्ध बोलत नाहींत तरी अंतर्यामी जशाच्या तशाच आहेत; किंवा स्त्रीशिक्षणाचा क्रम तरी लोकांस जितका पसंत पडावा तितका पडत नाहीं.

माझ्या मतें हें दुसरें कारण विशेष प्रबळ आहे. स्त्रियांस शिक्षण देणें हें पुरुषाच्या शिक्षणाप्रमाणें अवश्य नाहीं हें खरें आहे. इंग्रजी शिक्षण ह्मणजे पुरुषांस द्रव्यार्जनाचें किंबहुना उदरनिर्वाहाचें साधन होऊन बसलें आहे, यामुळें उच्च जातींत इंग्रजी शिक्षणाचे प्रसारास जसें जबरदस्त उत्तेजन आहे तसें स्त्रीशिक्षणास नाहीं हें उघड आहे. व या कारणानें पुरुषांच्या संख्येइतकी सुशिक्षित स्त्रियांची संख्या कधींही होणार नाहीं. परंतु हल्लीं पुरुषांच्या मानानें स्त्रियांच्या शिक्षणाचें प्रमाण अगदींच कमी आहे हें प्रांजलपणें कबूल केलें पाहिजे. सुशिक्षित स्त्रियांची संख्या याहून अधिक झाली पाहिजे. ती कां होत नाहीं, याचा विचार आपणांस मुख्यत्वें केला पाहिजे. स्त्रीशिक्षणाची दिशा बदलल्याशिवाय लोकमत अधिक अनुकूल होणार नाहीं असें मला वाटतें. हल्लींची स्त्रीशिक्षणाची दिशा कांहीं चुकली आहे व ती कशी असली पाहिजे या हेतूनें हा निबंध लिहिला आहे. सारांश स्त्रीशिक्षणाचा खरा उद्देश काय असला पाहिजे व हिंदु समाजाची स्थिति मनांत आणितां तें कोणत्या प्रकारचें असावें व तें देण्याची पद्धति कशी असावी या विषयाचा ऊह या निबंधांत करण्याचें योजिलें आहे.

प्रथमतः हल्लींच्या पद्धतीप्रमाणें शिकलेल्या मुली व स्त्रि-यांत आपणास काय दोष दिसतात तें पाहूं. स्त्रियांस पुरु-षाप्रमाणेंच सर्व विषय शिकवून अखेर त्यांस ग्रॅज्वेट बन-विण्याची स्त्रिशिक्षणाची दिशा असल्यामुळें आमच्या रीति-

भाती, आमचा धर्म, आमच्या स्त्रियांच्या संवयी यांत अंतर पडण्याचा बराच संभव दिसतो. युरोपियन स्त्रियांप्रमाणें आमच्या स्त्रियांस संवयी व रीतिभाती लागतील तर तें ठीक नाहीं, असें पुष्कळ लोकांस वाटतें. फीमेल हायस्कूल, शारदा-सदन वगैरे ठिकाणीं शिकलेल्या मुली संसाराच्या कामास निरुपयोगी असतात अशीही कित्येकांची कुरकुर आहे. इंग्रजी शिक्षणामुळें सुशिक्षित पुरुषाप्रमाणें सुशिक्षित स्त्रि-यांच्या ठिकाणीं आपल्या वाडवडिलांविषयीं अनादरबुद्धि, स्वेच्छेप्रमाणें वागण्याची हौस, खर्चिक रीतीनें राहण्याची चटक, आपल्यांत व तशीच पारशी लोकांत उत्पन्न झालेली दिसत आहे. तेव्हां अशा फलश्रुतीच्या भीतीनें स्त्रीशिक्षणाचा प्रसार जितका व्हावा तितका होत नाहीं.

हल्लीची शिक्षणपद्धति जर वाईट आहे तर ती कशी असली पाहिजे हा प्रश्न सोडवतांना प्रथम शिक्षण ह्मणजे काय याचा खरा अर्थ लक्षांत आणिला पाहिजे. साधारण दृष्टीला लिहिणें, वाचणें, भूगोल, इतिहास, गणित, सिद्धांत शिकणें ह्मणजे शिक्षण देणें असें दिसतें. व हे विषय बाय-कांस शिकविणें ह्मणजे स्त्रीशिक्षण असा ठरीव अर्थ होऊन बसला आहे व असा शिक्षणाचा चुकीचा अर्थ झाल्यानें स्त्रीशिक्षणाची दिशा सहजच चुकली आहे. शिक्षणाचा फैलाव झाल्यावांचून समाजस्थिति सुधरत नाहीं, या सिद्धां-तांतील शिक्षण शब्दाचा अर्थ वरील चुकीच्या व्याख्ये-प्रमाणें केला असतां लिहिणें, वाचणें, भूगोल, गणित, सि-द्धांत इत्यादि विषय राजापासून रंकापर्यंत निरनिराळ्या

स्थितींतल्या, निरनिराळ्या धंद्यांच्या मनुष्यांस शिकणें सारखेंच अवश्यक होईल. पण शिक्षण शब्दाचा खरा अर्थ असा नाहीं. शिक्षण ह्मणजे मनुष्याची मानसिक व शारीरिक शक्ति व नीति यांस अशा रीतीनें वळण देऊन वाढवावयाचें कीं, समाजांतील व कुटुंबांतील आपलीं कर्तव्यें त्यांस योग्य रीतीनें बजावितां येतील. या व्याख्येप्रमाणें शिक्षण द्याव-याचें असल्यास अर्थात्‌च ज्यांस शिक्षण देणें आहे त्याची मानसिक शक्ति व शारीरिक शक्यता कशी आहे, त्यांचे स्वभाव कसे आहेत, त्यांचीं कुटुंबांतील व समाजांतील कर्त-व्यें काय आहेत याचा प्रथम विचार झाला पाहिजे. पुरु-षांचीं व स्त्रियांचीं समाजांतील व कुटुंबांतील कर्तव्यें सारखीं असतीं, त्यांच्या मानसिक व शारीरिक अवस्था सारख्याच असत्या तर त्यांस सारखेंच शिक्षण देणें योग्य झालें असतें. परंतु असें नसतांनाही त्यांस एकाच चरकांतून काढण्यांत गाईस बैलाप्रमाणें वेसणी फोडून नागरकीच्या कामास ला-वण्या इतका पात्रापात्र विचार होईल.

कोणी येथें असा आक्षेप साहजिक घेतील कीं, स्त्रियांची व पुरुषांची शारीरिक व मानसिक शक्ति सारखी नाहीं व त्यांचीं कुटुंबांतील कर्तव्यें निरनिराळीं आहेत हें तरी कशां-वरून? मिल्लसारखे कट्टे अबलाभिमानी लोक "पुरुष स्त्रियांस स्वयंपाक करावयास लावितात, त्यांस राजकीय हक्काला लायक समजत नाहींत, वगैरे त्याजवर पुरुषांनीं घालून दिलेल्या प्राचीन रूढीचा जुलूम आहे; स्त्रियांस स्वतंत्रता दिली असतां प्रत्येक धंद्यांत, प्रत्येक कामांत त्या सर्व प्रकारें पुरु-

षांची बरोबरी करतील," इत्यादि प्रतिपादन करितात. मला वाटतें ह्या प्रतिपादनांत जितकें सत्य आहे तितकेंच अतिशयोक्तिचेंही अंग आहे. कोणताही सिद्धांत कायम करितांना जी गोष्ट पांच पंचवीस व्यक्तींसच लागू आहे, ती सर्व व्यक्तींना लागू करणें ही एक मोठी चुकी होते. तात्पर्य एकंदर स्त्रियांना कोणती गोष्ट लागू आहे, याचा विचार स्त्रीशिक्षणपद्धति कायम करतांना केला पाहिजे. कांहीं स्त्रिया गणितांत किंवा कवित्वांत किंवा पदार्थविज्ञानशास्त्रांत पुरुषांबरोबर निष्णात झाल्या असतील. कांहीं स्त्रिया क्रिकेट वगैरे शक्तीच्या खेळांत पुरुषांशीं टक्कर मारूं शकतील; कित्येक विशिष्ट स्त्रियांनीं राज्याधिकार पुरुषाहूनही अधिक जोरानें व शहाणपणानें चालविला असेल. इतक्यावरून एवढेंच सिद्ध होईल कीं, विद्यापीठांत किंवा क्रिकेट भूमीवर किंवा राजाधिकृत–सभेंत जाण्यास स्त्रियांस स्त्रिया ह्मणून आडकाठी नसावी. ज्या स्त्रिया योग्य, हुशार, सशक्त किंवा उत्साही असतील त्यांनीं सर्व सामान्य शिक्षणसाधनांचा पुरुषांबरोबर उपयोग करावा, हें ठीक आहे. पण बहुत्वानें स्त्रियांस जो शिक्षणक्रम देणें आहे, त्यांत साधारणरीत्या स्त्रियांच्या स्थितीचा विचार झाला पाहिजे.

मिल्ल सारख्या विद्वान् ग्रंथकर्त्याच्या लेखावर टीका करणें ह्मणजे ल्हान तोंडीं मोठा घास घेणें आहे. शिवाय हा लेख स्त्रियांची परवशता या पुस्तकावर टीका करण्याकरितां लिहिला नाहीं. परंतु प्रसंगवशात् एवढें लिहिणें जरूर आहे कीं, मिल्लनें एकतर्फी अतिशयोक्तीचा कांहीं अंशीं

स्वमतपुष्टयर्थ उपयोग केला आहे. ज्या दोन मुख्य अडचणी स्त्रियांस आहेत, त्याचा तर त्यानें कोठेंच उल्लेख केला नाहीं. पण एक ठिकाणीं मिल्लनेंहीं एवढें दिग्दर्शन केलें आहे कीं, स्त्रियांना पुरुषांची बरोबरी करण्यास ज्या मुख्य अड चणी आहेत, त्यांत कुटुंबांची व्यवस्था पाहणें व खर्चवेचावर नजर ठेवणें हें एक लचांड त्याच्या गळ्यांत पडलें आहे, ही मुख्य अडचण आहे. येथें पुरुषांनीं भाकरी भाजून व पोरें संभाळून स्त्रियांनीं बाहेरचे उद्योग करावे असें ह्मणण्यास मिल्ल सुद्धां तयार नाहीं. किंबहुना अशी व्यवस्था कोणत्याही सुधारलेल्या राष्ट्रांत अद्याप झालेली नाहीं. तसेंच स्त्रियांच्या पलटणी पूर्वकाळीं अमेझान नांवाच्या स्त्रिया झाल्या, त्याशिवाय आजवर कोठें दृष्टीस पडल्या नाहींत. गर्भाशय परमेश्वरानें स्त्री जातींतच ठेविला आहे, व पशुपक्षादि सर्व सृष्टींत लहान अर्भकांचे संगोपन स्त्रियांचे पदरीं घातलें आहे, ह्या दोन मुख्य नैसर्गिक अडचणी स्त्रीजातीस सर्व तऱ्हेनें पुरुषांची बरोबरी करण्याचे आड येतात, ही गोष्ट मिल्लनें मुद्दाम छपवून ठेविली असें मला वाटतें. एका फ्रेंच तत्ववेत्याचे विचार मिल्लहून अगदीं भिन्न आहेत. तो ह्मणतोः—

लग्नाच्या शर्ती शेवटीं कोणत्या थराला जाऊन पोंचतील याचा आज अदमास होऊं शकत नाहीं. परंतु येथें इतकेंच सांगितलें ह्मणजे पुरें आहे कीं, लग्नसंस्थेंत कितीही फरक झाले तरी त्यांतील मुख्य तत्त्व ह्मणजे स्त्रियांनीं पुरुषाचे अंकित असावें हें कधींही नाहींसें होणार नाहीं. सर्व

युगांत व सर्व प्रकारच्या लग्नपद्धतींत हें तत्त्व असलेलें नेहमीं दिसतें. नवीन शारीरिकशास्त्रादिविचाराप्रमाणें तें चुकीचें ठरणें अशक्य आहे, असें स्त्रीपुरुषांची शरीरघटना व समाजघटना यावरून दिसून येतें. शरीरशास्त्रावरून स्पष्ट दिसतें कीं, जरी जीवनक्रिया वगैरे गोष्टीचे अवयव दोघांत एकसारखे आहेत तरी कांहीं बाबतींत त्यांच्या शारीरिक व नैतिक घटनेंत फार फरक आहे. नरजाति व स्त्रीजाति यांच्या वयपरत्वें होणाऱ्या स्थिति ताडून पाहिल्या तर स्त्रीजाति, विशेषतः मानवी स्त्रीजाति, नरजातीच्या मानानें नेहमीं बाल्यावस्थेंत आहे असें म्हटलें तरी चालेल. यामुळें बहुतेक महत्वाच्या कामांत पुरुषापेक्षां स्त्रियांचे अंगीं कुवत कमी असते. समाजशास्त्राचा विचार केला तरीही या दोन्ही वर्गांचीं कर्तव्यें व अधिकार एक असणें असंभवनीय आहे. प्रत्येक वर्गाचीं कर्तव्यें निरनिराळीं व ठरींव आहेत व अशा व्यवस्थेनें दोघांसही सुखाचा लाभ होतो."

मिल्लचे विचार व वर नमूद केलेले फ्रेंच तत्ववेत्त्याचे ( काम्टीचे ) विचार यांतील विरोध जरी आपण एकीकडे ठेविला तरी एवढी गोष्ट निर्विवाद आहे कीं ज्या स्त्रिया विवाह करून संसारांत पडतात त्या कधींही पुरुषांची बरोबरी किंवा पुरुषांचे व्यासंग करूं शकत नाहींत; व त्यापुढें त्यांचें शिक्षणही गहन विषयांत होणार नाहीं. हीच स्थिति आपण पशुजातींतही पाहतों. अश्वजातींत नराप्रमाणेंच माद्या काम देतात. पण त्या माद्यांस अविवाहित ठेवावें लागतें. गाई, म्हशी यांजकडूनही मेहनतीचें काम घेतां

येईल, परंतु त्यांजकडून मग दूध मिळणार नाहीं. ज्या स्त्रियांनीं आजपर्यंत विद्येंत, शास्त्रांत किंवा शारीरिक शक्तींत पुरुषांची बरोबरी केली त्या बहुतेक सर्व अविवाहित होत्या असें मला वाटतें. व हल्लींही ज्या स्त्रिया पाश्चात्य देशांत व क्वचित् या देशांतही पुरुषांचे धंदे करून राहतात किंवा पुरुषांबरोबर शिकतात त्या अविवाहित असतात असें दिसतें. सारांश ज्या पाश्चात्य देशांत स्त्रियांस पाहिजे तितक्या मुदतीपर्यंत अविवाहित राहतां येतें व कांहीं आजन्म अविवाहित राहतात, त्या देशांत मिल्लचे विचार सर्वांशीं लागू पडतील. पण हिंदुस्थानांत बहुतेक स्त्रियांचें १२ वर्षांचे आंतच लग्न होतें व सर्वांचें लग्न झालेंच पाहिजे असा हिंदुसमाजाचा व शास्त्राचा आग्रह आहे, तेव्हां येथें स्त्रीशिक्षणपद्धति पाश्चात्य शिक्षणपद्धतीवरच सर्वांशीं बांधतां येईल असें मला वाटत नाहीं.*

येथें असा प्रश्न उपस्थित होतो कीं, हल्लीं हिंदुस्थानांतील स्त्रियांची जी स्थिति आहे ती बदलणेंच इष्ट आहे व हळूहळू ती बदलत जाईलच; तेव्हां साहजिक होणाऱ्या इष्ट गोष्टीला शिक्षणपद्धतीनें कां आळा घालावा? मला वाटतें या प्रश्नांतील दोन्ही प्रमेयें चुकीचीं आहेत. हल्लींची स्त्रियांची स्थिति बदलून त्या एवजीं पाश्चात्य देशांतील स्त्रियांप्रमाणें येथें स्त्रिया अविवाहित राहण्याची पद्धति अमलांत आणणें

---

* म्हैसूर येथील प्रसिद्ध महाराणी कॉलेजाचे १९०३–१९०४ चे रिपोर्टावरून असें दिसतें कीं तेथेंही अशाच मताच्या सबबीनें एक ओरिएंटल क्लास कॉलेजांत नवीन जोडला गेला आहे.

पुष्कळांच्या दृष्टीनें इष्ट नाहीं किंबहुना शोचनीय होईल. स्त्रियांची स्थिति या बाबतींत तिकडे चांगली नाहीं असें पाश्चात्य देशांतीलही विचारी लोक कबूल करतात. समाजांतील पुष्कळ स्त्रियांनीं व अर्थात त्याजबरोबर पुष्कळ पुरुषांनीं अविवाहित रहावें हें इष्ट आहे कीं काय हा प्रश्न स्वतंत्र असून त्याचा सर्वतोदृष्ट्या विचार या लेखांत होणें अशक्य आहे. येथें एवढें ह्मणणें पुरें आहे कीं, अशा स्थितींत स्त्रीपुरुषांचें सुख कमी होईल असें मला तरी वाटतें व नीतिदृष्ट्या ही व्यवस्था प्रशंसनीय होणार नाहीं. पण याशिवाय विशेष मुद्याची गोष्ट ही कीं, पुष्कळ स्त्रियांस अविवाहित ठेवण्याची चाल हिंदुस्थानांत रूढ होईल याचीही मला भ्रांति वाटते. आपले लोकांचा रूढीस चिकटून चालण्याचा कल इतका दृढ आहे कीं, तींत फेरबदल होणें सहसा शक्यच नाहीं. त्यांत ही गोष्ट धर्माची बाब होऊन बसली आहे व प्रत्येक स्त्रीचें लग्न झालें पाहिजे असा धर्मशास्त्रांचा कटाक्ष आहे. धर्माचें बंधन किती दृढ आहे याचा विचार केला ह्मणजे या धर्म व रूढी अशा दोन्ही बंधनानें समाजास जखडून टाकिलेल्या बाबतींत फार फरक होईल असें मला वाटत नाहीं. सारांश हिंदुसमाजाची ही स्थिति ह्मणजे प्रत्येक स्त्रीचें बहुतेक १२ वर्षांपूर्वी लग्न होतें ही गोष्ट शिक्षणपद्धति कायम करतांना लक्षांत घेतली पाहिजे.

या स्थितीचा एक चांगला परिणाम असा दृष्टीस पडतो कीं, आपल्यांत स्त्रियांच्या जीवनाचा बोजा बहुतकरून त्यांजवर असत नाहीं. आपल्यास स्वतंत्र उद्योग करून

पोट भरलेंच पाहिजे अशी स्थिति या देशांतील थोड्या हिंदु स्त्रियांची असते. लहाणपणीं पोषण करण्याचा बोजा आई, बाप, बंधु इत्यादिकांवर असतोच, व लग्न झाल्यानंतर साहजिकच तो नवऱ्याचे कुटुंबावर जातो. विवाहित स्त्रियांचे पोषण करणें हें जितके नवऱ्याचे कुटुंबावर समाजमतानें जरूर असतें, तितकें मोठ्या झालेल्या मुलींचें पोषण करणें बापाच्या कुटुंबावर लादलें जात नाहीं. यामुळें पाश्चात्य देशांतील कित्येक मोठमोठाल्ल्या अविवाहित मुलींस उदरपोषाण करणें भाग पडतें. ही त्यांची स्थिति पुष्कळ अंशीं शोचनीय आहे असें कित्येकांचें मत आहे.

वरील विवेचनावरून स्त्रीशिक्षणपद्धतीसंबंधानें दोन सिद्धांत आपणास कायम करतां येतात. सर्व धंद्यास उपयोगी पडणाऱ्या विषयांचें ज्ञान ह्मणजे साधारणपणें माट्रिक्युलेशन परिक्षेकरितां जे विषय शिकविले जातात त्यांचें ज्ञान स्त्रियांच्या साधारण शिक्षणांत असण्याचें कारण नाहीं. युक्लीडचे सिद्धांत किंवा बीजगणित किंवा इंग्लंडचा इतिहास स्त्रीशिक्षणांत घालण्याची कांहीं अवश्यकता नाहीं असें मला वाटतें. तात्पर्य—माट्रिक्युलेशन परीक्षा पास करणें हा सर्वसाधारण स्त्रीशिक्षणाचा उद्देश नव्हे. ज्या स्त्रियांस अविवाहित राहून विशिष्ट धंदे शिकणें असेल त्याजकरितां पाहिजे असल्यास माट्रिक्युलेशन क्लास निराळा काढावा किंवा त्यांजकरितां मुलांच्या शाळेंतील वरच्या वर्गांत शिकविण्याची निराळी व्यवस्था करावी. तसेंच स्त्रियांकरितां निराळीं कॉलेजें काढण्याची कांहीं अवश्यकता नाहीं. अशा विद्या-

ळयांत शिकणाऱ्या स्त्रियांची संख्या फारच थोडी असाव॰ याची व ज्या अर्थी त्या पुरुषांप्रमाणें विद्येंत निष्णात होऊं इच्छितात त्याअर्थी त्यांना पुरुषांच्या बरोबर शिकणें हेंच फायदेशीर आहे.

दुसरी गोष्ट अशी कीं, मुलींचीं लग्नें बहुतकरून १२ वर्षांच्या सुमारास होतात व विवाहित मुली बहुतेक शाळेंत जात नाहींत, यामुळें मुलींचें शिक्षण अपुरें राहतें. प्राथमिक शाळांत मुलींस जें शिक्षण दिलें जाईल तें एक रीतीनें पूर्ण असावें, असा सिद्धांत वरील स्थितीवरून प्राप्त होतो. प्रत्येक स्त्रीस मग ती गरीब असो किंवा श्रीमंत असो ज्या गोष्टी येणें अवश्य आहे अशा विषयांचा प्राथमिक शिक्षणांत अंतर्भाव झाला पाहिजे; ज्या गोष्टी स्त्रियांस साधारणपणें निरुपयोगी आहेत त्यांस बगळलें पाहिजे. असे विषय कोणते याचा विषेष खुलासा पुढील विवेचनावरून होईल.

स्त्रीशिक्षण पद्धतींत काय नसावें हें सांगून आतां त्यांत काय असावें ह्या विषयाकडे वळूं. स्त्रियांचीं समाजांतील व कुटुंबांतील कर्तव्यें काय आहेत हा वर सांगितल्याप्रमाणें प्रथम विचार केला पाहिजे. मिल्लनें एक कर्तव्य सांगितलेंच आहे. कुटुंबाची व्यवस्था पाहणें व खर्चावेचावर नजर ठेवणें हें काम मुख्यत: सर्व स्त्रियांचें आहे. मुलांचें संगोपन, कुटुंबांतील आजारी मनुष्याची शुश्रूषा, घरांत आणलेल्या जिनसांचा योग्य विनिमय हें काम प्रत्येक स्त्रीनें केलें पाहिजे. या बाबतींत नवीन शिकलेल्या स्त्रिया अगदीं

निरुपयोगी असतात असें कित्येकांचें मत आहे, हें प्रारंभीं निर्दिष्ट केलेंच आहे. लिहिणें, वाचणें व अंकगणित ह्मणजे साधारण रीतीचे हिशोब ह्या तीन गोष्टी ( ज्यांस इंग्रजी three Rs ह्मणतात ) सर्व शिक्षणाचा पाया आहे. ह्या गोष्टी सर्वांस शिकविल्या पाहिजेत. पण एवढ्यानेंच भागत नाहीं. मुलींस या गोष्टी आल्या तरी व्यवस्थित रीतीनें राहणें व द्रव्याचा व्यवस्थित विनीमय करणें ही गोष्ट फार निराळी आहे. हल्लींच्या शिकलेल्या स्त्रियांस ती फार कमी साधते. गृहाशिक्षण या संबंधांत अत्यंत उपयोगाचें आहे असें मला वाटतें. गृहशिक्षण शाळेंतील मुलीस मुळींच मिळत नाहीं. व प्रत्यक्ष गृहशिक्षण मिळण्यास त्यांस हल्लींच्या शिक्षणक्रमानें फुरसत राहत नाहीं. एखाद्या हुशार सासूच्या हाताखालीं मुलगी असली ह्मणजे ती जशी वरील तीन्ही बाबतींत हुशार होते, ह्मणजे मुलांचें संगोपन, आजाऱ्याची शुश्रूषा व आणलेल्या सामानाचा व्यवस्थित विनिमय या तीन्ही बाबतींत तरबेज होते, तशा शिकलेल्या स्त्रिया नसतात. लहान मुलीस किंवा मोठ्या मुलीस एवढ्याशा वयांत अशी त्रासदायक कामें सांगणें ह्मणजे त्याजवर जुलूम करणें आहे असें कित्येक शीघ्रगामी लोक ह्मणतील पण ज्या गोष्टी लहानपणापासून आंगवळणी पडत नाहींत त्या पुढें कधींही चांगल्या साधत नाहींत, हें त्यांनीं पक्कें ध्यानांत ठेविलें पाहिजे.

घरांत आणलेल्या सामानाचा योग्य विनिमय करणें ह्मणजे एक प्रकारचा कंजूषपणा आहे असेंही कांहीं लोक ह्मणतील पण हीही त्यांची मोठी चुकी आहे. समजांत बार-

काईनें पाहिलें असतां असें दिसेल कीं, जी नवरा बायको व्यवस्थित असतात त्यांचा संसार थोडक्या पैशांत जसा सुखावह होतो तसा त्याहून कित्येक पटीनें अधिक पैसा मिळविणाऱ्यांचा होत नाहीं. नासधूस करणें, वेळेवर न जपणें, हलगर्जीपणा करणें इत्यादि संवयी अनेक शिकलेल्या पुरुषांच्या ठिकाणीं दिसतात तशा शिकलेल्या स्त्रियांचेही ठिकाणीं नजरेस पडतात. युरोपियन लोकांतही व्यवस्थेनें संसार करणें हा एक स्त्रियांचा मोठा गुण समतात व घरची व्यवस्था पाहून जमाखर्च ठेवणें हें त्यांचें एक खास काम आहे असें पाश्चात्य लोकसमाजांतही समजलें जातें. आपल्यांत जमाखर्च टिपण्याची बायकास माहिती नसते तरी घरची व्यवस्था ठेवणें व सामानाची योग्य व्यवस्था लावणें हें काम बायकांचेंच आहे. या कर्तव्यास स्त्रिया अधिक योग्य होतील व उलट अयोग्य हल्लीं होतात त्याप्रमाणें त्या होणार नाहींत असा स्त्रीशिक्षणाचा कल असला पाहिजे. प्रथमतः प्रत्यक्ष गृहशिक्षण जेणेंकरून मुलींचें अंतरणार नाहीं अशी व्यवस्था ठेविली पाहिजे. शिवाय, Domestic economy "गृहांतील काटकसर" हा विषय प्रौढ मुलीस शिकविला पाहिजे. साधारण जमाखर्च टिपतां येणें व रुपये आणे पैचा हिशोब जाणणें हें प्रत्येक मुलीस आलें पाहिजे ह्मणजे हा विषय प्राथमिक शिक्षणांतच घातला पाहिजे.

प्रत्यक्ष गृहशिक्षणापासून आणखी फायदा असा आहे कीं, स्त्रियांची धर्मश्रद्धा, आपल्या आचाराविषयीं अभि-

मान व वाडवडिलांविषयीं पूज्यबुद्धि कायम राहण्यास हरकत पडणार नाहीं. मनुष्याचा असा स्वभाव आहे कीं, जे विचार, ज्या संवयी लहानपणापासून त्याचे ठिकाणीं कायम करव्या ते विचार व त्या संवयी त्यास बहुधा चांगल्या वाटून त्यांस तो सहसा सोडीत नाहीं. घरांतील आचार घरांतील शिक्षणामुळें आजकाल केवळ स्त्रियांच्याच जोरावर चालले आहेत असें प्रत्येक चाणाक्ष पुरुषाच्या अनुभवास येण्यासारखें आहे. इंग्रजी शिक्षणाचा लहानपणापासून ज्यांवर पगडा आहे अशा पुरुषांची गृहस्थिति पूर्वीच्या पद्धतीनें केवळ कुटुंबांतील स्त्रियांमुळें चालली आहे असें ह्मटलें तरी चालेल. आतां दोन्ही स्त्रीपुरुषें जर गृहशिक्षणापासून सुटून लहानपणापासून नवीन तऱ्हेच्या विचारांच्या व आचारांच्या अमलाखालीं राहतील तर हिंदु लोकांची गृहस्थिति फारच लवकर बदलून मग ती कोणत्या थरावर जाईल याचा नेम नाहीं. सारांश पूर्व स्थितीचा अभिमान बाळगणाऱ्या लोकांना हल्लींच्या शिक्षणपद्धतीपासून जें नुकसान आहे असें वाटतें, तें स्त्रियांस गृहशिक्षण चांगलें मिळाल्यास होणार नाहीं.

धर्मश्रद्धा किंवा पूर्वापारचे आचारविचार यांस एकीकडे ठेविलें तरीही गृहशिक्षणापासून दुसरा मोठा फायदा असा आहे कीं मनुष्यास खर्चिक व छानछोकीच्या संवयी लागत नाहींत. हल्लींच्या उच्च प्रतीच्या शिक्षणानें विभूषित झालेल्या कित्येक हिंदु स्त्रिया व्यवस्थित रीतीनें संसार करतानां दृष्टीस पडतात हें खरें आहे पण हें विधान पुष्कळांविषयीं करतां येत नाहीं. पारशी लोकांत मला वाटतें या विषयीं बरीच प्रतिकूळ चर्चा चालली आहे. सुशिक्षित

स्त्री ह्मणजे एक जास्ती खर्चाचा बोजा आहे असें हिंदी पंचांतील चित्रांवरून लोकमत असल्याचें दृष्टीस पडतें. उत्तम पोषाक वेळोवेळीं बदलण्याची चाल साहेब लोकांत आहे असें आपल्यास दुरून दिसतें आणि जरी कांहीं स्त्रिया मोठ्या युक्तीनें काटकसरीचा उपयोग करीत असतील तरी लग्न झालेल्या बायकोमुळें आपणास अतिशय खर्च लागतो अशी बहुतेक युरोपियन नवऱ्यांची ओरड असते. त्यांचेंच अनुकरण इकडील स्त्रिया करतात याचें कारण गृहशिक्षणाचा त्यांच्यावर मुळींच दाब पडलेला नसतो. हिंदुलोकांची सामान्यस्थिति पाहिली तर श्रीमंतीपेक्षां गरीबी अधिक कुटुंबांत आहे. आणि श्रीमंत कुटुंबांतील स्त्रिया खर्चिक चालीचा अंगीकार करतील तर लाजेकाजेनें गरीब आप्तवर्गासही तसें करावें लागेल. सारांश, थोडक्यांत डामडौल न करतां राहण्याची संवय सर्वांस फायदेशीर आहे.

स्वयंपाक करणें हें कुटुंबांतील स्त्रियांचें कर्तव्य आहे कीं नाहीं याविषयीं कदाचित् जबर मतभेद होईल. पण प्रत्येक स्त्रियेस चांगले पदार्थ करितां यावे हें तिचें मोठें भूषण आहे असें सर्व कबूल करतील. श्रीमंत कुटुंबांतील स्त्रियांस स्वयंपाक करण्याची जरी अवश्यकता नाहीं तरी त्याजवर त्यांस नजर ठेवितां आली पाहिजे व प्रसंगविशेषीं त्यांस स्वतः स्वयंपाक करतां आला पाहिजे. आपण ज्यांचें प्रत्येक बाबींत बहुधा उदाहरण घेतों अशा पाश्चात्य लोकांच्या कुटुंबांतही स्वयंपाकावर नजर ठेविणें हें स्त्रियांचें कर्तव्य आहे असें समजतात. इकडे साहेब लोकांस अति

स्वस्त नोकर मिळाल्यामुळें किंवा फार पैसा मिळत असल्यामुळें कदाचित् बायका स्वयंपाकाकडे मुळींच लक्ष देत नसतील. पण मला वाटतें युरोपांतील सर्व देशांतील मध्यम व कनिष्ठ प्रतीच्या लोकांत स्वयंपाकावर नजर ठेवणें किंबहुना खुद्द पदार्थ बनविणें हें स्त्रियांवर सोंपविलेलें असतें. हा गुण बायकांस प्रत्यक्ष गृहशिक्षण मिळाल्यानेंच येणार आहे. शाळेंत पाकशास्त्र शिकवलें गेलें तरी त्यापासून तितपतच माहिती होईल. रोजचे जेवणाचे पदार्थ जोपर्यंत पुष्कळ वेळा हातांतून निघाले नाहींत तोंपर्यंत ते चांगले बनवितां येणार नाहींत हें उघड आहे.

एक गोष्ट येथें सांगण्यासारखी या विषयांसंबंधें अशी आहे कीं आपल्यांत उपहाराचे ह्मणजे मधल्यावेळीं किंवा प्रसंगविशेषीं खाण्याचे पदार्थ फार थोडे आहेत व तेही गोड करण्याची फार चाल आहे. मला वाटतें शाळेंतून मोठ्या मुलींस निरनिराळे जातींत रूढ असलेले उपहाराचे पदार्थ करण्यास शिकविलें तर फारच उपयुक्त होणार आहे. पाकशास्त्र ही एक शिक्षणाची बाब आहे असें हल्लीं सर्वत्र गृहीत झालेलें आहे. पण बहुतेक शाळांतून आपल्यांत जे नेहमीचे पदार्थ आहेत तेच करण्याचे शिकवितात. मला वाटतें साहेब लोकांचे मधल्या वेळीं खाण्याचे पदार्थ व गुजराथी, पारशी, कानडी, बंगाली लोकांत रूढ असलेले पदार्थ या पैकीं ज्या ज्या पदार्थांत रुचकरपणा व सुपचपणा असेल व विशेषतः जे गोरगरीबासही करण्यास हर-

कत पडणार नाहींत असे पदार्थ तयार करण्यास मुलींस शिकविण्यापासून समाजास चांगला फायदा होणार आहे.

संसारयात्रेंत नवऱ्याचे व्यासंगास अनुकूल राहून त्यास योग्य मदत देणें हें एक प्रत्येक स्त्रीचें कर्तव्य आहे. त्यांत नवरा सुशिक्षित असला व चांगल्या धंद्यांत किंवा नोकरीवर असला तर त्याच्या बायकोस हा गुण जरूर असला पाहिजे. हा गुण प्राप्त होण्यास नवऱ्याचे बरोबरीचेंच शिक्षण असलें पाहिजे असें नाहीं. परंतु चांगला विषय लिहितां येणें, किंवा पत्रव्यवहार योग्य रीतीनें करतां येणें, साधारण तत्कालीन स्थितीची माहिती असणें, आपल्या देशाचा भूगोल व इतिहास जाणणें, इत्यादि गोष्टी जरूर आहेत. हे विषय मध्यम प्रतीच्या स्त्रीशिक्षणांत घातले पाहिजेत. अगदीं लहान मुलास योग्य रीतीनें लहानपणापासून शिक्षणाकडे लावणें हेंही सुशिक्षित आयांचें कर्तव्य आहे. या बाबतींत मुलास कोणत्या गोष्टी घरीं सांगितल्या पाहिजेत; व कोणत्या गोष्टी त्याचे कानावर कधीं पडूं देतां कामा नये; वगैरे माहिती चांगल्या सुशिक्षित स्त्रियांस असेल; तर फार चांगलें.

येथवर स्त्रियांच्या कुटुंबांतील कर्तव्याविषयीं विचार झाला. त्यांचे समाजांतील कर्तव्य काय आहे हें पाहण्यापूर्वी आपण प्रथम स्त्रियांच्या शारीरिक शिक्षणाकडे वळूं. हिंदुस्थानांतील स्त्रिया पुरुषांच्या मानानें विशेष अशक्त व कमी वाढीच्या असतात, ह्या गोष्टीकडे आपण सर्वतोपरी दुर्लक्ष केलें आहे. जुने मतांचे लोक व नवीन शिक्षणपद्धति कायम

करणारे सुशिक्षित लोक या दोघांवरही या कामांत सारखाच दोष आहे; असें मला वाटतें; सर्व प्राणिवर्गीत नरजाति स्त्रीजातीहून कांहींशी अधिक बळकट व शरीर प्रमाणानें मोठी असते; पण आपल्या लोकांत पाश्चिमात्य लोकांच्या मानानें हें अंतर फारच अधिक आहे. एक बारीक दृष्टीनें पाहणारा इतालिन गृहस्थ मजला गाडींत भेटला होता तो ह्मणाला ' तुमच्यांत पुरुषाची वाढ बरी दिसते, परंतु स्त्रिया वयाच्या मानानें फार अशक्त व कमी वाढीच्या दिसतात. ' लहानपणीं लग्नें झाल्यानें व लहानपणींच मुलें होऊं लागल्यानें स्त्रियांच्या शरीराची योग्य वाढ होत नाहीं हें धडधडीत कारण आपल्यास दिसत आहे. तसेंच आहार ही सशक्त नसतो हें कारण आपल्यांतील स्त्रीपुरुषांस दोघांसही सारखें लागू आहे. पण या निबंधाचा त्या कारणांशीं संबंध नाहीं. पुरुषाच्या मानानें स्त्रियांची चांगली वाढ नसण्यास तिसरें कारण असें दिसतें कीं, त्यांस चांगल्या मोकळ्या हवेंत फिरण्याची व व्यायाम करण्याची मुभा नसते. ज्या जातींत स्त्रिया पुरुषांबरोबर बाहेर फिरून मेहनत करतात त्या जातीत उदाहरण कुणब्यांत व इतर खालच्या जातीत स्त्रियांची वाढ इतर जातीच्या मानानें बरी असते हें आपण पाहतों. स्त्रियांस पडद्यांत ठेविल्यानें किंवा घरांत कोंडल्यानें त्यांचें सौंदर्य व त्यांचा नाजुकपणा कदाचित् वाढत असेल, पण त्यांची शरीरप्रकृति चांगली सदृढ होत नाहीं हें निर्विवाद आहे. गांवढ्यांतील उच्च जातींतल्या स्त्रिया बऱ्याच सशक्त असतात. कारण घरांतील अंगणांत धडधाकड काम करण्याच्या परिश्रमानें त्या मजबूत होतात. विहिरींतून रहाटानें

पाणी काढणें, धोतरें धुणें, किंवा गांवढ्यांमधून बहुधा एकच विहीर असते तेथून डोक्यावर पाणी वाहणें इत्यादि व्यायाम बाहेरगांवच्या स्त्रियांस असतात, त्यामुळें त्या पुष्कळ सशक्त असतात.

पण ह्या प्रकारचे उघड्या हवेंतील जे थोडेबहुत व्यायाम स्त्रियांस असतात, त्यांस शिक्षण पावणाऱ्या व पावलेल्या स्त्रिया अंतरतात, यामुळें सुशिक्षित स्त्रिया बहुधा अशक्त, पिकुटलेल्या, विनाकारण उंच झालेल्या, किंवा बारीक हाडें झाल्यानें ऊंच दिसणाऱ्या अशा दिसतात. नवीन शिक्षणपद्धतींत असें न होण्याकरितां कांहींच साधन केलेलें दिसत नाहीं; उघड्या हवेंत व्यायाम करण्याच्या कोणत्याही नवीन तऱ्हा किंवा जुने खेळ उपयोगांत आणल्याचें मी पाहिलें नाहीं. बडोदे येथील कन्याशाळा फार उत्तम स्थितींत आहे ती पाहण्यास मी गेलों होतों व या प्रश्नांसंबंधानें विशेष चौकशी केली. तेथें नवीन तऱ्हेच्या ड्रिलची साधनें (ज्यांस शेंकडो रुपये खर्च पडतो) कांहीं अंशीं उपयोगांत आणिली जातात; पण मला वाटतें यापेक्षां उघड्या हवेंतील आपल्या जुन्या तऱ्हेचे खेळ फारच फायदेशीर होतील. या शाळेच्या पाठीमागें असलेलें मैदान लहान आहे, तरी पण कंपौंडाची भिंत वाढवून तें मुलींच्या खेळाकरितां हमेषा उपयोगी आणलें तर विशेष फायदा होईल असें मला वाटतें. एका विशिष्ट संस्थेविषयीं येथें लिहिणें अप्रशस्त आहे हें खरें पण विषयांचा चांगला उहापोह होण्याकरितां मी हा प्रमाद स्वीकारला आहे. असो. शारीरिक शिक्षणाकडे जितकें लक्ष

दिलें पाहिजे तितकें हल्लींच्या पद्धतींत दिलेलें नाहीं असें मला स्पष्ट ह्मणावें लागतें. अगोदरच आपल्या स्त्रिया पुष्कळ तऱ्हेनें अशक्त असतात आणि त्यांतही शिक्षणामुळें अधिक अशक्त होतील तर सुशिक्षित पुरुष व स्त्रिया दोन्हीही शरीरप्रकृतीनें सुदृढ नसल्यानें वरिष्ट वर्गांतील लोकांच्या शारीरिक दौर्बल्यास कांहींच पारावार राहणार नाहीं असें मला वाटतें.

शाळेंत शिकणाऱ्या मुली त्याच ठिकाणच्या शाळेंत न जाणाऱ्या मुलींपेक्षां अशक्त नसतात असा कित्येक शिक्षण देणाऱ्या अनुभवशीर लोकांचा ग्रह आहे. हा जरी खरा मानला तरी शिक्षण ह्मणजे मानसिक व शारीरिक स्थितीला उन्नतीस पोंचविणें आहे, असें मानिलें तर शिकणाऱ्या मुलींची शरीरप्रकृति न शिकणाऱ्या मुलींपेक्षां सदृढ करण्याचा शिक्षण पद्धतीनें कां प्रयत्न करूं नये ? एखादी सुदृढ चांगली वाढ झालेली मुलगी पाहून आपल्यास फार आनंद होतो, इतकेंच नव्हे तर अशा मुली देशाच्या भावी शारीरिक उन्नतीस कारण आहेत. युरोपियन लोकांच्या सशक्त व पूर्ण वाढ झालेल्या मुली पाहून आपल्या शाळेंतील अशक्त पिकटलेल्या बारीक मुलीविषयीं कोणास खेद वाटणार नाहीं ! तात्पर्य, स्त्रियांची शरीरप्रकृति सुदृढ करण्याविषयीं प्रत्येक शिक्षणक्रमांत प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष रीतीनें प्रयत्न केला पाहिजे. प्रत्येक शाळेंत मग ती प्राथमिक असो किंवा वरच्या दर्जाची असो, प्रत्येक वर्गांत शारीरिक खेळ उघड्या हवेंत तास अर्धातास

खेळणें अवश्य ठेविलें पाहिजे. ते खेळ आपले प्राचीन पद्धतीचे बिनखर्ची असावे हे बरें. परंतु अर्वाचीन तऱ्हेचे खेळ असल्यास हरकत नाहीं. या प्रत्यक्ष प्रयत्नाशिवाय ज्या ज्या गोष्टींनीं शरीरप्रकृतीवर अनिष्ट परिणाम घडतात, त्या त्या शिक्षणपद्धतींतून वर्ज केल्या पाहिजेत. शाळेंतलि वेळेशिवाय मुलींचा घरचा वेळही घेण्याचा परिपाठ अनेक शाळांतून असतो, ह्मणजे घरीं लिहिण्यास धडे देणें, घरीं पाठ करण्यास लाविणें हे मुलीच्या शाळेंत अगदीं वर्ज केले पाहिजे. तसें न केलें तर बिचाऱ्या मुलीस घरी व शाळेत चरकांत धरल्यासारखें होईल, त्यास खेळण्या बागडण्यास मुलींच वेळ राहणार नाहीं. तसेंच लेखी परीक्षा वारंवार घेणें हेंही शरीरप्रकृतीस अनिष्टकारक आहे. याशिवाय ज्या गोष्टींनी शरीरप्रकृति सुधारण्याविषयीं मनाची हौस उत्पन्न होईल व आपसांत चढाओढ लागेल, असे उपायहीं योजिले पाहिजेत. व शेवटची गोष्ट ही कीं, खेळानंतर कांहीं तरी खावयास देणें हें अत्यंत फायदेशीर होईल.

स्त्रियांची मानसिक शक्ति पुरुषाहून कमी नसते ही गोष्ट खरी आहे व पुरुषवर्गाप्रमाणें स्त्रीवर्गाचीही बुद्धि विकास पावेल तर भावी संततीही बुद्धिमत्तेंत अधिक वाढेल यांत संशय नाहीं. देशांतील अर्धी प्रजा अज्ञानांत व अज्ञानाचा परिणाम ज्या वेड्या समजुती आहेत त्यांत मग्न राहील तर तो देश कधींही सुधारणेच्या पंथास लागणार नाहीं! तात्पर्य, स्त्रियांच्या बुद्धीचा व ज्ञानाचा विकास होऊं देणें हें राष्ट्रास सर्वतोपरी हितावह आहे, व स्त्रियांनीं अमुक विषय शिकूं

नये ही बंदी अजीबात काढून टाकली पाहिजे. ज्या स्त्रिया बुद्धिमान, महत्वाकांक्षी व उत्साहशील आहेत त्यांस पुरुषां-प्रमाणें व पुरुषाबरोबर शिक्षण मिळण्यास काहींच आड-काठी असूं नये. परंतु पूर्वी सांगितल्या कारणामुळें अशी स्थिति हिंदुस्त्रियांपैकीं फार थोड्यांची असते. लहानपणीं बहुतेक सर्वांचीं लग्नें झाल्यामुळें आपल्या स्त्रियांस शिक-ण्यास फार थोडा वेळ मिळतो. व बाळंतपणामुळें व मुलां-च्या संगोपनाच्या त्रासामुळें विद्याभ्यासास लागणारी शारी-रिक मेहनत त्यांच्या हातून होऊं शकत नाहीं अशा स्थितींत प्रौढ मुली व स्त्रियांच्या शिक्षणांत साधारणपणें पुष्कळ विषयांचा अंतर्भाव होऊं शकत नाहीं. यासाठीं वरिष्ठ शिक्षणांत अवश्य शिकण्याचे विषय व ऐच्छिक शिकण्याचे विषय असे दोन भाग करणें जरूर आहे व त्यांतही ऐच्छिक शिकण्याच्या विषयांची संख्या संस्थेच्या द्रव्यशक्तीवर अव-लंबून राहणारी आहे. अशा सर्व विषयांची परिगणना करणें अशक्य आहे. जेणेकरून स्त्रियांच्या बुद्धीचा विकास होऊन त्यांचें "जनरल कल्चर" वाढेल असे विषय त्यांस शिक-विले पाहिजेत. मनास संस्कृतपणा येणें हें फार उपयोगाचें आहे. कारण तेणेंकरून वेडगळ समजुती व हटवादीपणा नाहींसा होतो. ज्यास इंग्रजींत "लिटरेचर" म्हणतात तो विषय मनाचा संस्कृतपणा येण्यास फार उपयोगी आहे, असें मला वाटतें. उत्तम उत्तम ग्रंथकर्त्यांचे लेख व कविता, व अनेक विषयांच्या प्रचुर माहितीनें भरलेलीं पुस्तकें वाचणें फार महत्वाचें आहे. स्वभाषेचें परिज्ञान याकरितां जरूर पाहिजे. स्वभाषेशिवाय इंग्रजी भाषेचें ज्ञान झाल्यास

फार चांगलें. आपल्या भाषेंत व संस्कृतांत ही उत्तम ग्रंथ आहेत यांत संशय नाहीं व स्वभाषाज्ञान व संस्कृताचें ज्ञान हें अवश्य आहे. पण इंग्रजी भाषेंत याहूनही अधिक माहितीची विविध विषयावर पुस्तकें आहेत. त्यामुळें इंग्रजी शिकणें हा एक विषय ऐच्छिक विषयापैकीं असावा.

येथें एक अत्यंत महत्वाची गोष्ट सांगणें जरूर आहे. मराठी भाषेंत जे नवीन ग्रंथ लिहिले जातात ते सर्वच वाचण्यासारखे नसून त्यापैकीं कित्येक ग्रंथ इतके वाईट असतात कीं, ते स्त्रियांना वाचण्याच्या लायक नसतात. असे असून ही अशा प्रकारचीं पुस्तकें शिकलेल्या मुलीच्या हातांतून मी पाहिलीं आहेत. यांत त्यांच्या घरच्या माणसांचा व शिक्षकांचा दोष असतोच पण मला वाटतें यापेक्षां ग्रंथकर्त्यांचा याहून अधिक दोष आहे. चावटपणानें भरलेलीं नाटकें व इष्कबाजीची लज्जत लावणाऱ्या कादंबऱ्या अधिक खपून कदाचित् ग्रंथकर्त्यास फायदा विशेष होत असेल पण समाजाचें यापासून किती नुकसान होतें याजकडे ग्रंथकर्त्यांचें लक्ष जात नाहीं. स्त्रियांची मानसिक स्थिति पुरुषाहून अधिक कोमल असते व त्यांचे मनावर उत्कट विकाराचा लवकर ठसा पडतो किंबहुना अशा कादंबऱ्या व नाटकें वाचणें हें मुलांनाही अपायकारक आहे. त्यापासून स्त्रीपुरुषांचें मन सुसंस्कृत होत नाहीं इतकेंच नाहीं, तर त्याजवर उलट परिणाम घडतो. जेणेंकरून नीति, धैर्य-स्वाभिमान, सत्यप्रियता, स्वदेशभक्ति वाढेल असे लेख लिहिणें किंवा अशा गोष्टी रचणें हेंच खरें कर्तव्य आपल्या

देशी भाषेंतील ग्रंथकर्त्यांचें आहे. मला वाटतें इंग्रजी भाषें-तील ग्रंथकर्तें या आपल्या कर्तव्यास चांगले जागृत असतात, व इंग्रजी ग्रंथ यासंबंधानें जितके निर्दोष असतात त्या मानानें मराठी नवीन ग्रंथ नसतात. संस्कृतांतीलही अनेक ग्रंथ यासंबंधानें दूषणार्ह आहेत. सारांश देशी भाषेंतील व संस्कृत भाषेंतील पुस्तकें वरिष्ठ शाळेंत कोणतीं शिकवावीं याविषयीं चांगलीं खबरदारी घेतली पाहिजे.*

या संबंधानें मराठी प्राचीन कवींचीं जितकी थोरवी गावी तितकी थोडी. तुकाराम, रामदास, वामन, मोरोपंत इत्यादि कवींच्या ग्रंथांत भाषा जोरदार व हृदयंगम असते. इतकेंच नव्हे तर त्यांचे ग्रंथ नीति व सद्धर्माचे पूर्ण प्रतिपादक आहेत. त्यांत अश्लील स्थळें बिलकुल नाहींत ह्मटलें तरी चालेल. आतां कोणी ह्मणेल कीं, या कवींनीं धर्म-विषय किंवा पुराणें याजवरच ग्रंथ लिहिले आहेत. परंतु ग्रंथकर्त्यास आपलीं कवित्वशक्ति अयोग्य रीतीनें दाखविण्यास पाहिजेल तेथें संधि सांपडते. याचीं उदाहरणें अनेक देतां येतील. खास ज्या महाभारत व रामायणावर पुष्कळ प्राचीन कवींचे ग्रंथ रचिलेले आहेत त्यांतही कांहीं ठिकाणीं ( अशीं ठिकाणें फार थोडीं आहेत हें खरें ) अश्लील वर्णनें आढळतात. स्वानंदसाम्राज्य हा एक वेदांतावर अर्वाचीन

---

* देशी भाषेंतील कांहीं ग्रंथांची अश्लीलता पाहून मला असें वाटतें कीं प्रत्येक नवीन कादंबरी अथवा नाटक एखाद्या समाजानें नेमिलेल्या कमिटीनें पास केल्याशिवाय प्रसिद्ध होऊं देऊं नये.

ग्रंथ आहे. वेदांताचे ग्रंथांत स्त्रीसुखाचें वर्णन प्रचुर व मोहक केलेलें पाहून ग्रंथकर्त्यास आपलें कवित्व दाखविण्यास कशी संधि मिळते हें साहजिक कळणार आहे. असो; महाभारत, रामायण वगैरे संस्कृत ग्रंथ व मराठींतील वामन मोरोपंत वगैरे कवींच्या कविता ह्या स्त्रीशिक्षणपद्धतींत हमेशा ठेवण्यासारख्या आहेत. त्याच्या परिशीलनानें भाषाज्ञान चांगलें होईल इतकेंच नव्हे तर मनास संस्कृतपणा येऊन नीतिमत्ताही वाढेल.

आपल्या देशाचा इतिहास जाणणें हें प्रत्येक चांगल्या शिकलेल्या स्त्रियेस जरूर आहे. इतिहासाचे ज्ञानापासून मनास व बुद्धीस एक प्रकारचें वळण लागतें. या शिवाय मनुष्यास आपल्या राजकीय स्थितीचें चांगलें ज्ञान होतें. इतिहास शिकल्यापासून काय काय फायदे आहेत हें येथें सांगत बसणें ह्मणजे बरेच विषयांतर होईल. स्त्रियांस जों पावेतो स्वदेशाचा इतिहास माहीत होणार नाहीं तोंपावेतों ज्या ज्या राजकीय चळवळी किंवा गरजा या देशांतील लोकांत प्रचलित किंवा प्रस्तुत आहेत त्या त्यांस समजणार नाहींत व त्याजविषयीं त्या योग्य मतही देऊं शकणार नाहींत. राजकीय हक्क स्त्रियांस मिळावे किंवा नाहींत हा प्रश्न मी येथें उपस्थित करीत नाहीं. मला एवढेंच सांगणें आहे कीं, आपल्या नवऱ्याशीं किंवा इतर स्नेही वगैरे मंडळीशीं भाषण करतांना राजकीय विषय आले असतां स्त्रियांना विषय समजून बोलणें जोपर्यंत त्यांस इतिहासाची व राजकीय परीस्थितीची माहिती नाहीं तोंपावेतों अशक्य

आहे. देशांतील सुशिक्षितसमाजाच्या अर्ध्या संख्येनें राजकीयविषयांत अगदींच मुग्ध राहावें व त्यांजकडोन या बाबतींत कांहींच मदत किंवा प्रोत्साहन मिळूं नये हें राष्ट्रीय प्रगतीस प्रतिकूळ आहे असें मला वाटतें.

बुद्धीचा विकास होण्यास आणखी ही कित्येक विषयांची उपयुक्तता असते असें सार्वत्रिक समजतात. युक्लिडचे भूमिति सिद्धांत बुद्धीस व्यवस्थित विचार करण्याचें वळण देतात. बीजगणित ही याच कारणानें उपयुक्त आहे. लॉजिक किंवा न्यायशास्त्र फिलासफी, कायदा इत्यादि गहन विषय बुद्धीस कुशाग्र करितात. ह्मणून सदर पैकीं पाहिजे तो विषय फुरसत असल्यास व त्याची आवड असल्यास शिकवावा. परंतु हे विषय कठीण व साधारण स्त्रियांच्या आटोक्याचे बाहेर आहेत ह्मणोन याजविषयीं जास्ती आग्रह करण्याची जरूरी नाहीं. भौतिक शास्त्रांतील त्रोटक विषयांची माहिती स्त्रियांस असणें फार फायद्याचें आहे, शास्त्रीय माहितीनें भोळसर समजुती नाहीशा होतात. ग्रहणें कशीं पडतात, वाफेकडून काम कसें घेतां येतें, विद्युच्छक्ति काय आहे वगैरे माहिती थोडक्यांत देण्यानें स्त्रियांस पुष्कळ फायदा होणार आहे. परतु हेही विषय कांहींसे गहन असल्यानें माझ्या मतें वरील विषयाप्रमाणें त्यांस ऐच्छिक विषयांत घालावें. या शिवाय याच प्रकारचे अनेक विषय आहेत त्यांची यादी येथें देतां येत नाहीं. सवडीप्रमाणें व शिकणाऱ्याच्या व शिकविणाऱ्यांच्या सोईप्रमाणें आणखी विषय ठेवितां येतील.

स्त्रियांच्या समाजांतील कर्तव्याविषयीं आतां विचार करणें बाकी आहे. स्त्रिया ह्या समाजाचें भूषण आहेत. त्यांत सुशिक्षित स्वलंकृत स्त्रिया ज्या समाजांत ज्या ठिकाणीं येतील त्या ठिकाणीं आनंद व उत्साह प्रसृत होतील यांत संशय नाहीं. पाश्चात्यसमाजांत हरएक मोठया प्रसंगीं स्त्रियांचे येणें प्रशस्त मानलें जातें. जेवणाच्या ठिकाणीं, लेक-चर हॉलमध्यें किंवा मंदिरांत चांगली वस्त्रें परिधान केलेल्या सुशिक्षित स्त्रिया पुरुषाबरोबर येतात गायन, नृत्य, किंवा चित्रकला इत्यादि मनोहर गुणांनीं त्या जनसमाजास तुष्ट करितात. नवीन पाहुणा आला तर त्याजला प्रथम भेटणें व त्यांजपाशीं कुशल प्रश्नादिकानी बोलणें हें स्त्रियांचे कर्तव्य आहे असें मानिलें जातें. एकमेकांकडे जेवावयास किंवा विजिटसला (भेटावयास) जाणें, गरीब अनाथ बेमार मनुष्यांची कळकळ बाळगून त्यांस मदत करणें, दानधर्म करणें, वगैरे अनेक बाबतींत स्त्रियांसच पुढें करि-तात. याप्रमाणें पाश्चात्य देशांत स्त्रियांची समाजांतील कर्तव्यें अनेक आहेत.

हिंदु स्त्रियांची स्थिति यासंबंधानें फार भिन्न आहे. प्रथ-मतः उत्तर हिंदुस्थानांत असा जबरदस्त पडदा आहे कीं, वरिष्ठ जातींतील स्त्रियांचें नखही पुरुषांचे दृष्टीस पडत नाहीं. मग परपुरुषाच्या समाजांत मिसळणें किंवा त्यांच्याशीं बोलणें दूरच राहिलें. पडदा किंवा गोषाची चाल हिंदु-स्थानांत फार प्राचीन काळापासून आहे. कथासरित्सागरां-तील एका गोष्टींत पाटलिपुत्रांतील राजाच्या पडद्यांतील

स्त्रियांच्या वाड्याकडे एक मनुष्य पाहत होता, त्यास देहांत प्रायःश्चित्त दिलें असें आलें आहे. प्राचीन काळीं यावरून ही पडद्याची चाल फारच कडक होती, असें स्पष्ट दिसतें. रामचंद्रानें लंका जिंकल्यानंतर सीतेस उघड सभेंत बोलाविलें, त्यावेळेस सीतेस फार दुःख होऊन असें कां ह्मणून लक्ष्मणानें रामचंद्रास विचारिलें, तेव्हां.

> व्यसनेषु च कृच्छ्रेषु न युद्धेषु स्वयंवरे ।
> न क्रतौ नो विवाहे च दर्शनं दुष्यते स्त्रियः ॥

असें त्यानें सांगितलें. उत्तरेस नृत्य शिकविण्याकरितां बृहन्नडेची योजना केली गेली याचेही तात्पर्य हेंच आहे. सारांश फार प्राचीनकाळापासून पडदा उत्तर हिंदुस्थानांत प्रबळ आहे; व तो मुसलमानांच्या वर्चस्वाचे वेळीं जास्तीच पक्का झाला. त्या चालींत हल्लींच्या शिक्षणानें किंवा सुशिक्षित लोकांच्या कंठशोषानें कांहीं फरक पडेल असें मला वाटत नाहीं.

दक्षिण व पश्चिम हिंदुस्थानांत पडदा जरी कमी आहे, तरी कांहीं अंशीं स्त्रिया पडद्यांतच असतात असें ह्मटलें तरी चालेल. इकडील स्त्रिया विनाकारण पुरुषा समोर येत नाहींत व आल्या तरी त्यांशीं बोलणें किंवा त्यांच्यांत मिसळणें हें इकडील रिवाजांत पसंत मानिलें नाहीं. या कारणांनीं स्त्रियांचें समाजांतील कर्तव्य हिंदुसमाजांत फारच थोडें आहे. असें जरी आहे, तरी स्त्रीसमाजांत सुशिक्षित स्त्रियांनीं आपल्या आचरणानें, आपल्या कृतीनें व आपल्या

उपदेशानें शिक्षणाचा प्रसार करावा हें त्यांचें कर्तव्य आहे असें ह्मटलें असतां चालेल. हें कर्तव्य योग्य रीतीनें बजावण्यास सुशिक्षित स्त्रियांस चांगले चांगले ग्रंथकर्त्यांचे लेख अवगत असून त्यांस वक्तृत्वशक्तीचाही थोडासा अभ्यास केला पाहिजे. हे विषय प्राथमिक शिक्षणांतले नसून वरिष्ठ प्रतीच्या शिक्षणांत ठेवण्यास योग्य आहेत.

स्त्रिया समाजांतील भूषण व मोहकवस्तू आहेत तें त्यांच्या कांहीं विशिष्ट मनोहर गुणांनीं आहे. त्यांचा कंठ पुरुषांपेक्षां मधुर असतो, त्यांस नृत्य शिकविलें तर त्या प्रेक्षकांस आनंद देतात, चित्रकला, मालाग्रथनकला इत्यादिकांत त्यांस सहज प्रावीण्य असतें. सारांश प्राचीनस्त्रियांस गान, नृत्य, चित्रलेखन इत्यादि कला शिकविल्या जात. अशा कलांची संख्या ६४ पर्यंत गणिली आहे. प्राचीन शिक्षणग्रंथांत असें लिहिलें आहे कीं ज्या मुली ६४ कलांचें ज्ञान संपादन करतील, त्या सरदाराच्या कन्या असल्या तरीही पट्टराण्या होतील, मग राजकन्या असल्या तर काय सांगावें ? अर्वाचीन कालीं हिंदुस्थानांत नृत्यगानादि कला, स्त्रियांस शिकविणें फारच गर्ह्य समजलें जात होतें. हल्लींही नृत्य शिकविण्याचा संप्रदाय नाहींच ह्मटलें तरी चालेल. मात्र गायन शास्त्रीय रीतीनें शिकविण्याचा क्रम सुरू आहे. बडोदें येथील कन्याशाळेंत गायन चांगले रीतीनें शिकविलें जातें. मला वाटतें प्रत्येक मुलीस थोडें बहुत गाता येणें अवश्य आहे, परंतु तें अगदीं शास्त्रीय तऱ्हेचें पाहिजे असें नाहीं. लहान मुलीस शुद्ध सुरावर मुलींची व

स्त्रियांची गाणीं व श्लोक ह्मणतां आले तरी पुरे आहे. वरिष्ठ दर्जाच्या शाळेंत गायन प्रत्येक मुलीस येत असावें असें मला वाटत नाहीं. कांहीं मुली मात्र गाणें चांगलें शिकूं शकतात, ज्यांस परमेश्वरानें कंठ व सहजयोग्यता दिली आहे, त्याशिवाय इतरांस गाण्यावर मेहनत करण्यास लावणें व्यर्थ आहे. ज्या अर्थी हल्लीं समाजास स्त्रियांनीं नाचण्याची चाल मुळींच आवडत नाहीं व आपल्या पत्नीस नृत्य शिकवून त्यापासून करमणूक करून घेण्याइतके विषयीं पुरुष थोडेच असतील त्या अर्थी नृत्य हा विषय शिक्षणांत अजीबात नसला तरी चालेल. चित्रकलेपासून स्वतःला आनंद आहे इतकेंच नव्हे तर इतरांसही त्याचा फायदा कोणताही अग्राह्यत्वाचा अंश त्यांतून येतां घेतां येतो. या करितां चित्रकला ही एक शिकण्यासारखी कला आहे. पण ती सर्वांस येण्यासारखी नसल्यामुळें ऐच्छिक विषयांत तिचा समावेश असावा. वरील तीन कलांशिवाय इतर ललित कला अनेक आहेत. पण त्याजविषयीं विशेष चर्चा कर-ण्याची जरूरी नाहीं, जशी सवड व शिक्षणसामुग्री असेल त्याप्रमाणें त्यांचा अंगीकार करणें आहे.

येथवर स्त्रीशिक्षणपद्धतीचा बहुतेक सर्व बाजूंनीं विचार झाला. फक्त दोन तीन कमी महत्वाच्या गोष्टींचा विचार करणें बाकी आहे. मुलींच्या शाळांतून होतां होईल तो पावेतों स्त्रीशिक्षकिणी असाव्या हें बहुतेक सर्व ठिकाणीं ग्राह्य झालें आहे. त्यांत वरिष्ठ दर्जाच्या शाळांतून जर १२ वर्षांवरील मुली बहुतेक विवाह झालेल्या येणार आहेत तर

वरिष्ठ शाळांतून स्त्रीशिक्षकिणीच असल्या पाहिजेत. पण याशिवाय आणखी एक गोष्ट अशी आहे कीं, अशा शाळेंत एखादी युरोपिअन चांगली बाई शिक्षकीण मिळेल तर अवश्य ठेविली जावी. युरोपिअन लोकांत स्त्रीशिक्षण फार पुढें गेलें आहे इतकेंच नव्हे तर त्यांच्यांत टापटीप वेळेवर कामें करणें, कर्तव्यदक्षता, इत्यादि गुण अवर्णनीय व आपल्यास शिकण्यासारखे आहेत. ते अशा बाईच्या शिक्षणापासून आपल्या स्त्रियांस कांहीं अंशीं तरी प्राप्त होतील.

कन्याशाळांचीं गृहें फार चांगलीं असून ती हवाशीर ठिकाणीं असावीं व प्रत्येक शाळेला चांगल्या विस्ताराची थोडी बहुत अडोसा केलेली खेळाची जागा जोडलेली असावी. लहान कोंदट घरांत असलेलीं व खेळण्याची व्यवस्था अगदीं नसलेलीं कन्याशाळा नसेल तरी फार नुकसान होणार नाहीं. पण असल्या शाळेपासून मुलींचें व भावी प्रजेचें शारीरिक नुकसान आहे, हे पूर्वी केलेल्या विवेचनावरून स्पष्ट आहे.

या लेखांत लिहिलेल्या तत्वावर कन्याशाळा ( प्राथमिक व वरिष्ट प्रतीच्या ) कायम होण्यास या तत्वांस अनुसरून नवी क्रमिकपुस्तकें, निदान कांहीं कांहीं विषयांवर झालीं पाहिजेत. क्रमिकपुस्तकांवर शिक्षणाचा पुष्कळसा परिणाम अवलंबून असतो. चांगले विचार चांगल्या सुगमभाषेनें बुद्धीस व स्मरणशक्तीस त्रास पडणार नाहीं अशा रीतीनें लिहिलेले ज्या पुस्तकांत असतील तीं सर्व प्रकारें मान्य आहेत. विशेषतः लिहिणारांनीं हीं पुस्तकें कोणाकरिता

आहेत याचा विचार केला पाहिजे व वाचणाऱ्यांच्या शक्ती-प्रमाणें त्यांत विषयांची मांडणी केली पाहिजे.

ज्याअर्थी स्त्रीशिक्षणाचा मुख्य उद्देश मुलांनां लागणाऱ्या परीक्षा पास होणें हा नाहीं, ज्याअर्थी स्त्रीशिक्षणाचें फळ स्त्रियांस स्वतः उद्योग करून पोट भरतां यावें हें नाहीं, ज्याअर्थी कन्याशाळांची वार्षिक लेखी परीक्षा घेऊं असें आपण ठरविलें आहे त्याअर्थी सरकारानें खास चालविलेल्या प्राथमिक शाळांशिवाय इतर कन्याशाळेवर केवळ समाजानें कायम केलेल्या कमेटीचीच देखरेख असावी, सरकारी देखरेख असूं नये. प्रत्येक समाजाच्या सवडीप्रमाणें, गरजेप्रमाणें, त्यांतील रूढ असलेल्या आचारविचारांप्रमाणें त्यांनीं शिक्षणक्रम कायम करून शाळेंत शिक्षण पावत असलेल्या मुलींचें शिक्षण कसें चाललें आहे याची जाचणी करण्याकरितां योग्य व्यवस्था करावी.

वरील सर्व गोष्टींच्या विचारांवरून स्त्रीशिक्षणपद्धति कशी असावी व स्त्रियांस कोणकोणते विषय शिकवावे, इत्यादि गोष्टींविषयीं माझा अभिप्राय येणेंप्रमाणें आहे.

स्त्रीशिक्षणाचे एकंदर तीन वर्ग असावे; प्राथमिक शिक्षण उच्चशिक्षण आणि शास्त्रीय शिक्षण. यांतील पहिल्या वर्गातील शिक्षणानें आमच्या स्त्रियांस कुलवधूंचीं सर्व कृत्यें चांगल्या तऱ्हेनें बजविता यावीं असें तें असावें; व तें सर्व मुलींस अवश्य असावें. दुसऱ्या वर्गाचें शिक्षण फक्त ज्यांस बरेच दिवस शिक्षणांत घालविण्याची ऐपत आहे अशा प्रौढ संपन्न स्त्रियांकरितां असावें व त्यामुळें खात्यापित्या सुखी

लोकांच्या स्त्रिया चांगल्या सुशिक्षित होऊन संसाराच्या हर-एक कामांत उत्तम प्रकारची मदत व सल्लामसलत देण्याच्या योग्यतेच्या होतील असें असावें. तिसऱ्या वर्गाचें शिक्षण ज्या प्रौढ मुलींस व स्त्रियांस एकाद्या उपयुक्त कलेचें ज्ञान संपादन करण्याची अथवा एखाद्या धंद्यांत वाकब होण्याची इच्छा असेल त्यांत देण्याचें असावें. ह्या तिन्ही निरनिराळ्या तऱ्हेचें शिक्षण अनुक्रमें प्राथमिक शाळा हायस्कुलें, आणि कालेजे ( पाठशाळा ) अशा ठिकाणी द्यावें. हीं तिन्ही शिक्षणालयें अगदीं भिन्न असावी; त्यावरील शिक्षक वेग-वेगळे असावे व त्यांचा एकमेकांशीं कोणत्याही प्रकारें संबंध असूं नये. अशी भिन्न व्यवस्था असावी, असें ह्मण-ण्याची कारणें पुढें दिलेली आहेत.

## प्राथमिक शिक्षणशाळा.

ह्या शाळांत फक्त ७ पासून १२ वर्षांच्या वयाच्या मुली घ्याव्या. अति लहान वयांत शिक्षण देणें मला प्रशस्त वाटत नाहीं. कारण त्यापासून शरीरप्रकृति बिघडून मनुष्य दुर्बळ होतो. त्याचप्रमाणें अज्ञान मुली आणि प्रौढ मुली—ह्यांस अक्षयीं मिसळून राहूं दिलें असतां वाईट परिणाम होतील असें ही मला वाटतें. इतकेंच नाहीं, विवाहित आणि अविवाहित मुलींसही परस्पर समागमांत राहूं देऊं नये असें माझें मत आहे, व त्याप्रमाणें प्राथमिक शाळांत फक्त अविवाहित मुलींस मात्र घ्यावें असा नियम असावा असें मला वाटतें, परंतु ह्या देशांतील बालविवाहाची दुष्ट चाल त्या नियमाच्या पूर्ण आडवी येईल ह्यामुळें नाइलाज

आहे. तथापि बारा वर्षांच्या आंतील विवाहित मुली साधारणपणें अविवाहित स्थितींतच असतात असें ह्मटल्यास चालेल. व बारावर्षांच्या वरील वयाच्या मुलींस अशा शाळांत घेऊं नये इतकाच जरी नियम सध्यां केला तरी कार्य भागण्यासारखें आहे.

प्राथमिक शाळा भरण्याची वेळ सकाळीं ७ वाजल्यापासून ९ वाजेपर्यंत असावी व सायंकाळीं ३ पासून ५ वाजेपर्यंत असावी. मुलांच्या शाळांप्रमाणें मुलींची शाळाही ११ पासून ५ वाजेपर्यंत करणें मला इष्ट वाटत नाहीं. सतत पांच तास अभ्यास करण्याचे श्रम कोंवळ्या मुलींकडून होणें शक्य नाहीं. आपलें मुख्य जेवण बहुत करून दुपारीं ११।१२ वाजतां होतें व तें झाल्याबरोबर लागलेंच धांवत धांवत जाऊन पांच तास शाळेंत बसणें हें मुलींसच काय पण मुलांना आणि मोठ्या माणसांना देखील अपायकारक आहे, अगदीं लहान मुलींस तर दिवसांत चार वेळ जेवण्याची संवय असते. ह्याकरितां ज्या ज्या प्रांतांत जशी जशी सकाळच्या जेवणाची वेळ असेल त्याप्रमाणें त्या प्रांतांत मुलींच्या शाळेची सकाळची वेळ सोईस पडेल अशी ठरवावी, ह्मणजे ७ ते ९ ह्यांच्याऐवजी ८ ते १० असें केलें तरी चालेल. तसेंच संध्याकाळची वेळ उन्हाळ्यादिवसांत ४ पासून ६ ची करावी.

प्राथमिक शिक्षणाच्या शाळांतून होईल तितके करून स्त्रीशिक्षक ठेवावे हें चांगलें. परंतु निरनिराळ्या इयत्ताकरितां इतक्या शिक्षकिणी मिळण्याची पंचाईत असल्यास

पुरुष शिक्षक नेमण्यासही हरकत नाहीं. तसेंच मुख्य शिक्षकांची जागा सवड असल्यास स्त्रियांस अवश्य द्यावी.

अशा शाळांत पांच इयत्ता असाव्या; परंतु बुद्धिवान् मुलींस इतरांबरोबर रखडण्याचा प्रसंग न यावा ह्मणून सहा सहा महिन्यांनीं वर्ग बदलीत जावें. ह्याप्रमाणें ज्या मुलींचा ह्या शाळेंतील क्रम तीन किंवा चार वर्षांतच संपेल त्यांस रजा द्यावी किंवा वरिष्ट इयत्तेंत ठेवून इतर विषय शिकवावे. तथापि तिचें वय पुरें १२ वर्षांचें होई-पर्यंत ती योग्य असली तरीही तिला हायस्कुलांत घेऊं नये.

अशा प्राथमिक शिक्षण-शाळांत प्रत्येक स्त्रीस अवश्य आले पाहिजेत असेच विषय शिकवावे. सर्व मुलींस बालबोध व मोडी लिहितां येणें अवश्य आहे हें उघड आहे. तसेंच साधे हिशेब करणें, साधीं गाणीं ह्मणणें व साधारण प्रतीचें शिवणकाम हेंही त्यांस शिकवावें. हे सर्व विषय ह्या पांच इयत्तांत खालीं दिल्याप्रमाणें वांटून द्यावे.

**पहिली इयत्ता**—मूळाक्षरें व अंक.

**दुसरी इयत्ता**—बालबोध वाचन व लेखन—पाडे.

**तिसरी इयत्ता**—बालबोध वाचन व लेखन—बेरीज वजाबाकी.

**चवथी इयत्ता**—बालबोध व मोडी लेखन व वाचन, गुणाकार, भागाकार, साधे श्लोक ह्मणणें व साधे शिवणकाम.

**पांचवी इयत्ता**—लेखन, वाचन व व्याकरणाचे मुख्य नियम, त्रैराशिक, तोंडचे हिशेब, साधा जमाखर्च, बायकांची गाणीं ह्मणणें व शिवणकाम.

कांहीं स्त्रीशिक्षणेच्छु लोकांचे मतें प्रत्येक स्त्रीस मुलांच्या रोगपरीक्षेचें व त्यावरील औषधांचें व एकंदरीनें शिशुसंगोपनाचें ज्ञान असणें अवश्य आहे. परंतु हा विषय फार अवघड असल्यामुळें लहान मुलींच्या आटोक्या बाहेर आहे, आणि असें असूनही जर हट्टानें त्यांस तो शिकविला तर 'थोडें ज्ञान घातुक आहे' ह्या ह्मणीप्रमाणें आणि विशेषें करून औषधोपचारांत, त्यांच्या कोत्या ज्ञानाचे फार वाईट परिणाम होतील, सबब प्राथमिक शिक्षणांत हा विषय ठेविला नाहीं.

शिकविण्याचे रीतीसंबंधानें खालीं दिलेल्या गोष्टी अवश्य ध्यानांत ठेवण्यासारख्या आहेत.

१. लहानपणापासून स्मरणशक्ति वाढविणें फार फायद्याचें आहे. ह्यासाठीं वरच्या तीन इयत्तांत कविता तोंडपाठ ह्मणण्याचें योजिलें आहे. ह्या कविता ह्मणजे साधे श्लोक आणि गाणीं; तींही गवय्याचे पद्धतीप्रमाणें ह्मणण्याची जरूर नाहीं. साध्या सुरांत असलीं ह्मणजे पुरे. तसेंच हे श्लोक व हीं गाणीं मौजेची, उपयुक्त आणि नीतिपरिपूर्ण असावीं.

२. मुलींस व्याकरणाचें पुस्तक अथपासून इतिपर्यंत पाठ करावयास लावणें केवळ निरर्थक आहे. त्या कामाकडे

स्मरणशक्तीचा व्यय व्यर्थ करूं नये, व अशा पोपट विद्येनें विद्यार्थ्यास त्या विषयापासून फायदाही विशेष नाहीं. हा विषय त्यांस समजावून देण्याविषयीं मात्र शिक्षकानें झटावें व तो त्यांस सहज समजावा ह्मणून वरिष्ठइयत्तांत मात्र व्याकरण ठेविलें आहे.

३. शाळेंतील शिक्षणाखेरीज लहान मुलींस घरीं पाठ करण्यास धडे अगर लिहून काढण्यास लेख अगदीं देऊं नये. लहान मुलींचा व ( मुलांचाही ) सर्व काळ शिक्षणांत घालविणें व त्यांस खेळण्यास व करमणूक करण्यास फुरसत न देणें अहितकारक आहे, इत्यादि गोष्टी वर लिहिल्याच आहेत प्राथमिक शाळांत विद्यार्थ्यांनीं शाळेच्या वेळांतच शिकावें. शिक्षे दाखल घरीं कांहीं धडे दिले तर हरकत नाहीं.

४. मुलींस मराठी शब्दांस प्रतिशब्द सांगावयास शिकविणेंही निरर्थक होय, मी एका शाळेंत गेलों होतों तेथें मुलींस "घोडा ह्मणजे अश्व" असें शिकविलेलें आढळलें. शिक्षकानें फक्त इतकेंच लक्ष द्यावें कीं, शब्दाची यथार्थ कल्पना विद्यार्थ्यास आली आहे किंवा नाहीं; व ती आली नसल्यास शांतपणें त्यानें ती विद्यार्थ्याच्या मनांत भरवून द्यावी. जसजशा त्या प्रौढ होत जातात तसतशी त्यांची कल्पना वाढत जाते व गुरुस अथवा शिष्यास फारशी नड पडत नाहीं. जाडे जाडे संस्कृत शब्द अथवा इतर बिकट शब्द मुलींकडून पाठ करवून घेण्याची जरूरी नाहीं. फक्त पांचव्या इयत्तेंतील मुलींस मात्र कठीण शब्दांचा व वाक्यांचा अर्थ शिक्षकानें विचारावा.

९. वार्षिक किंवा सहामाहीं अशा लेखी परिक्षा ह्या शाळांत नसाव्या. प्राथमिक शिक्षण समाप्तीची एक परिक्षा (स्कूलफायनलप्रमाणें) शेवटीं ठेविली असतां चालेल. परंतु वर्षाचे वर्षास शाळेची चांचणी पाहणें अवश्य आहे व त्यांत मुलींची हुशारी तोंडच्या परिक्षेनें ठरवावी. बक्षिसें देणें तीं चांगल्या हजेरीबद्दल, चांगल्या वर्तणुकीबद्दल, चांगल्या गाण्याबद्दल, चांगल्या शारीरिक खेळाबद्दल वगैरे प्रत्येक गुणांस उत्तेजन येईल अशीं द्यावीं.

शारीरिक शिक्षणासंबंधानें आपल्या देशांतील मुलींचे खेळ व बिनखर्चाचे व जास्त इजा होण्याचा संभव नाहीं असे इंग्लिश खेळ अवश्य शिकवावे. हवेच्या मानाप्रमाणें सकाळीं अगर सायंकाळीं अशा प्रकारचे खेळ त्यांस शिक्षकांसमक्ष अर्धा तास खेळूं द्यावे. त्याबद्दल त्यांस कांहीं खाऊं देण्याचीही वहिवाट ठेवावी आणि सुखी आईबापांच्या मुलीं पासून ह्याकरितां काहीं फी घेत जावी.

## हायस्कुलें.

ह्यांत फक्त बारा वर्षांच्या वरील वयाच्या मुलींस घेत जावें. ज्यांचें प्राथमिक शिक्षण पुरें झालें आहे त्या हायस्कुलांत येण्यास योग्य आहेतच. व ज्यांचें प्राथमिक शिक्षण पुरें झालें नाहीं परंतु ज्या हायस्कुलांत घेण्यास योग्य आहेत ह्मणजे ज्यांस लिहितां वाचतां येतें, त्रैराशिकापर्यंत गणित येतें, त्यांसही अशा शाळांत घ्यावें.

हायस्कुल भरण्याची वेळ संध्याकाळीं १ पासून ४ पर्यंत किंवा २ पासून ५ पर्यंत असावी. ह्यांहून अगोदर किंवा

ह्यापेक्षां अधिक वेळपर्यंत हायस्कूल भरूं नये. कारण ह्या शाळा प्रौढ मुली व स्त्रियांकरितांच आहेत व हिंदुस्त्रियांस व प्रौढ मुलीस घरचें काम बरेंच करावयाचें असतें; चांगल्या संपन्न कुटुंबांतही हें घरकाम स्त्रियांनीं स्वतःच करण्याची चाल आहे, कारण ते चाकरावर हवालतां येत नाहीं. व मध्यम स्थितींतील स्त्रियांस तें करणें भाग पडतें, त्यामुळें इतर कोणतीही वेळ त्यांस सोयीवार पडणार नाही. त्यामुळें आमच्या मुलींस गृहकृत्यांत चांगली वाकबगारी येते व आरोग्य वाढतें. सुशिशित स्त्रियांस व कित्येक पुरुषांस देखील शिक्षणामुळें घरच्या कामाचा जो तिटकारा वाटतो त्याला हें चांगलें औषध असल्यामुळें त्या ज्यास्त उपयोगी होतील. ह्याचें सविस्तर वर्णन पूर्वी आलेंच आहे

हायस्कुलांतील शिक्षकांचें काम स्त्रियांकडेच असलें पाहिजे. बारावर्षांहून अधिक वयाच्या व विवाहित मुलींस पुरुष शिक्षकांचें हाताखालीं ठेवणें सुरक्षितपणाचें नाहीं. शिवाय हायस्कुलांतील शिक्षक स्त्रिया विवाहित असाव्या अथवा चांगल्या वर्तणुकीच्या पोक्त विधवा असाव्या, किंवा युरोपियन स्त्रिया असाव्या.

हायस्कुलांतील शिकविण्याच्या विषयांत अवश्य शिकण्याचे व इच्छेनुरूप शिकण्याचे असे दोन भेद असावे. सर्वगुण संपन्न सुशिक्षित स्त्री ह्मणवून घेण्यास जितके विषय शिकावे लागतील तितके प्रत्येकीनें शिकूं ह्मटल्यास अशक्य आहे. करितां प्रत्येकीनें आपल्या सामर्थ्यानुरूप आपणास आवडतील व साध्य असतील असे दोन किंवा तीन विषय घ्यावे.

ह्या ठिकाणीं जे विषय अवश्यक व विकल्पानें ठेवावे असें माझें मत आहे ते कोणते व किती शिकवावे, इतकेंच मात्र येथें दिलें आहे. याहून कमी जास्ती विषय सवडीनुसार किंवा समाजस्थितीप्रमाणें ठेवावे.

अवश्य शिकविण्याचे विषय.

१ मराठी किंवा दुसरी जी देशभाषा असले ती, तिचें व्याकरण, त्यांतील चांगल्या चांगल्या कवींची काव्यें; व निबंधलेखन, २ हिंदुस्थानचा इतिहास, ३ जगाच्या भूगोलाची ठोकळ माहिती, ४ संस्कृत ( भांडारकराचें १ लें व दुसरें पुस्तक व मुलीकरितां व स्त्रियां करितां संस्कृत पुस्तकांतून शोधून काढलेले वेंचे, ) ५ शिवणकाम, ६ लहान मुलांच्या रोगांची व त्यांवरील औषधाची व शिशुसंगोपनाची माहिती. ७ पाक. ८ गृहांतील व्यवस्था.

इच्छेप्रमाणें घेण्याचे विषय.

खालीं दिल्यापैकीं कोणतेही दोन प्रत्येकीनें शिकावे.

१ इंग्लिश, २ इंग्लंडचा इतिहास, ३ अंकगणित व बीजगणित ( वर्गसमीकरणांपर्यंत ) ४ भूमिति–पहिली २ पुस्तकें, ५ गाणें ( शास्त्राप्रमाणें ) ह्मणणें व वाजविणें, ६ चित्रकला व रंग देणें, ७ पदार्थविज्ञानशास्त्र.

ह्यांशिवाय आणखीही उपयुक्त व कौशल्याच्या कला सवडीनुसार ठेवाव्या.

हल्लीच्या पद्धतीप्रमाणें हायस्कुलांतील विद्यार्थी मुलींस मॅट्रिक्युलेसन परिक्षेस तयार करणें ठीक नाहीं व हायस्कुलां-

तील स्त्रीशिक्षणाची ही दिशा अगदीं चुकलेली आहे, असें वर दाखविलेंच आहे. सर्व स्त्रिया कामदार किंवा कायदेपंडित, अथवा तत्त्ववेत्या होण्याची जरूर नाहीं. तथापि हें ह्मणणें मध्यस्थितीच्या कुटुंबांतील स्त्रियांस एकंदरीनें अनुलक्षून आहे असें समजावें. ज्यांची स्थिति अनुकूल असेल, ज्यांची बुद्धि अचाट असेल, ज्यांस विद्याव्यासंगांत व दुसऱ्या अनेक कलांत व धंद्यांत पुरुषांशीं बरोबरी करण्याची हिंमत असेल अशा स्त्रियांनीं स्त्रियांच्या पाठशाळेंत अथवा पुरुषांच्या पाठशालांत जाऊन अभ्यास करावा.

हायस्कुलांत शारीरिक शिक्षण अवश्य असावें व त्याकरितां हायस्कुलांत कसरतीची व्यायाम सामुग्री व बिनखर्चाचे इंग्लिश खेळ शिकवण्याची साधनें आणून ठेवावीं.

हायस्कुलांतील विद्यार्थ्यांची दरसाल लेखी परीक्षा होऊं नये परंतु अखेरीस हायस्कूल शिक्षणसमाप्तीची एक परीक्षा ठेवावी. तरी दर वर्षास विद्यार्थ्यांची तोंडी परीक्षा घेऊन त्यांस बक्षिसें बांटावीं.

माझ्या मतानें वरील सुचविलेली हायस्कुलाची तजवीज अशा प्रकारची आहे कीं, जनानखान्यांतील व पडदपोशींतील स्त्रियांसही त्यांत जाण्यास हरकत नाहीं व त्याजकरितां जनानास्कूल अगर खासगी वर्ग काढण्याचीं आवश्यकता नाहीं. तथापि अब्रूदार व श्रीमंत लोकांची इच्छा आपल्या मुलींस व स्त्रियांस शाळेंत पाठविण्याची नसल्यास त्यांनीं आपल्या घरीं खासगी वर्ग काढावे. शिक्षणाचे विषय

मात्र त्यांनीं होईल तितकें करून हायस्कुलाप्रमाणेंच ठेवावे, त्यावरील शिक्षक स्त्रिया अति उत्तम वर्तणुकीच्या ठेवाव्या व त्यांवर हायस्कुलांतील मुख्य शिक्षकिणीची देखरेख असावी.

## कॉलेजें.

कालेजांत शिकविण्याची वेळ कोणती व किती असावी, त्यांतील विद्यार्थी व विषय कोणते असावे इत्यादि गोष्टींचा बारीक विचार करण्याची येथें जरूर नाहीं. कारण ह्या कालेजांची जरूर फार थोड्या स्त्रियांस असणार, त्यांची स्थिति साधारण स्त्रियांपेक्षां भिन्न असणार व त्यांस अधिक श्रम व खर्च करण्याचें सामर्थ्य असलेंच पाहिजे. तथापि वैद्यशास्त्र, शिशुसंगोपन, शिक्षकपणा हे गुण स्त्रियांत येण्याची जरूरी असल्यामुळें प्रत्येक संस्थानानें व प्रत्येक इलाख्यांत निदान एक किंवा अधिक स्त्रीकालेजें स्थापणें अगत्याचें आहे.

## शिक्षणगृहें.

प्राथमिक शिक्षणाच्या शाळा, हायस्कूलें, व कालेजें ह्यांचा एकमेकाशीं संबंध असूं नये, होण्यासारखें असल्यास तीं एकमेकांपासून दूर ठेवावीं हें चांगलें. त्यांतील शिक्षण वेगळें, शिक्षकांची तऱ्हाही वेगळी असणार. प्रत्येक प्राथमिक शाळेस व हायस्कुला सभोंवतालीं आवार असलेली अशी जागा जोडलेली असावी व त्यांतील भूमि खेळण्यासारखी तयार करावी. व कालेजांत तेथें राहणाऱ्या मुलींस व शिक्षकांस राहण्याची सोय केलेली असावी.

सदरील दिलेली स्त्रीशिक्षणपद्धति स्त्रीशिक्षणेच्छु सुधारकांस व जुन्या मताच्याही लोकांस पसंत पडेल व त्यांच्या इच्छेप्रमाणें स्त्रियांचा विनय व उपयोगीपणा कमी न होतां ह्या पद्धतीनें त्या चांगल्या सुशिक्षित होऊन आपल्या समाजास भूषण होतील असा अजमास आहे. वर वर्णन केल्याप्रमाणें किंवा त्याहून कमीजास्तीप्रमाणानें मूळ तत्वास अनुसरून एखादें हायस्कूल कायम होऊन स्त्रीशिक्षणाचा पाया किती दृढ होतो हें पाहण्याची मला फार इच्छा आहे, ती पुरी करण्याविषयीं परमेश्वराची प्रार्थना करून हा लेख व ही माला समाप्त करितों.

